ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ २१ वा.

# शिवपुराणवायवीयसंहिता

## उत्तरभाग.

हा

(महाराष्ट्र तात्पर्यासह)

वेदमूर्ति, मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं सोलापूर येथें

'श्रीदत्तप्रसाद' छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली प्रती १०००.

शके १८२७, सन १९०५.



किंमत २ रुपये.

# प्रस्तावना.

कालगतीनें सर्व जातींतल्या धर्मास जशी क्षीणदशा आलेली आहे, तदनुसार आमच्या या अनादिसिद्धवीरशैवधर्मासही क्षीणता आली आहे. अलीकडे अलीकडे अतिशय हीनस्थितीला पोहोंचलेल्या हिंदुस्थानवासी प्रत्येक पंथांतल्या लोकांना आपल्या निकृष्टावस्थेबद्दल अतिशय वाईट वाटत आहे. ह्मणूनच त्या त्या पंथांतले विचारी लोक आपल्या उर्जितावस्थेचे योग्य उपाय शोधीत आहेत. त्या अनेक उपायांपैकीं स्वधर्मोद्धाररूपी एक उपाय सर्वांस पसंत पडला आहे. वास्तविक स्वधर्माची जागृति झाल्याखेरीज आपला उदयकाल येत नाहीं हें मागच्या उदाहरणांवरून अनुभवसिद्ध झालें आहे. हें जाणून आमच्या या वीरशैवधर्माच्या जागृतीसाठीं आपल्या हातून होईल तेवढे प्रयत्न करावेत, अशा समजुतीनें लुप्तप्राय झालेल्या वीरशैवमतग्रंथांचा शोध करवून त्यांचें सुगम व सुरस भाषांतर करवून छापवून प्रसिद्ध करण्याचें दुस्तर काम "मशक पतंग" न्यायानें आह्मीं आपल्या शिरावर घेतलें आहे. श्रीपरशिवाच्या अमोघ अनुग्रहानें आजपर्यंत २० ग्रंथ बाहेर पडले आहेत त्याप्रमाणें सदरमालिकेंतला एकविसावा ग्रंथ हें शिवपुराण होय. यांत वीरशैवोपयोगीं अमोलिक विषय अनेक आहेत, त्यांपैकीं कांहींचें येथें दिग्दर्शन करतों. पशु, पति, पाश या त्रयीचें विवेचन उत्तम केलें आहे. तसेंच शिवागम व शिवागमज्ञान (इतर ज्ञानाला ज्ञान ह्मणूं नये). इष्टलिंग धारण, शिवोत्कृष्टत्व, देशिकपूजा, वीरशैव, वीरमाहेश्वरब्राह्मण, शिवभक्ति, शिवभक्तानें कर्म सोडलें तरी मुक्ति मिळतें, शिवरूप होऊन शिवपूजा करणें, देशिकाच्या आज्ञेनें शिवागमांचा स्वीकार करणें, त्यांचें पठन व श्रवण करणें, इष्टलिंगपूजा करणें, शिवोपासना, शक्त्युपासना, पूजालक्षण, गुरुलक्षण, शिष्यलक्षण, वगैरे महत्वाचे विषय आहेत एकूण १३९ विषय आहेत. शिवपुराणग्रंथ फार मोठा असल्यामुळें त्याचे दोन भाग केले आहेत, त्यांत हा २ रा भाग आहे. याचें भाषांतर शक्य तेवढ्या प्रयत्नानें

सुरस व सुगम करविलें आहे. यांत जे गुणदोष आढळतील, त्यांचा शोध करून सूज्ञ वाचकवर्ग कळवितील तर त्यांचे आभार मानून पुढच्या आवृत्तीच्या वेळेस सुधारणा करूं.

श्रीशिवपुराणाची छापील मूळप्रत घेऊन तिचें मराठी भाषांतर वे. मू. रा. रंगाचार्य शास्त्री मुधोळकर यांनीं केलें आहे.

प्रूफतपास रुजुवात वगैरे कामांत वे. मू. मल्लिकार्जुनशास्त्री जैनापूर व वे. मू. रा. रा. रंगाचार्य शास्त्री मुधोळकर यांनीं मदत केल्याबद्दल त्यांचे आह्मीं अभारी आहोंत.

सोलापूर,<br>ता. १।१२।१९०९. } मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री.

---

## विनंति.

उपर्युक्त अशा वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखितप्रति कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचेकडे पाठवून देण्याची मेहरबानी करावी; ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व पाठविणारांस धर्मोन्नतीच्या कामीं यथाशक्ति हातभार लावल्याचें श्रेयही मिळेल. त्या ग्रंथाचें काम संपतांच त्यांची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं. आपली मूळप्रत परत मिळेल किंवा नाहीं याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचेकडे ग्रंथ पाठविण्याचें करावें.

प्रसिद्धिकर्ता.

---

# शिवपुराण वायवीयसंहिता उत्तरभाग यांतील विषयानुक्रमणिका.

## अध्याय १ ला



## अध्याय २ रा.



## अध्याय ३ रा.



## अध्याय ४ था.



## अध्याय ५ वा.

### अध्याय ६ वा.



### अध्याय ७ वा.



### अध्याय ८ वा.



### अध्याय ९ वा.

## अध्याय १० वा.



## अध्याय ११ वा.



## अध्याय १२ वा.

## अध्याय १३ वा.

अध्याय १४ वा.



अध्याय १५ वा.



अध्याय १६ वा.



अध्याय १७ वा.



अध्याय १८ वा.

अध्याय १९ वा.



अध्याय २० वा.



अध्याय २१ वा.



अध्याय २२ वा.



अध्याय २३ वा.



अध्याय २४ वा.



अध्याय २५ वा.



अध्याय २६ वा.

## अध्याय २७ वा.



## अध्याय २८ वा.



## अध्याय २९ वा.



## अध्याय ३० वा.

## सदरहू १३५ विषयांमध्यें पुढें दिलेले हे विषयही आहेत.

१ "शिवागम ज्ञानासच ज्ञान ह्मणावें दुसऱ्या ज्ञानास ज्ञान ह्मणूं नये" अध्याय ११ पान ६४ श्लोक ४.

२ "इष्टलिंगधारण" अ० ११ पान ६३ श्लोक १ "शिवोत्कृष्टत्व" अ. १२ पा. ९० श्लो. १२७.

३ "देशिकपूजा" अ. १० पा. ५६ श्लो. २९.

४ "वीरमाहेश्वरब्राह्मण" (वीरशैवब्राह्मण) अ. २० पा. १७८ श्लो. ११८.

"शिवावर पूर्ण भाव ठेवणाऱ्या शिवभक्तांना चांद्रायण, प्राजापत्य, मासोपवास वगैरे व्रतें करण्याचें कारण नाहीं" अ. २० पा. १८० श्लो. १३०।१३१.

६ "शिवरूप होऊन शिवपूजा करणें" अ. १८ पा. १५६ श्लो. ८७।८८.

७ "देशिकाच्या आज्ञेनें शिवागमांचा स्वीकार करणें अ. १४ पा. ११९ श्लो. ७७.

८ "इष्टलिंगपूजा करणें" अ. ८ पा. ४ श्लो. ३७.

९ "श्रीपरशिवांनीं पार्वतीस शिवभक्तांवर अनुग्रह करण्याकरितां शिवागम सांगितले" अ. ८ पा. ४ श्लो. ३९.

१० माझ्याकरितां देह कृश केला असतां त्याला तप ह्मणावें, कृच्छ्रादि व्रताला तप ह्मणूं नये. पंचक्षराभ्यासाला, प्रणवाभ्यासालाच जप ह्मणावा, दुसऱ्या मंत्राच्या जपाला जप ह्मणूं नये. रुद्राध्यायाच्या अभ्यासालाच अभ्यास ह्मणावा, वेदाध्ययनाला अभ्यास ह्मणूं नये. अ. ११ पा. ६३।६४ श्लो. ९२।९३.

---

## मराठी शुद्धिपत्रक.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २९ | २० | त्यावस्तूचा | त्यावस्तूंचा |
| ३० | २७ | विश्वगुरू | विश्वगुरु |
| ३१ | १८ | अतल्यामुळें | असल्यामुळें |
| ३८ | १९ | अनातिशयत्वेन | अनतिशयत्वेन |
| ४० | २६ | वगेरे | वगैरे |
| ४९ | १९ | आहे | आहें |
| ५९ | २७ | मांर्गानें | मार्गानें |
| ६५ | २२ | भक्ति पर- | भक्तिपर- |
| ६७ | २७ | ब्राह्मणामध्यें | ब्राह्मणांमध्यें |
| ७१ | १५ | श्रेष्ठकर्मी | श्रेष्ठकर्मी |
| ७१ | ३१ | श्रेयः प्राप्तीचें | श्रेयःप्राप्तीचें |
| ७४ | १५ | समज | समज. |
| ८२ | १६ | गुरुपासून | गुरूपासून |
| ८४ | २७ | शिवाय | " शिवाय " |
| ८६ | १७ | माझी | माझीं |
| ८७ | २३ | सग्दुरूच्या | सद्गुरूच्या |
| ९३ | २९ | आंगरखा | आंगराखा |
| १२१ | २२ | अक्षेंर | अक्षरें |
| १२२ | २१ | अघ्वशु, | अघ्वशु- |
| १३९ | २७ | त्रिपुंडू | त्रिपुंड्र |
| १६५ | २९ | मृगी | मृग |
| १६८ | १७ | देवसिहित | देवीसहित |
| १७० | १९ | पूजासमयी | पूजासमयीं |
| १७२ | २७ | ढुसरें | दुसरें |
| १७७ | २७ | शिखरे | शिखरें |
| २१२ | १९ | शनैश्चर | शनैश्चर |

| | | | |
|---|---|---|---|
| २२१ | १६ | अशा | असा |
| २२२ | १४ | अशा | असा |
| २२४ | २९ | मी | मीं |
| २९० | २४ | कद्रूष | कद्रूष |
| २९१ | २८ | अशा | अशी |
| २९४ | १८ | पतिव्रतेप्रमाणें | पतिव्रतेप्रमाणें |
| २६९ | २६ | आहे | आहें |
| २७२ | १६ | लिंगच्यिा | लिंगीच्या |
| २७७ | १७ | भार्गानें | मार्गानें |
| २८६ | १२ | यांतलें | यांतला |
| ३०८ | २८ | योग्याभ्यास | योगाभ्यास |
| ३१९ | २७ | हकिकत | हकीकत |
| ३१९ | २१ | मी | मीं |



## संस्कृत शुद्धिपत्रक.

| पृष्ठाङ्काः | पंक्तिः | अशुद्धम् | शुद्धम् |
|---|---|---|---|
| २ | ६ | पादयन | पादयन् |
| ४ | ९ | कीर्त्ति | कीर्ति |
| ८ | २ | विभर्त्ति | विभर्ति |
| २८ | ३ | गर्भकारगृहद्वारं | गर्भकारागृहद्वारं |
| ७४ | ५ | अशक्यंविस्तरा | अशक्यं विस्तरा |
| ७६ | १२ | एतावत्तुशि | एतावत्तु शि |
| ९३ | २ | कनिष्ठाक्षरणी | कनिष्ठा क्षरणी |
| १२६ | ११ | भस्मनातिल | भस्मना तिल |
| १२८ | १० | मनुवृति | मनुवृत्ति |
| १२९ | १० | मृध्दत्य | मुध्दत्य |
| १४१ | १२ | सतां | स तां |
| १४८ | ५ | तोयेनरक्त | तोयेन रक्त |
| १४९ | ५ | त्रिपुंड् | त्रिपुंड्रं |
| १६० | ३ | शिवायैकथितस्य | शिवायै कथितस्य |
| १६९ | ६ | लिंगंवेर | लिंगं बेर |
| १७६ | ८ | भूषितम | भूषितम् |
| १७८ | १० | आढ्योवाथ | आढ्यो वाथ |
| २०५ | ९ | लेपनम | लेपनम् |
| २२६ | ६ | शियायाश्च | शिबायाश्च |
| २३३ | ९ | मंगलम | मंगलम् |
| २३४ | ८ | स्त थैवंगुण | स्तथैव गुण |
| २४४ | २ | कृष्णकर्मे | कृष्ण कर्मे |
| २४४ | ९ | ते नफल | तेन फल |
| २५० | ३ | कर्षणंद्विजः | कर्षणं द्विजः |
| २५१ | २ | कर्षणंतथा | कर्षणं तथा |
| २७४ | ६ | बद्धवैरो | बद्धवैरौ |

| | | | |
|---|---|---|---|
| २७८ | ९ | कांचास्य | कां चास्य |
| ,, | ११ | लिंगंचो | लिंगं चो |
| २७९ | ९ | त्पद्म मालिख्य | त्पद्ममालिख्य |
| २९० | ११ | अवांनय | अवाङ्नय |
| ३१९ | ८ | सर्नत्पूवा | सनत्पूर्वा |
| ,, | ८ | तदा ह्च | तदाह्च |
| ३२३ | ६ | तंच | तं च |

---

**चन्द्रपुरीसुमनोमनोल्हासिनीमुद्राक्षरशालामुद्रितपुस्तकस्य १२९ पृष्ठांके पद्मपुराणे उत्तरखंडे माघमाहात्म्ये षोडशोऽध्याये पतिव्रताधर्माः कथिताः**

**गुरूणां पुत्रमित्राणां बंधूनां कर्मकारिणी ॥ आश्रितानां च भृत्यानां दासीदासजनस्य च ॥३०॥ अतिथ्यभ्यागतानां च भिक्षुकाणां च लिंगिनाम् ॥ आसने भोजने दाने सन्माने प्रियभाषणे ॥३१॥ तत्तद्गुणानुसारेण प्राप्तकाले यथोचितम् ॥ दक्षया सर्वथा भाव्यं भार्यया गृहमुख्यया ॥३२॥**

---

चन्द्रपुरी सुमनोमनोल्हासिनी छापखान्यांत छापलेल्या पुस्तकांतील १२९ पृष्ठांकांत पद्मपुराण उत्तरखंडांतील माघ माहात्म्याच्या सोळाव्या अध्यायामधील पतिव्रतेचे धर्म.—

(३०) गुरु, मुलें, मित्र, यांचीं व यांच्या स्त्रियांचीं कामें पतिव्रतेनें दक्षतेनें केलीं पाहिजेत, लिंगधारी व आश्रित, नोकर, दाई, दास, (३१) इष्टलिंग धारण केलेले अतिथि, अभ्यागत, भिक्षुक यांना आसन देणें, भोजन घालणें, यांचा सन्मान करणें, यांच्याशीं गोड बोलणें या कामांत (३२) त्यांच्या त्यांच्या गुणांला अनुसरून योग्य वेळेस गृहमुख्य पतिव्रता बायकोनें दक्ष असलें पाहिजे.

---

# अथ श्रीशिवपुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागप्रारंभः

## अथ प्रथमोऽध्यायः

श्रीगणेशाय नमः ॥ ओं नमो भगवते वामदेवाय ॥ नमः शिवाय सोमाय सगणाय ससूनवे ॥ प्रधानपुरुषेशाय सर्गस्थित्यन्तहेतवे ॥ १ ॥ शक्तिरप्रतिघा यस्य ऐश्वर्य्यं चापि सर्वगम् ॥ स्वामित्वं च विभुत्वं च स्वभावं सम्प्रचक्षते ॥ २ ॥ तमजं विश्वकर्माणं शाश्वतं शिवमद्वयम् ॥ महादेवं महात्मानं व्रजामि शरणं शिवम् ॥ ३ ॥ धर्मक्षेत्रे महातीर्थे गङ्गाकालिन्दिसंगमे ॥ प्रयागे नैमिषारण्ये ब्रह्मलोकस्य वर्त्मनि ॥ ४ ॥ मुनयः शंसितात्मानः सत्यव्रतपरायणाः ॥ महौजसो महाभागा महासत्रं वितेनिरे ॥ ५ ॥ तत्र सत्रं समाकर्ण्य तेषामक्लिष्टकर्मणाम् ॥ साक्षात्सत्यवतीसूनोर्वेदव्यासस्य धीमतः ॥ ६ ॥ शिष्यो महात्मा मेधावी त्रिषु लोकेषु

---

श्रीगणेशायनमः ॥ अर्थ—ॐनमो भगवते वामदेवाय ( १ ) गणसहित उमासहित शिवाला नमस्कार असो. प्रधान पुरुषाचा जो प्रभु असून सृष्टि, स्थिति, संहार यांना जो कारण आहे, त्या शिवाला नमन असो. ( २ ) ज्याची शक्ति अप्रतिम ( कुंठित न होणारी ) असून ज्याचें ऐश्वर्य जिकडे तिकडे व्याप्त झालें आहे, व जो सर्वांचा स्वामी, विभु आहे. अशा त्याच्या स्वभावाला मोठमोठे विचक्षण वर्णन करतात. ( ३ ) त्या जन्मरहित विश्वकर्म्याला ( शिवाला ) नमन असो. जो शाश्वत असून द्वितीयरहित आहे, अशा शिवाला नमन असो. ज्याला महादेव ह्मणतात, व जो महात्मा आहे, त्या शिवाला मी शरण जातों. ( ४ ) जेथें गंगा यमुना संगम आहे, अतएव ज्याला महातीर्थ ह्मणतात, अशा पुण्यकर क्षेत्रांत, प्रयागक्षेत्रांत, नैमिषारण्यांत, ब्रह्मलोकांच्या रस्त्यांत ( एका क्षेत्रांत ) ( ५ ) सत्यव्रत करणारे, महात्मे, तेजस्वी, भाग्यशाली मुनि महासत्र करिते झाले. ( ६ ) उत्साहानें काम करणाऱ्या त्या मुनींच्या सत्राला ऐकून बुद्धिमान सत्यवतीचा मुलगा जो साक्षात व्यास, त्याचा ( ७ ) शिष्य ज्याला ह्मणतात. तो शिष्य असा होता कीं, महात्मा, बुद्धिमान्,

विश्रुतः ॥ पञ्चावयवयुक्तस्य वाक्यस्य गुणदोषवित् ॥ ७ ॥ उत्तरोत्तरवक्ता च ब्रुवतोऽपि बृहस्पतेः ॥ मधुरश्रवणानां च मनोज्ञपदपर्वणाम् ॥ ८ ॥ कथानां निपुणो वक्ता कालविन्नयवित्कविः ॥ आजगाम स तं देशं सूतः पौराणिकोत्तमः ॥ ९ ॥ तं दृष्ट्वा सूतमायांतं मुनयो हृष्टमानसाः ॥ तस्मै साम च पूजां च यथावत्प्रत्यपादयन ॥ १० ॥ प्रतिगृह्य स तां पूजां मुनिभिः प्रतिपादिताम् ॥ उद्दिष्टमासनं भेजे नियुक्तो युक्तमात्मनः ॥ ११ ॥ ततस्तत्संगमादेव मुनीनां भावितात्मनाम् ॥ सोत्कण्ठमभवच्चित्तं श्रोतुं पौराणिकीः कथाः ॥ १२॥ तदा तमनुकूलाभिर्वाग्भिः पूज्य महर्षयः ॥ अतीवाभिमुखं कृत्वा वचनश्चेदमब्रुवन् ॥ १३ ॥

ऋषय ऊचुः ॥ रोमहर्षण सर्वज्ञ भवान्वै भाग्यगौरवात् ॥ पुराणविद्यामखिलां व्यासात्प्रत्यक्षमीयिवान् ॥ १४ ॥ तस्मादाश्चर्यभूतानां कथानां त्वं हि भाजनम् ॥ रत्नानामुरुसाराणां रत्नाकर

---

त्रैलोक्यांत प्रसिद्ध झालेला, पांच अवयवांच्या वाक्याच्या गुणदोषाला जाणणारा, ( ८ ) बृहस्पतीप्रमाणें अधिक अधिक बोलणारा, सुंदर सुंदर पदांचा, वाक्यांचा, अक्षरांचा उपयोग करणारा ( ९) कथा सांगणारा, निपुण, काल जाणणारा, नीति जाणणारा, कवि पौराणिकांमध्यें श्रेष्ठ पौराणिक असा तो सूत त्या प्रदेशाला आला. ( १० ) तेथें येणाऱ्या त्या सूताला पाहून मुनिसंघाला मोठा आनंद झाला. नंतर सूत महामुनीची सर्वांनीं मिळून योग्य पूजा केली. ( ११ ) मुनींनीं केलेल्या पूजेला मान डोलावून आपल्याला योग्य अशा आसनावर त्यांच्याच प्रेरणेनें सूत बसला. ( १२ ) नियतचित्त मुनीश्वरांना सूताचा सहवास घडल्यामुळें त्यांच्या मनांत पौराणिक कथा ऐकाव्या, अशी उत्कंठा उत्पन्न झाली. ( १३ ) नंतर सर्व महर्षींनीं अनुकूलवाणीनें सूताची स्तुति करून त्याच्या समोर बसून ते बोलले.

ऋषि बोलतात—( १४ ) सूत, सूत, रोमहर्षण, भगवन्, तुझें भाग्य फार मोठें आहे ह्मणून व्यासापासून तुला सर्व पुराणांचें ज्ञान झालें. ( १५ ) अर्थात् सर्व बुधांचें माहेरघरच तूं आहेस, किंवा आश्चर्यकारक

इवार्णवः ॥ १५ ॥ यच्च भूतं च भव्यं च यच्चान्यद्वस्तु वर्तते ॥ न तवाविदितं किञ्चित्त्रिषु लोकेषु विद्यते ॥ १६ ॥ त्वमदृष्टवशादस्मद्दर्शनार्थमिहागतः ॥ अकुर्वन्किमपि श्रेयो न वृथा गन्तुमर्हसि ॥ १७ ॥ तस्माच्छ्रव्यतमं पुण्यं सत्कथाज्ञानसंहितम् ॥ अपवर्गफलैकान्तमनाचारबहिष्कृतम् ॥ १८ ॥ जगतः सृष्टिसंहारस्थितिहेतुप्रदर्शकम् ॥ वेदान्तसारसर्वस्वं पुराणं श्रावयाशु नः ॥ १९ ॥ एवमभ्यर्थितः सूतो मुनिभिर्वेदवादिभिः ॥ श्लक्ष्णां च न्यायसंयुक्तां प्रत्युवाच शुभां गिरम् ॥ २० ॥

सूत उवाच ॥ पूजितोऽनुगृहीतश्च भवद्भिरिति चोदितः ॥ कस्मात्सम्यङ् न विब्रूयां पुराणमृषिपूजितम् ॥ २१ ॥ अभिवन्द्य महादेवं देवीं स्कन्दं विनायकम् ॥ नन्दिनं च तथा साक्षाद्व्यासं

---

कथांचें पात्र तूं आहेस. पुष्कळ तेजस्वी रत्नांचा आश्रय जसा समुद्र आहे, त्याप्रमाणें तूं आहेस. ( १६ ) या त्रैलोक्यांत भूत, भविष्य, वर्तमान जें असेल, तें सर्व तुला माहीत आहे. तुला अमुक एक समजत नाहीं, अशी कोणतीहि वस्तु नाहीं. ( १७ ) आमच्या दैवयोगानें अकस्मात तुझा आह्मांला लाभ झाला. येथें आल्यासारखें कांहींतरी श्रेय आह्मांस न देतां तसेंच विनाकारण तूं येथून जाऊं नये, अशी आमची इच्छा आहे. ( १८ ) अर्थात् सुश्राव्य पुण्यकर कथा मोक्षाच्या उपयोगाला पडणारी अनाचार नसलेली अशी कोणती आहे ? ती कथा सांग. ( १९ ) आणि ती कथा अशी असावी कीं, तिच्यामध्यें जगाचा सृष्टिक्रम, पालनक्रम, संहारक्रम, हे असावेत, व त्यांचीं कारणें दिलीं असावींत, तो कथाभाग वेदांताचा सार असावा, अशा पुराणाला सांग. ( २० ) अशी प्रार्थना त्या वेदवादी मुनींनीं केल्याबरोबर सुंदर, नीतियुक्त अशी शुभ वाणी सूतानें सांगितली.

सूत बोलला—( २१ ) मुनिजनहो, तुह्मीं माझी पूजा केली, सत्कार केला, असें असून मी ऋषींना मान्य असें पुराण कां सांगणार नाहीं बरें ? ( २२ ) महादेवाला, स्कंदाला, देवीला, विनायकाला, नंदीला सत्यवती-

सत्यवतीसुतम् ॥ २२ ॥ वक्ष्यामि परमं पुण्यं पुराणं ब्रह्मसम्मितम् ॥ शिवज्ञानार्णवं साक्षाद्भुक्तिमुक्तिफलप्रदम् ॥ २३ ॥ शब्दार्थन्यायसंयुक्तैरागमार्थैर्विभूषितम् ॥ श्वेतकल्पे प्रसंगेन वायुना कथितं पुरा ॥ २४ ॥ विद्यास्थानानि सर्वाणि पुराणानुक्रमं तथा ॥ पुराणस्यास्य चोत्पत्तिं ब्रुवतो मे निबोधत ॥ २५ ॥ अङ्गानि वेदाश्चत्वारो मीमांसान्यायविस्तरः ॥ एतद्वः कथितं सर्वं कृष्णस्याक्लिष्टकर्मणः ॥ महर्षेर्ज्ञानलाभश्च पुत्रलाभश्च शङ्करात् ॥ २६ ॥ य इदं कीर्त्तयेन्नित्यं शृणुयाच्छ्रावयेत्तथा ॥ स विष्णोर्ज्ञानमासाद्य तेनैव सह मुच्यते ॥ २७ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे सूतर्षिसंवादो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---

सुत व्यासाला नमस्कार करून ( २३ ) वेदाच्या तुलनेला आलेल्या पुण्यकर पुराणाला सांगतों. तें असें आहे कीं, शिवज्ञानाचा समुद्रच कीं काय ? असें पुराण असून भोग मोक्ष या दोन फलांला देणारें आहे, ( २४ ) व शब्दार्थाच्या नियमाला अनुसरून असून आगमांतल्या अर्थांनीं अलंकृत झालें आहे. असें तें पुराण श्वेतकल्पांत पूर्वीं वायूनें सांगितलें होतें. तें तुह्मांला सांगतों. ( २५ ) सर्व विद्यास्थान, पुराणाचा अनुक्रम, पुराणाची उत्पत्ति इत्यादि सर्व सांगतों ऐका. ( २६ ) सहा अंगें ( शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष, छंदस ), चार वेद, मीमांसान्यायांचा विस्तार वगैरे सर्व तुह्मांस सांगितले, व श्रमाची पर्वा न बाळगितां कर्म करणाऱ्या कृष्णाला ( २७ ) महर्षीपासून ज्ञानलाभ कसा झाला ? व श्रीशिवापासून पुत्राचा लाभ कसा झाला ? इत्यादि कथा सांगितल्या आहेत. जो प्राणी याचें कीर्तन करितो, श्रवण करितो, श्रवण करवितो, ( २८ ) तो प्राणी विष्णूसारखा ज्ञानी होऊन मुक्त होतो.

याप्रमाणें शैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील सूतऋषिसंवादनांवाचा पहिला अध्याय संपला.

## अथ द्वितीयोऽध्यायः

ऋषय ऊचुः ॥ किं तत्पाशुपतं ज्ञानं कथं पशुपतिः शिवः ॥ कथं धौम्याग्रजः पृष्टः कृष्णेनाद्भुतकर्मणा ॥ १ ॥

वायुरुवाच ॥ पुरा साक्षान्महेशेन श्रीकण्ठाख्येन मन्दरे ॥ देव्यै देवेन कथितं ज्ञानं पाशुपतं परम् ॥ २ ॥ तदेव पृष्टं कृष्णेन विष्णुना विश्वयोनिना ॥ पशुत्वञ्च सुरादीनां पतित्वञ्च शिवस्य च ॥ ३ ॥ यथोपदिष्टं कृष्णाय मुनिनाप्युपमन्युना ॥ तथा समासतो वक्ष्ये तच्छृणुध्वमतन्द्रिताः ॥ ४ ॥ पुरोपमन्युमासीनं विष्णुः कृष्णवपुर्धरः ॥ प्रणिपत्य यथान्यायमिदं वचनमब्रवीत् ॥ ५ ॥

श्रीकृष्ण उवाच ॥ भगवञ्छ्रोतुमिच्छामि देव्यै देवेन भाषितम् ॥ दिव्यं पाशुपतं ज्ञानं विभूतिश्चास्य कृत्स्नशः ॥ ६ ॥ कथं पशुपतिर्देवः पशवः के प्रकीर्तिताः ॥ कैः पाशैस्ते निबध्यन्ते विमुच्यन्ते च

---

ऋषि बोलतात— ( १ ) पाशुपतज्ञान म्हणजे काय ? पशुपति शिव कसा आहे ? व अद्भुतकर्म करणाऱ्या कृष्णानें धौम्याच्या बंधूला ( उपमन्युऋषीला ) काय प्रश्न केला ?

वायु बोलला— ( २ ) पूर्वी मंदरपर्वतावर श्रीकंठाख्य महादेवानें पार्वतीला पाशुपतज्ञान सांगितलें होतें. ( ३ ) जगाच्या उत्पत्तीला कारण अशा विष्णूनें उपमन्युमहर्षीला त्याच ज्ञानाचा प्रश्न केला कीं, इतर सर्व देवांना पशुत्व कसें आलें आहे ? व शिवाला पतित्व कसें आलें ? ( ४ ) कृष्णाच्या या प्रश्नाला उपमन्युमुनीनें काय उत्तर दिलें ? तें संक्षेपानें सांगतों, आळस न आणतां सावधानानें ऐका. ( ५ ) पूर्वी कृष्णशरीर धारण केलेल्या विष्णूनें बसलेल्या उपमन्यूला नमस्कार केला, व तो विष्णु नीतीला अनुसरून बोलला.

श्रीकृष्ण बोलतो— ( ६ ) भगवन् उपमन्यो, देवीला ( पार्वतीला ) शिवानें जें सांगितलें, तें दिव्य पाशुपतज्ञान सांग व त्याच्या ( शिवाच्या ) विभूतीला ( गुणवर्णन ) सांग. सद्यः ऐकण्याची उत्कंठा झाली आहे. ( ७ ) श्रीशिव पशुपति कसा ? व पशु कोण ? कोणत्या पाशांनीं पशु

ते कथम् ॥ ७ ॥ इति सञ्चोदितः श्रीमानुपमन्युर्महामनाः ॥ प्रणम्य देवं देवीञ्च प्राह पृष्टो यथा तथा ॥ ८ ॥

उपमन्युरुवाच ॥ ब्रह्माद्याः स्थावरान्ताश्च देवदेवस्य शूलिनः ॥ पशवः परिकीर्त्यन्ते संसारवशवर्तिनः ॥९॥ तेषां पतित्वाद्देवेशः शिवः पशुपतिः स्मृतः ॥ मलमायादिभिः पाशैः स बध्नाति पशून्पतिः ॥१०॥ स एव मोचकस्तेषां भक्तानां समुपासितः ॥ चतुर्विंशतितत्वानि मायाकर्मगुणा अमी ॥ ११ ॥ विषया इति कथ्यन्ते पाशा जीवनिबन्धनाः ॥ ब्रह्मादिस्तम्बपर्य्यन्तान्पशून्बद्ध्वा महेश्वरः ॥ १२ ॥ पाशैरेतैः पतिर्देवः कार्यं कारयति स्वकम् ॥ तस्याज्ञया महेशस्य प्रकृतिः पुरुषोचिताम् ॥ १३ ॥ बुद्धिं प्रसूते सा बुद्धिरहंकारमहंकृतिः ॥ इन्द्रियाणि दशैकञ्च तन्मात्रापञ्चकं तथा ॥ १४ ॥ शास-

---

बांधिले जातात ? व ते पशु पुनः मुक्त कसे होतात. (८) असे प्रश्न करितांक्षणीं मोठ्या मनाचा उपमन्यु शिवपार्वतीला नमस्कार करून जसजसे त्याचे प्रश्न होते, तसतसे बोलला.

उपमन्यु बोलला— (९) ब्रह्मदेवापासून अखेर स्थावरापर्यंत सर्व देवादिदेव शूलीचे ( शिवाचे ) पशु होत. हे सर्व जीव संसाराच्या ताब्यांत राहिले आहेत. (१०) यांचा स्वामी शिव आहे, ह्मणून शिवाला पशुपति असें ह्मणतात. ह्मणूनच आणव, माया, कार्मिकमल या पाशांनीं सर्व पशूंना शिव बांधितो. (११) जेव्हां हे पशु त्याचे भक्त होऊन त्याची उपासना करितात, तेव्हां शिव सर्व पशूंना त्या पाशांपासून मुक्त करतो. चोवीस तत्वें, माया, कर्म, हे गुण (१२) यांना विषय अशी संज्ञा आहे, व जीवाला बांधावयाचे पाश ते हेच होत. या पाशांनीं ब्रह्मादिस्तंबापर्यंत सर्व पशूंना महेश्वर शिव बांधून टाकितो. (१३) देव शिव हा याच पाशाच्या योगानें आपलें कार्य ब्रह्मादि पशूंकडून करवून घेतो. त्या महेशाच्या आज्ञेनें प्रकृति ही पुरुषाला योग्य अशा (१४) बुद्धीला प्रसवते, ती बुद्धि अहंकाराला प्रसवते, त्या अहंकारापासून अकरा इंद्रियें व त्यांच्या पांच मात्रा उत्पन्न होतात. (१५) शुभ देणाऱ्या

नादेवदेवस्य शिवस्य शिवदायिनः ॥ तन्मात्राण्यपि तस्यैव शासनेन महीयसा ॥ १५ ॥ महाभूतान्यशेषाणि भावयन्त्यनुपूर्वशः ॥ ब्रह्मादीनां तृणान्तानां देहिनां देहसङ्गतिम् ॥ १६ ॥ महाभूतान्यशेषाणि जनयन्ति शिवाज्ञया ॥ अध्यवस्यति वै बुद्धिरहंकारोऽभिमन्यते ॥ १७ ॥ चित्तं चेतयते चापि मनः संकल्पयत्यपि ॥ श्रोत्रादीनि च गृह्णन्ति शब्दादीन्विषयान्पृथक् ॥ १८ ॥ स्वानेव नान्यान्देवस्य दिव्येनाज्ञाबलेन वै ॥ वागादीन्यपि यान्यासंस्तानि कर्मेन्द्रियाणि च ॥ १९ ॥ यथास्वं कर्म कुर्वन्ति नान्यत्किञ्चिच्छिवाज्ञया ॥ शब्दादयोऽपि गृह्यन्ते क्रियन्ते वचनादयः ॥ २० ॥ अविलङ्घ्या हि सर्वेषामाज्ञा शम्भोर्गरीयसी ॥ अवकाशमशेषाणां भूतानां सम्प्रयच्छति ॥ २१ ॥ आकाशः परमेशस्य शासनादेव

---

देवाधिदेव शिवाच्या आज्ञेनें हा सृष्टिक्रम होतो. तसेंच अहंकाराच्या पांच मात्राही ( रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द ) त्याच शिवाच्या पूज्य आज्ञेनें उत्पन्न होतात. ( १६ ) नंतर अनुक्रमानें पांच मात्रांपासून सर्व पंचमहाभूतें ( पृथ्वी, अप, तेज, वायु, आकाश ) उत्पन्न होतात. पुढें ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व जीवांना देहांचा संबंध ( १७ ) शिवाच्या आज्ञेनें हीं पांच महाभूतेंच करतात. नंतर बुद्धीच्या ठिकाणीं अहंकाराचा वास होतो, यामुळें देहावर अभिमान उत्पन्न होतो. ( १८ ) चित्त हें चेतवितें, मनांत संकल्प विकल्प होतात. श्रोत्रादि इंद्रियें निरनिराळ्या शब्दादि विषयांचें ग्रहण करतात. ( १९ ) नंतर शिवाच्या दिव्य आज्ञेच्या बळानें वाणी वगैरे विषय जे उत्पन्न झाले, त्यांचें ग्रहण कर्मेंद्रियें करतात. ( २० ) नंतर ज्यांचें कर्म जें असेल तेंच कर्म तीं इंद्रियें शिवाच्या आज्ञेनें न चुकतां बरोबर करतात, एकाचें कर्म एक कधींही करीत नाहींत, शिवाच्या आज्ञेनें तीं तीं इंद्रियें शब्दादि विषय घेतात व वचनादि विषय स्वीकारतात. ( २१ ) जगांतील सर्व लोक शंभूची श्रेष्ठ आज्ञा बरोबर पाळतात व त्याची आज्ञा मोडावयास कोणी समर्थ होत नाहीं. सर्व प्राण्यांना शंभूची आज्ञाच अवकाश देत्ये. ( २२ ) तें आकाश शिवाच्या आज्ञेनेंच सर्व ठिकाणीं व्याप्त झालें आहे. प्राणादि निरनिराळ्या नांवांनीं

सर्वगः ॥ प्राणाद्यैश्च तथा नामभेदैरन्तर्बहिर्जगत् ॥ २२ ॥ बिभर्त्ति सर्वं शर्वस्य शासने च प्रभञ्जनः ॥ हव्यं वहति देवानां कव्यं कव्याशिनामपि ॥ २३ ॥ पाकाद्यश्च करोत्यग्निः परमेश्वरशासनात् ॥ सञ्जीवनाद्यं सर्वस्य कुर्वन्त्यापस्तदाज्ञया ॥ २४ ॥ विश्वम्भरा जगन्नित्यं धत्ते विश्वेश्वराज्ञया ॥ देवान्पात्यसुरान्हन्ति त्रिलोकमभिरक्षति ॥ २५ ॥ आज्ञया तस्य देवेंद्रः सर्वैर्देवैरलंघ्यया ॥ जीवानां व्याधिभिः पीडां मृतानाञ्चैव यातनाम् ॥ २६ ॥ अधार्मिकाणां धर्मेशः करोति शिवशासनात् ॥ निर्ऋतिर्विधिहीनानां फलं हरति कर्मणाम् ॥ २७ ॥ निशाचराधिपत्यं च कुरुते शंकराज्ञया ॥ आधिपत्यमपां नित्यं कुरुते वरुणो मुने ॥ २८ ॥ पाशैर्बध्नाति वध्यांश्च परमेश्वरशासनात् ॥ ददाति नित्यं यक्षेन्द्रो द्रविणं द्रविणेश्वरः ॥२९॥ पुण्यानुरूपं भूतेभ्यः पुरुषस्यानुशासनात् ॥ करोति सम्पदः शश्व-

---

जगाच्या आंत बाहेर ( २३ ) शिवाच्या आज्ञेनें राहून सर्व जगाला वायु धारण करतो. देवांना हव्य देण्याचें कव्याशी पितरांना कव्य देण्याचें कर्म ( २४ ) शिवाच्या आज्ञेनें अग्नि करतो, पाकादि कर्मेंही करतो. त्याच शिवाच्या आज्ञेनें उदक हें सर्वांचें संजीवन होऊन राहिलें आहे. ( २५ ) विश्वेश्वराच्या आज्ञेनें पृथ्वी जगाला धारण करित्ये. देवाचें पालन असुराचा नाश करून त्रैलोक्याचें रक्षण करण्याचें काम ( २६ ) देवेंद्राकडे शिवाच्या अलंघ्य आज्ञेनेंच आलें आहे. ह्मणून इतर देवाच्या सहाय्यानें देवेंद्र हें कर्म करतो. जीवांना रोगादिकांची पीडा देणें, मृत प्राण्याला यातना देणें ( २७ ) धर्माविरुद्ध चालणाऱ्या लोकांना शिक्षा देणें हें काम शिवाच्या आज्ञेनें यमधर्म करतो. विधियुक्त कर्म जे करीत नाहींत, त्यांच्या कर्माच्या फळाचें हरण करण्याचें काम शिवाज्ञेनें निर्ऋति करतो, ( २८ ) व शंकराच्या आज्ञेनें राक्षसांचा राजा होऊन राज्य करतो. हे मुने, शिवाच्या आज्ञेनें उदकांचा अधिपति होऊन वरुण राज्य करतो, ( २९ ) व त्याच परमेश्वराच्या शासनानें वध्य लोकांना पाशांनीं बांधून टाकितो. यक्षांचा राजा कुबेर हा द्रव्याधिपति होऊन द्रव्य ( ३० ) ईश्वराज्ञेनें पुण्यवान लोकांना त्यांच्या पुण्यानुसार देतो, व शाश्वत

ज्ज्ञानं चैव सुमेधसाम् ॥ ३० ॥ निग्रहं चाप्यसाधूनामीशानः शिवशासनात् ॥ धत्ते तु धरणीं मूर्ध्ना शेषः शिवनियोगतः ॥ ३१ ॥ यामाहुस्तामसीं रौद्रीं मूर्तिमन्तकरीं हरेः ॥ सृजत्यशेषमीशस्य शासनाच्चतुराननः ॥ ३२ ॥ तिसृभिर्मूर्तिभिः स्वाभिः पाति चान्ते निहन्ति च ॥ विष्णुः पालयते विश्वं विश्वेश्वरनियोगतः ॥ ३३ ॥ सृजते ग्रसते चापि स्वकाभिस्तनुभिस्तथा ॥ हरत्यन्ते जगत्सर्वं हरस्तस्यैव शासनात् ॥ ३४ ॥ सृजत्यपि च विश्वात्मा त्रिधा भिन्नस्तु रक्षति ॥ कालः करोति सकलं कालः संहराति प्रजाः ॥३५॥ कालः पालयते विश्वं कालकालस्य शासनात् ॥ त्रिभिरंशैर्जगद्बिभ्रत्तेजोभिर्वृष्टिमादिशन् ॥ ३६ ॥ दिवि वर्षत्यसौ भानुर्देवदेवस्य शासनात् ॥ पुष्णात्योषधिजातानि भूतानि ह्लादयत्यपि ॥ ३७ ॥ देवैश्च पीयते चन्द्रश्चन्द्रभूषणशासनात् ॥ आदित्या वसवो रुद्रा

---

संपत्ति देतो, आणि बुद्धिमान लोकांना ज्ञान देतो. (३१) शिवाज्ञेनें दुष्ट लोकांना शिक्षा ईशान देतो. शिवाच्या आज्ञेनें शेष हा मस्तकावर पृथ्वीला धारण करतो. (३२) श्रीहरीच्या अंताला कारण झालेली, तामसी रौद्रीकला जिला ह्मणतात, त्या मूर्तीची सृष्टि व सर्व जगाची सृष्टि शिवाज्ञेनें ब्रह्मदेव करतो. (३३) आपल्याच तीन मूर्तींनीं सृष्टि, पालन, संहार हीं कर्में करतो. विश्वेश्वराच्या आज्ञेनें विष्णु जगाचें रक्षण करतो. (३४) हर हा शिवाच्या आज्ञेनें आपल्याच शरीरांनीं सृष्टि करतो, नाश करतो, प्रळयकाळीं जगाचा संहार करतो. (३५) विश्वव्यापी विश्वात्मा काल हा सृष्टि करतो, पुनः तीनप्रकारें स्वरूप घेऊन रक्षण करतो. शिवाज्ञेनें काल हा प्रजा उत्पन्न करतो, व प्रजा संहार करतो. (३६) कालाला काल अशा शिवाच्या आज्ञेनें काल हा जगाचें रक्षण करतो. तीन अंशांनीं जगाला धारण करून तेजाच्या योगानें वृष्टीला आज्ञा देत असून (३७) आकाशांत सूर्य हा शिवाज्ञेनें पाऊस पाडतो सर्व औषधींचें पोषण करतो, जगाला आल्हाद देतो. (३८) स्वतः देवांचा आहार होतो. (अमृतकलारूपानें देवांचा आहार समजावा) इतके अधिकार शिवाच्या आज्ञेनें चंद्राला मिळाले आहेत. आदित्य, वसु-

अश्विनौ मरुतस्तथा ॥ ३८ ॥ खेचरा ऋषयः सिद्धा भोगिनो मनुजा मृगाः॥ पशवः पक्षिणश्चैव कीटाद्याः स्थावराणि च ॥ ३९ ॥ नद्यः समुद्रा गिरयः काननानि सरांसि च ॥ वेदाः सांगाश्च शास्त्राणि मन्त्राः स्तोममखादयः ॥ ४० ॥ कालाग्न्यादिशिवान्तानि भुवनानि सहाधिपैः ॥ ब्रह्माण्डान्यप्यसंख्यानि तेषामावरणानि च ॥ ४१ ॥ वर्तमानान्यतीतानि भविष्यन्त्यपि कृत्स्नशः ॥ दिशश्च विदिशश्चैव कालभेदाः कलादयः ॥ ४२ ॥ यच्च किंचिज्जगत्यस्मिन्दृश्यते श्रूयतेऽपि वा ॥ तत्सर्वं शंकरस्याज्ञाबलेन समधिष्ठितम् ॥ ४३ ॥ आज्ञाबलात्तस्य धरा स्थितेह धराधरा वारिधराः समुद्राः ॥ ज्योतिर्गणाः शक्रमुखाश्च देवाः स्थिरं चरं वा चिदचिद्यदस्ति ॥ ४४ ॥
इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे पाशुपतज्ञाननिरूपणं नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

---

गण, रुद्र अश्विनीदेव, मरुद्गण, ( ३९ ) खेचर, ऋषि, सिद्ध, सर्प, मनुष्य, मृग, पशु, पाक्षि, कीट, स्थावर, ( ४० ) नद्या, समुद्र, पर्वत, अरण्य, सरोवर, वेद, वेदांग, शास्त्र, मंत्र, स्तोत्र, यज्ञयागादिक, ( ४१ ) कालाग्नीपासून शिवापर्यंत जितके लोक असतील, तितके लोक व या लोकांचे स्वामी, असंख्यात ब्रह्मांडें, त्यांचीं आवरणें, ( ४२ ) वर्तमान, भूत, भविष्य, सर्व दिशा, विदिशा, मुहूर्तादि कालाचे भेद, सर्व कला, ( ४३ ) याशिवाय जगांत जें दिसतें व जें ऐकिवांत आहे, तें सर्व श्रीशिवाच्या आज्ञेच्या बळानेंच राहिलें आहे. ( ४४ ) तात्पर्य हें कीं श्रीशिवाच्या आज्ञेनेंच ही पृथ्वी अस्तित्वांत आहे, व पर्वत आहेत, समुद्र आहेत, नक्षत्रगण आहे, इंद्रादिदेव आहेत, शिवाय स्थिरचर जें कांहीं असेल तें सर्व शिवाच्या आज्ञेनें राहिलें आहे असें समजावें.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील पाशुपतज्ञाननिरूपण नांवाचा दुसरा अध्याय संपला.

---

## अथ तृतीयोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ अत्याश्चर्यमिदं कृष्ण शम्भोरमितकर्मणः ॥ आज्ञाकृतं शृणुष्वैतच्छ्रुतं श्रुतिमुखे मया ॥ १ ॥ पुरा किल सुराः सेन्द्रा विवदन्तः परस्परम् ॥ असुरान्समरे जित्वा जेताहमहमित्युत ॥ २ ॥ तदा महेश्वरस्तेषां मध्यतोऽवरवेषधृक् ॥ स्वलक्षणैर्विहीनाङ्गः स्वयं यक्ष इवाभवत् ॥ ३ ॥ स तानाह सुरानेकं तृणमादाय भूतले ॥ य एतद्विकृतं कर्तुं क्षमेत स तु दैत्यजित् ॥ ४ ॥ यक्षस्य वचनं श्रुत्वा वज्रपाणिः शचीपतिः ॥ किञ्चित्क्रुद्धो विहस्यैनं तृणमादातुमुद्यतः ॥ ५ ॥ न तत्तृणमुपादातुं मनसापि च शक्यते ॥ यथा तथापि तच्छेत्तुं वज्रं वज्रधरोऽसृजत् ॥ ६ ॥ तद्वज्रं निजवज्रेण सं-

---

उपमन्यु बोलला— (१) कृष्णा, अपरिमित कर्मकरणाऱ्या शंभूचें अत्याश्चर्यकर काम तें केवळ शिवाच्या आज्ञेनेंच जें होतें. तें तुला सांगतों, वेदांत जसें वर्णन केलें आहे, तें मीं ऐकिलें आहे तेंच सांगतों. (२) पूर्वी देवासुरांची लढाई झाली, तेव्हां इंद्रादिदेवांमध्यें परस्पर असा वाद उत्पन्न झाला कीं दैत्यांचा पराभव मीं केला आहे, मीं केला आहे, असें जे ते ह्मणूं लागले. (३) त्याचवेळेस श्रीमहेश्वरानें अधम वेष घेऊन अवयवांच्या लक्षणांनीं हीन होऊन त्यांच्यामध्यें प्रवेश केला. त्यावेळेस साधारण एखाद्या यक्षाप्रमाणें दिसूं लागला. (४) तो यक्षवेषधारी शिव भूमीवरची गवताची एक काडी उचलून त्यांना बोलला. देवहो, आपसांमध्यें विनाकारण कां भांडतां ? मी एक युक्ति सांगतों ऐका. ही जमिनीवरची काडी कोण मोडतो, तो दैत्यांना जिंकणारा खरा. तर तुह्मांमध्यें कोण समर्थ असेल त्यानें हें काम करावें. (५) यक्षाचें हें वाक्य ऐकून शचीपति वज्रधारी इंद्राला किंचित राग आला, तथापि ती काडी घेण्याकरितां तो पुढें सरसावला. (६) तें तृण हातांत घेण्यास मनानेंसुद्धां तो समर्थ झाला नाहीं. तेव्हां त्याचा छेद करावयास वज्रधरानें (इंद्रानें) त्यावर वज्र सोडलें. (७) नंतर त्या वज्राचा आणि काडीचा संयोग जेव्हां झाला, तेव्हां तृणाच्या घर्षणानें वज्राचा अग्रभागच मोडून एकीकडे

सृष्टमिव सर्वतः ।। तृणेनाभिहतं तेन तिर्यगग्रं पपात ह ॥ ७ ॥ तथान्ये सुसंरब्धा लोकपाला महाबलाः ॥ ससृजुस्तृणमुद्दिश्य स्वायुधानि सहस्रशः ॥ ८॥ प्रजज्वाल महावह्निः प्रचण्डः पवनो ववौ ॥ प्रबुद्धोऽपांपतिर्यद्वत्प्रलये समुपस्थिते ॥ ९ ॥ एवं देवैः समारब्धं तृणमुद्दिश्य यत्नतः ।। व्यर्थमासीदहो कृष्ण यक्षस्याज्ञाबलेन वै ॥ १० ॥ तदाह यक्षं देवेन्द्रः को भवानित्यमर्षितः ॥ ततः स पश्यतामेव तेषामन्तरधीयत ॥ ११ ॥ तदन्तरे हैमवती देवी दिव्यविभूषणा ॥ आविरासीन्नभोरङ्गे शोभमाना शुचिस्मिता ॥ १२ ॥ तां दृष्ट्वा विस्मयाविष्टा देवाः शक्रपुरोगमाः ॥ प्रणम्य यक्षं पप्रच्छुः कोऽसौ यक्षो विलक्षणः ।। १३ ।। साब्रवीत्ससस्मितं देवी सयुष्माकमगोचरः ॥ तेनेदं भ्राम्यते चक्रं संसाराख्यं चराचरम् ।। १४ ॥

---

वांकडें होऊन वज्र खालीं पडलें. ( ८ ) नंतर मोठमोठे बलिष्ठ लोकपाल आपआपलें आयुध घेऊन संतापानें पुढें येऊन त्या तृणावर त्यांनीं आपल्या हजारो आयुधांचा उपयोग केला. ( ९ ) तेव्हां अग्नीचा मोठाच भडका उडाला. भयंकर सोसाट्याचा वारा सुटला. प्रलयकालाप्रमाणें उदकाचा स्वामी वरुण वर उचंबळून आला. ( १० ) याप्रमाणें त्या तृणाकरतां देवांनीं पुष्कळ प्रयत्न केले, तथापि त्यांचे ते यत्न यक्षवेषधारी शिवाच्या आज्ञेनें सर्व व्यर्थ झाले. ( ११ ) तेव्हां त्या यक्षाला इंद्रानें ह्मटलें कीं, तूं कोण आहेस ? असें ह्मणत असतां सर्व देव पाहत असतां तो यक्ष एकदम तेथेंच गुप्त झाला. ( १२ ) तितक्यांत हिमालयाची मुलगी देवी-पार्वती सर्वांगावर अलंकार घालून आकाशमंडपांत प्रकटली. व ती सुशोभित झालेली असून गालांतल्यागालांत हंसत होती. ( १३ ) तिला पाहून इंद्रप्रमुख देव आश्चर्यचकित झाले. नंतर तिला नमस्कार करून सर्वांनीं प्रश्न केला कीं, हे देवि, तो विलक्षण यक्ष कोण होता बरें ? ( १४ ) ती बोलली कीं देवहो, तो तुह्माला अगोचर ( न दिसणारा ) आहे, हें चराचर जगरूपी चक्र त्याच्यामुळेंच फिरतें.

तेनादौ क्रियते विश्वं तेन संह्रियते पुनः ॥ न तस्य नियमः कश्चि-
त्तेन सर्वं नियम्यते ॥ १५ ॥ इत्युक्त्वा सा महादेवी तत्रैवान्तरधी-
यत ॥ देवाश्च विस्मिताः सर्वे तां प्रणम्य दिवं ययुः ॥ १६ ॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे तृती-
योऽध्यायः ॥ ३ ॥

---

( १५ ) तोच विश्वाची सृष्टि करतो, तोच पुनः संहार करतो. त्याला
नियमन करणारा कोणी नसून तो मात्र सर्वांना शासन करतो. ( १६ )
असें बोलून ती देवी तेथेंच गुप्त झाली. देवही आश्चर्यचकित होऊन
तिला नमस्कार करून स्वर्गाला गेले.

याप्रमाणें शैवमहापुराणाच्या वायवीयसंहितेच्या उत्तरभागांतील तिसरा
अध्याय संपला.

---

## अथ चतुर्थोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ शृणु कृष्ण महेशस्य शिवस्य परमात्मनः ॥ मूर्त्यात्मभिस्ततं कृत्स्नं जगदेतच्चराचरम् ॥ १ ॥ स शिवः सर्वमेवेदं स्वकीयाभिश्च मूर्तिभिः ॥ अधितिष्ठत्यमेयात्मा यच्चात्सर्वस्ततः स्मृतः ॥२॥ ब्रह्मा विष्णुस्तथा रुद्रो महेशानः सदाशिवः ॥ मूर्तयस्तस्य विज्ञेया याभिर्विश्वमिदं ततम् ॥ ३ ॥ अथान्याश्चापि तनवः पञ्चब्रह्मसमाह्वयाः ॥ तनुभिस्ताभिरव्याप्तमिह किञ्चिन्न विद्यते ॥ ४ ॥ ईशानः पुरुषोऽघोरो वामः सद्यस्तथैव च ॥ ब्रह्माण्येतानि देवस्य मूर्तयः पञ्च विश्रुताः ॥ ५ ॥ ईशानाख्या तु या तस्य मूर्तिराद्या गरीयसी ॥ भोक्तारं प्रकृतेः साक्षात्क्षेत्रज्ञमधितिष्ठति ॥ ६ ॥ स्थाणोस्तत्पुरुषाख्या या मूर्तिर्मूर्तिमतः प्रभोः ॥ गुणाश्रयात्मकं भोग्यमव्यक्तमधितिष्ठति ॥ ७ ॥ धर्माद्यष्टाङ्गसंयुक्तं बुद्धितत्वं पिनाकिनः ॥ अधितिष्ठत्यघोराख्या मूर्तिरत्यन्तपूजिता ॥ ८ ॥ वामदेवाह्वया मूर्तिर्महादेवस्य वे-

---

उपमन्यु बोलला—( १ ) कृष्णा, परमात्मा, महेश शिवाच्या मूर्तींनीं हें सर्व चराचर जग व्याप्त झालें आहे. ( २ ) तो शिव आपल्या मूर्तींनीं या सर्व जगाला व्यापून अतर्क्य शरीराचा शिव तो सर्वत्र व्याप्त असल्यामुळें त्याला सर्व असें ह्मणतात. ( ३ ) ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईशान, सदाशिव इत्यादि शिवाच्या मूर्ती जाणाव्या. या मूर्तींनीं हें जग व्याप्त झालें आहे. ( ४ ) याशिवाय पंचब्रह्मनांवाचें दुसरें शरीरही आहे. या शरीरानें व्याप्त झालें नाहीं, असें एकही स्थल नाहीं. ( ५ ) ईशान, तत्पुरुष, अघोर, वामदेव, सद्योजात, अशीं हीं पंचब्रह्में होत. याच पांच मूर्ति जगांत विख्यात आहेत. ( ६ ) त्यांत ईशान नांवाची जी श्रेष्ठ मूर्ति आहे, ती आद्य असून प्रकृतीचा उपभोग घेणारा जो साक्षात क्षेत्रज्ञ आहे, त्याच्या आश्रयानें ती आद्यमूर्ति राहते. ( ७ ) शिवाची तत्पुरुषनांवाची जी मूर्ति आहे, ती मूर्ति गुणाश्रयात्मक ( गुणांचा आश्रयभूत ) भोग्य अशा अव्यक्त तत्वाच्या आश्रयानें राहते. ( ८ ) धर्मादि अष्ट अवयवांनीं युक्त अशा बुद्धितत्वाला ( शिवाच्या बुद्धितत्वाला ) आश्रय करून अत्यंत पूजित अशी अघोरानांवाची मूर्ति राहते. ( ९ ) महादेवाची वाम-

धसः ॥ अहंकृतेरधिष्ठात्रीमाहुरागमवेदिनः ॥ ९ ॥ सद्योजाताह्वया मूर्तिः शम्भोरमितवर्चसः ॥ मनसः समधिष्ठात्रीं मतिमन्तः प्रचक्षते ॥१०॥ श्रोत्रस्य वाचः शब्दस्य विभोर्व्योम्नस्तथैव च ॥ ईश्वरीमीश्वरस्यैव तामीशाख्यां विदुर्बुधाः ॥ ११ ॥ त्वक्पाणिस्पर्शवायूनामीश्वरीं मूर्तिमैश्वरीम् ॥ पुरुषाख्यां विदुः सर्वे पुराणार्थविशारदाः ॥ १२ ॥ चक्षुषश्चरणस्यापि रूपस्याग्नेस्तथैव च ॥ अघोराख्यामधिष्ठात्रीं मूर्तिमाहुर्मनीषिणः ॥१३॥ रसनायाश्च पायोश्च रसस्यापां तथैव च ॥ ईश्वरीं वामदेवाख्यां मूर्तिं तन्निरता विदुः ॥ १४ ॥ घ्राणस्य चैवोपस्थस्य गन्धस्य च भुवस्तथा ॥ सद्योजाताह्वयां मूर्तिमीश्वरीं सम्प्रचक्षते ॥ १५॥ मूर्तयः पञ्च देवस्य वन्दनीयाः प्रयत्नतः ॥ श्रेयोऽर्थिभिर्नरैर्नित्यं श्रेयसामेव हेतवः ॥ १६ ॥ तस्य देवाधिदेवस्य मूर्त्यष्टकमयं जगत् ॥ तस्मिन्व्याप्य स्थितं विश्वं सूत्रे मणिगणा इव ॥ १७ ॥ शर्वो भवस्तथा रुद्र उग्रो भीमः पशोः पतिः ॥ ईशानश्च

---

देवनांवाची जी मूर्ति आहे, ती मूर्ति वेधोरूपी ( चतुर्मुखरूपी ) अहंकार तत्वाच्या आश्रयाला राहते, असें आगम जाणणारे लोक ह्मणतात. (१०) सद्योजातनांवाची जी तेजस्वी शिवाची मूर्ति आहे, ती मूर्ति मनस्तत्वाच्या आश्रयाला राहते, असें बुद्धिमान लोक ह्मणतात. ( ११ ) श्रोत्रेंद्रिय, वागिंद्रिय, शब्द, आकाश यांचा जो स्वामी असेल, त्याच्यावरसुद्धां हिचा अधिकार आहे, ह्मणून या मूर्तीला ईशान असें पंडित ह्मणतात. ( १२ ) त्वचा, पाणी, स्पर्श, वायु यांच्यावर तत्पुरुष मूर्तीचा अधिकार आहे, असें पुराणवेत्ते लोक ह्मणतात. ( १३ ) चक्षु, चरण, रूप, अग्नि यांच्यावर अधिकार अघोर मूर्तीचा आहे, असें बुद्धिमान लोक ह्मणतात. ( १४ ) जिव्हा, वायु, रस, उदक यांच्यावर अधिकार वामदेवमूर्तीचा आहे, असें त्यांत विद्वान झालेले लोक ह्मणतात. ( १५ ) घ्राण, उपस्थ, गंध, भूमि यांच्यावर अधिकार सद्योजातमूर्तीचा आहे, असें सांगतात. ( १६ ) कल्याण इच्छा करणाऱ्यांनीं कल्याणाला कारणीभूत या पांच मूर्तींना निरंतर प्रयत्नपूर्वक नमस्कार करावेत. ( १७ ) देवाधिदेव शिवाच्या आठ मूर्ति ज्या आहेत, त्यांत हें जग दोरींतल्या मण्याप्रमाणें गोंवलें गेलें आहे. ( १८ ) शर्व, भव, रुद्र, उग्र, भीम, पशुपति, ईशान, महादेव अशा या

महादेवो मूर्तयश्चाष्ट विश्रुताः ॥ १८ ॥ भूम्यम्भोऽग्निमरुद्व्योमक्षेत्रज्ञा-र्कनिशाकराः ॥ अधिष्ठिता महेशस्य शर्वाद्यैरष्टमूर्तिभिः ॥ १९ ॥ चराचरात्मकं विश्वं धत्ते विश्वम्भरात्मिका ॥ शार्वी शर्वाव्हया मूर्तिरिति शास्त्रस्य निश्चयः ॥ २० ॥ सञ्जीवनं समस्तस्य जगतः सलिलात्मकम् ॥ भव इत्युच्यते मूर्तिर्भवस्य परमात्मनः ॥ २१ ॥ बहिरन्तर्जगद्विश्वं व्याप्य तेजोमयी शुभा ॥ रौद्री रुद्राव्हया मूर्तिरास्थिता घोररूपिणी ॥ २२ ॥ स्पन्दयन्पवनो विश्वं बिभर्ति स्पन्दते स्वयम् ॥ उग्र इत्युच्यते सद्भिर्मूर्तिरुग्रस्य वेधसः ॥ २३ ॥ सर्वावकाशदा सर्वव्यापिका गगनात्मिका ॥ मूर्तिर्भीमस्य भीमाख्या भूतवृन्दस्य भेदिका ॥ २४ ॥ सर्वात्मनामधिष्ठात्री सर्वक्षेत्रनिवासिनाम् ॥ मूर्तिः पशुपतेर्ज्ञेया पशुपाशनिकृन्तनी ॥ २५ ॥ दीपयन्ती जगत्सर्वं दिवाकरसमाव्हया ॥ ईशानाख्या महेशस्य मूर्तिर्दिवि वि-

---

आठ मूर्ति शिवाच्या होत. ( १९ ) भूमि, उदक, अग्नि, वायु, आकाश, क्षेत्रज्ञ, अर्क, चंद्र यांच्यामध्यें महेशशर्वाच्या आठ मूर्ति व्याप्त होऊन राहिल्या आहेत. ( २० ) शर्वाची शर्वनांवाची मूर्ति चराचर जगाला विश्वंभर स्वरूपानें ( पृथ्वीच्या रूपानें ) धारण करिते. असा शास्त्राचा निश्चय आहे. ( २१ ) सर्व जगाचें उपजीवन जें उदक आहे, त्यांत भवाची भवनांवाची मूर्ति आहे असें ह्मणतात. ( २२ ) जगाच्या आंत बाहेर व्याप्त होऊन रुद्राची रुद्रनांवाची मूर्ति आहे, असें सांगतात. परंतु ती मूर्ति फार तेजोमय असून भयंकर स्वरूपानें राहते असें ह्मणतात. ( २३ ) जगाला चलनवलनाची कृति देऊन या जगाला वायु धारण करतो, व स्वतः चलनवलन पावतो. त्या वायूच्या स्वरूपांत उग्राची उग्रनांवाची मूर्ति राहते, असें ह्मणतात. ( २४ ) सर्वांना अवकाश देणारी, सर्वांत व्याप्त होऊन राहिलेली, गगनरूप भीमनांवाची शिवाची मूर्ति भूतांमध्यें ( प्राण्यांमध्यें ) आकाशरूपानें राहिली, असें ह्मणतात. ( २५ ) सर्व क्षेत्रांत ( देहांत ) वास करणाऱ्या सर्व जगाच्या आश्रयानें राहणारी पशुपतीची मूर्ति पशूंच्या पाशाला तोडणारी आहे, असें जाणावें. ( २६ ) सर्व जगाला प्रकाश देणारी दिवाकर नांवाची शिवाची ईशानाख्यमूर्ति

**सर्पेति ॥ २६ ॥ आप्यायति यो विश्वममृतांशुर्निशाकरः ॥ महादेवस्य सा मूर्तिर्महादेवसमाव्हया ॥ २७ ॥ आत्मनश्चाष्टमी मूर्तिः शिवस्य परमात्मनः ॥ व्यापिकेतरमूर्तीनां विश्वं तस्माच्छिवात्मकम् ॥ २८ ॥ वृक्षमूलस्य सेकेन शाखाः पुष्यन्ति वै यथा ॥ शिवस्य पूजया तद्वत्पुष्यत्यस्य वपुर्जगत् ॥ २९ ॥ सर्वाभयप्रदानञ्च सर्वानुग्रहणं तथा ॥ सर्वोपकारकरणं शिवस्याराधनं विदुः ॥ ३० ॥ यथेह पुत्रपौत्रादेः प्रीत्या प्रीतो भवेत्पिता ॥ तथा सर्वस्य सम्प्रीत्या प्रीतो भवति शङ्करः ॥ ३१ ॥ देहिनो यस्य कस्यापि क्रियते यदि निग्रहः ॥ अनिष्टमष्टमूर्तेस्तत्कृतमेव न संशयः ॥३२॥ अष्टमूर्त्यात्मना विश्वमधिष्ठाय स्थितं शिवम् ॥ भजस्व सर्वभावेन रुद्रं परमकारणम् ॥३३॥ इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे चतुर्थोऽध्यायः ॥४॥**

---

अंतरिक्षांत राहते, असें सांगतात. (२७) सर्व जगाला जो अमृत पाजतो, तो अमृतकिरणाचा चंद्र महादेवाच्या महादेव नांवाच्या मूर्तीनें व्याप्त झाला आहे, असें ह्मणतात. (२८) परमात्मा शिवाची आठवी मूर्ति जी आहे, ती मूर्ति इतर सर्व मूर्तींमध्यें व्याप्त होऊन राहिली आहे, ह्मणून हें जग शिवात्मक (शिवस्वरूप) आहे, असें ह्मणतात. (२९) एखाद्या झाडाच्या मुळाला पाणी घातलें असतां तें झाड जसें प्रफुल्लित होतें; तद्वत शिवाची पूजा निरंतर केली असतां शिवाचें शरीर जें जग आहे, त्याची अभिवृद्धि होते. (अर्थात या पूजेनें शिवाचा संतोष होतो.) (३०) चोहोंकडून अभय असणें, चोहोंकडून प्रसन्नता असणें, चोहोंकडे उपकार करणें, किंवा सर्वांना अभय देणें, सर्वांवर अनुग्रह करणें, सर्वांवर उपकार करणें हें सर्व शिवाच्या आराधनेचें फळ आहे असें जाणावें. (३१) मुलाबाळांवर प्रीति केली असतां त्या मुलांच्या बापाची प्रीति जशी आपल्यावर होते, त्याप्रमाणें सर्व जगावर प्रीति केली असतां श्रीशंकराची प्रीति आपल्यावर होते. (३२) जगांतल्या कोणत्याही प्राण्याला शासन केलें असतां तें अष्टमूर्ति शिवाचेंच अनिष्ट केल्याप्रमाणें आहे, असें जाणावें. (३३) अष्टमूर्ति शिवानें सर्व जग हें व्यापिलें गेलें आहे, ह्मणूनच सर्व भावानें परमकारण रुद्राचें भजन कर. याप्रमाणें श्रीशैवमहापुराणाच्या वायवीयसंहितेच्या उत्तरभागांतील चौथा अध्याय संपला.

## अथ पंचमोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ भगवन्परमेशस्य सर्वस्यामिततेजसः ॥ मूर्तिभि-
र्विश्वमेवेदं यथा व्याप्तं तथा श्रुतम् ॥१॥ अथैतज्ज्ञातुमिच्छामि याथा-
त्म्यं परमेशयोः ॥ स्त्रीपुम्भावात्मकश्चेदं ताभ्यां कथमधिष्ठितम् ॥२॥
उपमन्युरुवाच ॥ श्रीमद्विभूतिं शिवयोर्याथात्म्यञ्च समासतः ॥
वक्ष्ये तद्विस्तराद्वक्तुं भवेनापि न शक्यते ॥ ३ ॥ शक्तिः साक्षान्मा-
हादेवी महादेवः स शक्तिमान् ॥ तयोर्विभूतिलेशो वै सर्वमेतच्चराच-
रम् ॥ ४ ॥ वस्तु किञ्चिदचिद्रूपं किञ्चिद्वस्तु चिदात्मकम् ॥ द्वयं शु-
द्धमशुद्धञ्च परञ्चापरमेव च ॥ ५ ॥ यत्संसरति चिच्चक्रमचिच्चक्रसम-
न्वितम् ॥ तदेवाशुद्धमपरमितरत्तु परं शुभम् ॥ ६ ॥ अपरञ्च पर-
ञ्चैव द्वयं चिदचिदात्मकम् ॥ शिवस्य च शिवायाश्च स्वात्म्यञ्चैतत्स्व-
भावतः ॥ ७ ॥ शिवयोर्वै वशं विश्वं न विश्वस्य वशे शिवौ ॥ ईशि-

---

श्रीकृष्ण ह्मणतात— ( १ ) भगवन् अपरिमिततेजस्वी परमेशाच्या मूर्तींनीं हें जग जसें व्याप्त झालें आहे, तें ऐकिलें, ( २ ) आतां शिवपार्वतीचें यथार्थरूप कसें आहे, तें सांग, आणि स्त्रीपुरुषरूपी जग हें शिवपार्वतीरूपांनीं कसें व्यापिलें गेलें आहे ? तें सांग.

उपमन्यु ह्मणतात— ( ३ ) कृष्णा, शिवपार्वतीचें रूप यथार्थरीतीनें संक्षेपानें वर्णन करतों, ऐक. तेंच विस्तारानें सांगावयास साक्षात शिवसुद्धां समर्थ होत नाहीं असें वाटतें. ( ४ ) शक्ति ही साक्षात महादेवी ( पार्वती ) होय. महादेव हा शक्तिमान् होय. त्या दोघांची अल्पविभूति ( किंचितरूप ) हें चराचर जग आहे. ( ५ ) त्यांत कांहीं अचिद्रूप आहे, ( अज्ञानरूप ) व कांहीं चिद्रूप ( ज्ञानरूप ) आहे. या दोनी रूपाला अशुद्ध, शुद्ध व अपर, पर अशी संज्ञा आहे. ( ६ ) यामध्यें चिद्रूप जें चक्र आहे, तें चक्र अचिद्रूप चक्रासहित जें फिरतें, त्याला अशुद्ध असें ह्मणतात. दुसऱ्याला शुद्धपर असें ह्मणतात. ( ७ ) चिदचिद्रूप परापर जग हें शिवाचें आणि भवानीचें स्वभावतः रूप आहे, असें ह्मणतात. ( ८ ) असें असून शिवपार्वतीच्या ताब्यांत हें जग आहे, आणि शिवपा-

तव्यमिदं यस्मात्तस्माद्विश्वेश्वरौ शिवौ ॥ ८ ॥ यथा शिवस्तथा देवी यथा देवी तथा शिवः॥ नानयोरन्तरं विद्याचन्द्रचन्द्रिकयोरिव ॥९॥ चन्द्रो न खलु भात्येष यथा चन्द्रिकया विना ॥ न भाति विद्यमानोऽपि तथा शक्त्या विना शिवः ॥ १० ॥ प्रभया हि विना यद्वद्भानुरेष न विद्यते॥प्रभा च भानुना तेन सुतरां तदपाश्रया ॥११॥ एवं परस्परापेक्षा शक्तिशक्तिमतोः स्थितिः ॥ न शिवेन विना शक्तिर्न शक्त्या च विना शिवः ॥१२॥ शक्तो यया शिवो नित्यं भुक्तौ मुक्तौ च देहिनाम् ॥ आद्या सैका परा शक्तिश्चिन्मयी शिवसंश्रया ॥ १३ ॥ यामाहुरखिलेशस्य तैस्तैरनुगुणैर्गुणैः ॥ समानधर्मिणीमेव शिवस्य परमात्मनः ॥ १४ ॥ सैका परा च चिद्रूपा शक्तिः प्रसवधर्मिणी ॥ विभज्य बहुधा विश्वं विदधाति शिवेच्छया ॥ १५ ॥

---

र्वती हे जगाच्या ताब्यांत नाहींत, असें ह्मणतात. ज्याअर्थी शिवाचा पार्वतीचा अधिकार या जगावर चालतो, त्याअर्थी ते दोघे विश्वेश्वर आहेत, असें सिद्ध झालें. (९) जसा शिव आहे, तशी पार्वती आहे व जशी देवी आहे, तसा देव आहे. या दोघांमध्यें चंद्र व चांदणें ( चंद्रज्योत्स्ना ) याच्याप्रमाणें कांहीं भेद नाहीं. (१०) चांदण्यावांचून चंद्र जसा शोभत नाहीं, त्याप्रमाणें शिव हा शक्तीवांचून शोभत नाहीं. (११) प्रभेवांचून सूर्य जसा असूं शकत नाहीं, व भानूवांचून प्रभा असूं शकत नाहीं, (१२) त्याप्रमाणें शिव आणि शक्ति या दोघांची स्थिति आहे, अर्थात् परस्पराची अपेक्षा परस्पराला आहे, असें झालें. ह्मणूनच शिवावांचून शक्ति, शक्तीवांचून शिव असूं शकत नाहीं. (१३) जी ज्याच्या जवळ आहे, ह्मणून भुक्ति मुक्ति प्राण्यांना देण्यास शिव समर्थ आहे. शिवाला आश्रय करून राहणारी चिन्मय शक्ति, ती आद्य असून तिलाच पराशक्ति असें ह्मणतात. (१४) अखिल जगाचा स्वामी जो शिव आहे, त्याच्या गुणाला अनुसरून शक्तीचे गुण आहेत, ह्मणून तिला परमात्मा शिवाची "समानधर्मिणी" असें ह्मणतात. (१५) ती चिद्रूप पराशक्ति प्रसवधर्मिणी आहे, ( बाळंतीण होण्याचा तिचा धर्मच आहे. ) ह्मणून ती एकटीच अनेकरूपानें विभक्त होऊन ( निरनिराळी होऊन ) शिवाच्या इच्छे-

सा मूलप्रकृतिर्माया त्रिगुणा त्रिविधा स्मृता ॥ शिवया च विपर्यस्तं यया ततमिदं जगत् ॥ १६ ॥ एकधा च द्विधा चैव तथा शतसहस्रधा ॥ शक्तयः खलु भिद्यन्ते बहुधा व्यवहारतः ॥ १७ ॥ शिवेच्छया परा शक्तिः शिवतत्त्वैकतां गता ॥ ततः परिस्फुरत्यादौ सर्गे तैलं तिलादिव ॥ १८ ॥ ततः क्रियाख्यया शक्त्या शक्तौ शक्तिमदुत्थया ॥ तस्यां विक्षोभ्यमाणायामादौ नादः समुद्बभौ ॥ १९ ॥ नादाद्विनिसृतो बिन्दुर्बिन्दोर्देवः सदाशिवः ॥ तस्मान्महेश्वरो जातः शुद्धा विद्या महेश्वरात् ॥२०॥ सा वाचामीश्वरी शक्तिर्वागीशाख्या हि शूलिनः ॥ या सा वर्णस्वरूपेण मातृकेति विजृम्भते ॥ २१ ॥ अथानन्तसमावेशान्माया कालमवासृजत् ॥ नियतिञ्च कलां विद्यां कलातो रागपूरुषौ ॥२२॥ मायातः पुनरेवाभूदव्यक्तं त्रिगुणात्म-

---

नें या जगाला धारण करिते. ( १६ ) तीच मूलप्रकृति मायारूपिणी होऊन तीनगुणांमुळें तीनरूपें ती ( इच्छा, क्रिया, ज्ञान ) घेते. त्या शक्तीनें विपर्यस्त झालेल्या या जगांत तीच शक्ति व्याप्त होऊन राहिली आहे. ( १७ ) एक, दोन, शंभर, हजार या प्रकारांनीं व्यवहाराला अनुसरून पुष्कळ तऱ्हेनें शक्ति निरनिराळ्या रूपांनीं पुष्कळ प्रकारांची होते. ( १८ ) शिवाच्या इच्छेनेंच शिवशक्ति शिवतत्वामध्यें ऐक्य पावली आहे. जेव्हां जगाची सृष्टि व्हावयाची वेळ येईल, तेव्हां तिळापासून तेल जसें प्रकट व्हावें, त्याप्रमाणें शक्ति अनेकरूपांनीं प्रकट होते. ( १९ ) शक्तिमान शिवापासून प्रादुर्भूत झालेल्या क्रियाख्यशक्तीनें ( क्रियानांवाच्या शक्तीनें ) शक्ति जेव्हां क्षुब्ध होईल, तेव्हां प्रथम शब्द उत्पन्न होतो. ( २० ) नंतर नादापासून बिंदूची उत्पत्ति होते, बिंदूपासून सदाशिव नांवाचा देव उत्पन्न होतो. त्याच्यापासून महेश्वर उत्पन्न होतो, महेश्वरापासून शुद्ध विद्या उत्पन्न होते. ( २१ ) ती शुद्धविद्या वाणीची स्वामिनी असून साक्षात शिवाची वागीशा नांवाची शक्ति ह्मणविते. तीच वर्णांच्या रूपानें मातृकाशक्ति अशी ह्मणविते. ( २२ ) नंतर अनंताच्या समावेशानें मायानांवाची शक्ति कालाची सृष्टि करिते व नियति, कला विद्या यांची सृष्टि करिते. कलेपासून राग, पुरुष हे दोघे उत्पन्न होतात. ( २३ ) मायाशक्तीपासून त्रिगुणस्वरूप अ-

कम् ॥ त्रिगुणाच्च ततो व्यक्ताद्विभक्ताः स्युस्त्रयो गुणाः ॥ २३ ॥ सत्वं रजस्तमश्चेति यैर्व्याप्तमखिलं जगत् ॥ गुणेभ्यः क्षोभ्यमाणेभ्यो गुणेशाख्यास्त्रिमूर्तयः ॥ २४ ॥ अभवन्महदादीनि तत्वानि च यथाक्रमम् ॥ तेभ्यः स्युरण्डपिण्डानि त्वसंख्यानि शिवाज्ञया ॥२५॥ अधिष्ठितान्यनन्ताद्यैर्विद्येशैश्चक्रवर्तिभिः ॥ शरीरान्तरभेदेन शक्तेर्भेदाः प्रकीर्तिताः ॥२६॥ नानारूपास्तु विज्ञेयाः स्थूलसूक्ष्मविभेदतः ॥ रुद्रस्य रौद्री सा शक्तिर्विष्णोर्वै वैष्णवी मता ॥२७॥ ब्रह्माणी ब्रह्मणः प्रोक्ता इन्द्रस्यैन्द्रीति कथ्यते ॥ किमत्र बहुनोक्तेन यद्विश्वमिति कीर्तितम् ॥२८॥ शक्त्यात्मनैव तद्व्याप्तं यथा देहोऽन्तरात्मना ॥ तस्माच्छक्तिमयं सर्वं जगत्स्थावरजङ्गमम् ॥२९॥ कलया परमा शक्तिः कथिता परमात्मनः ॥ एवमेषा परा शक्तिरीश्वरेच्छानुयायिनी ॥३०॥ स्थिरं चरश्च यद्विश्वं सृजतीति विनिश्चयः ॥ ज्ञानक्रियाचिकीर्षाभि-

---

व्यक्ततत्वाची सृष्टि होते, त्रिगुणरूप अव्यक्तापासून तीन गुण उत्पन्न होतात. ( २४ ) ते तीन गुण सत्व, रज, तम हेच होत. त्या गुणांनीं हें जग व्यापिलें गेलें आहे. नंतर गुण जेव्हां क्षुब्ध होतील, तेव्हां गुणेश नांवाच्या तीन मूर्ति उत्पन्न होतात. ( २५ ) नंतर क्रमानें महदादितत्वें झालीं, त्या तत्वांपासून शिवाच्या आज्ञेनें असंख्याक ब्रह्मांडें उत्पन्न होतात. ( २६ ) त्या ब्रह्मांडांमध्यें विद्याधिपति चक्रवर्ति अनंतादिमूर्ती व्याप्त होऊन राहिल्या आहेत. अन्य तन्हेच्या शरीरांच्या भेदांनीं शरीरांचे अनेक भेद आहेत. ( २७ ) स्थूल सूक्ष्म भेदांनीं शक्ति अनेक आहेत, असें समजावें. जशी रुद्राची शक्ति रौद्री, विष्णूची शक्ति वैष्णवी, ( २८ ) ब्रह्मदेवांची ब्रह्माणी, इंद्राची इंद्राणी अशा या शक्ति होत. फार सांगण्यांत काय अर्थ आहे ? सर्व जग शक्तिमय आहे, असें जाणावें. ( २९ ) जसा देह अंतरात्म्यानें व्याप्त झाला आहे, त्याप्रमाणें शक्तीनीं जग हें व्याप्त झालें आहे. ह्मणून स्थावरजंगमरूप जग हें शक्तिमय आहे, असें ह्मणतात. ( ३० ) परमात्मा शिवाच्या कलेनें पराशक्ति जशी सांगितली, त्याप्रमाणें पराशक्ति ही ईश्वराच्या इच्छेनें चालणारी आहे. ( ३१ ) तीच शक्ति स्थिरचर जगाची सृष्टि करिते असा निश्चय झाला आहे. ज्ञान, क्रिया, चिकीर्षा या तीन

स्तिसृभिः स्वात्मशक्तिभिः ॥३१॥ शक्तिमानीश्वरः शश्वद्विश्वं व्याप्याधितिष्ठति ॥ इदमित्थमिदं नेत्थं भवेदित्येवमात्मिका ॥३२॥ इच्छाशक्तिर्महेशस्य नित्या कार्यो नियामिका ॥ ज्ञानशक्तिस्तु तत्कार्यं कारणं करणं तथा ॥३३॥ प्रयोजनञ्च तत्वेन बुद्धिरूपाध्यवस्यति ॥ यथेप्सितं क्रियाशक्तिर्यथाध्यवसितं जगत् ॥३४॥ कल्पयत्यखिलं कार्यं क्षणात्सङ्कल्परूपिणी ॥ यथा शक्तित्रयोत्थानं शक्तिः प्रसवधर्मिणी ॥३५॥ शक्त्या परमया नुन्ना प्रसूते सकलं जगत् ॥ एवं शक्तिसमायोगाच्छक्तिमानुच्यते शिवः ॥३६॥ शक्तिशक्तिमदुत्थन्तु शाक्तं शैवमिदं जगत् ॥ यथा न जायते पुत्रः पितरं मातरं विना ॥३७॥ तथा भवं भवानीं च विना नैतच्चराचरम् ॥ स्त्रीपुंसप्रभवं विश्वं स्त्रीपुंसात्मकमेव च ॥३८॥ स्त्रीपुंसयोर्विभूतिश्च स्त्रीपुंसाभ्यामधिष्ठिता ॥ परमात्मा शिवः प्रोक्तः शिवा सा च प्रकीर्तिता ॥३९॥

---

आत्मशक्तींनीं ( ३२ ) ईश्वर हा शक्तिमान् असून निरंतर जगांत व्याप्त होऊन राहिला आहे. आणि "हें असें आहे, हें असें नाहीं" असें जें ईश्वराचें ह्मणणें आहे, ( ३३ ) त्यालाच महेशाची इच्छाशक्ति ह्मणतात. आणि नित्य असून कार्याला नियमन करणारी ज्ञानशक्ति ही जगरूप कार्य, कारण, करण, ( साधन ) ( ३४ ) प्रयोजन यांमध्यें बुद्धिरूप होऊन नेहमीं राहते. आणि इच्छाशक्तीला अनुसरून क्रियाशक्ति ही जगामध्यें राहते. ( ३५ ) संकल्परूपशक्ति एका क्षणामध्यें अखिल कार्याला करिते. तात्पर्य हें कीं, जसें शक्तित्रयाचें उत्थान ( प्रादुर्भाव ) होईल, तसें शक्ति प्रसवधर्मिणी ( प्रसवणारी ) होते. ( ३६ ) पराशक्तीनें अनेक तऱ्हेनें भिन्नहोणारी शक्ति जगाला प्रसवते. याप्रमाणें शक्तीचा संबंध झाल्यामुळें शिव हा शक्तिमान् झाला. ( ३७ ) शक्ति आणि शक्तिमान् यांनीं उत्पन्न झालेलें जग हें शाक्त असें ह्मणवतें. लोकांत आईबापावांचून मुलगा उत्पन्न होत नाहीं, ( ३८ ) तसें भव भवानीवांचून चराचर जगाची उत्पत्ति होत नाहीं. अर्थात् स्त्री आणि पुरुष यांपासून जग उत्पन्न झाल्यामुळें जग हें स्त्रीपुरुषात्मक झालें आहे. ( ३९ ) स्त्रीपुरुषांमध्यें स्त्रीपुरुषांची ( शिवपार्वतीची ) विभूति व्याप्त होऊन राहिली आहे. त्यांमध्यें पुरुष हा

शिवः सदाशिवः प्रोक्तः शिवा सा च मनोन्मनी ॥ शिवो महेश्वरो ज्ञेयः शिवा मायेति कथ्यते ॥ ४० ॥ पुरुषः परमेशानः प्रकृतिः परमेश्वरी ॥ रुद्रो महेश्वरः साक्षाद्रुद्राणी रुद्रवल्लभा ॥४१॥ विष्णु र्विश्वेश्वरो देवो लक्ष्मीर्विश्वेश्वरप्रिया ॥ ब्रह्मा ब्रह्मशिरोहर्ता ब्रह्माणी ब्रह्मणः प्रिया ॥ ४२ ॥ भास्करो भगवाञ्छम्भुः प्रभा भगवती शिवा ॥ महेन्द्रो मन्मथारातिः शची शैलेन्द्रकन्यका ॥४३॥ जातवेदा महादेवः स्वाहा शर्वार्धदेहिनी ॥ यमस्त्रियम्बको देवस्तत्प्रिया गिरिकन्यका ॥४४॥ निर्ऋतिर्भगवानीशो निर्ऋतिर्नगनन्दिनी ॥ वरुणो भगवान्रुद्रो गौरी गिरिवरात्मजा ॥४५॥ वालेन्दुशेखरो वायुः शिवा शिवमनोहरा ॥ यक्षो यज्ञशिरोहर्ता ऋद्धिर्हिमगिरिप्रजा ॥४६॥ चन्द्रार्धशेखरश्चन्द्रो रोहिणी रुद्रवल्लभा ॥ ईशानः परमेशानस्तद्भार्या परमेश्वरी ॥४७॥ अनन्तवलयोऽनन्तो ह्यनंतानन्तवल्लभा ॥ काला-

---

शिव असून स्त्री पार्वती आहे, असें समजावें. ( ४० ) आणि शिव हा सदाशिव असून पार्वती मनोन्मनी ( सदाशिवाची शक्ति ) आहे, असें समजावें. तसेंच शिव हा महेश्वर असून शिवा ही माया आहे, असें जाणावें. ( ४१ ) शिव हा पुरुष असून शिवा ही प्रकृति आहे. शिव हा रुद्र असून शिवा ही रुद्राणी आहे. ( ४२ ) विश्वेश्वर शिव हा विष्णु असून विश्वेश्वराची भार्या पार्वती ही लक्ष्मी आहे. ब्रह्मदेवाचें मस्तक तोडणारा शिव हा ब्रह्मा असून शिवा ही ब्रह्माणी आहे. ( ४३ ) भगवान शंभु हा भास्कर असून शिवा ही प्रभा आहे. मन्मथशत्रु शिव हा इंद्र असून हिमकन्या इंद्राणी आहे. ( ४४ ) महादेव हा अग्नि असून शिवा स्वाहा आहे. त्रियंवक हा यम असून गिरिकन्या यमाची शक्ति आहे. ( ४९ ) पूज्य शिव हा निर्ऋति असून त्याची शक्ति नगकन्या आहे. रुद्र हा वरुण असून गिरिपुत्री गौरी ( वरुणाची शक्ति ) आहे. ( ४६ ) चंद्रशेखर हा वायु असून पार्वती ही शिवा ( वायूची शक्ति ) आहे. यज्ञाचें डोकें उडविणारा शिव हा यक्ष असून हिमकन्या ऋद्धि आहे. ( ४७ ) चंद्रशेखर शिव हा चंद्र असून रुद्रप्रिया पार्वती रोहिणी आहे. शिव हा ईशान असून शिवा ही त्याची शक्ति आहे. (४८) शिव हा शेष असून शिवा ही अनंता आहे.

ग्निरुद्रः कालारिः काली कालान्तकप्रिया ॥ ४८ ॥ पुरुषाख्यो मनुः शम्भुः शतरूपा शिवप्रिया ॥ दक्षः साक्षान्महादेवः प्रसूतिः परमेश्वरी ॥४९॥ रुचिर्भवो भवानी च बुधैराकूतिरुच्यते ॥ भृगुर्भगाक्षहा देवः ख्यातिस्त्रिनयनप्रिया ॥५०॥ मरीचिर्भगवान्रुद्रः सम्भूतिः शर्ववल्लभा ॥ गंगाधरोऽगिरा ज्ञेयः स्मृतिः साक्षादुमा स्मृता ॥ ५१ ॥ पुलस्त्यः शशभृन्मौलिः प्रीतिः कान्ता पिनाकिनः ॥ पुलहस्त्रिपुरध्वंसी तत्प्रिया तु शिवप्रिया ॥५२॥ क्रतुध्वंसी क्रतुः प्रोक्ता सन्नतिर्दयिता विभोः ॥ त्रिनेत्रोऽत्रिरुमासाक्षादनसूया स्मृता बुधैः ॥५३॥ कश्यपः कालहा देवी देवमाता महेश्वरी ॥ वसिष्ठो मन्मथारातिर्देवी साक्षादरुन्धती ॥५४॥ शंकरः पुरुषाः सर्वे स्त्रियः सर्वा महेश्वरी ॥ सर्वे स्त्रीपुरुषास्तस्मात्तयोरेव विभूतयः ॥ ५५ ॥ विषयी भगवानीशो

---

कालारि शिव हा कालाग्निरुद्र असून कालांतकाची भार्या पार्वती ही काली आहे. ( ४९ ) शंभु हा पुरुषरूप स्वायंभुव मनु असून शिवप्रिया शतरूपा आहे. साक्षात् महादेव हा दक्ष असून शिवा ही प्रसूति आहे. ( ५० ) भव हा रुचिनांवाचा प्रजापति असून भवानी ही आकूति आहे. भगाचे डोळे काढणारा शिव हा भृगु असून भवानी ख्याति आहे. ( ५१ ) भगवान शिव हा मरीचि असून भवानी संभूति आहे. गंगाधर शिव हा अंगिरा असून उमा ही स्मृति आहे. ( ५२ ) चंद्रशेखर शिव हा पुलस्त्य असून शिवा ही प्रीति आहे. त्रिपुरशत्रु शिव हा पुलहऋषि असून शिवा त्याची भार्या होऊन राहिली आहे. ( ५३ ) शिव हा ऋतु असून उमा ही सन्नति आहे. त्रिनेत्र शिव हा अत्रि असून शिवा ही अनुसूया आहे, असें पंडित ह्मणतात. ( ५४ ) शिव हा कश्यप असून पार्वती ही अदिति आहे. शिव हा वसिष्ठ असून देवी पार्वती अरुंधती आहे. ( ५५ ) जगांत जितके पुरुष असतील तितके सर्व शंकररूप जाणावेत, आणि जितक्या स्त्रिया असतील तितक्या सर्व सतीरूप समजाव्या एकूण तात्पर्य हें कीं, स्त्रीपुरुष सर्व शंकरपार्वतीचे अंशभूत ( विभूति ) आहेत, असें समजावें. ( ५६ ) विषयोपभोग घेणारा भगवान शिव विषयी असून विषय सती आहे जगांत जि-

विषयः परमेश्वरी ॥ श्राव्यं सर्वमुमारूपं श्रोता शूलवरायुधः ॥५६॥ स्प्रष्टव्यं वस्तुजातन्तु धत्ते शंकरवल्लभा ॥ स्प्रष्टा स एव विश्वात्मा वालचन्द्रावतंसकः ॥५७॥ द्रष्टव्यं वस्तुरूपन्तु बिभर्ति भववल्लभा ॥ द्रष्टा विश्वेश्वरो देवः शशिखण्डशिखामणिः ॥५८॥ रसजातं महादेवी देवो रसयिता शिवः ॥ प्रियजातं च गिरिजा प्रीतश्चैव गराशनः ॥५९॥ मन्तव्यवस्तुतां धत्ते महादेवी महेश्वरी ॥ मन्ता स एव विश्वात्मा महादेवो महेश्वरः ॥६०॥ वोढव्यं वस्तुरूपन्तु बिभर्ति भववल्लभा ॥ देवः स एव भगवान्वोढा मुग्धेन्दुशेखरः ॥६१॥ प्राणः पिनाकी सर्वेषां प्राणिनां भगवान्प्रभुः ॥ प्राणस्थितिस्तु सर्वेषामम्बिका चाम्वुरूपिणी ॥६२॥ बिभर्ति क्षेत्रतां देवी त्रिपुरान्तकवल्लभा ॥ क्षेत्रज्ञत्वं तदा धत्ते भगवानन्तकान्तकः ॥६३॥ अहः शूलायुधो देवः शूलपाणिप्रिया निशा ॥ आकाशः शङ्करो देवः पृथिवी शंकरप्रिया ॥६४॥ समुद्रो भगवानीशो वेला शैलेन्द्रकन्यका ॥ वृक्षो वृषध्वजो

---

तकें श्राव्य असेल तितकें सर्व उमारूप आहे, श्रोता (ऐकणारा) त्रिशूलधारी शिव आहे. (५७) जगांत प्रश्न करावयास योग्य अशी जी वस्तु असेल ती उमारूप असून प्रश्न करणारा शिवरूप आहे. (५८) पहावयास योग्य तितक्या वस्तूंला उमा धारण करीत असून चंद्रशेखर शिव हा पाहणारा आहे, असें समजावें. (५९) रसपदार्थ सर्व देवी असून रसास्वाद घेणारा शिव आहे. प्रियवस्तु सर्व उमा असून त्यावस्तूचा उपभोग घेऊन संतुष्ट होणारा शिव आहे. (६०) मनन करावयास योग्य वस्तु उमा असून मनन करणारा विश्वात्मा परमेश्वर शिव आहे. (६१) वोढव्यवस्तूचें (वहावयास योग्य वस्तूचें) रूप उमा असून वोढा (वाहणारा) चंद्रशेखर शिव आहे. (६२) जगांतल्या सर्व प्राण्यांचे प्राण शिव असून सर्वांमध्यें प्राणांची स्थिति उदकरूप उमा आहे. (६३) त्रिपुरांतकाची भार्या उमा ही क्षेत्ररूप असून अंतकाला अंतक शिव हा क्षेत्रज्ञ आहे. (६४) शूलायुधधारण करणारा शिव हा दिवस असून त्याची बायको उमा ही रात्रि आहे. आकाश शंकराचें रूप असून पृथिवी शंकरभार्या उमा आहे. (६५) भगवान ईश हा समुद्र असून पार्वती ही काठ आहे. झाड शं-

देवो लता विश्वेश्वरप्रिया ॥६५॥ पुंलिङ्गमखिलं धत्ते भगवान्पुरशासनः ॥ स्त्रीलिङ्गं चाखिलं धत्ते देवी देवमनोरमा ॥६६॥ शब्दजालमशेषन्तु धत्ते शर्वस्य वल्लभा ॥ अर्थस्य रूपमखिलं धत्ते मुग्धेन्दुशेखरः ॥६७॥ यस्य यस्य पदार्थस्य या या शक्तिरुदाहृता ॥ सा सा विश्वेश्वरी देवी स स शर्वो महेश्वरः ॥६८॥ यत्परं यत्पवित्रञ्च यत्पुण्यं यच्च मङ्गलम् ॥ तत्तदाहुर्महाभागास्तयोस्तेजोविजृम्भितम् ॥६९॥ यथा दीपस्य दीप्तस्य शिखा दीपयते गृहम् ॥ तथा तेजस्तयोरेतद्व्याप्य दीपयते जगत् ॥७०॥ तृणादिशिवमूर्त्यंतं विश्वस्यातिशयक्रमः ॥ सन्निकर्षक्रमवशात्तयोरिति परा श्रुतिः ॥७१॥ सर्वाकारात्मकावेतौ सर्वश्रेयोविधायिनौ ॥ पूजनीयौ नमस्कार्यौ चिन्त-

---

काररूप असून वेल उमा आहे. ( ६६ ) जगांतलें सर्व पुरुषचिन्ह शिवाचें असून देवाच्या मनाला आनंद देणाऱ्या उमेचें रूप जगांतलें सर्व स्त्रीचिन्ह आहे, असें समजावें. ( ६७ ) जगांत जितके शब्द असतील तितके देवीचे रूप असून तितक्या शब्दांचे अर्थ शिवरूप आहेत, असें समजावें तात्पर्य हें कीं, शब्दाला देवी धारण करिते, आणि अर्थाला शिव धारण करितो. ( ६८ ) ज्या ज्या पदार्थाची जी जी शक्ति असेल ती ती शक्ति पार्वतीची आहे, असें समजावें. तो तो पदार्थ महेश्वर आहे, असें जाणावें. ( ६९ ) जगांत जें श्रेष्ठ असेल, जें पवित्र असेल, जें पुण्यकर असेल, जें मंगलकर असेल तें तें शिवपार्वती तेजोरूप आहे, असें मोठे भाग्यशाली लोक सांगतात. ( ७० ) दिव्याचा प्रकाश स्वच्छ पडला असतां ती दिव्याची ज्योत घराला जशी प्रकाशिते, त्याप्रमाणें शिवसतीचें तेज जगांत व्याप्त होऊन प्रकाशितें. ( ७१ ) गवताच्या काडीपासून शिवाच्या मूर्तीपर्यंत एकापेक्षां एकाचें तेज जें वाढत्या प्रमाणावर दिसतें, तसेंच क्रमानें शिवमूर्तीपासून गवताच्या काडीपर्यंत जें तेज उतरत्या प्रमाणावर दिसतें तें सर्व जगाचें तेज शिवसतीचेंच तेज आहे, असें श्रुति सांगते. ( ७२ ) हे दोघे ( शिव-पार्वती ) ज्या त्या आकारामध्यें असून ज्या त्या आकाराच्या श्रेयाला कारण होऊन राहिले आहेत. ह्मणूनच सर्वदा ते पूज्य व वंद्य आ-

नीयौ च सर्वदा ॥७२॥ यथाप्रज्ञमिदं कृष्ण याथात्म्यं परमेशयोः ॥ कथितं हि मया तेऽद्य न तु तावदियत्तया ॥ ७३ ॥ तत्कथं शक्यते वक्तुं याथात्म्यं परमेशयोः ॥ महतामपि सर्वेषां मनसोऽपि बहिर्गतम् ॥७४॥ अन्तर्गतमनन्यानामीश्वरार्पितचेतसाम् ॥ अन्येषां बुद्ध्यनारूढमारूढं वा तथैव तत् ॥ ७५॥ येयमुक्ता विभूतिर्वै प्राकृती सा परा मता ॥ अप्राकृतीं परामन्यां गुह्यां गुह्यविदो विदुः ॥७६॥ यतो वाचो निवर्तंते मनसा चेन्द्रियैः सह ॥ अप्राकृती परा सैषा विभूतिः पारमेश्वरी ॥७७॥ सैवेह परमं धाम सैवेह परमा गतिः ॥ सै-

---

हेत. आणि चिंत्य आहेत (पूजा, वंदन, चिंतन करावयास योग्य आहेत). ( ७३ ) अरे कृष्णा, माझ्या बुद्धीला अनुसरून जितकें सांगवेल, तितकें शिवपार्वतीचें यथार्थरूप मीं तुला सांगितलें. परंतु त्यांत अमुक एक इयत्ता त्या रूपाला नाहीं. ( ७४ ) त्या परमेशांचें माहात्म्य सर्व ( कांहीं न ठेवतां ) वर्णन करणें माझ्यानें कसें होईल बरें ? कारण जगांत जितके मोठे आहेत, त्या सर्वांच्या मनाबाहेरची गोष्ट होऊन ती राहिली आहे. ( ७५ ) शिवावांचून दुसऱ्या देवाला न भजणाऱ्या लोकांच्या अंतर्गत मनांत जें रूप ( शिवपार्वतीचें ) आहे, व शिवाच्याच ठिकाणीं सर्वस्वी मन ज्यांनीं वाहिलें आहे, व यांशिवाय जे असतील, त्यांपैकीं कांहीं लोकांच्या बुद्धींत तें रूप शिरलें आहे, ( कांहीं लोकांना कळलें आहे, ) व कांहीं लोकांच्या बुद्धींत मुळींच शिरलें नाहीं. ( कांहीं लोकांना मुळींच कळलें नाहीं. ) ( ७६ ) आतांपर्यंत जी विभूति ( रूप ) सांगितली, तिला प्राकृत विभूति ह्मणतात. आणि जी श्रेष्ठ अप्राकृत विभूति दुसरी आहे, तिला गुह्यज्ञानी जाणतात. कारण तीही गुप्त आहेच. ( ७७ ) जिच्यापासून ( अप्राकृत विभूतीपासून ) मन, इंद्रिय यांस जी वाणी परत फिरते, ( जी विभूति मनाला समजत नाहीं, इंद्रियाला गोचर होत नाहीं, व जिचें वर्णन वाणीनें करवत नाहीं. ) त्या परमेश्वराच्या श्रेष्ठ विभूतीला अप्राकृत विभूति ह्मणतात. ( ७८ ) त्या परमेश्वराची तीच विभूति श्रेष्ठ स्थान होय, तींच विभू-

वेह परमा काष्ठा विभूतिः परमेष्ठिनः ॥७८॥ तां प्राप्तुं प्रयतन्तेऽत्र जितश्वासा जितेन्द्रियाः ॥ गर्भकारगृहद्वारं निश्छिद्रं घटितं यथा ॥७९॥ संसाराशीविषालीढमृतसंजीवनौषधम् ॥ विभूतिं शिवयोर्विद्वान्न बिभेति कुतश्चन ॥८०॥ यः परामपराञ्चैव विभूतिं वेत्ति तत्वतः ॥ सोऽपरां भूतिमुल्लंघ्य परां भूतिं समश्नुते ॥८१॥ एतत्ते कथितं कृष्ण याथात्म्यं परमात्मनोः ॥ रहस्यमपि योग्योऽसि भवभक्तो भवानिति ॥८२॥ नाशिष्येभ्यः शठेभ्यो वा नाभक्तेभ्यः कदाचन ॥ व्याहरेदीदृशानर्थानिति वेदानुशासनम् ॥८३॥ तस्मात्त्वमपि कल्याणपरेभ्यः कथयेर्यदि ॥ त्वादृशेभ्योऽनुरूपेभ्यः कथयैतन्न चान्यथा ॥८४॥ विभूतिमेतां शिवयोर्योग्येभ्यो यः प्रदापयेत् ॥ संसारसागरा-

---

ति श्रेष्ठ गति होय, तीच विभूति ज्ञानी लोकांची श्रेष्ठ दिशा होय. (७९) ती विभूति प्राप्त करून घेण्याकरितां श्वासाला जिंकलेले, ( प्राणायाम करणारे ) जितेंद्रिय लोक यत्न करतात. कोठेंही अवकाश ( छिद्र ) नसलेल्या आपोआप बनलेल्या गर्भरूपी तुरंगांतून बाहेर येण्याकरितां गर्भवासी जीव जसे यत्न करतात, तसे हे योगी विभूति मिळविण्यास यत्न करतात. (८०) शिवपार्वतीच्या अशा विभूतीला जाणणारा जो विद्वान असेल, तो संसाररूपी कालकूट विषापासून मरणाऱ्या लोकांना " संजीवन " औषध ही विभूतीच आहे, असें समजून कोणासही भीत नाहीं. ( ८१ ) जो प्राणी श्रेष्ठ कनिष्ठ विभूतीला यथार्थरीतीनें जाणतो, तो प्राणी कनिष्ठ विभूतीला सोडून श्रेष्ठ विभूतीचा उपभोग घेतो. ( ८२ ) कृष्णा, शिवपार्वतीचें माहात्म्य गुह्य जरी आहे, तरी ( यथार्थ स्वरूप ) तुला सांगितलें. कारण शिवाचा मोठा भक्त तूं आहेस, अर्थात हें रहस्य समजून घ्यावयास योग्य आहेस. (८३) जो शिष्य नसेल, जो शठ असेल, जो अभक्त असेल, त्या प्राण्याला असला गुह्य अर्थ सांगूं नये, असें वेदाचें सांगणें आहे. ( ८४ ) अर्थात् तूं सुद्धां दुसऱ्याला जर सांगशील तर तुझ्याप्रमाणें जे योग्य असून या रहस्याला जे पात्र असतील त्यांनाच सांग. अभक्तांना मुळींच सांगूं नकोस. ( ८५ ) जो प्राणी या शिवपार्वतीच्या विभूतीला ( विभूतिज्ञानाला ) योग्य

न्मुक्तः शिवसायुज्यमाप्नुयात् ॥८५॥ कीर्तनादस्य नश्यंति महांतः पातकोत्तमाः ॥ त्रिश्चतुर्वासमभ्यस्ते विनश्यंति ततोऽधिकाः ॥८६॥ नश्यंत्यरिष्टरिपवो वर्द्धंते सुहृदस्तथा ॥ विद्या च वर्द्धते शैवी मतिः सत्ये प्रवर्तते ॥८७॥ भक्तिः परा शिवे साम्बे सानुगे सपरिच्छदे ॥ यद्यदिष्टतमं चान्यत्तत्तदाप्नोत्यसंशयम् ॥ ८८ ॥ अतः शुचिः शिवे भक्तो विश्रब्धः कीर्तयेद्यदि ॥ प्रबलैः कर्मभिः पूर्वैः फलं चेत्प्रतिबध्यते ॥ पुनः पुनः समभ्यस्येत्तस्य नास्तीह दुर्लभम् ॥८९॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे शिवतत्वकथनं नाम पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥

---

मनुष्यास देतो, तो प्राणी संसारसमुद्रांतून तरून शिव सायुज्याला पावतो. ( ८६ ) या विभूतीच्या कीर्तनानें मोठमोठालीं पातकें लयाला पावतात. तीनवार किंवा चारवार याचा अभ्यास केला असतां त्यापेक्षां अधिक पातकें नष्ट होतात. ( ८७ ) याच्या कीर्तनापासून मोठमोठीं अरिष्टें टळून शत्रु नष्ट होतात, व स्नेह्यांची अभिवृद्धि होते. आणि शिवसंबंधीं विद्या वाढून त्याची बुद्धि नेहमीं सत्याला अवलंबून असते. ( ८८ ) या विभूतीच्या कीर्तनानें अनुचर व परिवारसहित शिवाच्या ठिकाणीं भक्ति वाढते, आणि जें जें आपल्याला प्रिय असेल तें तें तत्काळ निःसंशयानें मिळतें. ( ८९ ) जो मनुष्य शुद्ध होऊन शिवाविषयीं भक्ति ठेवून विश्वासानें विभूतीचें कीर्तन करील, त्या मनुष्याचीं पूर्वकर्में कितीहीं प्रबळ असलीं, तथापि त्याच्या फळाला प्रतिबंधक होणार नाहींत. कदाचित् तीं कर्में त्याच्या फळाला प्रतिबंधक होतील, तर पुनः पुनः विभूति माहात्म्याचा अभ्यास करावा. अशा अभ्यासानें जगांतला कोणताही पदार्थ त्या प्राण्याला दुर्लभ होत नाहीं, व त्याचीं पूर्वकर्मेंही नष्ट होतात.

याप्रमाणें शैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागापैकीं शिवतत्वकथननांवाचा पांचवा अध्याय संपला.

## अथ षष्ठोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ विग्रहं देवदेवस्य विश्वमेतच्चराचरम् ॥ तदेव न विजानन्ति पशवः पाशगौरवात् ॥१॥ तमेकमेव बहुधा वदन्ति यदुनन्दन ॥ अजानन्तः परं भावमविकल्पं महर्षयः ॥२॥ अपरं ब्रह्मरूपञ्च परब्रह्मात्मकं तथा ॥ केचिदाहुर्महादेवमनादिनिधनं परम् ॥३॥ भूतेन्द्रियान्तःकरणप्रधानविषयात्मकम् ॥ अपरं ब्रह्म निर्दिष्टं परं ब्रह्म चिदात्मकम् ॥४॥ बृहत्त्वाद्बृंहणत्वाच्च परमित्यभिधीयते ॥ उभे ते ब्रह्मणो रूपे ब्रह्मणोऽधिपतेः प्रभोः ॥५॥ विद्याविद्यास्वरूपीति कैश्चिदीशो निगद्यते ॥ विद्येति चेतनां प्राहुस्तथाविद्यामचेतनाम् ॥६॥ विद्याविद्यात्मकश्चैव विश्वं विश्वगुरोर्विभोः ॥ रूपमेव न सन्देहो विश्वं तस्य वशे यतः ॥७॥ भ्रान्तिर्विद्यापरश्चेति शार्वं रूपं

---

उपमन्यु बोलतो— ( १ ) देवाधिदेव शिवाचें शरीर चराचर जग हें आहे अशा शरीराला पशु ( जीव ) पाशाच्या बंधामुळें जाणूं शकत नाहींत. ( २ ) हे यदुनंदना, कृष्णा, मोठमोठे ऋषिसुद्धां निर्विकल्प ( विकल्परहित ) परभावाला न जाणतां त्या एकट्या शिवाला अनेकत्व सांगतात. ( शिव परब्रह्मवस्तु एक असून अनेक आहे, असें ह्मणतात. ) (३) ज्याला आदि नाहीं, निधन ( मरण ) नाहीं, अशा श्रेष्ठ महादेवाला ब्रह्मस्वरूपात्मक दुसरें ( अपर ) ब्रह्मरूप आहे, असें कांहीं लोक ह्मणतात. ( ४ ) प्राणिमात्रांचे इंद्रिय, अंतःकरण, प्रधानतत्व इत्यादि विषयांमध्यें व्याप्त होऊन राहिलेल्या वस्तूला अपरब्रह्म असें ह्मणतात, आणि चिदात्मक ( आनंदरूप ) वस्तूला ( निष्कलवस्तूला ) परब्रह्म असें ह्मणतात. ( ५ ) जी वस्तु मोठी असून गुणपूर्ण आहे, अशा त्या वस्तूला परब्रह्म असें ह्मणतात. अपरब्रह्माचा अधिपति शिव जो आहे, त्या परब्रह्म वस्तूचीच हीं दोन्हीं रूपें आहेत, असें सांगतात. ( ६ ) विद्येचें अविद्येचें स्वरूप ज्याचें आहे, त्याला कांहीं लोक ईश असें ह्मणतात. विद्या ह्मणजे चेतनास्वरूप, व अविद्या ह्मणजे अचेतनास्वरूप आहे असें सांगतात. ( ७ ) चेतनाचेतनरूप हें सर्व जग विश्वगुरू शिवाचेंच रूप आहे, यांत संशय नाहीं. कारण ज्याच्या ताब्यांत हें जग आहे. ( ८ ) भ्रांति, विद्या, पर हीं तीन्हीं शंकराचीं रूपें आ-

परे विदुः ॥ अयथाबुद्धिरर्थेषु बहुधा भ्रान्तिरुच्यते ॥८॥ यथार्थाकारसंवित्तिर्विद्येति परिकीर्त्यते ॥ विकल्परहितं तत्वं परमित्यभिधीयते ॥९॥ तत्त्रयं शाङ्करं रूपं तदाज्ञाधिष्ठितं यतः ॥ सदसद्रूप इत्याहुः सदसत्पतिरित्यपि ॥१०॥ सत्ये साधौ च सच्छब्दः सद्भिरेव प्रयुज्यते ॥ विपरीते त्वसच्छब्दः कथ्यते वेदवादिभिः ॥११॥ सच्चासच्च जगद्विश्वं शरीरं परमेष्ठिनः ॥ यदिदं सदिति प्रोक्तं यच्चासदिति कथ्यते ॥१२॥ तयोः पतित्वाच्चु शिवः सदसत्पतिरुच्यते ॥ क्षराक्षरात्मकं प्राहुः क्षराक्षरपरं परे ॥१३॥ क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ उभे ते परमेशस्य रूपे तस्य वशे यतः ॥१४॥ तयोः परः शिवः शान्तः क्षराक्षरपरः स्मृतः ॥ समष्टिव्यष्टिरूपश्च स-

---

हेत, असें कांहीं लोक सांगतात. यांमध्यें भ्रांति ह्मणजे खऱ्या वस्तूच्या ठिकाणीं नानाप्रकारची मिथ्याबुद्धि जी होते, तिला ‘ भ्रांति ’ असें ह्मणतात. ( ९ ) खऱ्या वस्तूचें ज्ञान खरेपणानें होणें, याला ‘ विद्या ’ ह्मणतात. आणि विकल्परहित तत्वाला ‘ पर ’ असें ह्मणतात. ( १० ) हीं तीन्हीं शंकराचीं रूपें आहेत, असें ह्मणतात. कारण या शंकराच्या आज्ञेंतच हीं तीन रूपें आहेत कांहीं लोक सदसद्रूप किंवा सदसत्पति असेंही ह्मणतात. ( ११ ) सत्यवस्तूला साधुवस्तूला ( खऱ्या किंवा चांगल्या वस्तूला ) ‘ सत् ’ या शब्दाचा उपयोग सज्जन करतात, आणि जें खोटें असून वाईट असेल, त्याठिकाणीं ‘ असत् ’ या शब्दाचा उपयोग मोठे मोठे वेदज्ञ ( वेद जाणणारे ) करतात. ( १२ ) सद्रूप असद्रूप जग हें ईश्वराचें शरीर आहे. जें सत् आहे, आणि जें असत् आहे, ( ज्याला सत् ह्मणतात, आणि ज्याला असत् ह्मणतात, ) ( १३ ) यां दोंहोला शिव हा पति असल्यामुळें शिवाला सदसत्पति असें ह्मणतात, कांहीं लोक क्षराक्षरात्मक आणि क्षराक्षरपर असें ह्मणतात. ( १४ ) क्षर याचा अर्थ सर्व प्राणी असा होतो, आणि कूटस्थाला अक्षर असें ह्मणतात. हीं दोन्ही प्रभूच्या ताब्यांत असल्यामुळें हीं दोन्हीं शिवाचींच रूपें आहेत, असें ह्मणतात. ( १५ ) शांत, श्रेष्ठ असा शिव हा क्षराक्षरापलीकडे असल्यामुळें शिवाला क्षराक्षरपर असें ह्मणतात, आणि समष्टि व्यष्टिरूप शिव असून समष्टि व्यष्टिवस्तूला कारणही आहे, असें कांहीं

मष्टिव्यष्टिकारणम् ॥१५॥ वदन्ति मुनयः केचिच्छिवं परमकारणम् ॥ समष्टिमाहुरव्यक्तं व्यष्टिं व्यक्तं तथैव च ॥१६॥ ते रूपे परमेशस्य तदिच्छामनुवर्तनात् ॥ तयोः कारणभावेन शिवं परमकारणम् ॥१७॥ कारणार्थविदः प्राहुः समष्टिव्यष्टिकारणम् ॥ जातिव्यक्तिस्वरूपीति कथ्यते कैश्चिदीश्वरः ॥१८॥ यत्पिण्डेष्वनुवर्तेत सा जातिरिति कथ्यते ॥ व्यक्तिर्व्यावृत्तरूपं तत्पिण्डजाते समाश्रितम् ॥१९॥ जातयो- व्यक्तयश्चैव तदाज्ञापरिपालिताः ॥ यतस्ततो महादेवो जातिव्यक्ति- वपुः स्मृतः ॥२०॥ प्रधानपुरुषव्यक्तकालात्मा कथ्यते शिवः ॥ प्र- धानं प्रकृतिं प्राहुः क्षेत्रज्ञं पुरुषं तथा ॥२१॥ त्रयोविंशतितत्वानि व्यक्तमाहुर्मनीषिणः ॥ कालः कार्यप्रपञ्चस्य परिणामैककारण-

---

लोक ह्मणतात. ( १६ ) शिव हा कारणाला कारण असल्यामुळें कांहीं ऋषि शिवाला परमकारण असें ह्मणतात, आणि अव्यक्ताला समष्टि ( एक- रूपानें असलेल्या जगाला समष्टि ह्मणतात ) ह्मणत असून व्यक्ताला व्यष्टि ( नानातऱ्हेनें असलेल्या जगाला व्यष्टि ह्मणतात ) असें ह्मणतात. ( १७ ) हे दोन्ही शिवाच्या इच्छेला अनुसरून राहतात, यामुळें हीं दोन्हीं ईशाचींच रूपें आहेत, असें ह्मणतात, आणि या दोहोंला शिव कारण असल्यामुळें शिवाला परमकारण असें ह्मणतात. ( १८ ) समष्टि व्यष्टिकारण शिवच आहे, असें कारणरूपी अर्थाला जाणणारे पंडित लोक ह्मणतात. कांहीं लोक शिव हा जातिस्वरूपी व व्यक्तिस्वरूपी आहे, असें ह्मणतात. ( १९ ) पिंडांमध्यें जें असतें, त्याला जाति ह्मणतात, आणि पिंडानें उत्पन्न झालेल्या वस्तूंला आश्रय करून उपाधिभेदानें भिन्नरूपानें राहत असलेल्या वस्तूला व्यक्ति ह्मणतात. ( २० ) जाति असो, व्यक्ति असो, हे सर्व शिवाच्या आ- ज्ञेनें रक्षित झाले आहेत, ह्मणूनच शिव हा जाति व्यक्ति शरीरी आहे, असें ह्मणतात. ( २१ ) प्रधान, पुरुष, व्यक्त, काल हीं सर्व शिवाचीं रूपें आ- हेत, असें कांहीं लोक ह्मणतात. यांमध्यें प्रकृतीला प्रधान असें ह्मणत अ- सून क्षेत्रज्ञाला पुरुष असें ह्मणतात. ( २२ ) तेवीस तत्वांना व्यक्ति असें मोठे पंडित नांव देतात, आणि कार्यरूपी जगाच्या परिणामाला मुख्य का-

म् ॥२२॥ एषामीशोऽधिपो धाता प्रवर्तकनिवर्तकः ॥ आविर्भावतिरोभावहेतुरेकः स्वराडजः ॥२३॥ तस्मात्प्रधानपुरुषव्यक्तकालस्वरूपवान् ॥ हेतुर्नेताधिपस्तेषां धाता चोक्तो महेश्वरः ॥२४॥ विराड्ढिरण्यगर्भात्मा कैश्चिदीशो निगद्यते ॥ हिरण्यगर्भो लोकानां हेतुर्विश्वात्मको विराट् ॥२५॥ अन्तर्यामी परश्चेति कथ्यते कविभिः शिवः ॥ प्राज्ञतैजसविश्वात्मेत्यपरे सम्प्रचक्षते ॥२६॥ माता मानञ्च मेयञ्च मितिञ्चाहुरथापरे ॥ कर्ता क्रिया च कार्यञ्च करणं कारणं परे ॥२७॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यात्मेत्यपरे सम्प्रचक्षते ॥ तुरीयमपरे प्राहुस्तुर्यातीतमितीतरे ॥२८॥ तमाहुर्निर्गुणं केचिद्गुणवन्तं परे विदुः ॥ के-

---

रण जें आहे, त्याला काल असें ह्मणतात. ( २३ ) या सर्वांना स्वामी, राजा, पोषक शिवच आहे, असें ह्मणतात, आणि या सर्वांचा प्रवर्तक (प्रवृत्ति करणारा) निवर्तक ( फिरविणारा ) शिव आहे, असें ह्मणतात, आणि या सर्वांच्या आविर्भावाला ( उत्पत्तीला ) तिरोभावाला ( लयाला ) कारण जन्मरहित शिव एकटाच असून स्वतः राजा आहे, असें ह्मणतात. ( २४ ) ह्मणूनच प्रधान, पुरुष, व्यक्त, काल हे सर्व शिवाचीं रूपें आहेत, असें ह्मणतात. या सर्वांचा नेता शिव असून या सर्वांना कारण शिवच आहे, आणि या सर्वांचा पोषक महेश्वरच आहे, असें ह्मणतात. ( २५ ) हिरण्यगर्भ विराट हा शिव आहे, असें कांहीं लोकांचें ह्मणणें आहे. विश्वरूपी विराट् हा सर्व लोकांच्या उत्पत्तीला वगैरे कारण आहे, यालाच हिरण्यगर्भ असें ह्मणतात. ( २६ ) शिव हा सर्वांचा अंतर्यामी ( आंत राहणारा ) आहे, असें कांहीं कवि ह्मणतात. कांहीं लोक प्राज्ञ, तैजस, विश्व हे शिवाचें रूप आहे, असें ह्मणतात. ( २७ ) माता ( माप घेणारा ) मान ( माप ) मेय ( माप घेण्यास योग्य ) मिति ( परिमाण ) हे सर्व शिवाचें रूप आहे, असें ह्मणतात. कर्ता, ( करणारा ) क्रिया, कार्य, करण, ( साधन ) कारण हीं सर्व शिवाचीं रूपें आहेत, असें ह्मणतात. ( २८ ) जाग्रति, स्वप्न, सुषुप्ति हीं शिवाचीं स्वरूपें आहेत, असें कांहीं दुसरे लोक ह्मणतात, कांहीं लोक शिवाला तुरीय असें ह्मणतात, आणि कांहीं लोक तुरीयातीत असेंही ह्मणतात. ( २९ ) कांहीं लोक शिवाला निर्गुण ह्मणत

चित्संसारिणं प्राहुस्तमसंसारिणं परे ॥२९॥ स्वतन्त्रमपरे प्राहुरस्वतन्त्रं परे विदुः ॥ घोरमित्यपरे प्राहुः सौम्यमेव परे विदुः ॥३०॥ रागवन्तं परे प्राहुर्वीतरागं तथा परे ॥ निष्क्रियन्त्वपरे प्राहुः सक्रियञ्चेतरे जनाः ॥३१॥ निरिन्द्रियं परे प्राहुः सेंद्रियञ्च तथा परे ॥ ध्रुवमित्यपरे प्राहुस्तमध्रुवमितीतरे ॥३२॥ अरूपं केचिदाहुर्वै रूपवन्तं परे विदुः ॥ अदृश्यमपरे प्राहुर्दृश्यमित्यपरे विदुः ॥३३॥ वाच्यमित्यपरे प्राहुरवाच्यमिति चापरे ॥ शब्दात्मकं परे प्राहुः शब्दातीतमथापरे ॥३४॥ केचिच्चिन्तामयं प्राहुश्चिन्तया रहितं परे ॥ ज्ञानात्मकं परे प्राहुर्विज्ञानमिति चापरे ॥३५॥ केचिज्ज्ञेयमिति प्राहुरज्ञेयमि-

---

असून कांहीं लोक सगुण असेंही ह्मणतात. कांहीं लोक शिवाला संसारी ह्मणत असून कांहीं लोक शिवाला निःसंसारी असेंही ह्मणतात. ( ३० ) कांहीं लोक शिवाला स्वतंत्र ह्मणत असून कांहीं लोक त्याला अस्वतंत्रही ह्मणतात. कांहीं लोक शिवाला घोर असें ह्मणत असून कांहीं लोक शिवाला सौम्य असें ह्मणतात. ( ३१ ) कांहीं लोक शिवाला रागवान ( लोभी ) ह्मणत असून कांहीं लोक त्याला वीतराग ( निर्लोभी ) असें ह्मणतात. कांहीं लोक शिवाला निष्क्रिय ( क्रियाहीन ) ह्मणत असून कांहीं लोक त्याला सक्रिय असें ह्मणतात. ( ३२ ) कांहीं लोक शिवाला इंद्रियें नाहींत असें ह्मणतात, कांहीं लोक त्याला इंद्रियें आहेत, असें ह्मणतात. कांहीं लोक शिवाला चंचल ह्मणतात, कांहीं लोक त्याला स्थिरही ह्मणतात. ( ३३ ) कांहीं लोक शिवाला रूप नाहीं असें ह्मणतात, कांहीं लोक त्याला रूप आहे, असें ह्मणतात. कांहीं लोक शिव दिसत नाहीं ह्मणतात, कांहीं लोक शिव दिसतो, ह्मणतात. ( ३४ ) कांहीं लोक शिवाचें वर्णन करितां येत नाहीं ह्मणतात, काहीं लोक शिवाचें वर्णन करितां येतें, असेंही ह्मणतात. कांहीं लोक शिवाला हाक मारितां येते, ( अर्थात्मक ) ह्मणतात, कांहीं लोक त्याला हाक मारितां येत नाहीं, ( शब्दातीत ) ह्मणतात. ( ३५ ) कांहीं लोक शिवाला काळजी आहे, ( चिंतामय ) ह्मणतात, कांहीं लोक त्याला काळजी नाहीं ( चिंतारहित ) ह्मणतात. कांहीं लोक शिव हा ज्ञानरूपी ह्मणतात, कांहीं लोक शिव हा विज्ञानरूपी ह्मणतात. ( ३६ ) कांहीं शिवाला सम-

ति चापरे ॥ एके तमेकमेवाहुरनेकञ्च तथापरे ॥३६॥ एवं विकल्प्यमानं तद्याथात्म्यं परमेष्ठिनः ॥ नाध्यवस्यन्ति मुनयो नानाप्रत्ययकारणात् ॥३७॥ ये पुनः सर्वभावेन प्रपन्नाः परमेश्वरम् ॥ ते हि जानन्त्ययत्नेन शिवं परमकारणम् ॥३८॥ वृत्तम् ॥ यावत्पशुर्नैव पश्यत्यनीशं कविं पुराणं भुवनस्येशितारम् ॥ तावद्दुःखे वर्तते बद्धपाशः संसारेऽस्मिंश्चक्रनेमिभ्रमेण ॥३९॥ यदा पश्येत्पश्यन्तं रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ॥ तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरञ्जनः परममुपैति साम्यम् ॥४०॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे षष्ठोऽध्यायः ॥६॥

---

जून घेतां येतें ( ज्ञेय ) ह्मणतात, कांहीं लोक शिवाला समजून घेतां येत नाहीं ( अज्ञेय ) ह्मणतात. काहीं लोक शिव एकटाच आहे, ह्मणतात, कांहीं लोक शिव अनेक आहेत, ह्मणतात. ( ३७ ) याप्रमाणें शिवाविषयीं अनेक विकल्प येत असल्यामुळें आणि या विकल्पाला अनेक प्रत्ययाचीं कारणें असल्यामुळें मोठमोठ्या ऋषींना सुद्धां शिवाचें यथार्थ रूप निश्चयानें कळत नाहीं. ( ३८ ) जे कोणी सर्व भावानें ( सर्व कांहीं तूंच आहेस अशा भावानें ) शिवाला शरण जातात, ते मात्र परमकारण शिवाला विन आयासानें जाणतात. ( ३९ ) ज्याचा स्वामी कोणीही नाहीं, आणि ज्याला कवि, पुराण, लोकपति असें ह्मणतात, त्या शिवाला जोंपर्यंत पशु ( अज्ञानी ) पाहत नाहीं, तोंपर्यंत राहटगाडग्याप्रमाणें या संसारांत पाशांनीं बद्ध होऊन दुःख घेत फिरतो. ( ४० ) ज्याचा वर्ण सोन्याप्रमाणें असून ज्याला कर्ता, ईश, पुरुष, ब्रह्मयोनि असें ह्मणतात, त्या शिवाला जेव्हां पाहील, तेव्हां त्याचें पुण्यपाप लयाला जाऊन तो ज्ञानी शिवसाम्याला पावतो.

याप्रमाणें श्रीशैवपुराणांतील वायवीयसंहितेच्या उत्तरभागांतील सहावा अध्याय संपला.

## अथ सप्तमोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ न शिवस्याणवो बन्धः कार्मो मायेय एव वा ॥ प्राकृतो वाथ बौद्धो वा ह्यहङ्कारात्मकस्तथा ॥१॥ नैवास्य मानसो बन्धो न चैत्तो नेन्द्रियात्मकः ॥ न च तन्मात्रबन्धोऽपि भूतबन्धो न कश्चन ॥२॥ न च कालः कला चैव नाविद्या नियतिस्तथा ॥ न रागो न च विद्वेषः शम्भोरमिततेजसः ॥३॥ न चाप्याभिनिवेशोऽस्य कुशलाकुशलान्यपि ॥ कर्माणि तद्विपाकश्च सुखदुःखे च तत्फले ॥४॥ आशयैर्नास्य सम्बन्धः संस्कारैः कर्मणामपि ॥ भोगैश्च भोगसंस्कारैः कालत्रितयगोचरैः ॥५॥ न तस्य कारणं कर्ता नादिरन्तस्तथान्तरम् ॥ न कर्म करणं वापि नाकार्यं कार्यमेव च ॥६॥ नास्य बन्धुर्न चारिर्वा नियन्ता प्रेरकोऽपि वा ॥ न पतिर्न गुरुर्भ्राता नाधिको न समस्तथा ॥७॥ न जन्ममरणे तस्य न कांक्षितमकांक्षितम् ॥ न विधिर्न निषेधश्च न मुक्तिर्न च बन्धनम् ॥८॥ नास्ति यद्यदकल्याणं तत्तद-

---

उपमन्यु बोलतो— ( १ ) आणव, माया, कर्म, प्राकृत, बौद्ध ( बुद्धीचा ) अहंकार यांपैकीं कोणताही बंध शिवाला मुळींच नाहीं. ( २ ) मनाचा, चित्ताचा, इंद्रियांचा, इंद्रियांच्या मात्रांचा, पंचभूतांचा यांपैकीं कोणताही बंध शिवाला नाहीं. ( ३ ) काल कला, विद्या, नियति, राग, द्वेष यांचा प्रवेश अपरिमित तेजस्वी श्रीशंभूच्या ठिकाणीं ( ४ ) मुळींच होत नाहीं, आणि कुशल, ( कल्याण ) अकुशल, ( अकल्याण ) कर्म, कर्मविपाक, सुख, दुःख, सुखदुःखांचीं फळें यांचाही प्रवेश होत नाहीं. ( ५ ) आशयांचा ( अंतःकरणाचा ) संबंध, कर्माच्या संस्करांचा संबंध, भोगांचा संबंध, त्रिकालीं गोचर होणाऱ्या भोगसंस्कारांचा संबंध, शिवाला होत नाहीं, ( ६ ) त्याला कोणी कारण नसून कर्ता नाहीं, व त्याला आदि, अंत, मध्य, कांहीं नाहीं, व कर्म, करण, कार्य, अकार्य हे कांहीं त्याला नाहींत. ( ७ ) बंधु, शत्रु, नियंता, प्रेरक, पति, गुरु, भ्राता, अधिक ( शिवापेक्षां अधिक ) सम ( बरोबरीचा ) हे कोणीही त्या शिवाला नाहींत. ( ८ ) जन्म, मरण, इच्छितवस्तु व इच्छारहितवस्तु विधि, निषेध, मुक्ति, बंध, हेही त्याला नाँहा. ( ९ ) जगांत जें जें अकल्याण असेल, तें तें अकल्याण याच्या

स्य कदाचन ॥ कल्याणं सकलश्चास्ति परमात्मा शिवो यतः ॥९॥ स शिवः सर्वमेवेदमधिष्ठाय स्वशक्तिभिः ॥ अप्रच्युतस्वतो भावः स्थितः स्थाणुरतः स्मृतः ॥१०॥ शिवेनाधिष्ठितं यस्माज्जगत्स्थावरजङ्गमम् ॥ सर्वरूपः स्मृतः शर्वस्तथा ज्ञात्वा न मुह्यति ॥११॥ शर्वो रुद्रो नमस्तस्मै पुरुषः सन्परो महान् ॥ हिरण्यबाहुर्भगवान्हिरण्यपतिरीश्वरः ॥१२॥ अम्बिकापतिरीशानः पिनाकी वृषवाहनः ॥ एको रुद्रः परं ब्रह्म पुरुषः कृष्णपिङ्गलः ॥१३॥ वालाग्रमात्रो हृन्मध्ये विचिन्त्यो दहरान्तरे ॥ हिरण्यकेशः पद्माक्षो ह्यरुणस्ताम्र एव च ॥१४॥ योऽवसर्पत्यसौ देवो नीलग्रीवो हिरण्मयः ॥ सौम्यो घोरस्तथा मिश्रश्चाक्षरश्चामृतोऽव्ययः ॥१५॥ स पुंविशेषः परमो भगवानन्तकान्तकः ॥

---

जवळ सुद्धां येत नाहीं, परंतु जें जें कल्याण असेल, तें तें मात्र याच्या जवळ आहे. कारण याचें नांवच मुळीं शिव असें आहे. (१०) जितक्या आपल्या शक्ति असतील, तितक्यांना घेऊन या जगांत आपल्या भावाची (सत्तेची) स्थिति भ्रष्ट करून न घेतां राहतो, ह्मणून याला लोक स्थाणु असें ह्मणतात. (११) ज्याअर्थी स्थावरजंगम जगांत सर्वत्र शिवाचें अधिष्ठान आहे, त्याअर्थी त्या सर्वरूपी शिवाला शर्व असें ह्मणतात. परंतु अशा तऱ्हेचें शिवाचें ज्ञान मिळविलें असतां मोह येत नाहीं. (१२) शर्व, रुद्र, पुरुष, पर, महान, हिरण्यबाहु, भगवान्, हिरण्यपति, ईश्वर या शिवाला नमस्कार असो. (१३) अंबिकापति, ईशान, पिनाकी, नंदिवाहन, एक, रुद्र, परंब्रह्म, कृष्णपिंगल (काळा तांबडा) पुरुष याला नमस्कार असो. (१४) सोन्याप्रमाणें केश असून कमलाप्रमाणें ज्याचे डोळे आहेत, आणि ज्याचा वर्ण अरुण असून तांबडा आहे, अशा शिवाच्या मूर्तीची कल्पना शेपटीच्या केंसाच्या अग्रा एवढी करून आपल्या हृदयाकाशांत त्या मूर्तीचें चिंतन करावें. (१५) जो हा देव नीलकंठ जगांत आहे, त्याला हिरण्मय, सौम्य, घोर, मिश्र, अक्षर, अमृत, अव्यय असें ह्मणतात. (१६) हाच शिव श्रेष्ठ असून पुरुषचिन्हाचा आहे, आणि हाच पूज्य शिव अंतकाचा (मृत्यूचा) अंतक (मृत्यु) आहे, आणि असें असून जड व जीव यांच्यापासून मुक्त आहे, व

चेतनाचेतनोन्मुक्तः प्रपञ्चाच्च परात्परः ॥१६॥ लोके सातिशयत्वेन ज्ञानैश्वर्ये विलोकिते ॥ शिवेऽनातिशयत्वेन स्थिते प्राहुर्मनीषिणः ॥१७॥ प्रतिसर्गं प्रसूतानां ब्रह्मणां शास्त्रविस्तरम् ॥ उपदेष्टा स एवादौ कालावच्छेदवर्तिनाम् ॥१८॥ कालावच्छेदयुक्तानां गुरूणामप्यसौ गुरुः ॥ सर्वेषामेव सर्वेशः कालावच्छेदवर्जितः ॥१९॥ सिद्धिः स्वाभाविकी तस्य शक्तिः सर्वातिशायिनी ॥ ज्ञानमप्रतिमं नित्यं वपुरत्यन्तनिर्मलम् ॥२०॥ ऐश्वर्यमप्रतिद्वन्द्वं सुखमात्यन्तिकं बलम् ॥ तेजः प्रभावो वीर्यं च क्षमा कारुण्यमेव च ॥२१॥ परिपूर्णस्य सर्गाद्यैर्नात्मनोऽस्ति प्रयोजनम् ॥ परानुग्रह एवास्य फलं सर्वस्य कर्मणः ॥२२॥ प्रणवो वाचकस्तस्य शिवस्य परमात्मनः ॥ शिवरुद्रादिशब्दानां प्रणवो हि परः स्मृतः ॥२३॥ शम्भोः प्रणववाच्यस्य भावनात्तज्जपादपि ॥ या सिद्धिः सा परा प्राप्य भवत्येव न संशयः ॥२४॥

---

या जगापासून अलिप्त आहे. (१७) शिवाय जगांत अतिशय ज्ञान व ऐश्वर्य यांनीं मुक्त होऊन राहिला आहे. असें असून अनातिशयत्वेन ( व्याप्तपणानें ) जगांत आहे, असें मोठे पंडित ह्मणतात. (१८) आणि प्रत्येक सृष्टीच्या वेळेस उत्पन्न होणाऱ्या ब्रह्मदेवांना शास्त्रांचा उपदेश करणारा हाच शिव आहे. हे ब्रह्मदेव कालाच्या कांहीं परिमाणापर्यंतच राहतात. (१९) ज्यांच्या आयुष्याला कांहीं कालाची इयत्ता आहे, त्या गुरूंना हा शिव गुरु आहे. जगांतल्या सर्व लोकांचा ईश हाच असून याला मात्र कालाची इयत्ता नाहीं. (२०) त्या शिवाची सिद्धि स्वाभाविक असून त्याची शक्ति सर्वांपेक्षां जास्त आहे आणि त्याचें ज्ञान अप्रतिम असून त्याचें शरीर नित्य व निर्मल आहे. (२१) त्याच्याप्रमाणें ऐश्वर्य कोणालाही नसून अत्यंत सुख त्याचें आहे. बल, तेज, वीर्य, प्रभाव, क्षमा, करुणा हे अतिशय त्याला आहेत. (२२) परिपूर्ण शिवाला या सृष्टीचें प्रयोजन मुळींच नाहीं. परंतु लोकांवर अनुग्रह करावा, हेंच त्याच्या कर्माचें फल आहे. (२३) परमात्मा शिव या शब्दाचा वाचकशब्द प्रणव हा आहे, आणि शिव रुद्र वगैरे शब्दांचा वाचकही श्रेष्ठ प्रणवच आहे. (२४) प्रणववाच्य ( प्रणवाचा अर्थ ) शंभूच्या भावनेनें, जपानें जी सिद्धि प्राप्त होते, ती श्रेष्ठच होय, यांत संशय नाहीं.

तस्मादेकाक्षरं देवमाहुरागमपारगाः ॥ वाच्यवाचकयोरैक्यं मन्यमाना मनस्विनः ॥२५॥ अस्य मात्राः समाख्याताश्चतस्रो वेदमूर्द्धनि ॥ अकारश्चाप्युकारश्च मकारो नाद इत्यपि ॥२६॥ अकारं बह्वृचं प्राहुरुकारो यजुरुच्यते ॥ मकारः सामनादोऽस्य श्रुतिराथर्वणी स्मृता ॥२७॥ अकारश्च महाबीजं रजः स्रष्टा चतुर्मुखः ॥ उकारः प्रकृतिर्योनिः सत्त्वं पालयिता हरिः ॥२८॥ मकारः पुरुषो बीजं तमः संहारको हरः ॥ नादः परः पुमानीशो निर्गुणो निष्क्रियः शिवः ॥२९॥ एवं तिसृभिरेवेशमात्राभिर्निखिलं त्रिधा ॥ अभिधाय शिवात्मानं बोधयत्यर्द्धमात्रया ॥३०॥ वृत्तम् ॥ यस्मात्परं नापरमस्ति किञ्चिद्यस्मान्नाणीयो न च ज्यायोऽस्ति कश्चित् ॥ वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकस्तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ॥३१॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे सप्तमोऽध्यायः

---

(२५) वाच्य, वाचक यांमध्यें ऐक्य मानणारे जे प्रशस्तमनाचे पंडित आहेत, ते सर्व आगमांना जाणणारे असून शिवाला एकाक्षरदेव (ॐ) असें ह्मणतात. (२६) याला वेदाच्या शिरोभागांत चार मात्रा आहेत, ह्मणून सांगितलें आहे. अकार, उकार, मकार, नाद याच चार मात्रा होत. (२७) अकार ऋग्वेद असून उकार यजुर्वेद आहे, व मकार सामवेद असून नाद अथर्वणश्रुति आहे, असें ह्मणतात. (२८) अकार महाबीज असून रजोगुणमिश्रित चतुर्मुख ब्रह्मा अकारच आहे, उकार प्रकृति योनि असून सत्वगुणमिश्रित पालक हरि आहे. (२९) मकार पुरुष, बीज असून तमोगुणमिश्रित संहार करणारा हर आहे. आणि पुरुष, ईश, निर्गुण, निष्क्रिय असा शिव हा नाद आहे. (३०) याप्रमाणें ईशाच्या तीन मात्रांनीं जग हें तीन प्रकारचे होत असून अर्धमात्रेनें शिवाला बोधन करितें. (३१) ज्या वस्तूपेक्षां श्रेष्ठ वस्तु दुसरी नाहीं, ज्याच्यापेक्षां लहान वस्तु दुसरी नाहीं, ज्याच्यापेक्षां मोठी वस्तु दुसरी नाहीं, व एखाद्या झाडाप्रमाणें अंतरिक्षांत स्तब्ध जो राहतो त्या शिवानें हें जग भरलें गेलें आहे.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांपैकीं सातवा अध्याय संपला.

## अथ अष्टमोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ शक्तिः स्वाभाविकी तस्य विद्या विश्वविलक्षणा ॥ एकानेकस्वरूपेण भाति भानोरिव प्रभा ॥१॥ अनन्ताः शक्तयस्तस्या इच्छाज्ञानक्रियादयः ॥ मायाद्याश्चाभवन्वह्नेर्विस्फुलिङ्गा यथा तथा ॥२॥ सदाशिवेश्वराद्याश्च नानाविद्येश्वरादयः ॥ अभवन्पुरुषाश्चास्याः प्रकृतिश्च परात्परा ॥३॥ महदादिविशेषान्ता अजाद्याश्चापि मूर्तयः ॥ यच्चान्यदपि तत्सर्वं तस्याः कार्यं न संशयः ॥४॥ सा शक्तिः सर्वगा सूक्ष्मा प्रबोधानन्दरूपिणी ॥ शक्तिमानुच्यते देवः शिवः शीतांशुभूषणः ॥५॥ वेद्यः शिवः शिवा विद्या प्रज्ञा चैव श्रुतिः स्मृतिः ॥ धृतिरेषा स्थितिर्निष्ठा ज्ञानेच्छाकर्मशक्तयः ॥६॥ आज्ञा चैव परं ब्रह्म द्वे विद्ये च परापरे ॥ शुद्धविद्या शुद्धकला सर्वं शक्तिकृतं यतः ॥७॥ माया च प्रकृतिर्जीवो विकारो विकृ-

---

उपमन्यु बोलतो— (१) त्या शिवाची शक्ति स्वाभाविक असून त्याची विद्या जगांतल्या विद्येपेक्षां विलक्षण आहे. आणि त्याची प्रभा ( तेज ) एकच असून अनेक प्रकारानें सूर्याच्या प्रभेप्रमाणें दिसते. (२) त्या प्रभेची शक्ति अनंत आहे. तो प्रकार असा कीं, इच्छा, ज्ञान, क्रिया, माया वगैरे शक्ति होत. अग्नीची प्रभा एक असून ठिणग्यांच्या रूपानें ती जशी अनेक प्रकारानें दिसते, त्याप्रमाणें या शक्तीचे प्रकारही जाणावेत. (३) शिवाच्या त्या प्रभेपासून सदाशिव, ईश्वर, विद्येश्वर वगैरे पुरुष झाले, व परात्पर प्रकृति या प्रभेपासूनच झाली. (४) महत्तत्वापासून विशेषतत्वापर्यंत अजादिमूर्ति वगैरे या प्रभेपासून झाल्या. याच्याशिवाय दुसरें जें कांहीं असेल, तें सर्व या प्रभेचेंच कार्य आहे, असें जाणावें. (५) ती शक्ति सर्वत्र व्याप्त असून फार सूक्ष्म आहे. व तिचें रूप ज्ञान व आनंद यांचें आहे. अशा शक्तीनें युक्त असलेला चंद्रशेखर शिव हा शक्तिमान असें ह्मणवितो. (६) वेद्य ( जाणावयास योग्य ) शिव असून शुभविद्या, प्रज्ञा, श्रुति, स्मृति, धृति, स्थिति, निष्ठा, ज्ञान, इच्छा, कर्म वगैरे त्याच्या शक्ति होत. (७) आज्ञा, परब्रह्म, परविद्या, अपरविद्या, शुद्धविद्या, शुद्धकला वगैरे सर्व शिवशक्तीचा प्रभाव आहे, असें जाणावें. (८) माया, प्रकृति, जीव, विकार, विकृति, अ-

तिस्तथा ।। असच्च सच्च यत्किञ्चित्तया सर्वमिदं ततम् ।।८।। सा देवी मायया सर्वं ब्रह्माण्डं सचराचरम् ।। मोहयत्यप्रयत्नेन मोचयत्यपि लीलया ।।९।। अनया सह सर्वेशः सप्तविंशत्प्रकारया ।। विश्वं व्याप्य स्थितस्तस्मान्मुक्तिरत्र प्रवर्तते ।।१०।। मुमुक्षवः पुरा केचिन्मुनयो ब्रह्मवादिनः ।। संशयाविष्टमनसो विमृशन्ति यथातथम् ।।११।। किं कारणं कुतो जाता जीवामः केन वा वयम् ।।१२।। केन वर्तामहे शश्वत्सुखेष्वन्येषु चानिशम् ।। अनिर्लङ्घ्या च विश्वस्य व्यवस्था केन वा कृता ।।१३।। कालः स्वभावो नियतिर्यदृच्छा नात्र युज्यते ।। भूतानि योनिः पुरुषो योगश्चैषां परोऽथवा ।।१४।। अचेतनत्वात्कालादेश्चेतनत्वेऽपि चात्मनः ।। सुखदुःखाभिभूतत्वादनीशत्वं विचार्य

---

सत्, सत्, वगैरे जें कांहीं असेल, तें सर्व शक्तिकृत ( शक्तीपासून झालेलें ) जाणावें, व जग हें शक्तीनें व्यापिलें गेलें आहे. (९) ती देवी ( शक्तिरूपिणी देवी ) आपल्या मायेच्या योगानें चराचर ब्रह्मांडाला श्रमावांचून मोहून टाकिते, आणि लीलेनें मोहापासून सोडविते. (१०) सत्तावीस प्रकारांनीं असलेल्या शक्तीनें युक्त होऊन सर्वेश शिव हा जगांत व्याप्त होऊन राहिला आहे. ह्मणूनच त्याच्यापासून मुक्ति मिळते. (११) ब्रह्मवादी कांहीं मुनि पूर्वी मोक्षाच्या इच्छेनें शिवतत्व विचारामध्यें असतां त्यांचें मन मोठ्या संशयांत पडलें, ह्मणूनच यथार्थरूप पाहण्याचा विचार त्यांनीं केला. (१२) आह्मी कोठून आलो ? कां आलो ? आमचें जीवन कोठून होत आहे, व (१३) निरंतर इतर सुखांमध्यें अहोरात्र आह्मीं असतों, याला कारण कोण आहे ? आणि या जगाची व्यवस्था इतकी अनुल्लंघनीय ( नबिघडणारी ) कोणी केली आहे ? (१४) काल, स्वभाव, नियति, यदृच्छा वगैरे हे जगाच्या व्यवस्थेला कारण आहेत, असें ह्मणणें उपयोगीं पडत नाहीं, आणि पंचमहाभूतें, योनि, पुरुष, योग इत्यादि पदार्थ किंवा यांच्याहून भिन्न कांहीं पदार्थ जगाच्या व्यवस्थेला कारण आहेत, असें ह्मणणेंही सयुक्तिक वाटत नाहीं. (१५) कारण याला असें आहे कीं, कालादि वस्तू तर बोलून चालून अचेतन आहेत, तर या अचेतनांकडून व्यवस्था होईल असें मुळींच संभवत नाहीं. आणि आत्मा जरी चेतन आहे, तथापि तो आत्मा सुखदुःखाच्या

च ॥१५॥ ते ध्यानयोगानुगताः प्रापश्यञ्छक्तिमैश्वरीम् ॥ पाशविच्छेदिकां साक्षान्निगूढां स्वगुणैर्भृशम् ॥१६॥ तया विच्छिन्नपाशास्ते सर्वकारणकारणम् ॥ शक्तिमन्तं महादेवमपश्यन्दिव्यचक्षुषा ॥१७॥ यः कारणान्यशेषाणि कालात्मसहितानि च ॥ अप्रमेयोऽनया शक्त्या साकमेकोऽधितिष्ठति ॥१८॥ ततः प्रसादयोगेन योगेन परमेण च ॥ दृढेन भक्तियोगेन दिव्यां गतिमवाप्नुवन् ॥१९॥ तस्मात्सह तया शक्त्या हृदि पश्यन्ति ये शिवम् ॥ तेषां शाश्वतिकी शान्तिर्नेतरेषामिति श्रुतिः ॥२०॥ न हि शक्तिमतः शक्त्या विप्रयोगोऽस्ति जातुचित् ॥ तस्माच्छक्तेः शक्तिमतः प्रसादान्निर्वृतिर्द्वयोः ॥२१॥ क्रमोऽविवक्षितो नूनं विमुक्तौ ज्ञानकर्मणोः ॥ प्रसादे सति सा मुक्तिर्य-

---

फेऱ्यामध्यें सांपडल्यामुळें त्याच्याकडे अनीशत्व ( अप्रभुत्व ) येतें. तर अशा असमर्थाकडून जगाची व्यवस्था होते, ह्मणणें अनीशत्वाचा विचार केला असतां केवळ असंबद्ध वाटतें. (१६) सचेतन जितके आहेत, तितके ध्यान योगाच्या पाठीमागें लागून पाश छेदन करणाऱ्या गूढ अशा शिवसंबंधी शक्तीला आपल्या गुणांनीं पाहतात. (१७) त्या शैवी शक्तीच्या दर्शनाच्या ( ज्ञानाच्या ) प्रभावानें पाश सर्व तोडून कारणाला कारण अशा शक्तिमान महादेवाला दिव्यनेत्रांनीं पाहतात. (१८) काल वगैरे व आत्मादि जीं कारणें असतील, तीं सर्व घेऊन आपल्या शक्तीसहित अप्रमेय शिव हा नेहमीं असाच राहतो. (१९) नंतर प्रसादयोगानें, व परम योगानें, व दृढ अशा भक्तियोगानें दिव्यगतीला ते सर्व आत्मे पावतात. (२०) अर्थात् शक्तिसहित शिवाला आपल्या हृदयांत जे पाहतात, त्यांना शाश्वत सुख मिळतें. इतरांना मिळत नाहीं. असें वेद ह्मणतात. (२१) शक्तिमान शिवाचा आणि त्याच्या शक्तीचा वियोग कधींही होत नाहीं. अर्थात शक्तीचा आणि शक्तिमानाचा ( शिवसतीचा ) प्रसाद जो मिळवील, त्याला सुख मिळतें. अर्थात् दोघांचा प्रसाद मिळविणें हेंच मुख्य आहे, असें झालें. (२२) याच्यावरून मुक्तीविषयीं ज्ञानकर्मांचा क्रम पाहिजेच, असें कांहीं ह्मणतां यावयाचें नाहीं. कारण प्रसाद मिळाला असतां ती मुक्ति तळहातावरच

स्मात्करतले स्थिता ॥२२॥ देवो वा दानवो वापि पशुर्वा विहगोपि वा ॥ कीटोऽथवा कृमिर्वापि मुच्यते तत्प्रसादतः ॥२३॥ गर्भस्थो जायमानो वा बालो वा तरुणोऽपि वा ॥ वृद्धो वा म्रियमाणो वा स्वर्गस्थोवाथ नारकी ॥२४॥ पतितो वापि धर्मात्मा पण्डितो मूढ एव वा ॥ प्रसादे तत्क्षणादेव मुच्यते नात्र संशयः ॥२५॥ अयोग्यानाञ्च कारुण्याद्भक्तानां परमेश्वरः ॥ प्रसीदति न सन्देहो निगृह्य विविधान्मलान् ॥२६॥ प्रसादादेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसम्भवः ॥ अवस्थाभेदमुत्प्रेक्ष्य विद्वांस्तत्र न मुह्यति ॥२७॥ प्रसादपूर्विका येयं भक्तिर्मुक्तिविधायिनी ॥ नैव सा शक्यते प्राप्तुं नरैरेकेन जन्मना ॥२८॥ अनेकजन्मसिद्धानां श्रौतस्मार्त्तानुवर्त्तिनाम् ॥ विरक्तानां प्रबुद्धानां प्रसीदति महेश्वरः ॥२९॥ प्रसन्ने सति देवेशे पशोस्तस्मि-

---

आहे. (२३) देव, दानव, पशु, पक्षी, कीट, कृमि यांपैकीं कोणी असो, त्याला प्रसाद मिळाला ह्मणजे मुक्ति मिळते. (२४) गर्भांत असो, बालक असो, उपजणारा असो, बाल असो, तरुण असो, वृद्ध असो, मरणारा असो, स्वर्गांतला असो, नरकांतला असो, (२५) पतित असो, धर्मात्मा असो, पंडित असो, मूर्ख असो, त्या दोघांचा प्रसाद झाला ह्मणजे तात्काळ मुक्ति मिळते, यांत संशय नाहीं. (२६) अयोग्य असूनही शिवाचा भक्त जर असेल तर त्याच्यावर करुणा करून शिव प्रसन्न होतो, व त्याच्या सर्व मलाचा निग्रह करतो, ( नाश करितो ) यांत संशय नाहीं. (२७) शिवाविषयीं भक्ति प्रसादाच्या योगानें उत्पन्न होते, व प्रसाद हा भक्तीपासून उत्पन्न होतो. वेळेनुसार जी जी अवस्था प्राप्त होईल, त्या त्या अवस्थेला चांगल्या-रीतीनें जो पंडित पाहतो, त्या पंडिताला मोह कधीं उत्पन्न होत नाहीं. (२८) प्रसादपूर्वक ( प्रसादसहित ) भक्ति ज्याला उत्पन्न झाली असेल त्याला मुक्ति मिळते. तशातऱ्हेची भक्ति एका जन्मांत मिळण्यास अशक्य आहे. (२९) अनेक जन्मांपासून सिद्ध झालेले, श्रौतस्मार्त मार्गांत राहिलेले, विरक्त अशा ज्ञानी लोकांना महेश्वर शिव हा लौकर प्रसन्न होतो. (३०) पशु ह्मणवून घेणाऱ्या जीवाला जेव्हां शिव प्रसन्न होतो, तेव्हां जीव ह्मणतो कीं, माझा प्रभु कोणी आहे अशा तऱ्हेची अल्प भक्ति बुद्धिपूर्वक त्या जी-

न्प्रवर्तते ॥ अस्ति नाथो ममेत्यल्पा भक्तिर्बुद्धिपुरःसरा ॥३०॥ तपसा विवशः शैवैर्धर्मैः संयुज्यते नरः ॥ तत्प्रयोगे तदभ्यासस्ततो भक्तिः परा भवेत् ॥३१॥ परया च तया भक्त्या प्रसादो लभ्यते परः ॥ प्रसादात्सर्वपाशेभ्यो मुक्तिर्मुक्तिसुनिर्वृतिः ॥३२॥ अल्पभावोऽपि यो मर्त्यः सोऽपि जन्मत्रयात्परम् ॥ न योनियन्त्रपीडां वै लभते नात्र संशयः ॥३३॥ सांगानङ्गा च या सेवा सा भक्तिरिति कथ्यते ॥ सा पुनर्भिद्यते त्रेधामनोवाक्कायसाधनैः ॥३४॥ शिवरूपादिचिन्ता या सा सेवा मानसी स्मृता ॥ जपादिर्वाचिकी सेवा कर्मपूजादिकायिकी ॥३५॥ सेयं त्रिसाधना सेवा शिवधर्मश्च कथ्यते ॥ स तु पञ्चविधः प्रोक्तः शिवेन परमात्मना ॥३६॥ तपः कर्म जपो

---

वाला उत्पन्न होते. (३१) प्रथम तपश्चर्येच्या योगानें विवश ( पराधीन ) होऊन शैवधर्मांनी मनुष्य संयुक्त होतो. ( शैवधर्म करण्यांत निष्णात होतो. ) शैवधर्माच्या योगानें पुढें योगाभ्यास करूं लागतो, पुढें त्या अभ्यासानें उत्तम भक्ति उत्पन्न होते. (३२) त्या पर ( उत्तम ) भक्तीनें श्रेष्ठ प्रसाद मिळतो, नंतर त्या प्रसादाच्या योगानें सर्व पाशांतून सुटून भोगमोक्षाच्या सुखाला तो प्राणी पात्र होतो. (३३) ज्या मनुष्याला शिवाच्या ठिकाणीं अल्प जरी भक्ति जेव्हां उत्पन्न होते, तेव्हां त्या जन्मापासून तीन जन्मानंतर पुढें कांहीं तो गर्भवासांत प्रवेश करीत नाहीं. यांत संशय नाहीं. (३४) श्रीशिवाची सेवा सांग ( अंगसहित ) अनंग ( अंगरहित ) जी होते, त्या सेवेलाच भक्ति असें ह्मणतात. पुनः त्या भक्तींत मन, वाक्, काय, या साधनाच्या रूपानें तीन प्रकार आहेत. (३५) शिवाचीं जीं अनेक रूपें आहेत, त्या रूपांचें चिंतन करणें, याला मानसी सेवा ह्मणतात, शिवनामाचें किंवा शिवमंत्राचे जप करणें, याला वाचिकी सेवा ह्मणतात, आणि शिवमूर्तीची पूजा करणें वगैरे कर्माला कायिकी सेवा ह्मणतात. (३६) याप्रमाणें ती शिवसेवा तीन साधनांनीं तीन प्रकारची झाली, त्या सेवेलाच शिवधर्म ह्मणतात, तो शिवधर्म मात्र पांच प्रकारचा आहे, ह्मणून साक्षात परमात्मा शिवानेंच सांगितलें आहे. (३७) तप, कर्म, जप, ध्यान, ज्ञान

ध्यानं ज्ञानं चेति समासतः ॥ कर्म लिंगार्चनाद्यं च तपश्चान्द्रायणा-
दिकम् ॥३७॥ जपस्त्रिधा शिवाभ्यासश्चिन्ताध्यानं शिवस्य तु ॥ शि-
वागमोक्तं यज्ज्ञानं तदत्र ज्ञानमुच्यते ॥३८॥ श्रीकण्ठेन शिवेनोक्तः
शिवायै च शिवागमः ॥ शिवाश्रितानां कारुण्याच्छ्रेयसामेकसाधनम्
॥३९॥ तस्माद्विवर्धयेद्भक्तिं शिवे परमकारणे ॥ त्यजेच्च विषयासंगं
श्रेयोऽर्थी मतिमान्नरः ॥४०॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागेऽष्टमोऽध्यायः

---

असे हे पांच प्रकार होत. यांमध्यें लिंगपूजा करणें वगैरे कृतीला कर्म ह्मण-
तात. चांद्रायणादि व्रताला तप ह्मणतात, (३८) जपांत मात्र शिवाचा अ-
भ्यास, शिवाचें चिंतन, शिवाचें ध्यान याप्रमाणें प्रकार तीन आहेत. शि-
वागमांत ज्या ज्ञानाला ज्ञान ह्मणून सांगितलें आहे, त्यालाच खरें ज्ञान ह्म-
णावें. (३९) नीलकंठ शिवानें पार्वतीस करुणापूर्वक शिवागम सांगितला
तो शिवागमच शिवभक्तांच्या श्रेयाला मुख्य साधन होय. (४०) अतएव
परमकारण शिवाच्या ठिकाणीं भक्ति वाढवावी. कल्याणेच्छु प्राण्यानें विषय-
व्यासंग सोडून बुद्धिमान होऊन भक्ति करावी.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील आ-
ठवा अध्याय संपला.

---

## अथ नवमोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ भगवञ्छ्रोतुमिच्छामि शिवेन परिभाषितम् ॥ वेदसारं शिवज्ञानं स्वाश्रितानां विमुक्तये ॥१॥ अभक्तानामबुद्धानामयुक्तानामगोचरम् ॥ अर्थैर्दशार्धैःसंयुक्तं गूढमप्राज्ञनिन्दितम् ॥२॥ वर्णाश्रमकृतैर्धर्मैर्विपरीतं क्वचित्समम् ॥ वेदात्षडङ्गादुद्धृत्य सांख्ययोगाच्च कृत्स्नशः ॥३॥ शतकोटिप्रमाणेन विस्तीर्णग्रन्थसंख्यया ॥ कथितं परमेशेन तत्र पूजा कथं प्रभो ॥४॥ कस्याधिकारः पूजादौ ज्ञानयोगादयः कथम् ॥ तत्सर्वं विस्तरादेव वक्तुमर्हसि सुव्रत ॥५॥

उपमन्युरुवाच ॥ शैवं संक्षिप्य वेदोक्तं शिवेन परिभाषितम् ॥ स्तुतिनिन्दाविरहितं सद्यः प्रत्ययकारकम् ॥६॥ गुरुप्रसादजं दिव्यमनायासेन मुक्तिदम् ॥ कथयिष्ये समासेन तस्य शक्यो न विस्तरः ॥ ७॥ सिसृक्षया पुराऽव्यक्ताच्छिवः स्थाणुर्महेश्वरः ॥ सत्कार्यका-

---

श्रीकृष्ण बोलतो (१) भगवन् आपल्याला आश्रय केलेल्या प्राण्यांच्या मुक्तीकरितां वेदांतलें सारभूत शिवज्ञान जें शिवानें सांगितलें, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे, (२) जे अभक्त, अज्ञानी, अयोग्य असतील, त्यांना हें ज्ञान मिळणें शक्य नाहीं, आणि ज्याचे अर्थ पांच प्रकारचे होत असून परमगूढ ( गुप्त ) आहे, व ज्याला अज्ञानी लोक निंदा करतात, (३) आणि जें वर्णाश्रम धर्माहून विलक्षण आहे, व कांहीं ठिकाणीं बरोबरीचें आहे, व जें षडंग वेदापासून व सर्व सांख्ययोगापासून उद्धृत ( त्यांतला सार ) झालें आहे, (४) शिवानें सांगितलें आहे, त्या ग्रंथाची संख्या शंभरकोटी आहे, त्या शिवज्ञानांतील पूजा कशी करावी ? (५) व पूजा वगैरे करावयास अधिकार कोणाला पोहोंचतो ? ज्ञान योग वगैरे कसे करावेत ? हें सर्व विस्तारानें आह्मांस सांगा.

उपमन्यु बोलतो— (६) वेदोक्त शिवज्ञान संक्षेपानें शिवानें जें सांगितलें, त्याची अधिक स्तुति व निंदा न करतां मिळविलें तर तात्काळ प्रत्ययाला कारणीभूत होतें. (७) अनायासानें मुक्ति देणारें शिवज्ञान संक्षेपानें सांगतों विस्तारानें सांगणें मुळीं अशक्य आहे. (८) पूर्वी महेश्वर स्थाणु ( शिव )

रणोपेतः स्वयमाविरभूत्प्रभुः ॥८॥ जनयामास च तदा ऋषिर्विश्वाधिकः प्रभुः ॥ देवानां प्रथमं देवं ब्रह्माणं ब्रह्मणः पतिः ॥९॥ ब्रह्मापि पितरं देवं जायमानोऽन्ववैक्षत ॥ तं जायमानं जनको देवः प्रापश्यदाज्ञया ॥१०॥ दृष्टो रुद्रेण देवोऽसावसृजद्विश्वमीश्वरः ॥ वर्णाश्रमव्यवस्थां च चकार स पृथक्पृथक् ॥११॥ सोमं ससर्ज यज्ञार्थे सोमाद्द्यौः समजायत ॥ धरा च वह्निः सूर्यश्च यज्ञो विष्णुः शचीपतिः ॥१२॥ ते चान्ये च सुरा रुद्रं रुद्राध्यायेन तुष्टुवुः ॥ प्रसन्नवदनस्तस्थौ देवानामग्रतः प्रभुः ॥१३॥ अपहृत्य स्वलीलार्थं तेषां ज्ञानं महेश्वरः ॥ तमपृच्छंस्ततो देवाः को भवानिति मोहिताः ॥१४॥ सोऽब्रवीद्भगवान्रुद्रो ह्यहमेकः पुरातनः ॥ आसं प्रथममेवाहं वर्तामि च सुरोत्तमाः ॥१५॥ भविष्यामि च मत्तोऽन्यो व्यतिरिक्तो न क-

---

हा अव्यक्तापासून जगाची सृष्टि करण्याच्या इच्छेनें सत्कार्य कारणानें युक्त झाला, व त्या करितांच तो स्वतः प्रभु प्रकट झाला. (९) जगांत श्रेष्ठ असा तो प्रभु ऋषि असा ह्मणवून घेऊन त्या देवानें प्रथम देवांमध्यें श्रेष्ठ अशा ब्रह्मदेवाला उत्पन्न केलें. ह्मणूनच त्याला ब्रह्मपति असें ह्मणतात. (१०) ब्रह्मदेव जेव्हां सृष्टींत यावयास लागला, तेव्हां आपल्या पित्याला ( शिवाला ) त्यानें पाहिलें. आणि उत्पन्न होणाऱ्या ब्रह्मदेवाला आपल्या आज्ञेच्या योगानें शिवानें ( बापानें ) पाहिलें. (११) अशी दृष्टि त्या रुद्राची आपल्यावर पडल्याबरोबर त्यानें जगाची सृष्टि करावयास आरंभ केला. तसें निरनिराळ्या रीतीनें त्यानें वर्णाश्रमांची व्यवस्थाही केली. (१२) नंतर यज्ञाकरितां सोमाची सृष्टि केली, त्या सोमापासून द्युलोकाची उत्पत्ति झाली, नंतर पृथ्वी, अग्नि, सूर्य, यज्ञ, विष्णु, इंद्र, (१३) इतर देव या सर्वांनीं रुद्राध्यायानें रुद्राची स्तुति केली. इतक्यांत रुद्र प्रसन्न होऊन सर्व देवांपुढें उभा राहिला. (१४) आणि त्या महेश्वरानें लीला दाखविण्याकरितां त्यांच्या ( देवांच्या ) ज्ञानाचा अपहार केला. यामुळेंच सर्व देवांनीं मोहित होऊन त्याला ( शिवाला ) 'तूं कोण आहेस?' असा प्रश्न केला. (१५) तेव्हां तो रुद्र बोलला कीं, मी एक पुरातन ( जुना ) पुरुष आहे. हे देवहो, पूर्वीं मी होतों, व आतां आहे. (१६) व पुढें ( भविष्यकाळीं ) आहे. माझ्यावांचून दुसरा

श्चन ॥ अहमेव जगत्सर्वं तर्पयामि स्वतेजसा ॥१६॥ मत्तोऽधिकः समो नास्ति मां यो वेद स मुच्यते ॥ इत्युक्त्वा भगवान्रुद्रस्तत्रैवान्तरधीयत ॥१७॥ नापश्यंश्च ततो देवं देवा विष्णुपुरोगमाः ॥ अथर्वशिरसा रुद्रमस्तुवंश्चोर्ध्वबाहवः ॥१८॥ त्वरिताख्येन रुद्रेण रुद्रेण ब्रह्मभिस्तथा ॥ स्तोत्रैश्च विविधैरन्यैः सूक्तैः शैवैश्च नामभिः ॥१९॥ व्रतं पाशुपतं कृत्वा ह्यथर्वशिरसि स्थितम् ॥ भस्मसञ्छन्नसर्वाङ्गा बभूवुरमरास्तदा ॥२०॥ अथ तेषां प्रसादार्थं पशूनां पतिरीश्वरः ॥ सगणश्चाम्बया सार्धं सान्निध्यमकरोत्प्रभुः ॥२१॥ यं विनिद्रा जितश्वासा योगिनो दग्धकिल्बिषाः ॥ हृदि पश्यन्ति तं देवं ददृशुर्देवपुंगवाः ॥२२॥ यामाहुः परमां शक्तिमीश्वरेच्छानुवर्तिनीम् ॥ तामपश्यन्महेशस्य वामांगे वामलोचनाम् ॥२३॥ ये विनिर्धूतसंसाराः प्राप्ताः शैवं परं पदम् ॥ नित्यसिद्धाश्च ये चान्ये ते च दृष्टा गणेश्वराः ॥२४॥ अथ

---

पुरुष कोणी नाहीं. माझ्या तेजानें मीच सर्व जगाची तृप्ति करितों. (१७) माझ्यापेक्षां श्रेष्ठ किंवा माझ्या बरोबरीचा दुसरा कोणीही नाहीं. माझें ज्ञान ज्याला झालें आहे, तो प्राणी मुक्त होतो. असें बोलून तात्काळ तेथेंच तो रुद्र अंतर्धान पावला. (१८) विष्णु प्रमुख सर्व देवांनीं त्याला न पाहून पुनः वर हात करून अथर्वशीर्षानें रुद्राची स्तुति केली. (१९) त्वरित नांवाच्या रुद्रस्तोत्रानें, रुद्रसूक्तानें पंचब्रह्म मंत्रांनीं, नानाप्रकार इतर स्तोत्रांनीं सूक्तांनीं, शिवनामांनीं रुद्राची स्तुति केली. (२०) अथर्वशीर्षांत सांगितलेलें पाशुपत व्रत करून सर्वांगाला भस्माचें लेपन त्या सर्व अमरांनीं केलें. (२१) नंतर देवांना प्रसाद देण्याकरितां पशुपति शिव हा आपल्या गणांसहित पार्वतीसहित त्यांच्या जवळ आला. (२२) निद्रा, श्वास याला जिंकून सर्व पाप नाहींसें करून घेऊन जे योगी आपल्या हृदयांत ज्याला पाहतात, त्या देवाला विष्णवादि सर्व देवांनीं पाहिलें. (२३) ईश्वराच्या इच्छेला अनुसरून राहणारी जी शक्ति आहे, ह्मणून सांगतात, त्या सुंदराक्षी शक्तीला त्या महेशाच्या डाव्या आंगावर देवांदिकांनीं पाहिलें. (२४) ज्यांनीं संसाराला पार हुडडून टाकिलें आहे, ज्यांनीं शिवपद अक्षय मिळविलें आहे, ज्यांना नित्यसिद्ध असें ह्मणतात, त्या गणेश्वरांना देवांनीं शिवापुढें पाहिलें. (२९) नंतर देवीसहित

तं तुष्टुवुर्देवा देव्या सह महेश्वरम् ॥ स्तोत्रैर्माहेश्वरैर्दिव्यैः स्तोत्रैः पौराणिकैरपि ॥२५॥ देवोऽपि देवानालोक्य कृपया वृषभध्वजः ॥ तुष्टोऽस्मीत्याह सम्प्रीतः स्वभावमधुरां गिरम् ॥२६॥ अथ तं प्रीतमनसं प्रणिपत्य वृषध्वजम् ॥ अर्थमर्थ्यतमं देवाः पप्रच्छुरिममादरात् ॥२७॥

देवा ऊचुः ॥ भगवन्केन मार्गेण पूजनीयोऽसि भूतले ॥ कस्याधिकारःपूजायां वक्तुमर्हसि तत्वतः ॥२८॥ ततः सस्मितमालोक्य देवीं देववरो हरः ॥ स्वरूपं दर्शयामास घोरं सूर्यात्मकं परम् ॥२९॥ सर्वाश्चर्यगुणोपेतं सर्वतेजोमयं परम् ॥ शक्तिभिर्मूर्तिभिः स्वाभिर्ग्रहैर्देवैश्च संवृतम् ॥३०॥ अष्टबाहुं चतुर्वक्त्रमर्धनारीकमद्भुतम् ॥ दृष्ट्वैवमद्भुताकारं देवा विष्णुपुरोगमाः ॥३१॥ बुध्वा दिवाकरं देवं देवीं चैव निशाकरम् ॥ पंचभूतान्यशेषाणि तन्मयञ्च चराचरम् ॥३२॥ एवमुक्त्वा

---

ईश्वराची स्तुति देवांनीं केली. तोंडानें माहेश्वरस्तोत्र, दिव्य पौराणिकस्तोत्र वगैरे ते देव ह्मणूं लागले. (२६) तेव्हां वृषभध्वज शिवानें कृपेनें त्या देवाकडे बघून 'मी तुमच्यावर प्रसन्न आहें' असें स्वभावतः मधुर अशा वाणीनें ह्मटलें. (२७) प्रसन्न झालेल्या त्या ईश्वराला पाहून नमस्कार करून याचनेस योग्य अशा अर्थाचा प्रश्न सर्व देवांनीं मोठ्या आदरानें केला.

देव बोलले— (२८) भगवन् भूतलावर कोणत्या मार्गानें तूं पूज्य झाला आहेस ? तुझी पूजा करावयास कोणाला अधिकार आहे ? हें सर्व यथार्थरीतीनें आह्मांस सांग. (२९) नंतर देवानें मंदहास करून देवीकडे बघून सूर्यात्मक ( सूर्यस्वरूपी ) आपल्या घोररूपाला श्रीहरानें त्यांस दाखविलें. (३०) जगांत जितके आश्चर्यकारक गुण असतील, तितक्या गुणांनीं हें रूप युक्त होतें, व जितकीं तेजें असतील तितकीं तेजें या रूपांत होतीं, आणि शक्ति, मूर्ति, स्वकीयग्रह, देव यांनीं युक्त तें रूप होतें. (३१) आणि त्या रूपाला आठ बाहु असून चार तोंडें होतीं, व अर्धा वेष स्त्रीचा असून अर्धी आकृति पुरुषाची होती, अशा अद्भुत रूपाला पाहून विष्णुप्रमुख देवांनीं (३२) सूर्य, शिव, देवी, चंद्र, पंचमहाभूतें, तन्मय चराचर जग हे सर्व यांत आहेत, असें समजून (३३) असें बोलून सर्वांनीं अर्घ्य देऊन नम-

नमश्चक्रुस्तस्मै चार्घ्यं प्रदाय वै ॥३३॥ वृत्तम् ॥ सिन्दूरवर्णाय सुमण्ड लाय सुवर्णवज्राभरणाय तुभ्यम् ॥ पद्माभनेत्राय सपंकजाय ब्रह्मेन्द्र-नारायणकारणाय ॥३४॥ सुरत्नपूर्णं ससुवर्णतोयं सुकुंकुमाढ्यं सकुशं सपुष्पम् ॥ प्रदत्तमादाय सहेमपात्रं प्रशस्तमर्घ्यं भगवन्प्रसीद ॥३५॥ नमः शिवाय साम्बाय सगणायादिहेतवे ॥ रुद्राय विष्णवे तुभ्यं ब्रह्मणे सूर्यमूर्तये ॥३६॥ यः शिवं मण्डले सौरे सम्पूज्यैवं समाहितः ॥ प्रातर्मध्याह्नसायाह्ने प्रदद्यादर्घ्यमुत्तमम् ॥३७॥ प्रणमेद्वा पठेदेतत्स्तोत्रं स्तुतिशतोत्तमम् ॥ न तस्य दुर्लभं किंचिद्भक्तश्चेन्मुच्यते दृढम् ॥३८॥ तस्माद्भक्त्यार्चयेन्नित्यं शिवमादित्यरूपिणम् ॥ धर्मकामार्थमुक्त्यर्थं मनसा कर्मणा गिरा ॥३९॥ अथ देवान्समालोक्य मण्डलस्थो महेश्वरः ॥ सर्वागमोत्तरं दत्वा शास्त्रमन्तरधीयत ॥ ४०॥ तत्र पूजा-

---

स्कार केला. (३४) सिंदूराप्रमाणें ज्याचा वर्ण असून उत्तम मंडल ज्याचें आहे, व गळ्यांत ज्यानें सोन्याचे व जडावाचे दागिने घातले आहेत, ज्याचे नेत्र कमळासारिखे असून हातांत ज्यानें कमल धरिलें आहे, आणि जो ब्रह्मा इंद्र या देवांच्या उत्पत्तीला कारण आहे, अशा त्या शिवाला नमस्कार असो. (३५) ज्यांत रत्नें घातलीं असून ज्याचें पात्र सोन्याचें आहे, व ज्यांत कुंकुम, केशर, कुश, पुष्प इत्यादि पदार्थ घातले आहेत, अशा सोन्याच्या अर्घ्यपात्राला आह्मीं देतों, तें तूं घेऊन व त्यांतलें अर्घ्य घेऊन शिवा, आह्मांवर प्रसन्न हो. (३६) सांबा, गणसहित शिवा, मूलकारणा, रुद्रा, विष्णो, ब्रह्मन् सूर्यमूर्ते, तुला नमन असो. (३७) जो प्राणी सूर्यमंडलांत असणाऱ्या शिवाला पूजा करून समाधानानें अर्घ्य देतो, आणि पुनः सकाळीं, माध्यान्हीं, संध्याकाळीं असें त्रिकाल अर्घ्य जो देतो, (३८) व जो नमस्कार करतो, व शंभरस्तुतिपाठाचें स्तोत्र जो करतो, अशा त्या प्राण्याला जगांत कांहीं दुर्लभ नाहीं, असा शिवभक्त असेल तर निश्चयानें तो मुक्त होतो. (३९) अतएव आदित्यरूपी त्या शिवाची पूजा भक्तीनें नित्य करावी. अशी पूजा मनानें, कृतीनें, वाणीनें जो करतो, त्याला धर्म, अर्थ, काम, मोक्ष असे चारही पुरुषार्थ मिळतात. (४०) नंतर मंडलस्थ हरानें त्या देवांना पाहून सर्व आगमांत श्रेष्ठ अशा शास्त्राला देऊन तेथेंच तो देव गुप्त झाला. (४१) तेव्हां

धिकाराद्यं ब्रह्मक्षत्रविशामिति ॥ ज्ञात्वा प्रणम्य देवेशं देवा जग्मुर्यथागतम् ॥४१॥ अथ कालेन महता तस्मिञ्छास्त्रे तिरोहिते ॥ भर्तारं परिपप्रच्छ तदङ्कस्था महेश्वरी ॥४२॥ तया संचोदितो देवो देव्याचन्द्रार्धभूषणः ॥ अवदत्सारमुद्धृत्य शास्त्रं सर्वागमोत्तरम् ॥४३॥ प्रवर्तितं च तल्लोके नियोगात्परमेष्ठिनः ॥ मयागस्त्येन गुरुणा दधीचेन महर्षिणा ॥४४॥ स्वयमप्यवतीर्योर्व्यां युगावर्तेषु शूलधृक् ॥ स्वाश्रितानां विमुक्त्यर्थं कुरुते ज्ञानसन्ततिम् ॥४५॥ ऋभुः सत्यो भार्गवश्च अङ्गिरा सविता द्विजाः ॥ मृत्युः शतक्रतुर्धर्मो वसिष्ठो मुनिपुंगवः ॥४६॥ सारस्वतस्त्रिधामा च त्रिवृतो मुनिपुंगवः ॥ शततेजाः स्वयं धर्मो नारायण इति श्रुतः ॥४७॥ स्वरक्षश्चारुणिर्धीमांस्तथा चैव कृतञ्जयः ॥ मामतेयो भरद्वाजो गौतमः कविसत्तमः ॥४८॥ वाचःश्रवा मुनिः साक्षात्तथा सूक्ष्मायणिः शुचिः ॥तृणबिंदुमुनिः कृष्णशक्तिः शाक्तेय उत्तरः ॥४९॥ जातूकर्ण्यो हरिः साक्षात्कृष्णद्वैपायनो मुनिः ॥

---

शिवाच्या पूजेचा अधिकार ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांना आहे, असें समजून ते सर्व देव शिवाला नमस्कार करून जसे आले होते, तसे परत आपआपल्या स्थानाला गेले. (४१) नंतर पुष्कळ काल लोटला तेव्हां तें शास्त्र तिरोधानदशेला पावलें, त्यावेळेस शिवाच्या मांडीवर सती प्रेमानें बसली होती, त्यावेळेस आपल्या पतीला तिनें प्रश्न केला. (४२) देवीनें जेव्हां प्रश्न केला, तेव्हां चंद्रशेखर शिवानें सर्व आगमांतला सार काढून तें शास्त्र तिला सांगितलें. (४४) नंतर त्या शिवाच्या आज्ञेनें या जगांत त्या शास्त्राची स्थापना मी, अगस्त्य, गुरु दधीच महर्षि, यांनीं केली. (४५) पुनः युगाच्या आवृत्तीच्या वेळेस ( युग फिरल्यानंतर ) शूलधारी शिव हा अवतार घेऊन आपल्या भक्तांना मुक्ति देण्याकरितां ज्ञानाचा विस्तार करितो. (४६) ऋभु, सत्य, भार्गव, अंगिरा, सविता, मृत्यु, शतक्रतु, धर्म, मुनिश्रेष्ठ वसिष्ठ, (४७) त्रिधामा ( तीन स्थानें ज्याचीं आहेत तो ) सारस्वत, मुनिश्रेष्ठ त्रिवृत, शततेजा, धर्म, नारायण, (४८) स्वरक्ष, अरुणि, बुद्धिमान कृतंजय, मामतीचा मुलगा भरद्वाज, कविश्रेष्ठ गौतम, (४९) वाचश्रवऋषि, सूक्ष्मायणि, शुद्ध असा तृणबिंदु ऋषि, कृष्णशक्ति, शक्तीचा मुलगा उत्तर, (५०) जातू

व्यासास्ते ते च शृण्वन्तु कल्पयोगेश्वरान्क्रमात् ॥५०॥ लैंगे व्यासावताराणि द्वापारान्तेषु सुव्रत ॥ योगाचार्यावताराणि तथा तिष्ये तु शूलिनः ॥५१॥ तत्र तत्र विभो शिष्याश्चत्वारः स्युर्महौजसः ॥ शिष्यास्तेषां प्रशिष्याश्च शतशोऽथ सहस्रशः ॥५२॥ तेषां सम्भाषणाल्लोके सेवाज्ञाकरणादिभिः ॥ भाग्यवन्तो विमुच्यन्ते भक्त्या चात्यन्तभाविताः ॥५३॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे नवमोऽध्यायः ॥९॥

---

कर्ण्य, हरि, व्यासऋषि, इत्यादि व्यासस्वरूपी अवतार जे झाले आहेत, तेच क्रमानें प्रत्येक कल्पांत योगेश्वर जें झाले, त्यांच्या चरित्राला सांगतों ऐक. (५१) सुव्रता कृष्णा, द्वापाराच्या शेवटीं व्यासाचे जे अवतार झाले, ते लिंगपुराणांत सांगितले आहेत, व कलियुगांत शिवाचे अवतार योगाचार्याच्या रूपानें झाले आहेत, (५२) तेव्हां त्या तेजस्वी योगाचार्याला चार चार शिष्य झाले, त्या शिष्यांचे हजारो शिष्य झाले. (५३) त्यांच्याशीं जे भक्तानें भावना ठेवून संभाषण करतात, त्यांची सेवा जे करतात, त्यांची आज्ञा जे पालन करतात, ते ते लोक भाग्यवान होऊन मुक्त होतात.

याप्रमाणें श्रीशिवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील नववा अध्याय संपला.

## अथ दशमोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ युगावर्तेषु सर्वेषु योगाचार्यच्छलेन तु ॥ अवताराणि शर्वस्य शिष्यांश्च भगवन्वद ॥१॥

उपमन्युरुवाच ॥ श्वेतः सुतारो मदनः सुहोत्रः कंक एव च ॥ लौगाक्षिश्च महामायो जैगीषव्यस्तथैव च ॥२॥ दधिवाहश्च ऋषभो मुनिरुग्रोऽत्रिरेव च ॥ सुबालको गौतमश्च तथा वेदशिरा मुनिः ॥३॥ गोकर्णश्च गुहावासी शिखंडी चापरः स्मृतः ॥ जटामाली चाट्टहासो दारुको लाङ्गली तथा ॥४॥ महाकालश्च शूली च दण्डी मुण्डी स एव च ॥ सहिष्णुः सोमशर्मा च नकुलीश्वर एव च ॥५॥ एते वाराहकल्पेऽस्मिन्सप्तमस्यान्तरे मनोः ॥ अष्टाविंशतिसंख्याता योगाचार्या युगक्रमात् ॥६॥ शिष्याः प्रत्येकमेतेषां चत्वारः शान्तचेतसः ॥ श्वेतादयश्च रुष्यान्तास्तान्ब्रवीमि यथाक्रमम् ॥७॥ श्वेतः श्वेतशिखश्चैव श्वेताश्वः श्वेतलोहितः ॥ दुन्दुभिः शतरूपश्च ऋचीकः केतुमांस्तथा ॥८॥ विकोशश्च विकेशश्च विपाशः पाशनाशनः ॥ सुमुखी

---

श्रीकृष्ण ह्मणाले— (१) हे भगवन् उपमन्यो, प्रत्येक युगामध्यें शर्वाचा ( शिवाचा ) अवतार योगाचार्याच्यारूपानें जो झाला, त्या सर्व अवतारांचें चरित्र व त्यांच्या शिष्यांचें चरित्र आह्मास सांगा.

उपमन्यु ह्मणाले— (२) श्वेत, सुतार, मदन, सुहोत्र, कंक, लौगाक्षि, महामाय, जैगीषव्य, (३) दधिवाह, ऋषभ, उग्रऋषि, अत्रि, सुबालक, गौतम, वेदशिराऋषि, (४) गोकर्ण, गुहेमध्यें राहणारा शिखंडी, जटामाली, अट्टहास, दारुक, लांगली, (५) महाकाल, शूली, दंडी, मुंडी, सहिष्णु, सोमशर्मा, नकुलीश्वर. (६) वगैरे योगाचार्य सातव्या मनूच्या वेळेस वराहकल्पांत झाले. युगाच्या क्रमानें योगाचार्य हे अठ्ठावीस संख्येचे होतात. (७) या अठ्ठावीस योगाचार्यांमध्यें प्रत्येक योगाचार्याला शांत स्वभावाचे चार शिष्य होतात. क्रमाला अनुसरून त्यांचीं नांवें श्वेतापासून ऋष्यंतापर्यंत सांगतों ऐक. (८) श्वेत, श्वेतशिख, श्वेताश्व, श्वेतलोहित, दुंदुभि, शतरूप, ऋचीक, केतुमान, (९) विकोश, विकेश, विपाश, पाशनाशन, सुमुखी, दुर्मुख, दु-

दुर्मुखश्चैव दुर्दमी दुरतिक्रमः ॥९॥ सनत्कुमारः सनकः सनन्दश्च सनातनः ॥ सुधामा विरजश्चैव शंखपाद्वैरजस्तथा ॥१०॥ सारस्वतश्च मेघश्च मेघवाहः सुवाहकः ॥ कपिलश्चासुरिः पञ्चशिखो बाष्कल एव च ॥११॥ पराशरश्च गर्गश्च भार्गवश्चांगिरास्तथा ॥ बलबन्धुर्निरामित्रः केतुश्रृंगस्तपोधनः ॥१२॥ लम्बोदरश्च लम्बश्च लम्बाक्षो लम्बकेशकः ॥ सर्वज्ञः समबुद्धिश्च साध्यबुद्धिस्तथैव च ॥१३॥ सुधामा काश्यपश्चैव वसिष्ठो विरजास्तथा ॥ अत्रिरुग्रो गुरुश्रेष्ठः श्रवणोऽथ श्रविष्ठकः ॥१४॥ कुणिश्च कुणिबाहुश्च कुशरीरः कुनेत्रकः ॥ कश्यपो ह्युशनाश्चैव च्यवनश्च बृहस्पतिः ॥१५॥ उतथ्यो वामदेवश्च महाकालो महानिलः ॥ वाचश्रवाः सुवीरश्च श्यावाश्वश्च यतीश्वरः ॥१६॥ हिरण्यनाभः कौशल्यो लोकाक्षिः कुथुमिस्तथा ॥ सुमन्तुर्जैमिनिश्चैव कवन्धः कुशकन्धरः ॥१७॥ प्लक्षो दार्भायणिश्चैव केतुमान्गौतमस्तथा ॥ भल्लवी मधुपिंगश्च श्वेतकेतुस्तथैव च ॥१८॥ उशिजो बृहदश्वश्च देवलः कविरेव च ॥ शालिहोत्रः सुवेषश्च युवनाश्वः शरद्वसुः ॥१९॥ छगलः कुण्डकर्णश्च कुम्भश्चैव प्रवाहुकः ॥ उलूको विद्युतश्चैव शम्बुकश्चाश्वलायनः ॥२०॥ अक्षपादः कणादश्च उलूको

---

र्दमी, दुरतिक्रम, (१०) सनत्कुमार; सनक, सनंद, सनातन, सुधामा, विरज, शंखपाद, वैरज, (११) सारस्वत, मेघ, मेघवाह, सुवाहक, कपिल, आसुरि, पंचशिख, बाष्कल, (१२) पराशर, गर्ग, भार्गव, अंगिरा, बलबंधु, निरामित्र, तपस्वी केतुशृंग, (१३) लंबोदर, लंब, लंबाक्ष, लंबकेशक, सर्वज्ञ, समबुद्धि, साध्यबुद्धि, (१४) सुधामा, काश्यप, वसिष्ठ, विरजा, अत्रि, उग्र, गुरुश्रेष्ठश्रवण, श्रविष्ठक, (१५) कुणि, कुणिबाहु, कुशरीर, कुनेत्र, कश्यप, उशना, च्यवन, बृहस्पति, (१६) उतथ्य, वामदेव, महाकाल, महानिल, वाचश्रवा, सुवीर, श्यावाश्व, यतीश्वर, (१७) हिरण्यनाभ, कौशल्य, लोकाक्षि, कुथुमि, सुमंतु, जैमिनि, कबंध, कुशकंधर, (१८) प्लक्ष, दार्भायणि, केतुमान, गौतम, भल्लवी, मधुपिंग, श्वेतकेतु, (१९) उशिज, बृहदश्व, देवल कवि, शालिहोत्र, सुवेष, युवनाश्व, शरद्वसु, (२०) छगल, कुंडकर्ण, कुंभ, प्रवाहुक, उलूक, विद्युत, शंबुक, आश्वलायन, (२१) अक्षपाद, क-

वत्स एव च ॥ कुशिकश्चैव गर्गश्च मित्रको रुष्य एव च ॥२१॥ एते शिष्या महेशस्य योगाचार्यस्वरूपिणः ॥ संख्या च शतमेतेषां सह द्वादशसंख्यया ॥२२॥ सर्वे पाशुपताः सिद्धा भस्मोध्दूलितविग्रहाः॥ सर्वे शास्त्रार्थतत्वज्ञा वेदवेदाङ्गपारगाः ॥२३॥ शिवाश्रमरताः सर्वे शिवज्ञानपरायणाः ॥ सर्वसंगविनिर्मुक्ताः शिवैकासक्तचेतसः॥२४॥ सर्वद्वन्द्वसहा धीराः सर्वभूतहिते रताः ॥ ऋजवो मृदवः स्वस्था जितक्रोधा जितेन्द्रियाः ॥२५॥ रुद्राक्षमालाभरणास्त्रिपुण्ड्रांकितमस्तकाः ॥ शिखाजटाः सर्वजटा अजटा मुण्डशीर्षकाः ॥२६॥ फलमूलाशनप्रायाः प्राणायामपरायणाः ॥ शिवाभिमानसम्पन्नाः शिवध्यानैकतत्पराः ॥२७॥ समुन्मथितसंसारविषवृक्षांकुरोद्गमाः ॥ प्रया-

---

णाद, उलूक, वत्स, कुशिक, गर्ग, मित्रक, ऋष्य, (२२) हे सर्व योगाचार्य स्वरूपी शिवाचे शिष्य होत. यांची संख्या एकशेबारा होते. (२३) हे सर्व पाशुपत असून सिद्ध असे ह्मणवितात, आणि हे सर्व शरीराला भस्म लावणारे असून सर्व शास्त्रांतला तत्वार्थ जाणणारे आहेत, व वेद वेदांगामध्यें पारंगत झाले आहेत. (२४) हे सर्व शिवाश्रमामध्यें रत असून शिवज्ञानांत मोठे पंडित आहेत. आणि सर्व संगाचा त्याग करणारे असून शिवावर मन आसक्त करणारे आहेत. (२५) शीतोष्णादि द्वंद्वाला सहन करणारे असून सर्व प्राण्यांचें हित करणारे आहेत. व सरळ स्वभावाचे असून मृदु आहेत. व यांनीं क्रोध जिंकला असून हे सर्व जितेंद्रिय आहेत, व स्वस्थ आहेत. (२६) हे सर्व रुद्राक्षमाला धारण करणारे असून कपाळाला त्रिपुंड्र लावणारे आहेत. त्यांत कांहीं लोक शिखा ( शेंडी ) ठेवणारे असून कांहीं लोक जटा ठेवणारे आहेत. व कांहीं लोक सर्व ठिकाणीं जटा बाळगणारे असून कांहीं लोकांना मुळीं जटा नाहींत. आणि कांहीं लोक नुसतें मुंडन केलेले आहेत. (२७) हे सर्व फलमूल भक्षण करणारे असून प्राणायाम करणारे आहेत. शिवाय हे सर्व शिवाचा अभिमान बाळगणारे असून शिवध्यानांत तत्पर राहणारे आहेत. (२८) त्या सर्वांनीं संसाररूपी विषाच्या झाडाचीं

तुमेव सन्नद्धाः परं शिवपुरं प्रति ॥२८॥ स्वदेशिकानिमान्मत्वा नित्यं यः शिवमर्चयेत् ॥ स याति शिवसायुज्यं नात्र कार्या विचारणा ॥२९॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे दशमोऽध्यायः ॥१०॥

---

पाळीं मुळीं उपटून टाकिलीं असून शिवपुराला जाण्याची कडेकोट तयारी केली आहे. (२९) हे सर्व आपले गुरु आहेत, असें मानून निरंतर जो प्राणी शिवाची पूजा करितो, तो प्राणी शिवसायुज्याला पावतो. यांत विचार करावयास नको.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरार्धांतील दहावा अध्याय संपला.

## अथ एकादशोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ भगवन्सर्वयोगीन्द्र गणेश्वर मुनीश्वर ॥ षडाननसमप्रख्य सर्वज्ञाननिधे गुरो ॥१॥ प्रायस्त्वमवतीर्योर्व्यां पाशविच्छित्तये नृणाम् ॥ महर्षिवपुरास्थाय स्थितोऽसि परमेश्वरः ॥२॥ अन्यथा हि जगत्यस्मिन्देवो वा दानवोऽपि वा ॥ त्वत्तोऽन्यः परमं भावं को जानीयाच्छिवात्मकम् ॥३॥ तस्मात्तव मुखोद्गीर्णं साक्षादिव पिनाकिनः ॥ शिवज्ञानामृतं पीत्वा न मे तृप्तमभून्मनः ॥४॥ साक्षात्सर्वजगत्कर्तुर्भर्तुरंकं समाश्रिता ॥ भगवन्किं नु पप्रच्छ भर्तारं परमेश्वरी ॥५॥

उपमन्युरुवाच ॥ स्थाने पृष्टं त्वया कृष्ण तद्वक्ष्यामि यथातथम् ॥ भवभक्तस्य युक्तस्य तव कल्याणचेतसः ॥६॥ महीधरवरे दिव्ये मन्दरे चारुकन्दरे ॥ देव्या सह महादेवो दिव्योद्यानगतोऽभवत् ॥७॥ तदा

---

श्रीकृष्ण बोलतो— (१) सर्व योग्यांमध्यें श्रेष्ठ ह्मणवून घेणाऱ्या, उपमन्यो, हे गणेश्वरा, हे मुनिश्रेष्ठा, हे षण्मुखतुल्या, हे ज्ञाननिधे, हे गुरो, भगवन्, (२) प्रायशः मनुष्यांचे पाश तोडण्याकरितां पृथ्वीतलावर अवतार घेऊन महर्षीचें शरीर धारण करून संचार करणारा तूं प्रत्यक्ष परमेश्वर आहेस, यांत संशय नाहीं. (३) नाहींतर या जगांत देवदानव यांपैकीं कोणता प्राणी शिवात्मक भावाला तुझ्यावांचून जाणणारा कोण आहे? (४) ह्मणूनच असें मी समजतों कीं, तुझ्या मुखानें निघालेली वाणी, ती साक्षात् परमेश्वराच्याच तोंडांतून निघाली आहे. तें असो. सांप्रतकाळीं शिवज्ञानरूपी अमृत पिऊन माझें मन अद्यापि तृप्त झालें नाहीं. (५) तर सर्व जगाचा कर्ता साक्षात् परमेश्वराच्या अंकावर बसून सतीनें पतीस काय प्रश्न केला ? हें सांग.

उपमन्यु बोलला— (६) रे कृष्णा त्वां योग्य प्रश्न केला. तर यथार्थ सांगतों ऐक. कारण उत्तम मनाचा असून शंकराचा योग्य भक्त तूं आहेस. (७) पृथ्वीतलावर उत्तम प्रख्यात असलेल्या मंदर पर्वतावर प्रसिद्ध असलेल्या एका बागेंत देवीसहित श्रीशिव एकेवेळीं बसले होते. (८) तेव्हां

देव्याः प्रियसखी सुस्मितास्या शुभावती ॥ फुल्लान्यतिमनोज्ञानि पुष्पाणि समुपाहरत् ॥८॥ ततः स्वमंकमारोप्य देवीं देववरो हरः ॥ अलङ्कृत्य च तैः पुष्पैरास्ते हृष्टतरः स्वयम् ॥९॥ अथान्तःपुरचारिण्यो देव्यो दिव्यविभूषणाः ॥ अन्तरङ्गा गणेन्द्राश्च देवं देवीं सिषेविरे ॥१०॥ ततः प्रियाः कथा वृत्ता विनोदाय महेशयोः॥ त्राणाय च नृणां लोके ये शिवं शरणं गताः ॥११॥ तदावसरमालोक्य सर्वलोकमहेश्वरी ॥ भर्तारं परिपप्रच्छ सर्वलोकमहेश्वरम् ॥१२॥

देव्युवाच ॥ केन वश्यो महादेवो मर्त्यानां मन्दचेतसाम् ॥ अल्पसत्वाल्पशक्तीनामल्पानामकृतात्मनाम् ॥१३॥

---

देवीजवळ गालांतल्या गालांत हंसणारी शुभावती नांवाची एक सुंदर दासी होती. तेव्हां तिनें सुंदर सुवासिक फुलें तोडून देवीला आणून दिलीं. (९) नंतर तीं फुलें श्रीशिवानें पाहून देवीला आपल्या अंकावर अति प्रेमानें बसवून घेऊन त्या फुलांची माळ स्वतः करून देवीच्या वेणींत हळूच बसविली. मग देवीकडे पाहून आपल्या मनाला शिवानें धन्य मानून घेतलें. (१०) इतक्यांत अंतःपुरांत असणाऱ्या एकूणएक दासी तेथें येऊन आंगावर डागडागिने घालून सेवेकरितां हात जोडून उभ्या राहिल्या. आणि कितीएक अंतरंगांतले गणेश्वर त्यावेळीं येऊन देवाची व देवीची सेवा करूं लागले. (११) त्यांतले कांहीं लोक पार्वतीपरमेश्वराच्या विनोदाकरितां सुरस कथा सांगूं लागले. इतक्यांत देवीच्या मनांत असें आलें, कीं जगांत कांहीं लोक आपलें संरक्षण व्हावें या हेतूनें आपल्याला जे शरण आले होते, त्यांचे हेतु परिपूर्ण करावे ह्मणून शिवाला प्रश्न करावा. (१२) व प्रश्न करावयास वेळ योग्य हीच आहे, असें पाहून सर्व लोकांची स्वामिनी सतीनें जगत्प्रभु आपल्या पतीला प्रश्न केला.

देवी बोलली— (१३) देवा, जगांत ज्यांची शक्ति फारच थोडी आहे, व ज्यांचें सत्व अल्प आहे त्यांना व ज्यांची बुद्धि अति जड आहे, व जे अशिक्षित आहेत, त्या लोकांना श्रीमहादेव कोणत्या आराधनेनें किंवा कोणत्या उपायानें वश होईल, हें सांगा.

ईश्वर उवाच ॥ न कर्मणा न तपसा न जपैर्न समाधिभिः ॥ न ज्ञानेन न चान्येन वश्योऽहं श्रद्धया विना ॥१४॥ श्रद्धा मय्यस्ति चेत्पुंसां येन केनापि हेतुना ॥ वश्यः स्पृश्यश्च दृश्यश्च पूज्यः सम्भाष्य एव च ॥१५॥ साध्या तस्मान्मयि श्रद्धा मां वशीकर्तुमिच्छता॥ श्रद्धाहेतुः स्वधर्मस्य रक्षणं वर्णिनामिह ॥१६॥ स्ववर्णाश्रमधर्माभ्यां वर्तते यस्तु मानवः ॥ तस्यैव भवति श्रद्धा मयि नान्यस्य कस्यचित् ॥१७॥ आम्नायसिद्धमखिलं धर्ममाश्रमिणामिह ॥ ब्रह्मणा कल्पितं पूर्वं ममैवाज्ञापुरःसरम् ॥१८॥ स तु पैतामहो धर्मो बहुवित्तक्रियान्वितः ॥ नात्यन्तफलभूयिष्ठः क्लेशायाससमन्वितः ॥१९॥ तेन धर्मेण महता श्रद्धां प्राप्य सुदुर्लभाम् ॥ वर्णिनो ये प्रपद्यन्ते मामनन्यसमाश्रयाः ॥२०॥ तेषां सुखेन मार्गेण धर्मकामार्थमुक्तये ॥ व-

---

ईश्वर बोलला— (१४) हे पार्वति, कर्मानें, तपानें, जपानें, समाधीनें, ज्ञानानें, व इतर कृतीनें मी वश्य नाहीं, परंतु श्रद्धेला मात्र मी वश्य आहे. (१५) कोणत्याही कारणानें माझ्या ठिकाणीं श्रद्धा मानवाची असली, तर त्या मानवाला मी वश होतो, त्याचा स्पर्श करतों, त्याला मी दिसतों, तो मला मान्य होतो, त्याच्या बरोबर मी बोलतों. (१६) मला वश करावयाचा उपाय एक श्रद्धाच आहे. याकरितां मानवांनीं माझ्यावर श्रद्धा करावी. शिवाय चारी वर्णांमध्यें राहणाऱ्यांनीं माझ्यावर श्रद्धा ठेविली तर त्यांच्या धर्माचें संरक्षण होईल. (१७) आपआपल्या वर्णाप्रमाणें आश्रमाप्रमाणें धर्माप्रमाणें जो प्राणी वागतो, त्यालाच श्रद्धा माझ्याविषयीं उत्पन्न होईल. इतर कोणत्याही प्राण्याला उत्पन्न होणार नाहीं. (१८) सर्व वेदांत प्रसिद्ध असलेला हा त्या त्या आश्रमवास्यांचा धर्म ब्रह्मदेवानें माझ्या आज्ञेनें पूर्वीं प्रसिद्ध केला. (१९) तो पैतामहधर्म पुष्कळ द्रव्याचा व पुष्कळ क्रियेचा असून पुष्कळसें फल कांहीं त्यानें मिळत नाहीं. शिवाय तो धर्म करावयास क्लेश फार होतात. (२०) अशा त्या धर्मानें दुर्लभ श्रद्धा मिळवून ज्या वर्णाचे लोक दुसऱ्याचा आश्रय न करतां मला शरण येतात. (२१) त्यांना बिन श्रमाच्या मार्गानें धर्म, काम, अर्थ, मोक्ष हे चार पुरुषार्थ मिळण्याकरितां वर्णाश्रमांचा

र्णाश्रमसमाचारो मया भूयः प्रकल्पितः ॥२१॥ तस्मिन्भक्तिमतामेव मदीयानान्तु वर्णिनाम् ॥ अधिकारो न चान्येषामित्याज्ञा नैष्ठिकी मम ॥२२॥ मदाज्ञप्तेन मार्गेण वर्णिनो मदुपाश्रयाः ॥ मलमायादिपाशेभ्यो विमुक्ता मत्प्रसादतः ॥२३॥ पुरं मदीयमासाद्य पुनरावृत्तिदुर्लभम् ॥ परमं मम साधर्म्यं प्राप्य निर्वृतिमाप्नुयुः ॥२४॥ तस्माल्लब्ध्वाप्यलब्ध्वा वा वर्णधर्मं मयेरितम् ॥ आश्रित्य मम भक्तश्चेत्स्वात्मनात्मानमुद्धरेत् ॥२५॥ अलब्धाल्लब्ध एवैष कोटिकोटिगुणाधिकः ॥ तस्मान्मन्मुखतो लब्ध्वा वर्णधर्मं समाचरेत् ॥२६॥ ममावताराणि शुभे योगाचार्यच्छलेन तु ॥ सर्वान्तरेषु सन्त्यार्ये सन्ततिश्च सहस्रशः ॥२७॥ अयुक्तानामबुद्धानामभक्तानां सुरेश्वरि ॥ दुर्लभं सन्ततिज्ञानं ततो यत्नात्समाश्रयेत् ॥२८॥ सा हानिस्तन्मह-

---

आचार पुनः मीं केला. (२२) अशा त्या आचारावर भक्ति ठेवणारे जे असतील, आणि असे जे माझे वर्णाश्रमवासी असतील, तेच या धर्माचे अधिकारी होत. दुसरे होत नाहींत, अशी माझी नैष्ठिकी आज्ञा आहे. (२३) मीं सांगितलेल्या मार्गानें माझा आश्रय करून जे वर्णी चालतात, ते लोक माझ्या प्रसादानें मल माया वगैरे पाशांतून मुक्त होतात. (२४) व जेथें आल्यावर पुनः जन्मास येत नाहींत, अशा त्या माझ्या लोकाला जाऊन तेथें माझ्या बरोबरीचे होऊन उत्तम सुखोपभोग घेतात. (२५) याकरितां वर्णाश्रमधर्माचा लाभ होवो, किंवा न होवो, परंतु मीं सांगितलेला धर्म स्वीकारून माझा भक्त जो होतो, तो आपल्या आपल्या आत्म्याच्या योगानें आत्म्याचा उद्धार करतो. (२६) वर्णाश्रमधर्म करणारा न करणारा हा प्राणी ( माझा धर्म करणारा प्राणी ) कोटि कोटि गुणांनीं अधिक आहे, असा समजावा. ह्मणूनच माझ्या तोंडांतून निघालेल्या वर्णधर्माचा स्वीकार करावा. (२७) हे शुभे, योगाचार्याच्या रूपानें माझे अवतार सर्व मन्वंतरांत आहेत, व त्यांच्या हजारो संतति आहेत. (२८) जे अयोग्य असतील, जे अभक्त असतील, जे अज्ञानी असतील, त्यांना या संततीचें ज्ञान होणें परमदुर्लभ आहे, असें जाण. याकरितां प्रयत्नानें या ज्ञानाचा आश्रय करावा (२९) मोक्षमार्ग ज्या धर्मानें मिळत नाहीं, अशा धर्माच्या ठिकाणीं श्रम करणें,

च्छिद्रं स मोहः सान्धमूकता ॥ यदन्यत्र श्रमं कुर्यान्मोक्षमार्गबहिष्कृतः ॥२९॥ ज्ञानं क्रिया च चर्या च योगश्चेति सुरेश्वरि ॥ चतुष्पादः समाख्यातो मम धर्मः सनातनः ॥३०॥ पशुपाशपतिज्ञानं ज्ञानमित्यभिधीयते ॥ षडध्वशुध्दिर्विधिना गुर्वधीना क्रियोच्यते ॥३१॥ वर्णाश्रमप्रयुक्तस्य मयैव विहितस्य च ॥ ममार्चनादिधर्मस्य चर्याचर्येति कथ्यते ॥३२॥ मदुक्तेनैव मार्गेण मय्यवस्थितचेतसः ॥ वृत्त्यन्तरनिरोधो यो योग इत्यभिधीयते ॥३३॥ अश्वमेधशताच्छ्रेष्ठं देवि चित्तप्रसाधनम् ॥ मुक्तिदश्च तथाप्येतदसाध्यं विषयैषिणाम् ॥३४॥ विजितेन्द्रियवर्गस्य यमेन नियमेन च ॥ सर्वपापहरो योगो विरक्तस्यैव कथ्यते ॥३५॥ वैराग्याज्जायते ज्ञानं ज्ञानाद्योगः प्रवर्तते ॥ योगज्ञः पतितो वापि मुच्यते नात्र संशयः ॥३६॥ दया का-

---

याच्यासारखी दुसरी हानि, दुसरें मोठें छिद्र ( मोठी चूक ) नाहीं. व याच्यासारखा दुसरा मोह, याच्यासारिखा आंधळेपणा व मुकेपणा कोणताही नाहीं. (३०) हे सुरेश्वरि, ज्ञान, क्रिया, चर्या, योग असे हे चार पाय माझ्या प्राचीन धर्माचे आहेत, असें जाण. (३१) पशुपाशपतीच्या ज्ञानालाच ज्ञान असें ह्मणतात. विधिपूर्वक गुरूच्या सहाय्यानें षडध्वाची शुद्धि करून घेणें, याला क्रिया ह्मणतात. (३२) मीं केलेल्या वर्णाश्रमधर्माचें आचरण व माझी पूजा वगैरे करणें या धर्माला चर्या असें ह्मणतात. (३३) मीं सांगितलेल्या मार्गानें माझ्याठिकाणीं मन ठेऊन इतर व्यापार सर्व सोडून आचरण करणें, याला योग असें ह्मणतात. (३४) हे देवि, मनाला संतोष देणारें, शंभर अश्वमेधांपेक्षां श्रेष्ठ असलेलें मुक्ति देणारें असें आचरण ( धर्म ) विषयाभिलाषी लोकांना साध्य होत नाहीं. (३५) जे यम नियम बाळगणारे आहेत, व ज्यांनीं इंद्रियें जिंकिलीं आहेत, अशा विरक्तांना सर्व पाप हरण करणारा हा योग साध्य होतो, असें सांगतात. (३६) वैराग्यापासून ज्ञान होतें, ज्ञानापासून योग होतो, योगापासून मुक्ति मिळते. योग जाणणारा पतित ( जातिभ्रष्ट ) जरी असला तरी तो मुक्त होतो, यांत संशय नाहीं. (३७) सर्व भूतांच्या ठिकाणीं दया करावी, व अहिंसेचा व

र्योथ सततमहिंसाज्ञानसंग्रहम् ॥ सत्यमस्तेयमास्तिक्यं श्रध्दा चेन्द्रियनिग्रहः ॥३७॥ अध्यापनश्चाध्ययनं यजनं याजनं तथा ॥ ध्यानमीश्वरभावश्च सततं ज्ञानशीलता ॥३८॥ य एवं वर्तते विप्रो ज्ञानयोगस्य सिध्दये ॥ अचिरादेव विज्ञानं लब्ध्वा योगश्च विन्दति ॥३९॥ दग्ध्वा देहमिमं ज्ञानी क्षणाज्ज्ञानाग्निना प्रिये ॥ प्रसादान्मम योगज्ञः कर्मबन्धं प्रहास्यति ॥४०॥ पुण्यापुण्यात्मकं कर्म मुक्तेस्तत्प्रतिबन्धकम् ॥ तस्मान्नियोगतो योगी पुण्यापुण्यं विवर्जयेत् ॥४१॥ फलकामनया कर्मकरणात्प्रतिबध्यते ॥ न कर्ममात्रकरणात्तस्मात्कर्मफलं त्यजेत् ॥४२॥ प्रथमं कर्मयज्ञेन बहिः सम्पूज्य मां प्रिये ॥ ज्ञानयज्ञरतो भूत्वा पश्चाद्योगं समभ्यसेत् ॥४३॥ विदिते मम याथात्म्ये कर्मयज्ञेन देहिनः ॥ न यजन्ति हि मां युक्ताः समलोष्टाश्मकाञ्चनाः ॥४४॥ नित्ययुक्तो मुनिश्रेष्ठो मद्भक्तश्च समाहितः ॥ ज्ञानयो-

---

ज्ञानाचा संग्रह नेहमीं करावा, सत्य अस्तेय ( चोरी न करणें ) आस्तिक्य, श्रध्दा, इंद्रियनिग्रह, (३८) अध्यापन, अध्ययन, यजन, याजन, ध्यान, ईश्वरभाव, ज्ञानशीलता (३९) इत्यादि गुण नेहमीं बाळगून जो प्राणी ज्ञानयोगाच्या सिध्दीकरितां झटतो, त्या प्राण्याला लौकरच ज्ञान मिळून योगही साध्य होतो. (४०) हे सुंदरि, ज्ञानरूपी अग्नीनें या देहाला एका क्षणांत जाळून माझ्या प्रसादानें योग जाणणारा ज्ञानी एका क्षणांत कर्मबंधाला झुगारून देतो. (४१) पुण्यरूपी पापरूपी जें कर्म असेल, तेंच मुक्तीला प्रतिबंधक होतें. ह्मणूनच योगानें पुण्यापुण्यकर्माचा त्याग योग्यानें करावा. (४२) फलाची इच्छा धरून कर्म केलें असतां तें कर्म मुक्तीला प्रतिबंधक होतें. केवळ कर्म कांहीं प्रतिबंधक होत नाहीं, याकरितां फलाची इच्छा न करितां कर्म करीत असावें. (४३) हे सुंदरि, प्रथम कर्मयज्ञानें माझी बाहेरील पूजा करून नंतर ज्ञानयोगांत रत होऊन योगाचा अभ्यास करावा. (४४) कर्मयज्ञानें माझें यथार्थ ज्ञान झालें असतां सोनें, लांकूड, पाषाण हे सर्व पदार्थ बरोबरीचे वाटूं लागतात. नंतर श्रेष्ठ लोक कर्मयज्ञानें माझी पूजा करीत नाहींत. (४५) नित्ययुक्त, मुनींमध्यें श्रेष्ठ, असा माझा भक्त समाधानमनानें ज्ञानयोगांत रत होऊन योगी असा ह्मणवून घेऊन माझ्या सायु-

गरतो योगी मम सायुज्यमाप्नुयात् ॥४५॥ अथाविरक्तचित्ता ये वर्णिनो मदुपाश्रयाः ॥ ज्ञानचर्याक्रियास्वेव तेऽधिकुर्युस्तदर्हकाः ॥४६॥ बाह्यमाभ्यन्तरश्चैव बाह्याभ्यन्तरमेव च ॥ वाङ्मनःकायभेदाच्च त्रिधा मद्भजनं विदुः ॥४७॥ जपः कर्म तपो ध्यानं ज्ञानश्चेत्यनुपूर्वशः ॥ पञ्चधा कथ्यते सद्भिस्तदेव भजनं पुनः ॥४८॥ अन्यात्मविदितं बाह्यमस्मदभ्यर्चनादिकम् ॥ तदेव तु स्वसंवेद्यमाभ्यन्तरमुदाहृतम् ॥४९॥ मनो मत्प्रवणं चित्तं न मनोमात्रमुच्यते ॥ मन्नामनिरता वाणी वाङ्मता मम नेतरा ॥५०॥ लिङ्गैर्मच्छासनादिष्टैस्त्रिपुण्ड्रादिभिरङ्कितः॥ ममोपचारनिरतः कायः कायो न चेतरः ॥५१॥ मदर्चा कर्म विज्ञेयं बाह्यं यागादि नोच्यते ॥ मदर्थे देहसंशोषस्तपः

---

ज्याला पावतो. (४६) आतां जे लोक अजून विरक्त झाले नसतील, व माझा आश्रय करणारे असतील, ते वर्णवासी लोक ज्ञान, क्रिया, चर्या यांतले अधिकारी असून याच कर्माला योग्य आहेत, असें समज. (४७) बाह्यकर्म, आभ्यंतरकर्म, बाह्याभ्यंतरकर्म असें तीन प्रकारचें हें कर्म वाणी, मन, शरीर याभेदानें पुनः तीन प्रकारचें होतें. व माझें भजनही मन, वाणी, शरीर यारीतीनें तीन प्रकारचें आहे, असें जाण. (४८) जप, कर्म, तप, ध्यान, ज्ञान या क्रमानें तेंच भजन पुनः पांच प्रकारचें आहे, असें सांगतात. (४९) माझी पूजा करणें वगैरे जें कर्म असेल, तें दुसऱ्याला समजलें तर किंवा दुसऱ्याकडून समजून घेऊन केलें तर त्याला बाह्यकर्म असें ह्मणतात. तेंच कर्म आपल्याच समजुतीनें केलें असतां त्याला आभ्यंतरकर्म ह्मणतात. (५०) सर्वदा माझ्या ठिकाणीं मन ज्याचें असेल, त्याच्याच मनाला मन असें ह्मणतात, केवळ मनाला मन ह्मणत नाहींत. माझ्या नामस्मरणांत ज्याची वाणी रत असेल, त्याच्या त्या वाणीला वाणी ह्मणावें. दुसऱ्याच्या वाणीला वाणी ह्मणूं नये. (५१) माझ्या शासनानें इष्टलिंगांनीं व भस्माच्या त्रिपुंड्रांनीं युक्त जो देह असेल, व माझ्या सेवेंत जो देह रत असेल, त्याला देह ह्मणतात, इतराला ह्मणत नाहींत. (५२) माझी पूजा सेवा वगैरे कर्म जें असेल त्याला कर्म ह्मणावें, यज्ञयागादिकाला कर्म ह्मणूं

कृच्छ्रादि नो मतम् ॥५२॥ जपः पञ्चाक्षराभ्यासः प्रणवाभ्यास एव च ॥ रुद्राध्यायादिकाभ्यासो न वेदाध्ययनादिकम् ॥५३॥ ध्यानं मद्रूपचिन्ताद्यं नात्माद्यर्थसमाधयः ॥ ममागमार्थविज्ञानं ज्ञानं नान्यार्थवेदनम् ॥५४॥ बाह्ये वाभ्यन्तरे वाथ यत्र स्यान्मनसो रतिः ॥ प्राग्वासनावशाद्देवि तत्र निष्ठां समाचरेत् ॥५५॥ बाह्यादाभ्यन्तरं श्रेष्ठं भवेच्छतगुणाधिकम् ॥ असंकटत्वाद्दोषाणां दृष्टानामप्यसम्भवात् ॥५६॥ शौचमाभ्यन्तरं विद्यान्न बाह्यं शौचमुच्यते ॥ अन्तःशौचवियुक्तात्मा शुचिरप्यशुचिर्यतः ॥५७॥ बाह्यमाभ्यन्तरञ्चैव भजनं भावपूर्वकम् ॥ न भावरहितं देवि विप्रलम्भैककारणम् ॥५८॥ कृतकृत्यस्य तृप्तस्य मम किं क्रियते नरैः ॥ बहिर्वाभ्यन्तरे वाथ मया

---

नये. माझ्या सेवेकरतां देह शोष करणें यालाच तप ह्मणावें, कृच्छ्रादिव्रताला तप ह्मणूं नये. (५३) पंचाक्षरमंत्राच्या अभ्यासालाच जप ह्मणतात, प्रणवाच्या अभ्यासालाच जप ह्मणतात, व रुद्राध्यायादिकाच्या अभ्यासाला जप ह्मणतात, वेदादि अध्ययनाला जप ह्मणत नाहींत. (५४) माझ्या रूपाचें चिंतन करणें यालाच ध्यान ह्मणतात, आपल्या पोटासाठीं द्रव्य कसें मिळवावें अशा चिंतेला ध्यान ह्मणत नाहींत. माझ्या आगमाच्या अर्थाच्या समजुतीला ज्ञान असें ह्मणतात, इतर अर्थाच्या ज्ञानाला ज्ञान ह्मणत नाहींत. (५५) हे देवि पूर्वजन्माच्या वासनेप्रमाणें बाह्यकर्मामध्यें किंवा आभ्यंतर कर्मामध्यें ज्याच्या मनाची प्रीति जशी होईल तशी निष्ठा त्या कर्मात ठेवावी. (५६) बाह्यकर्मापेक्षां आभ्यंतरकर्म हें शतपटीनें श्रेष्ठ आहे. कारण या आभ्यंतरकर्मात कोणतींहीं संकटें येत नाहींत, व दृष्टदोषही यांत येण्याचा संभव नाहीं. (५७) आभ्यंतर शुद्धतेलाच शौच ह्मणावें बाह्यशौचाला शौच ह्मणूं नये. ज्याच्या मनांत शुद्धता नाहीं, तो प्राणी बाह्यतः जरी शुद्ध असला तरी अशुद्धच समजावा. (५८) हे देवि, बाह्यभजन असो, किंवा आभ्यंतर भजन असो, तें भावयुक्त असेल तर श्रेष्ठ समजावें. भावरहित भजन असेल तर त्याला भजन ह्मणूं नये तसें भजन केलें असतां कपट केल्याप्रमाणें मात्र होणार आहे. (५९) नित्यतृप्त कृतार्थ अशा मला मानव काय करूं शकतात ? बाह्यभजन असो, आभ्यंतर भजन असो, त्यांतला भाव

भावो हि गृह्यते ॥५९॥ भावैकात्मा क्रिया देवि मम धर्मः सनातनः ॥ मनसा कर्मणा वाचाऽप्यनपेक्ष्य फलं क्वचित् ॥६०॥ फलोद्देशेन देवेशि लघुर्मम समाश्रयः ॥ फलार्थी तदभावे मां परित्यक्तुं क्षमी यतः ॥६१॥ फलार्थिनोऽपि यस्यैव मयि चित्तं प्रतिष्ठितम् ॥ भावानुरूपफलदस्तस्याप्यहमनिन्दिते ॥६२॥ फलानपेक्षया येषां मनो मत्प्रवणं भवेत् ॥ प्रार्थयेयुः फलं पश्चाद्भक्तास्तेऽपि मम प्रियाः ॥६३॥ प्राक्संस्कारवशादेव येऽविचिन्त्य फलाफले ॥ विवशा मां प्रपद्यन्ते मम प्रियतमा मताः ॥६४॥ मल्लाभान्न परो लाभस्तेषामस्ति यथातथम् ॥ ममापि लाभस्तल्लाभान्न परः परमेश्वरि ॥६५॥ मदनुग्रहतस्तेषां भावो मयि समर्पितः ॥ फलं परमनिर्वाणं प्रयच्छति बलादिव ॥६६॥ महात्मनामनन्यानां मयि विन्यस्तचेतसाम् ॥ अष्टधा

---

मात्र मी पाहणार. (६०) मनानें, वाणीनें शरीरानें फलाची इच्छा न धरितां माझ्या ठिकाणीं भाव ठेवून जी क्रिया करतात, त्यालाच सनातन माझा धर्म ह्मणतात. (६१) हे देवि, फलाची इच्छा धरून माझा आश्रय जो करितो त्याला लघुपणा येतो. याकरितां फलाचा त्याग करून माझा आश्रय करणें उत्तम मार्ग होय; कारण कीं, फलार्थी जो असतो, त्याचें फल एकदां मिळालें ह्मणजे पुनः माझ्याकडे तो पाहत सुद्धां नाहीं. (६२) जो फलार्थी असून माझ्यावर चित्त ठेवितो, त्याच्या भावाला अनुसरून त्याला फलें मी देतों. (६३) फलाची इच्छा न धरतां माझ्यावर चित्त जो ठेवितो, असा तो माझा भक्तही मला प्रिय होऊन मागून फल मागतोच. (६४) प्राचीन जन्माच्या संस्काराला अनुसरून फलाफलाचा विचार न करतां भक्ति परवश होऊन मला जे शरण येतात, ते मला फार आवडतात. (६५) तशा माझ्या भक्तांना माझ्या प्राप्तीशिवाय दुसरी वस्तु आवडतच नाहीं. हे देवि, मला सुद्धां तशा भक्तांच्या लाभाशिवाय कांहीं आवडत नाहीं. (६६) माझ्या अनुग्रहामुळेंच त्यांचा भाव माझ्या ठिकाणीं अर्पण केलेला असतो, अशा लोकांना बळेंच मोक्षरूपीफल मी देतों, घ्या असें त्यांस मला ह्मणावें लागतें. (६७) अन्यदेवतेला न भजणारे, माझ्याच ठिकाणीं मन तल्लीन करणारे, अशा म-

लक्षणं प्राहुर्मम धर्माधिकारिणाम् ॥६७॥ मद्भक्तजनवात्सल्यं पूजायां चानुमोदनम् ॥ स्वयमप्यर्चनं चैव मदर्थे चाङ्गचेष्टितम् ॥६८॥ मत्कथाश्रवणे भक्तिः स्वरनेत्राङ्गविक्रियाः ॥ ममानुस्मरणं नित्यं यश्च मामुपजीवति ॥६९॥ एवमष्टविधं चिह्नं यस्मिन्म्लेच्छेऽपि वर्तते ॥ स विप्रेन्द्रो मुनिः श्रीमान्स यतिः स च पण्डितः ॥७०॥ न मे प्रियश्चतुर्वेदी मद्भक्तः श्वपचोऽपि यः ॥ तस्मै देयं ततो ग्राह्यं स च पूज्यो यथा ह्यहम् ॥७१॥ पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ॥ तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥७२॥ अथ वक्ष्यामि देवेशि भक्तानामधिकारिणाम् ॥ विदुषां द्विजमुख्यानां वर्णधर्मं समासतः ॥७३॥ त्रिःस्नानं चाग्निकार्यश्च लिंगार्चनमनुत्तमम् ॥ दानमीश्वरभावश्च दया सर्वत्र सर्वदा ॥७४॥ सत्यं सन्तोष

---

हात्म्या धर्माधिकाऱ्यांचें लक्षण आठ प्रकारचें आहे. (६८) माझ्या भक्तांविषयीं वात्सल्य ( प्रेम ) बाळगणें, माझ्या पूजेला अनुमोदन देणें, स्वतः पूजा करणें, माझ्याकारितांच अंगचेष्टा करणें, ( नर्तन करणें ) (६९) माझी कथा ऐकण्याविषयीं भक्ति ठेवणें, माझ्या कारितांच स्वर, नेत्र, व अंग यांची चेष्टा करणें, माझें स्मरण करणें, नित्य माझ्या कारितांच उपजीविका करणें. (७०) हीं आठ लक्षणें होत. हीं लक्षणें एखाद्या म्लेंच्छाच्या ठिकाणीं जरी असलीं, तरी तोच मला ब्राह्मण श्रेष्ठ, मुनि, श्रीमान्, यति, पंडित असा वाटतो. (७१) चतुर्वेदांमध्यें विद्वान् असून माझा भक्त तो नसेल तर तो मला आवडत नाहीं. चांडाळ ( महार ) असूनही माझा भक्त असला तर त्याला दान द्यावें व त्याच्याकडून घ्यावें. मी जसा जगांत पूज्य आहें, तसा तोही पूज्य आहे, असें समजावें. (७२) पत्र, पुष्प, फल, उदक, वगैरे जो प्राणी मला भक्तिपूर्वक देतो, त्याला मी नाहींसा होत नाहीं, व तो मला नाहींसा होत नाहीं. (७३) देवि, शिवभक्त असून अधिकारी जे आहेत, अशा विद्वान् ब्राह्मणश्रेष्ठांचा वर्णधर्म संक्षेपानें आतां सांगतों. (७४) त्रिकाल स्नान करणें, अग्निकार्य करणें, लिंगपूजा करणें, भक्तांला दान देणें, ईश्वराच्या ठिकाणीं भाव ठेवणें, सर्व ठिकाणीं सर्वदा दया असणें, (७५) सत्य,

आस्तिक्यमहिंसा सर्वजन्तुषु ॥ ह्रीः श्रद्धाऽध्यापनं योगः सदाध्ययनमेव च ॥७५॥ व्याख्यानं ब्रह्मचर्यश्च श्रवणश्च तपः क्षमा ॥ शौचं शिखोपवीतं च उष्णीषं चोत्तरीयकम् ॥७६॥ निषिद्धासेवनं चैव भस्मरुद्राक्षधारणम् ॥ पर्वण्यभ्यर्चनं देवि चतुर्दश्यां विशेषतः ॥७७॥ पानं च ब्रह्मकूर्चस्य मासि मासि यथाविधि ॥ अभ्यर्चनं विशेषेण तेनैव स्नाप्य मां प्रिये ॥७८॥ सर्वक्रियान्नसन्त्यागः श्राद्धान्नस्य च वर्जनम् ॥ तथा पर्युषितान्नस्य यावकस्य विशेषतः ॥७९॥ मद्यस्य मद्यगन्धस्य नैवेद्यस्य च वर्जनम् ॥ सामान्यं सर्ववर्णानां ब्राह्मणानां विशेषतः ॥८०॥ क्षमा शान्तिश्च सन्तोषः सत्यमस्तेयमेव च ॥ ब्रह्मचर्यं मम ज्ञानं वैराग्यं भस्मसेवनम् ॥८१॥ सर्वसंगनिवृत्तिश्च दशैतानि विशेषतः ॥ लिंगानि योगिनां भूयो दिवा भिक्षाशनं तथा ॥८२॥ वानप्रस्थाश्रमस्थानां समानमिदमिष्यते ॥ रात्रौ न भोजनं कार्यं

---

संतोष, आस्तिक्य, सर्व जंतूंची अहिंसा, लज्जा, श्रद्धा, अध्यापन, ( अध्ययन करविणें ) योग, सर्वदा अध्ययन, (७६) व्याख्यान, ब्रह्मचर्य, श्रवण, तप, क्षमा, शौच, (शुचिर्भूतपणा ) शिखा, यज्ञोपवीत, उष्णीष, ( पागोटें ) उत्तरीय, ( पांघरावयाचें वस्त्र ) (७७) निषिद्ध सोडणें, ( निषिद्ध पदार्थ न खाणें ) भस्मधारण, रुद्राक्षधारण, पर्वकालीं पूजा करणें, विशेषतः चतुर्दशीला पूजा करणें, (७८) प्रत्येक महिन्याला विधानपूर्वक ब्रह्मकूर्चाचें पान करणें, मला त्या ब्रह्मकूर्चानें अभिषेक घालून विशेषतः पूजा करणें, (७९) मनास वाटेल तसें कर्म करून अशुद्धपणानें केलेलें अन्न सोडणें विशेषतः श्राद्धान्न सोडणें, शिळें अन्न सोडणें, विशेषतः अंबिल सोडणें, (८०) दारू, दारूचा वास, नैवेद्य हे सोडणें, वगैरे हा धर्म सर्व वर्णांचा आहे, असें समजावें. विशेषेंकरून ब्राह्मणांनीं हा धर्म अवश्य बाळगिला पाहिजे. (८१) क्षमा, शांति, संतोष, सत्य, चोरी न करणें (अस्तेय,) ब्रह्मचर्य, शिवज्ञान, वैराग्य, भस्मसेवन, (८२) सर्वसंगनिवृत्ति अशीं दहा लक्षणें ब्राह्मणामध्यें विशेषेंकरून असावींत. त्यांत हीं चिन्हें योग्यांचीं आहेत. त्या योग्यांनीं दिवसा भिक्षा मागावी. (८३) वानप्रस्थाश्रमवासी लोकांनीं सुद्धां वरील दहा चिन्हें बाळगावींत. सर्व ब्रह्मचाऱ्यांनीं रात्रीं भोजन

सर्वेषां ब्रह्मचारिणाम् ॥८३॥ अध्यापनं याजनं च क्षत्रियस्य प्रतिग्रहः ॥ वैश्यस्य च विशेषेण मया नात्र विधीयते ॥८४॥ रक्षणं सर्ववर्णानां युद्धे शत्रुवधस्तथा ॥ दुष्टपक्षिमृगाणां च दुष्टानां शातनं नृणाम् ॥८५॥ अविश्वासश्च सर्वत्र विश्वासो मम योगिषु ॥ स्त्रीसंसर्गश्च कालेषु चमूरक्षणमेव च ॥८६॥ सदा संचारितैश्चारैर्लोकवृत्तान्तवेदनम् ॥ सदास्त्रधारणं चैव भस्मकंचुकधारणम् ॥८७॥ राज्ञां ममाश्रमस्थानामेष धर्मस्य संग्रहः ॥ गोरक्षणं च वाणिज्यं कृषिर्वैश्यस्य कथ्यते ॥८८॥ शुश्रूषेतरवर्णानां धर्मः शूद्रस्य कथ्यते ॥ उद्यानकरणं चैव मम क्षेत्रसमाश्रयः ॥८९॥ धर्मपत्न्यास्तु गमनं गृहस्थस्य विधीयते ॥ ब्रह्मचर्यं वनस्थानां यतीनां ब्रह्मचारिणाम् ॥९०॥ स्त्रीणान्तु भर्तृशुश्रूषा धर्मो नान्यः सनातनः ॥ ममार्चनं च कल्याणि नियोगो भर्तुरस्ति चेत् ॥९१॥ या नारी भर्तृशुश्रूषां विहाय व्रतत-

---

करूं नये. (८४) अध्यापन, याजन, क्षत्रियाकडून दान घेणें, हीं लक्षणें ब्राह्मणाचीं आहेत, विशेषतः वैश्याकडून ब्राह्मणांनीं दान घेऊं नये, असें मीं स्वतः सांगतों. (८५) सर्व वर्णांचें रक्षण करणें, समरांत शत्रुवध करणें, दुष्टपक्षी, दुष्टमृग, दुष्टमानव यांना शासन करणें, (८६) सर्व ठिकाणीं अविश्वास ठेवणें, माझ्या भक्तांच्या ठिकाणीं ( योग्यांवर ) विश्वास ठेवणें, योग्यकालीं स्त्रीसंग करणें, सेनेचें रक्षण करणें, (८७) सर्वदा दुसऱ्यांच्या राज्यांत दूत पाठवून वर्तमान आणविणें, सर्वदा अस्त्रधारण करणें, भस्म धारण करणें, कंचुक धारण करणें, ( चिलखत घालणें ) (८८) वगैरे धर्म शिवाश्रमांत राहणाऱ्या क्षत्रियाचे आहेत, गोरक्षण करणें, व्यापार करणें, कृषि करणें वगैरे धर्म वैश्याचे आहेत. (८९) इतर वर्णांची सेवा करणें, शूद्राचा धर्म होय. बागबगीचा करून माझ्या क्षेत्राचा आश्रय करणें, (९०) धर्मपत्नीशीं व्यवहार करणें वगैरे धर्म गृहस्थाचे जाणावेत. वानप्रस्थ, यति, ब्रह्मचारी यांचा मुख्य धर्म ब्रह्मचर्यच होय. (९१) स्त्रियांचा मुख्य प्राचीन धर्म ह्मणजे आपल्या पतीची सेवा करणें हाच होय. दुसरा धर्म नव्हे; हे देवि, पतीची आज्ञा मिळेल तर तिनें माझी पूजा मात्र करावी. (९२) जी स्त्री

त्परा ॥ सा नारी नरकं याति नात्र कार्या विचारणा ॥९२॥ अथ भर्तृविहीनाया वक्ष्ये धर्मं सनातनम् ॥ व्रतं दानं तपः शौचं भूशय्या नक्तभोजनम् ॥९३॥ ब्रह्मचर्यं सदा स्नानं भस्मना सलिलेन वा ॥ शान्तिर्मौनं क्षमा नित्यं संविभागो यथाविधि ॥९४॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां पौर्णमास्यां विशेषतः ॥ एकादश्यां च विधिवदुपवासो ममार्चनम् ॥९५॥ इति संक्षेपतः प्रोक्तं मयाश्रमनिषेवणम् ॥ ब्रह्मक्षत्रविशां देवि यतीनां ब्रह्मचारिणाम् ॥९६॥ तथैव वानप्रस्थानां गृहस्थानां च सुन्दरि ॥ शूद्राणामथ नारीणां धर्म एष सनातनः ॥९७॥ ध्येयस्तयाहं देवेशि सदा जाप्यः षडक्षरः ॥ वेदोक्तमखिलं धर्ममिति धर्मार्थसंग्रहः ॥९८॥ अथ ये मानवा लोके स्वेच्छया धृतविग्रहाः ॥ भावातिशयसम्पन्नाः पूर्वसंस्कारसंयुताः ॥९९॥ विरक्ताश्चानुरक्ता वा स्त्रियादिविषयेष्वपि ॥ पापैर्न ते विलिप्यन्ते पद्मपत्रमिवाम्भसा

पतीची सेवा सोडून व्रत करीत सुटते, ती स्त्री नरकाला जाते. यांत विचार करावयास नको. (९३) जिचा नवरा मृत झाला आहे, तिचे सनातन धर्म सांगतों, ऐक. व्रत, दान, तप, शुद्धता, भूशय्या, नक्तभोजन ( रात्रीं जेवणें ) (९४) ब्रह्मचर्य, भस्माचें किंवा उदकाचें स्नान, शांति, मौन, क्षमा, विधानोक्त संविभाग, ( निराळें राहणें ) (९५) अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, एकादशी या दिवशीं विधिपूर्वक उपवास करणें विशेषेंकरून लिंगाची पूजा करणें (९६) वगैरे धर्म विधवेचे आहेत. याप्रमाणें आश्रमाचे धर्म संक्षेपानें मीं सांगितले, व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, यति, ब्रह्मचारी इत्यादिकांचे धर्मही सांगितले. (९७) हे सुंदरि, वानप्रस्थ, गृहस्थ, शूद्र, स्त्रिया यांचेही धर्म सांगितले. (९८) हे देवेशि, विधवेनें सर्वदा माझें ध्यान करावें, षडक्षराचा जप करावा. इत्यादि हे सर्व धर्म वेदांत सांगितले असून अशाच प्रकारें धर्मार्थांचा संग्रह करावा. (९९) जे मानव जगांत स्वेच्छेनें शरीरधारी होऊन माझ्या ठिकाणीं अतिशय भाव ठेवून पूर्व संस्काराच्या योग्यतेनें (१००) स्त्रियादि विषयांमध्यें जरी ते असक्त असोत, किंवा नसोत, तथापि पाण्यांतल्या कमळाप्रमाणें त्या पापापासून ते अलिप्तच असतात.

१ ममाश्रमनिषेवणम्

॥१००॥ तेषां ममात्मविज्ञानं विशुद्धानां विवेकिनाम् ॥ मत्प्रसादाद्विशुद्धानां दुःखमाश्रमरक्षणम् ॥१०१॥ नास्ति कृत्यमकृत्यंच समाधिर्वा परायणम् ॥ न विधिर्न निषेधश्च तेषां मम यथा तथा ॥१०२॥ यथेह परिपूर्णस्य साध्यं मम न विद्यते ॥ तथैव कृतकृत्यानां तेषामपि न संशयः ॥१०३॥ मद्भक्तानां हितार्थाय मानुषं भावमाश्रिताः ॥ रुद्रलोकात्परिभ्रष्टास्ते रुद्रा नात्र संशयः ॥१०४॥ ममानुशासनं यद्वद्ब्रह्मादीनां प्रवर्तकम् ॥ तथा नराणामन्येषां तन्नियोगः प्रवर्तकः ॥१०५॥ ममाज्ञाधारभावेन मद्भावातिशयेन च ॥ तदालोकनमात्रेण सर्वपापक्षयो भवेत् ॥१०६॥ प्रत्ययाश्च प्रवर्तन्ते प्रशस्तफलसूचकाः ॥ मयि भाववतां पुंसां प्रागदृष्टार्थगोचराः ॥१०७॥ कम्पः स्वेदोऽश्रुपातश्च कण्ठे च स्वरविक्रिया ॥ आनन्दाद्युपलब्धिश्च भवे-

---

(१०१) पवित्र अशा ज्ञानी लोकांना माझें ज्ञान होतें. माझ्या प्रसादानें शुद्ध झालेल्या लोकांना आश्रमाचें रक्षण दुःखकारकच आहे. ( आश्रम रक्षण करणें नकोच आहे. ) (१०२) त्या लोकांना कृत्य, ( करणें ) अकृत्य, ( न करणें ) समाधि, परायण, विधि, निषेध, वगैरे नाहींत. मला जसें सदरील विषय नाहींत, तसें यांनाही नाहींत, असें समजावें. (१०३) परिपूर्ण अशा मला जगांतलें कांहीं जसें साधावयाचें नाहीं, तसें कृतकृत्य झालेल्या माझ्या भक्तांना सुद्धां जगांतलें कांहीं साधावयाचें नाहीं. यांत संशय नाहीं. (१०४) माझ्या भक्तांच्या हिताकरितां मानवशरीराला येऊन संचार करणारे ते योगी रुद्रलोकापासून भ्रष्ट झालेले रुद्रच आहेत, यांत संशय नाहीं. (१०५) माझी आज्ञा जशी ब्रह्मादि देवांनीं पाळलीच पाहिजे, तसे या योग्यांची आज्ञा इतरांनीं पाळलीच पाहिजे. (१०६) माझी आज्ञा पाळल्यानें, माझ्यावर भाव ठेवल्यानें, जसा पापाचा क्षय होतो, तद्वत त्या योग्यांचें नुसतें दर्शन घेतलें असतां पापक्षय होतो. (१०७) शिवाय प्रशस्त फलांची प्राप्ति करून देणारे प्रत्यय होतात. ( विश्वास होतात. ) माझ्या ठिकाणीं भाव ठेवणाऱ्या पुरुषांना अदृष्ट फळाची प्राप्ति कशी होते, तद्वत त्यांचें दर्शन समजावें (१०८) कंप, स्वेद, ( घाम ) अश्रुपात, गळ्यांतला स्वरवि-

दाकस्मिकी मुहुः ॥१०८॥ एतैर्व्यस्तैः समस्तैर्वा लिङ्गैरव्यभिचारिभिः ॥ मन्दमध्योत्तमैर्भावैर्विज्ञेयास्ते नरोत्तमाः ॥१०९॥ यथायोऽग्निसमावेशान्नायो भवति केवलम् ॥ तथैव मम सान्निध्यान्न ते केवलमानुषाः ॥११०॥ हस्तपादादिसाधर्म्याद्रुद्रान्मर्त्यवपुर्धरान् ॥ प्राकृतानिव मन्वानो नावजानीत पण्डितः ॥१११॥ अवज्ञानं कृतं तेषु नरैर्व्यामूढचेतनैः ॥ आयुः श्रियं कुलं शीलं हत्वा निरयमावहेत् ॥११२॥ ब्रह्मविष्णुसुरेशानामपि तूलायते पदम् ॥ मत्तोऽन्यदनपेक्षाणामुध्दृतानां महात्मनाम् ॥११३॥ अशुद्धं वौद्धमैश्वर्यं प्राकृतं पौरुषं तथा ॥ गुणेशानामतस्त्याज्यं गुणातीतपदैषिणाम् ॥११४॥ अथ किं वहुनोक्तेन श्रेयःप्राप्त्यैकसाधनम् ॥ मयि चित्तसमासंगो येन केनापि हेतुना ॥११५॥

---

कार, आनंदाचा लाभ वगैरे अदृष्टफलें अकस्मात प्राप्त होतात. (१०९) विपरीत किंवा समान चिन्हांनीं व मंद भावानें मध्यम भावानें उत्तम भावानें जे युक्त असतील, ते अनुक्रमानें श्रेष्ठकर्मी समजावे. (११०) अग्नीमध्यें लोखंडाचा गोळा घातला असतां तो नुसता गोळा असें न ह्मणवून घेतां तेजोमय गोळा जसा ह्मणवितों, त्याप्रमाणें माझा संबंध ज्यांना झाला आहे, ते लोक केवळ मानव होत नाहींत. (१११) आपल्याप्रमाणेंच हात, पाय वगैरे अवयव आहेत ह्मणून मानवरूप धारण केलेल्या रुद्रगणाला प्राकृतांप्रमाणें ( इतर लोकांप्रमाणें ) समजून पंडितानें त्यांचा अपमान करूं नये. (११२) जे मूर्ख लोक त्यांचा अपमान करतात, त्याचें आयुष्य संपत्ति कुल, शील हे सर्व नष्ट होऊन मरणानंतर ते नरकाला जातात. (११३) एका तराजूमध्यें माझ्या भक्तांना घाळून दुसऱ्या तराजूंत ब्रह्मलोक, विष्णुलोक वगैरे लोक घाळून जोखिलें असतां त्यांच्यापुढें ब्रह्मादि देवांचीं स्थानें हलक्या कापसाप्रमाणें भासतात. माझ्याशिवाय दुसऱ्याची इच्छा न करणारे, महात्मे माझ्या भक्तांचें माहात्म्यच तसें आहे. (११४) बुद्धीनें कल्पित झालेलें सगुण लोकांचें अशुद्ध ऐश्वर्य, प्राकृत पौरुष वगैरे विषय गुणापलीकडच्या पदाला अभिलाष करणाऱ्यांनीं सोडून द्यावे. (११५) आतां फार बोलून काय उपयोग ? कोणत्याही कारणानें माझ्या ठिकाणीं भाव ठेवणें हें एवढेंच श्रेयः प्राप्तीचें मुख्य साधन आहे. दुसरें कोणतेंही नाहीं.

उपमन्युरुवाच ॥ इत्थं श्रीकण्ठनाथेन शिवेन परमात्मना ॥ हिताय जगतामुक्तो ज्ञानसारार्थसंग्रहः ॥११६॥ विज्ञानसंग्रहश्चायं वेदशास्त्राणि कृत्स्नशः ॥ सेतिहासपुराणानि विद्याव्याख्यानविस्तरः ॥११७॥ ज्ञानं ज्ञेयमनुष्ठेयमधिकारोऽथ साधनम् ॥ साध्यं चेति षडर्थानां संग्रहस्त्वेष संग्रहः ॥११८॥ गुरोरधिगतं ज्ञानं ज्ञेयः पाशः पशुः पतिः ॥ लिंगार्चनाद्यनुष्ठेयं भक्तस्त्वधिकृतो द्विजः ॥११९॥ साधनं शिवमन्त्राद्यं साध्यं शिवसमानता ॥ षडर्थसंग्रहस्यास्य ज्ञानात्सर्वज्ञतोच्यते ॥१२०॥ प्रथमं कर्म यज्ञाद्यैर्भक्त्या वित्तानुसारतः ॥ बाह्येऽभ्यर्च्य शिवं पश्चादन्तर्यागरतो भवेत् ॥१२१॥ रतिरभ्यन्तरे यस्य न बाह्ये पुण्यगौरवात् ॥ न कर्मकरणीयं हि बहिस्तस्य महात्मनः ॥१२२॥ ज्ञानामृतेन तृप्तस्य भक्त्या चैव शिवात्मनः ॥ नान्त-

---

उपमन्यु बोलला— (११६) याप्रमाणें श्रीकंठनाथ परमात्मा शिवानें जगाच्या कल्याणाकरतां ज्ञानांतल्या साराचा अर्थसंग्रह देवीला सांगितला. (११७) हा शिवज्ञानाचा विज्ञानाचा संग्रह वेदांतला व सर्व शास्त्रांतला असून सर्व इतिहास व पुराण व चौदा विद्या यांच्या व्याख्यानाचा विस्तार आहे. (११८) ज्ञान, ज्ञेय, ( जाणावयास योग्य ) अनुष्ठेय, ( अनुष्ठान करण्यास योग्य ) अधिकार, साधन, साध्य अशा सहा अर्थांचा संग्रह करणें याला संग्रह ह्मणतात. (११९) गुरूपासून जें ज्ञान मिळालें असतें, त्याला ज्ञान ह्मणावें. जाणावयास योग्य ( ज्ञेय ) पाश आणि पशु, पति हे समजावे. लिंगपूजा अनुष्ठेय ( अनुष्ठान करावयास योग्य ) होय. ब्राह्मण भक्त हा अधिकारी होय. (१२०) शिवमंत्र वगैरे हे साधन होत. शिवसमानता हें साध्य ( साधन करावयास योग्य ) होय. याप्रमाणें षडर्थांचा संग्रह ज्याच्या जवळ आहे, तो प्राणी सर्वज्ञ समजावा. (१२१) द्रव्याच्या अनुकूलतेप्रमाणें यज्ञयाग वगैरे भक्तीनें करणें हें पहिलें कर्म होय. बाह्यतः शिवाची पूजा करून नंतर अंतर्यागामध्यें नेहमीं मनुष्यानें रत व्हावें. (१२२) ज्याला आभ्यंतर रति ( अंतरात्म्याची पूजा करण्यात प्रीति ) असेल, त्या मनुष्याला केवळ पुण्याकरितां बाह्यकर्म नाहीं व त्या महात्म्याला बहिःकर्म करावें सुद्धां लागत नाहीं. (१२३) हे कृष्णा शिवतादात्म्याला पावलेल्या त्या मानवाला

नें च बहिः कृष्ण कृत्यमस्ति कदाचन ॥१२३॥ तस्मात्क्रमेण स-
न्त्यज्य बाह्यमाभ्यन्तरं तथा ॥ ज्ञानेन ज्ञेयमालोक्य ज्ञानं चापि प-
रित्यजेत् ॥१२४॥ नैकाग्रं चेच्छिवे चित्तं किं कृतेनापि कर्मणा ॥
एकाग्रमेव चेच्चित्तमकृतेनापि कर्मणा ॥१२५॥ तस्मात्कर्माण्यकृत्वा
वा कृत्वा वान्तर्बहिः क्रमात् ॥ येन केनाप्युपायेन शिवे चित्तं नि-
वेशयेत् ॥॥१२६॥ शिवे निविष्टचित्तानां प्रतिष्ठितधियां सताम् ॥
परत्रेह च सर्वत्र निवृत्तिः परमा भवेत् ॥१२७॥ इहोंनमः शिवायेति
मन्त्रेणानेन सिद्धयः ॥ स तस्मादधिगन्तव्यः परावरविभूतये ॥१२८॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे शैवधर्मक-
थनं नाम एकादशोऽध्यायः ॥११॥

---

शिवाच्या भक्तीनें व ज्ञानरूपी अमृतानें तृप्ति होत असल्यामुळें त्याला अं-
तःकर्म व बहिःकर्म कोणतेंही कर्म केव्हांही करावें लागत नाहीं. (१२४)
अतएव क्रमानें बाह्यकर्म सोडून नंतर अंतरकर्मही सोडून ज्ञानानें ज्ञेयवस्तूला
( शिवाला ) पाहून त्या ज्ञानालाही सोडून टाकावें. (१२५) शिवावर जर
एकाग्रमन नाहीं तरी कर्म करून काय करावयाचें आहे ? शिवाच्या ठिका-
णीं जर एकाग्रचित्त आहे, तर त्याला कर्म काय करावयाचें आहे ? (१२६)
बाह्यकर्म व अंतरकर्म क्रमानें करो, अथवा न करो, कोणत्याही उपायानें
शिवावर मन एकाग्र करावें. (१२७) शिवाच्या ठिकाणीं ज्याचें मन तल्लीन
झालें आहे, ज्याची बुद्धि शिवाच्या ठिकाणीं झाली आहे, त्या प्राण्याला इ-
हलोकीं परलोकीं दोन्हीं ठिकाणीं सौख्य मिळतें. (१२८) ' ॐनमः शिवाय '
या मंत्रानें सर्वसिद्धि प्राप्त होतात. याकरितां ती सिद्धि मिळविण्यासाठीं तो
मंत्र वश करावा ( समजून घ्यावा ).

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतला शै-
वधर्मकथननांवाचा अकरावा अध्याय संपला.

---

## अथ द्वादशोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ महर्षिवर सर्वज्ञ सर्वज्ञानमहोदधे ॥ पंचाक्षरस्य माहात्म्यं श्रोतुमिच्छामि तत्वतः ॥१॥

उपमन्युरुवाच ॥ पंचाक्षरस्य माहात्म्यं वर्षकोटिशतैरपि ॥ अशक्यंविस्तराद्वक्तुं तस्मात्संक्षेपतः श्रुणु ॥२॥ वेदे शिवागमे चायमुभयत्र षडक्षरः ॥ मन्त्रः स्थितः सदा मुख्यो लोके पंचाक्षरः स्मृतः ॥३॥ सर्वमन्त्राधिकश्चायमोंकाराद्यः षडक्षरः ॥ सर्वेषां शिवभक्तानामशेषार्थप्रसाधकः ॥४॥ तदल्पाक्षरमर्थाढ्यं वेदसारं विमुक्तिदम् ॥ आज्ञासिद्धमसन्दिग्धं वाक्यमेतच्छिवात्मकम् ॥५॥ नानासिद्धियुतं दिव्यं लोकचित्तानुरंजकम् ॥ सुनिश्चितार्थगम्भीरं वाक्यं तत्पारमेश्वरम् ॥६॥ मन्त्रं सुखमुखोच्चार्यमशेषार्थप्रसिध्दये ॥ प्राहोंनमः शि-

---

श्रीकृष्ण बोलले— (१) हे महर्षिश्रेष्ठा, सर्वज्ञा, सर्व ज्ञानसागरा, आतां पंचाक्षराचें माहात्म्य ऐकण्याची इच्छा झाली आहे, तर सविस्तर सर्व सांग.

उपमन्यु बोलला— (२) पंचाक्षराचें माहात्म्य शंभरकोटि वर्षें बसून सांगितलें तरी विस्तारानें सांगणें परम अशक्य आहे, असें समज याकरतां संक्षेपानें सांगतों, ऐक. (३) वेदांत शिवागमांत या दोन्ही ठिकाणीं हा षडक्षर मंत्र मुख्य आहे लोकांत मात्र पंचाक्षर मंत्र मुख्य आहे. (४) ॐकारपूर्वक हा षडक्षर मंत्र सर्व मंत्रांपेक्षां श्रेष्ठ आहे, व सर्व शिवभक्तांना सर्व अर्थाला साधन करून देणारा आहे. (५) ज्यामध्यें थोडीं अक्षरें आहेत, व ज्याचा अर्थ पुष्कळ आहे, व जें वेदांतला सार असून मुक्ति देणारें आहे, व शिवाज्ञेनें सिद्ध झालेलें असून व जें निःसंशय आहे, असें तें वाक्य साक्षात् शिवस्वरूपच आहे. (६) ह्मणूनच हा मंत्र अनेक सिद्धीनें युक्त असून अनेक लोकांच्या चित्ताला रंजन करणारा आहे, शिवाय यांत निश्चयाचे गंभीर अर्थ पुष्कळ असून हें वाक्य साक्षात् शिवाच्या मुखापासून निघालें आहे. (७) या मंत्रापासून अनेक लोकांना अनेक अर्थसिद्धि मिळत असून हा मंत्र मुखांतून विन आयासानें उच्चार करितां येण्यासारखा आहे. सर्व

वायेति सर्वज्ञः सर्वदेहिनाम् ॥७॥ तद्बीजं सर्वविद्यानां मन्त्रमाद्यं षडक्षरम् ॥ अतिसूक्ष्मं महार्थं च ज्ञेयं तद्वटबीजवत् ॥८॥ देवो गुणत्रयातीतः सर्वज्ञः सर्वकृत्प्रभुः ॥ ओमित्येकाक्षरे मन्त्रे स्थितः सर्वगतः शिवः ॥९॥ ईशानाद्यानि सूक्ष्माणि ब्रह्माण्येकाक्षराणि तु ॥ मन्त्रे नमःशिवायेति संस्थितानि यथाक्रमम् ॥१०॥ मन्त्रे षडक्षरे सूक्ष्मे पंचब्रह्मतनुः शिवः ॥ वाच्यवाचकभावेन स्थितः साक्षात्स्वभावतः ॥११॥ वाच्यः शिवः प्रमेयत्वान्मन्त्रस्तद्वाचकः स्मृतः ॥ वाच्यवाचकभावोऽयमनादिः संस्थितस्तयोः ॥१२॥ यथानादिः प्रवृत्तोऽयं घोरसंसारसागरः ॥ शिवोऽपि हि तथानादिः संसारान्मोचकः स्थितः ॥१३॥ व्याधीनां भेषजं यद्वत्प्रतिपक्षः स्वभावतः ॥ तद्वत्संसारदोषाणां प्रतिपक्षः शिवः स्मृतः ॥१४॥ असत्यस्मिञ्जगन्नाथे त-

---

प्राण्यांकारितां सर्वज्ञानें ( शिवानें ) 'ॐनमः शिवाय' असें ह्मटलें. (८) हा षडक्षर मंत्र सर्व विद्यांचें बीज आहे, सर्व मंत्रांत पहिला आहे व अतिशय सूक्ष्म असून मोठ्या अर्थाचा आहे. ह्मणूनच या मंत्राला वडाच्या बीजाची उपमा देतात. (९) जो गुणत्रयातीत ( तीन गुणांपलीकडचा ) असून सर्वज्ञ आहे, सर्वकर्ता जो असून जो जगाचा प्रभु आहे, व जो सर्वत्र व्याप्त आहे, असा तो देव शिव 'ॐ' या एकाक्षरमंत्रामध्यें सर्वदा राहतो. (१०) ईशानादि सूक्ष्म ब्रह्ममंत्र व एकाक्षर पंच ब्रह्ममंत्र हे सर्व क्रमानें 'नमःशिवाय' या मंत्रांत राहतात. (११) षडक्षर सूक्ष्ममंत्रांत पंचब्रह्मशरीराचा शिव हा वाच्यवाचकभावानें ( अर्थ शब्दाच्या भावानें ) स्वभावतः साक्षात् राहिलेला आहे. (१२) प्रमेयत्वामुळें शिव हा त्या मंत्राचा अर्थ होय. मंत्र हा वाचक आहे. या दोहोंमध्यें वाच्यवाचकभावसंबंध हा अनादिकालापासून आहे. (१३) अनादिकालापासून हा भयंकर संसारसमुद्र जसा चालत आलेला आहे, तसा शिवही अनादिकालापासून संसारांतून सोडविणारा होऊन राहिला आहे. (१४) रोगाला औषध जसें स्वभावतः प्रतिपक्ष (शत्रु) होऊन राहिलें आहे, त्याप्रमाणें संसारांतल्या दोषांचा प्रतिपक्ष (शत्रु) शिव होऊन राहिला आहे. (१५) जगन्नायक प्रभु शिव नसतांना जगांत जिकडे

मोभूतमिदंभवेत् ॥ आदित्येन यथा हीनं निरालोकमिदं जगत् ॥१५॥ अभावादीश्वरस्येयं जगत्सृष्टिः कथं भवेत् ॥ अचेतनत्वात्प्रकृतेरज्ञत्वात्पुरुषस्य च ॥१६॥ प्रधानपरमाण्वादि यावत्किंचिदचेतनम् ॥ न तत्कर्तृ स्वयं दृष्टं बुद्धिमत्कारणं विना ॥१७॥ धर्माधर्मोपदेशश्च बन्धमोक्षविचारणा ॥ न सर्वज्ञं विना पुंसामादिसर्गे प्रसिध्यति ॥१८॥ वैद्यं विना निरानन्दाः क्लिश्यन्ते रोगिणो यथा ॥ शिवं विना निरानन्दं क्लिश्यते हि जगत्तथा ॥१९॥ तस्मादनादिः सर्वज्ञः परिपूर्णः सदाशिवः ॥ अस्ति नाथः परित्राता पुंसां संसारसागरात् ॥२०॥ आदिमध्यान्तनिर्मुक्तः स्वभावविमलः प्रभुः ॥ सर्वज्ञः परिपूर्णश्च शिवो ज्ञेयः शिवागमे ॥२१॥ तस्याभिधानं मन्त्रोऽयमभिधेयश्च स स्मृतः ॥ अभिधानाभिधेयत्वान्मन्त्रः सिद्धः परः शिवः ॥२२॥ एतावत्तुशि-

---

तिकडे अंधारीअंधार होऊन कांहीं दिसेनासें होतें. सूर्य नसतांना जिकडे तिकडे जगांत अंधार जसा पडतो, त्याप्रमाणें शिव नसतांना समजावें. (१६) प्रकृति ही मुळापासून अचेतन आहे, व पुरुष हा अज्ञानी आहे. अशा अवस्थेंत ईश्वर नाहीं, अशी कल्पना केली तर जगाची सृष्टि कशी होईल ? (१७) प्रधान, परमाणु वगैरे जितकीं सृष्टीचीं साधनें असतील, तितकीं सर्व अचेतन असल्यामुळें ते पदार्थ जगाचे कर्ते होत नाहींत. त्या सृष्टीला बुद्धिमानाचें कारण लागतें. त्या शिवाय ( कारणाशिवाय ) सृष्टि होऊं शकत नाहीं. (१८) धर्माधर्माचा उपदेश व बंधमोक्षाचा विचार हे दोन्ही सर्वज्ञावांचून मानवाच्या आदिसृष्टींत प्रसिद्धीला येत नाहींत. (१९) रोगी लोकांना वैद्य सांपडला नाहीं, तर ते रोगी आनंदरहित होऊन जसे दुःखांत पडतात, त्याप्रमाणें शिवावांचून जग हें आनंदरहित होऊन सर्वदा दुःखांत राहतें. (२०) याकरितां अनादि, सर्वज्ञ, परिपूर्ण, असा सदाशिव नांवाचा कोणीएक ईश्वर या संसारांतून लोकांना तारणारा आहेच असें ह्मटल्यावांचून गत्यंतरच नाहीं. (२१) ज्याला आदि, मध्य, अंत नसून जो स्वभावानें निर्मळ आहे, व जो सर्वज्ञ असून सर्वदा परिपूर्ण आहे, असा प्रभु तो परमेश्वर शिवच ह्मणून समजावा, असें शिवागमांत सांगितलें आहे. (२२) त्या शिवाचा वाचकशब्द ह्मणजे हा मंत्र होय. आणि वाच्य हा शिव

वज्ञानमेतावत्परमं पदम् ॥ यदोंनमः शिवायेति शिववाक्यं षडक्षरम् ॥२३॥ विधिवाक्यमिदं शैवं नार्थवादं शिवात्मकम् ॥ यः सर्वज्ञः स सम्पूर्णस्वभावविमलः शिवः ॥२४॥ लोकानुग्रहकर्ता च स मृषार्थं कथं वदेत् ॥ यद्यथावस्थितं वस्तु गुणदोषैः स्वभावतः ॥२५॥ यावत्फलञ्च यत्पुण्यं सर्वज्ञस्तु तथा वदेत् ॥ रागाज्ञानादिभिर्दोषैर्ग्रस्तत्वादनृतं वदेत् ॥२६॥ ते चेश्वरे न विद्यन्ते ब्रूयात्स कथमन्यथा ॥ अजातादोषदोषेण सर्वज्ञेन शिवेन यत् ॥२७॥ प्रणीतममलं वाक्यं तत्प्रमाणं न संशयः ॥ तस्मादीश्वरवाक्यानि श्रद्धेयानि विपश्चिता ॥२८॥ यथार्थं पुण्यपापेषु तदश्रध्दो व्रजत्यधः ॥ स्वर्गापवर्गसिध्द्यर्थं भाषितं यत्सुशोभनम् ॥२९॥ वाक्यं मुनिवरैः शान्तैस्तद्विज्ञेयं सु-

---

आहे, असें अर्थात् सिद्ध झालें. या दोहोंमध्यें अभिधानाभिधेयभाव नांवाचा संबंध असल्यामुळें हा मंत्र परशिवरूपी आहे, असें ह्मणतात. (२३) शिवज्ञान आणि उत्तमपद ह्मणजे इतकेंच आहे कीं, जो षडक्षर 'ॐनमः शिवाय' मंत्र आहे, त्यांतच शिवज्ञान आणि परमपद आहे. (२४) हें जें शिवात्मक वाक्य आहे, तें विधिवादरूपी असून अर्थवादात्मक नाहीं, असें समजावें. जो सर्वज्ञ असून परिपूर्ण आहे, व जो स्वभावानें निर्मल असून ज्याला शिव असें ह्मणतात, (२५) तो लोकांवर अनुग्रह करणारा असून खोट्याकारितां कसा बोलूं शकेल ? गुणदोषांनीं युक्त अशी एखादी वस्तु स्वभावतः जशी असेल, (२६) व तिचें फल जितकें असेल, व जें तिचें पुण्य असेल, त्या मानानेंच सर्वज्ञ शिव हा तसेंच बोलूं शकेल. राग, अज्ञान वगैरे दोष ज्याच्या जवळ भरले असतील, ते मात्र खोटें बोलूं शकतात. (२७) ते दोष शिवाच्या ठिकाणीं नाहींत. मग शिव हा अन्यथा (विपरीत) कसा बोलेल ? कधींही ज्याच्यामध्यें दोष सांपडावयाचे नाहींत, अशा त्या सर्वज्ञ शिवानें जें (२८) निर्मल वाक्य केलें आहे, तें प्रमाणभूत आहे, यांत संशय नाहीं. याकरितां ज्ञानी मनुष्यानें त्या ईश्वरवाक्यावर अवश्य विश्वास ठेवावा. (२९) पुण्यपापांमध्यें जें यथार्थ सांगितलें आहे, त्यांत विश्वास ठेविला नाहीं तर तो अधःपाताला जातो. स्वर्गापवर्गाकरितां (स्वर्गमोक्षांकरितां) जें सुंदर वाक्य सांगितलें आहे, (३०) तें वाक्य शांत अशा श्रेष्ठ

भाषितम् ॥ रागद्वेषानृतक्रोधकामतृष्णानुसारि यत् ॥३०॥ वाक्यं निरयहेतुत्वात्तद्दुर्भाषितमुच्यते ॥ सत्कृतेनापि किं तेन मृदुना ललितेन वा ॥३१॥ अविद्यारागवाक्येन संसारक्लेशहेतुना ॥ यच्छ्रुत्वा जायते श्रेयो रागादीनाञ्च संक्षयः ॥३२॥ विरूपमपि तद्वाक्यं विज्ञेयमतिशोभनम् ॥ बहुत्वेऽपि हि मन्त्राणां सर्वज्ञेन शिवेन यत् ॥३३॥ प्रणीतममलं मन्त्रं न तेन सदृशं क्वचित् ॥ साङ्गानि वेदशास्त्राणि संस्थितानि षडक्षरे ॥३४॥ न तेन सदृशस्तस्मान्मन्त्रोऽन्योऽस्ति परः क्वचित् ॥ सप्तकोटिमहामन्त्रैरुपमन्त्रैरनेकधा ॥३५॥ मन्त्रः षडक्षरो भिन्नः सूत्रं वृत्त्यात्मना यथा ॥ शिवज्ञानानि यावन्ति विद्यास्थानानि यानि च ॥३६॥ षडक्षरस्य सूत्रस्य तानि भाष्यं समासतः ॥ किं

---

ऋषींनीं सांगितलेलें असून तें वाक्य उत्तम आहे, असें जाणावें. राग, द्वेष, अनृत ( खोटें ), क्रोध, काम, तृष्णा ( आशा ), इत्यादि विषयांला अनुसरून जें (३१) वाक्य असेल, तें नरकाला साधन करून देणारें असल्यामुळें त्या वाक्याला दुष्टभाषण असें ह्मणतात. तशा वाक्याचा सत्कार केला काय ? किंवा कोमलपणानें लालन केलें तर काय ? (३२) अज्ञान, राग यांनीं मिश्र असलेलें तें वाक्य केव्हांना केव्हांतरी संसारांतल्या क्लेशाला कारणच होणारें आहे. आतां ज्याचें श्रवण केलें असतां कल्याण होतें, व रागादिदोषांचा नाश होतो, (३३) तसें तें वाक्य विरूप ( विरुद्ध ) जरी आहे, तरी तें चांगलेंच आहे, असें समजावें. हजारो मंत्र जगांत असतांना सर्वज्ञ शिवानें जें वाक्य (३४) निर्मल मंत्राच्या रूपानें अस्तित्वांत आणिलें, त्यावरून या मंत्रासारखा दुसरा कोणताही मंत्र नाहीं, असें समजावें. या षडक्षर मंत्रांत अंगसहित सर्व वेद, व सर्व शास्त्रें आहेत, असें समजावें. (३५) या मंत्रासारिखा दुसरा मंत्र कोठेंही नाहीं, असें समजावें. सातकोटि महामंत्रांनीं व उपमंत्रांनीं अनेक प्रकारांनीं (३६) हा षडाक्षरमंत्र अभिन्न झाला आहे, सूत्राचे प्रकार वृत्तीच्या रूपानें जसे अनेक झाले आहेत, तसा या मंत्राचा प्रकार समजावा. जितकें शिवज्ञान असेल, जितकें विद्यास्थान असेल (३७) तितकें तें षडक्षरमंत्राचें संक्षेपरूपी भाष्य आहे, असें स-

तस्य बहुभिर्मन्त्रैः शास्त्रैर्वा बहुविस्तरैः ॥३७॥ यस्योंनमः शिवायेति मन्त्रोऽयं हृदि संस्थितः ॥ तेनाधीतं श्रुतं तेन कृतं सर्वमनुष्ठितम् ॥३८॥ येनोंनमः शिवायेति मन्त्राभ्यासः स्थिरीकृतः ॥ नमस्कारादिसंयुक्तं शिवायेत्यक्षरत्रयम् ॥३९॥ जिह्वाग्रे वर्तते यस्य सफलं तस्य जीवितम् ॥ अन्त्यजो वाधमो वापि मूर्खो वा पण्डितोऽपि वा ॥४०॥ पञ्चाक्षरजपे निष्ठो मुच्यते पापपञ्जरात् ॥ इत्युक्तं परमेशेन देव्या पृष्टेन शूलिना ॥४१॥ हिताय सर्वमर्त्यानां तिष्यजानां विशेषतः

देव्युवाच ॥ कलौ कलुषिते काले दुर्जये दुरतिक्रमे ॥४२॥ अपुण्यतमसा च्छन्ने लोके धर्मपराङ्मुखे ॥ क्षीणे वर्णसमाचारे सङ्करे समुपस्थिते ॥४३॥ सर्वाधिकारे सन्दिग्धे निश्चिते वा विपर्यये ॥ त-

---

मजावें. जगांतल्या पुष्कळ मंत्रांनीं व पुष्कळ विस्ताराच्या शास्त्रांनीं काय उपयोग व्हावयाचा आहे? (३८) ज्याच्या हृदयामध्यें 'ॐनमः शिवाय' हा मंत्र आहे, त्या प्राण्यानें सर्व अध्ययन केल्याप्रमाणें आहे. व त्यानें सर्व श्रवण केल्याप्रमाणें आहे, व त्यानें सर्व अनुष्ठान केल्याप्रमाणें आहे. (३९) ज्या प्राण्यानें 'ॐनमः शिवाय' या मंत्राचा दृढ अभ्यास केला आहे, किंवा नमः या दोन अक्षरांनीं युक्त 'शिवाय' या तीन अक्षरांचा अभ्यास ज्यानें दृढ केला आहे, (४०) व ज्याच्या जिभेवर हा मंत्र आहे, त्याचें जीवित सफल आहे, असें जाणावें. अंत्यज, अधम, मूर्ख, पंडित यांपैकीं कोणी असो, (४१) त्याची निष्ठा पंचाक्षरजपांत असली तर तो प्राणी पापाच्या जाळींतून सुटतो. याप्रमाणें शिवानें प्रश्न केलेल्या आपल्या सतीला सांगितलें आहे. (४२) विशेषेंकरून कलियुगांत जन्म घेतलेल्या मानवांच्या हिताकरितां शिवानें हें सांगितलें आहे.

देवी बोलली—कलियुगामध्यें काल दुष्ट झाला असतां व जिंकण्यास अशक्य व अतिक्रमण करण्यास अशक्य असा काल आला असतां (४३) व पापरूपी अंधारानें सर्व लोक आच्छादिला गेला असतां सर्व लोक धर्मापासून भ्रष्ट झाले असतां व सर्व वर्ण क्षीण झाला असतां वर्णसंकर जेव्हां झाला, (४४) सर्व अधिकार संशयांत जेव्हां राहिले, व निश्चयाचा विपर्यास

दोपदेशे विहते गुरुशिष्यक्रमे गते ॥४४॥ केनोपायेन मुच्यन्ते भक्तास्तव महेश्वर ॥

महेश्वर उवाच ॥ आश्रित्य परमां विद्यां हृद्यां पञ्चाक्षरीं मम ॥४५॥ भक्त्या च भावितात्मानो मुच्यन्ते कलिजा नराः ॥ मनोवाक्कायजैर्दोषैर्वक्तुं स्मर्तुमगोचरैः ॥४६॥ दूषितानां कृतघ्नानां निर्दयानां खलात्मनाम् ॥ लुब्धानां वक्रमनसामपि मत्प्रवणात्मनाम् ॥४७॥ मम पञ्चाक्षरी विद्या संसारभयतारिणी ॥ मयैवमसकृद्देवि प्रतिज्ञातं धरातले ॥४८॥ पतितोऽपि विमुच्येत मद्भक्तो विद्ययानया ॥

देव्युवाच ॥ कर्मायोग्यो भवेन्मर्त्यः पतितो यदि सर्वथा ॥४९॥ कर्मायोग्येन यत्कर्म कृतञ्च नरकाय हि ॥ ततः कथं विमुच्येत पतितो विद्ययाऽनया ॥५०॥

---

जेव्हां झाला, व गुरुशिष्यक्रमानें आलेला उपदेश जेव्हां नष्ट झाला, (४९) तेव्हां हे महेश्वरा, ते तुझे भक्त कोणत्या उपायानें मुक्त होतील, हें सांग.

महेश्वर बोलला—हे देवि, सुंदर अशा श्रेष्ठ माझ्या पंचाक्षरविद्येचा आश्रय करून (४६) कलिकालांतले लोक मुक्त होतात. परंतु त्यांचे आत्मे भक्तीनें पुनीत झालेले असले पाहिजेत. तोंडानें बोलावयास व मनानें स्मरण करावयास असमर्थ अशा मानसिक, कायिक, वाचिक दोषांपासून सुद्धां त्या विद्येच्या प्रभावानें ते लोक मुक्त होतात. (४७) दूषित ( पापी ), कृतघ्न, निर्दय, नीच, लोभी, वांकड्या मनाचे यांपैकीं कोणी असो, परंतु त्यानें माझ्याठिकाणीं मन ठेविलें तर मुक्ति मिळेल. (४८) माझी पंचाक्षरीविद्या संसारांतल्या भयापासून तारणारी आहे. हे देवि, पृथ्वीतलावर अशीच मीं प्रतिज्ञा वारंवार केली आहे. (४९) माझा भक्त पतित जरी असला तथापि या विद्येच्या अध्ययनानें तो मुक्त होतो.

देवी बोलली—हे देवा, सर्वथा जर एखादा पतित असेल तर तो मनुष्य कर्माला अयोग्य होतो. (५०) तेव्हां अशा अयोग्यानें कर्म केलें तर तें नरकालाच कारण होतें, असें शास्त्रांत आहे, तर तो पतित मनुष्य या विद्येनें कसा मुक्त होतो ?

ईश्वर उवाच ॥ तथ्यमेतत्त्वया प्रोक्तं तथा हि शृणु सुन्दरि ॥ रहस्यमिति मत्वैतद्गोपितं यन्मया पुरा ॥५१॥ समन्त्रकं मां पतितः पूजयेद्यदि मोहितः ॥ नारकी स्यान्न सन्देहो मम पंचाक्षरं विना ॥५२॥ अब्भक्षा वायुभक्षाश्च ये चान्ये व्रतकर्शिताः ॥ तेषामेतैर्व्रतैर्नास्ति मम लोकसमागमः ॥५३॥ भक्त्या पंचाक्षरेणैव यो हि मां सकृदर्चयेत् ॥ सोऽपि गच्छेन्मम स्थानं मन्त्रस्यास्यैव गौरवात् ॥५४॥ तस्मात्तपांसि यज्ञाश्च व्रतानि नियमास्तथा ॥ पंचाक्षरार्चनस्यैते कोट्यंशेनापि नो समाः ॥५५॥ बद्धो वाप्यथवा मुक्तः पाशात्पंचाक्षरेण यः ॥ पूजयेन्मां स मुच्येत नात्र कार्या विचारणा ॥५६॥ अरुद्रो वा सरुद्रो वा सकृत्पंचाक्षरेण यः ॥ पूजयेत्पतितो वापि मूढो वा मुच्यते नरः ॥५७॥ षडक्षरेण वा देवि तथा पंचाक्षरेण वा ॥ सब्रह्मा-

---

ईश्वर बोलला— (५१) हे सुंदरि, बरोबर बोललीस, तरी मी सांगतों ऐक. पूर्वीं जें रहस्य असल्यामुळें मीं गुप्त ठेविलें होतें, तेंच तुला सांगतों. (५२) मंत्रसहित असलेल्या माझ्या मूर्तींची पूजा मोहानें पतित प्राण्यानें माझ्या पंचाक्षरी मंत्रावांचून केली, तर तो पतित नरकवासी होतो, यांत संशय नाहीं. (५३) जे वायु भक्षण करून तप करणारे असतील, व उदक भक्षण करून तप करणारे जे असतील, व इतर व्रतांनीं देह क्लेश करून तप करणारे जे असतील, त्यांच्या त्या व्रतांनीं त्यांना माझें स्थान मिळत नाहीं. (५४) जो प्राणी भक्तीनें पंचाक्षर मंत्रानें एकवार माझी पूजा करितो, तो प्राणी या माझ्या मंत्राच्या गौरवानें माझ्या स्थानाला जातो. (५५) याकरितां तप, यज्ञ, व्रत, नियम हे माझ्या पंचाक्षरीच्या कोट अंशाच्या बरोबरीचे सुद्धां होत नाहींत. (५६) जो पाशानें बद्ध असेल, अथवा पाशांतून जो मुक्त असेल, त्यानें पंचाक्षरीनें माझी पूजा करावी, ह्मणजे तो मुक्त होतो. यांत विचार करावयाला नकोच आहे. (५७) अरुद्र ( रुद्ररहित ) असो, रुद्रसहित असो, त्यानें एकवार पंचाक्षरमंत्रानें माझी पूजा केली, तर तो मूर्ख असो, पतित असो, तात्काळ मुक्त होतो. (५८) हे देवि, षडक्षरमंत्रानें किंवा पंचाक्षरमंत्रानें भक्तिपूर्वक ब्रह्मांगानें जो माझी पूजा करतो, तो मुक्त होतो.

ङ्गेन मां भक्त्या पूजयेद्यदि मुच्यते ॥५८॥ पतितोऽपतितो वापि मन्त्रेणानेन पूजयेत् ॥ मम भक्तो जितक्रोधो ह्यलब्धो लब्ध एव वा ॥५९॥ अलब्धाल्लब्ध एवेह कोटिकोटिगुणाधिकः ॥ तस्माल्लब्ध्वैव मां देवि मन्त्रेणानेन पूजयेत् ॥६०॥ लब्ध्वा सम्पूजयेद्यस्तु मैत्र्यादिगुणसंयुतः ॥ ब्रह्मचर्यरतो भक्त्या मत्सादृश्यमवाप्नुयात् ॥६१॥ किमत्र बहुनोक्तेन भक्ताः सर्वेऽधिकारिणः ॥ मम पंचाक्षरे मंत्रे तस्माच्छ्रेष्ठतरो हि सः ॥६२॥ पञ्चाक्षरप्रभावेण लोका वेदा महर्षयः ॥ तिष्ठन्ति शाश्वता धर्मा देवाः सर्वमिदं जगत् ॥६३॥ प्रलये समनुप्राप्ते नष्टे स्थावरजङ्गमे ॥ सर्वं प्रकृतिमापन्नं तत्र संलयमेष्यति ॥६४॥ एकोऽहं संस्थितो देवि न द्वितीयोऽस्ति कुत्रचित् ॥ तदा वेदाश्च शास्त्राणि सर्वे पंचाक्षरे स्थिताः ॥६५॥ ते नाशं नैव सम्प्राप्ता मच्छ-

---

(५९) पतित असो, अपतित असो, या पंचाक्षरमंत्रानें त्यानें माझी पूजा करावी. माझ्या भक्तानें क्रोध जिंकलेला असो, किंवा अलब्ध ( मंत्र न मिळविलेला ) असो, लब्ध ( मंत्र मिळविलेला ) असो, त्यानें पंचाक्षरमंत्रानें माझी पूजा करावी. (६०) अलब्धापेक्षां लब्ध प्राणी ( मंत्र गुरुपासून घेतलेला ) कोटि कोटि पटीनें श्रेष्ठ आहे, असें समजावें हे देवि याकरतां माझा लाभ करून घेऊन ( गुरूपासून शिवमूर्ती समजून घेऊन ) या मंत्रानें माझी पूजा करावी. (६१) मैत्री वगैरे गुणांनीं युक्त होऊन माझा लाभ गुरुद्वारें करून घेऊन ब्रह्मचर्यव्रत पाळून जो माझी पूजा भक्तीनें करितो, तो प्राणी माझ्या बरोबरीचा होतो. (६२) फार बोलण्यांत काय मतलब आहे ? माझ्या पंचाक्षरमंत्रांत सर्व माझ्या भक्तांना अधिकार आहे, याकरितां तो माझा भक्त अत्यंत श्रेष्ठ आहे. (६३) या पंचाक्षराच्या प्रभावानें सर्व लोक, सर्व वेद, सर्व ऋषि, सर्व धर्म हे शाश्वतपणानें राहिले आहेत, फार काय ? सर्व जग हें पंचाक्षराच्या प्रभावानें राहिलें आहे. (६४) प्रलयकाल जेव्हां येतो, जेव्हां स्थावर जंगमांचा नाश होतो, जग हें प्रकृतीच्या पोटांत जेव्हां जातें, तशा त्या लयाच्या वेळेस (६५) हे देवि, मी एकटा राहतों. कोठेंही दुसरा प्राणी राहत नाहीं. तेव्हां सर्व वेद, सर्व शास्त्रें माझ्या पंचाक्षरांत राहतात. (६६) तेव्हां तीं सर्व ( वेदशास्त्रें ) नष्ट होत नाहींत, व

त्त्या ह्यनुपालिताः ॥ गुणमूर्त्यात्मनाश्चैव ततोऽवान्तरसंहृतिः ॥६६॥
ततः सृष्टिरभून्मत्तः प्रकृत्यात्मप्रभेदतः ॥ तदा नारायणः शेते देवो
मायामयीं तनुम् ॥६७॥ आस्थाय भोगिपर्यंकशयने तोयमध्यगः ॥
तन्नाभिपंकजाज्जातः पञ्चवक्त्रः पितामहः ॥६८॥ सिसृक्षमाणो लो-
कांस्त्रीनशक्तो ह्यसहायवान् ॥ मुनीन्दश ससर्जादौ मानसानमितौ-
जसः ॥६९॥ तेषां सिद्धिविवृद्ध्यर्थं मां प्रोवाच पितामहः ॥ मत्पु-
त्राणां महादेव शक्तिं देहि महेश्वर ॥७०॥ इत्येवं प्रार्थितस्तेन पंचव-
क्त्रधरो ह्यहम् ॥ पंचाक्षराणि क्रमशः प्रोक्तवान्पद्मयोनये ॥७१॥ स
पंचवदनैस्तानि गृह्णँल्लोकपितामहः ॥ वाच्यवाचकभावेन ज्ञातवान्मां
महेश्वरम् ॥७२॥ ज्ञात्वा प्रयोगं विधिवत्सिद्धमन्त्रः प्रजापतिः ॥ पु-

---

त्यांचें रक्षण माझी शक्ति करीत असते. आणि गुणयुक्त माझ्या मूर्तींच्या यो-
गानें ( सकल मूर्तींच्या योगानें ) अवांतर संहार होत असतो. (६७) नंतर
प्रकृति आत्मा याभेदानें पुनः सृष्टि माझ्यापासून होते. त्यावेळेस मायामय
शरीराचा स्वीकार करून नारायण निजलेला असतो. (६८) उदकाच्या म-
ध्यभागीं त्याचें आंथरूण शेषरूपी पलंगावर असते. तेव्हां त्याच्या नाभिक-
मलापासून पांच तोंडांचा पितामह ( जगाचा आजा ) उत्पन्न होतो. (६९)
नंतर त्याच्या मनांत तीन लोकांची सृष्टि करावी, अशी इच्छा उत्पन्न होते,
परंतु त्याला कांहीं सहाय्य मिळत नाहीं यामुळें नाइलाज होऊन तसाच
तो राहतो. तरी आपल्या मनापासून तेजस्वी दहा ऋषींची सृष्टि तो करि-
तो. (७०) नंतर त्यांच्या सिद्धीची वाढ व्हावी ह्मणून माझी प्रार्थना तो पि-
तामह ( ब्रह्मा ) करितो. ती प्रार्थना अशी कीं, हे महेश्वरा, महादेवा, माझ्या
पुत्रांना शक्ति दे. (७१) अशी प्रार्थना केल्याबरोबर मी पांच तोंडाचा हो-
ऊन क्रमानें त्याला ( ब्रह्माला ) पांच अक्षरांचा उपदेश करितों. (७२) नं-
तर तो जगाचा पितामह आपल्या पांच तोंडांनीं तीं अक्षरें घेऊन वाच्यवा-
चकसंबंधानें महेश्वर अशा मला तो जाणतो. (७३) नंतर विधिपूर्वक प्रयो-
गाचें ज्ञान करून घेऊन मंत्राची सिद्धि करून घेतो, मग मंत्र सिद्ध झाल्या-
नंतर आपल्या पुत्रांना तो मंत्र आणि त्याचा अर्थ दोन्ही यथार्थरीतीनें दे-

त्रेभ्यः प्रददौ मन्त्रं मन्त्रार्थं च यथातथम् ॥७३॥ ते च लब्ध्वा मन्त्ररत्नं साक्षाल्लोकपितामहात् ॥ तदाज्ञसेन मार्गेण मदाराधनकांक्षिणः ॥७४॥ मेरोस्तु शिखरे रम्ये मुंजवान्नाम पर्वतः ॥ मत्प्रियः सततं श्रीमान्मद्भूतैरपि रक्षितः ॥७५॥ तस्याभ्याशे तपस्तीव्रं लोकसृष्टिसमुत्सुकाः ॥ दिव्यं वर्षं सहस्रन्तु वायुभक्षाः समाचरन् ॥७६॥ तेषां भक्तिमहं दृष्ट्वा सद्यः प्रत्यक्षतामियाम् ॥ ऋषिं छन्दश्च कीलं च बीजं शक्तिं च दैवतम् ॥७७॥ न्यासं षडङ्गदिग्बन्धं विनियोगमशेषतः ॥ प्रोक्तवानहमार्याणां जगत्सृष्टिविवृद्धये ॥७८॥ ततस्ते मन्त्रमाहात्म्यादृषयस्तपसैधिताः ॥ सृष्टिं वितन्वते सम्यक्सदेवासुरमानुषाम् ॥७९॥ अस्याः परमविद्यायाः स्वरूपमधुनोच्यते ॥ आदौ नमः प्रयोक्तव्यं शिवायेति ततःपरम् ॥८०॥ सैषा पंचाक्षरी विद्या सर्वश्रुतिशिरोगता ॥ शब्दजातस्य सर्वस्य बीजभूता समासतः ॥८१॥

---

ऊन टाकितो. (७४) लोकपितामह अशा आपल्या बापाकडून मंत्ररत्न मिळाल्याबरोबर आपल्या पित्याच्या आज्ञेनेंच ते दहा ऋषि माझी आराधना करावी, अशी इच्छा करतात. (७५) याकरितांच मेरूच्या शिंखरावर मुंजवान नांवाचा पर्वत जो आहे, तो मला फार प्रिय असून पुष्कळ माझे प्राणी त्याच्यावर राहत असतात, व त्याचें रक्षण करतात, (७६) अशा त्या पर्वतानजीक जगाची सृष्टि करावयाच्या उत्कंठेनें कडक तप ते करतात. त्यावेळेस त्यांचा आहार केवळ वायु असून अशा उपोषणानें देवमानाचे दहाहजार वर्षपर्यंत तप करतात. (७७) अशी त्यांची भक्ति पाहून तात्काळ मी त्यांच्यासमोर प्रत्यक्ष होतों. मग ऋषि, छंद, कील, बीज, शक्ति, दैवत, (७८) न्यास, षडंग, दिग्बंध, वगैरे सर्व विनियोग जगाच्या सृष्टीची वृद्धि व्हावी ह्मणून त्या आर्यांना मीं सांगितले. (७९) नंतर ते तपस्वी लोक त्या मंत्राच्या माहात्म्यानें तपश्चर्येनें वृद्धिंगत होऊन देव, असुर, मानव यांची सृष्टि करतात. (८०) अशी जी विद्या आहे, त्या श्रेष्ठ विद्येचें स्वरूप सांप्रत पुनः सांगतों. प्रथम नमः या शब्दाचा प्रयोग करून नंतर शिवाय या पदाचा उच्चार करावा. (८१) ती हीच पंचाक्षरी विद्या होय. हीच सर्व श्रुतीच्या शिरोभागावर आहे. आणि हीच सर्व शब्दांचें संक्षेपरूपी बीज आहे.

प्रथमं मन्मुखोद्गीर्णा सा ममैवास्ति वाचिका ॥ तप्तचामीकरप्रख्या पीनोन्नतपयोधरा ॥८२॥ चतुर्भुजा त्रिनयना बालेन्दुकृतशेखरा ॥ पद्मोत्पलकरी सौम्या वरदाभयपाणिका ॥८३॥ सर्वलक्षणसम्पन्ना सर्वाभरणभूषिता ॥ सितपद्मासनासीना नीलकुंचितमूर्द्धजा ॥८४॥ अस्याः पंचविधा वर्णाः प्रस्फुरद्रश्मिमण्डलाः ॥ पीतः कृष्णस्तथा धूम्रः स्वर्णाभो रक्त एव च ॥८५॥ पृथक्प्रयोज्या यद्येते विन्दुनादविभूषिताः ॥ अर्द्धचन्द्राकृतिर्बिन्दुर्नादो दीपशिखाकृतिः ॥८६॥ वीजं द्वितीयं वीजेषु मन्त्रस्यास्य वरानने ॥ दीर्घपूर्वं तुरीयस्य पंचमं शक्तिमादिशेत् ॥८७॥ वामदेवो नाम ऋषिः पंक्तिच्छन्द उदाहृतम् ॥ देवता शिव एवाहं मन्त्रस्यास्य वरानने ॥८८॥ गौतमोऽत्रिर्वरारोहे

---

(८२) प्रथम माझ्या मुखापासून निघाली, व त्या विद्येचा अर्थ मीच आहे. या विद्येचा ( स्त्रीचा ) रंग तापलेल्या सोन्याप्रमाणें असून जिचे स्तन पुष्ट असून उन्नत आहेत. (८३) व जिला चार हात असून तीन डोळे आहेत, व जिच्या डोक्यावर चंद्राची कोर असून जिच्या हातांत पद्म उत्पल आहेत, जी सौम्य असून वरदहस्त व अभयहस्त जिचे आहेत; (८४) अशी ती सर्व लक्षणांनीं युक्त असून सर्व आभरणांनीं भूषित झाली आहे. जी शुभ्र कमलावर बसलेली असून जिचे केश काळे असून कुरळ आहेत, (८५) अशा त्या विद्यारूपी स्त्रीचे रंग पांच प्रकारचे आहेत. सभोंवतीं जिचे किरण फांकलेले आहेत. ते वर्ण असे कीं, पीत ( हळदी ), कृष्ण, धूम्र (धुरकट), स्वर्णाभ ( सोन्याप्रमाणें ), रक्त ( तांबडा ) हें पांच होत. (८६) बिंदु नाद यानें भूषित झालेल्या या सर्वांचा निराळेपणा दाखवावयाचा झाला तर तोही प्रकार सांगतों. बिंदु अर्धचंद्राच्या आकाराचा असून नाद दीपाच्या शिखेप्रमाण्यें ( कलिकेप्रमाणें ) आहे. (८७) या मंत्रांत सगळे वर्ण वीजरूप आहेत परंतु त्या सगळ्या वर्णामध्यें दुसरा वर्ण या मंत्राचें वीज आहे आणि चौथा व पांचवा दोनी वर्ण शक्तिरूप आहेत. त्यांतही पांचवा दीर्घवर्ण या मंत्राची शक्ति आहे. (८८) या मंत्राचा ऋषि वामदेव असून छंदस पंक्ति आहे, व शिवनांवाचा मीच या मंत्राची देवता आहे. (८९) हे सुं-

विश्वामित्रस्तथाङ्गिराः ॥ भरद्वाजश्च वर्णानां क्रमशो ऋषयः स्मृताः ॥८९॥ गायत्र्यनुष्टुप्त्रिष्टुप्च च्छन्दांसि बृहती विराट् ॥ इन्द्रो रुद्रो हरिर्ब्रह्मा स्कन्दस्तेषां च देवताः ॥९०॥ मम पंचमुखान्याहुः स्थानं तेषां वरानने ॥ पूर्वादिषूर्द्ध्वपर्यंतं नकारादि यथाक्रमम् ॥९१॥ उदात्तः प्रथमो वर्णश्चतुर्थश्च द्वितीयकः ॥ पञ्चमः स्वरितश्चैव तृतीयो निहतः स्मृतः ॥९२॥ मूलविद्या शिवं शैवं सूत्रं पंचाक्षरस्तथा ॥ नामान्यस्य विजानीयाच्छैवं मे हृदयं महत् ॥९३॥ नकारः शिर उच्येत मकारस्तु शिखोच्यते ॥ शिकारः कवचं तद्वद्वाकारो नेत्रमुच्यते ॥९४॥ यकारोऽस्त्रं नमः स्वाहा वषट्हुंवौषडित्यपि ॥ फडित्यपि च वर्णानामन्तेंऽगत्वं यदा तदा ॥९५॥ तवापि मूलमन्त्रोऽयं किञ्चिद्भेदसमन्वयात् ॥ तत्रापि पंचमो वर्णो द्वादशस्वरभूषितः ॥९६॥ तस्मादनेन मन्त्रेण मनोवाक्कायभेदतः ॥ आवयोरर्चनं कुर्याज्जपहोमा-

---

दरि गौतम, अत्रि, विश्वामित्र, अंगिरा, भरद्वाज, हे क्रमानें त्या मंत्राच्या वर्णांचे ऋषि आहेत. (९०) गायत्री, अनुष्टुप्, त्रिष्टुप्, बृहती, विराट् हे त्याचे छंदस आहेत. इंद्र, रुद्र, हरि, ब्रह्मा, स्कंद हे त्या वर्णांच्या देवता आहेत. (९१) त्या वर्णांचे स्थान माझी पांच मुखेंच आहेत. पूर्वमुखापासून ( सद्योजातापासून ) वरच्यामुखापर्यंत ( ईशानापर्यंत ) नकारादीच्या क्रमानें स्थानें समजावींत. (९२) पहिला वर्ण उदात्तस्वराचा आहे, चौथा, दुसरा, पांचवा, असे हे तीन वर्ण स्वरितस्वराचे आहेत. तिसरा अनुदात्तस्वराचा आहे. (९३) मूलविद्या शिव असून पंचाक्षर हे सूत्रात्मक आहेत. व तीं पांच अक्षरें शिवाचीं नामें आहेत, असें समजावें. याप्रमाणें हें शिवाचें हृदय जाणावें. (९४) नकार शिर ( डोकें ) असून मकार शिखा ( शेंडी ) आहे. शिकार कवच असून वाकार नेत्र आहे. (९५) यकार अस्त्र असून नमः, स्वाहा, वषट्, हुं, वौषट्, फट् हे सर्व ज्या त्या काळीं वर्णांच्या शेवटीं अंग आहेत, असें समजावें. (९६) आतां तुझाही मूलमंत्र हाच असून यांत किंचित् भेद मात्र आहे. त्यांतही पांचवा वर्ण बारा स्वरांनीं युक्त आहे. (९७) याकरितां यामंत्रानें आह्मा दोघांची पूजा मन, वाणी, शरीर यांनीं

दिकं तथा ॥९७॥ यथामज्ञं यथाश्रद्धं यथाकालं यथामाति ॥ यथाशक्ति यथासम्पद्यथायोगं यथारति ॥९८॥ यदाकदापि वा भक्त्या यत्र कुत्रापि वा कृता ॥ येन केनापि वा देवि पूजामुक्तिं नयिष्यति ॥९९॥ मय्यासक्तेन मनसा चेत्कृतं मम सुन्दरि ॥ मत्प्रियं च शिवं चैवक्रमेणाप्यक्रमेण वा ॥१००॥ तथापि मम भक्ता ये नात्यन्तविवशाः पुनः ॥ तेषामर्थे तु शास्त्रेषु मयैष नियमः कृतः ॥१०१॥ तत्रादौ सम्प्रवक्ष्यामि मन्त्रसंग्रहणं शुभम् ॥ यद्विना निष्फलं जाप्यं येन वा सफलं भवेत् ॥१०२॥ आज्ञाहीनं क्रियाहीनं श्रद्धाहीनं वरानने ॥ आज्ञार्थं दक्षिणाहीनं सदा जप्तं च निष्फलम् ॥१०३॥ आज्ञासिद्धं क्रियासिद्धं श्रध्दासिध्दं मदात्मकम् ॥ एवं चेद्दक्षिणायुक्तं मन्त्रसिध्दं महत्फलम् ॥१०४॥ उपगम्य गुरुं विप्रमाचार्यं तत्व-

---

करावी. व शेवटीं जप होम वगैरे करावेत. (९८) बुद्धीला अनुसरून व श्रद्धेला अनुसरून, कालानुसार, प्रज्ञानुसार, शक्तीला अनुसरून, संपत्तीला अनुसरून, रतीला अनुसरून योगाला अनुसरून (९९) केव्हांही भक्तीनें कोठेंही कोणत्याही मनुष्यानें आमची पूजा केली तर त्याला मुक्ति मिळते. (१००) हे सुंदरि, माझ्यावर मन आसक्त ठेवून माझी पूजा क्रमानें किंवा अक्रमानें केली तर, व माझें प्रेम ज्यावर आहे, त्याची पूजा केली तर, त्याला मुक्ति मिळेल. (१०१) असें असूनही माझे भक्त फार परवश होत नाहींत, तर यांच्याकरितां शास्त्रांमध्यें मीं हा एक नियम करून ठेविला आहे. (१०२) त्यांत प्रथम माझ्या शुभमंत्राचें ग्रहण ( स्वीकार ) सांगतों. कारण ज्या मंत्रावांचून इतर सर्व जप निष्फल होण्याचा संभव आहे, याकरितां ते जप कसे सफल होतील, तें सांगतों. (१०३) हे सुंदरि, सद्गुरूच्या आज्ञेवांचून व नित्यकर्मावांचून व श्रद्धेवांचून व दक्षिणेवांचून केलेले जप सर्वदा निष्फल आहेत, असें समजावें. (१०४) गुरूच्या आज्ञेनें सिद्ध झालेले, क्रियेनें सिद्ध झालेले, विश्वासानें सिद्ध झालेले, दक्षिणेनें युक्त असलेले, मंत्रानें सिद्ध झालेले माझे जप मोठ्या फलाला देणारे होतात, (१०५) शिवतत्वाला जाणणारा असून सर्वदा जो जप करीत असेल, व सद्गुणांनीं युक्त असून

वेदिनम् ॥ जापिनं सद्गुणोपेतं ध्यानयोगपरायणम् ॥१०५॥ तोषयेत्तं प्रयत्नेन भावशुध्दिसमन्वितः ॥ वाचा च मनसा चैव कायेन द्रविणेन च ॥१०६॥ आचार्यं पूजयेच्छिष्यः सर्वदा हि प्रयत्नतः ॥ हस्त्यश्वरथरत्नानि क्षेत्राणि च गृहाणि च ॥१०७॥ भूषणानि च वासांसि धान्यानि च धनानि च ॥ एतानि गुरवे दद्याद्भक्त्या च विभवे सति ॥१०८॥ वित्तशाठ्यं न कुर्वीत यदीच्छेत्सिध्दिमात्मनः ॥ पश्चान्निवेदयेद्देवि स्वात्मानं सपरिच्छदम् ॥१०९॥ एवं सम्पूज्य विधिवद्यथाशक्ति त्ववञ्चयन् ॥ आददीत गुरोर्मन्त्रं ज्ञानञ्चैव क्रमेण तु ॥११०॥ एवं तुष्टो गुरुः शिष्यं पूजकं वत्सरोषितम् ॥ शुश्रूषुमनहङ्कारं स्नातं शुचिमुपोषितम् ॥१११॥ स्नापयित्वा विशुध्दयर्थं पूर्णकुम्भघृतेन वै ॥ जलेन मन्त्रशुद्धेन पुण्यद्रव्ययुतेन च ॥११२॥ अलंकृत्य सुवेषं च गन्धस्रग्वस्त्रभूषणैः ॥ पुण्याहंवाचयित्वा च ब्राह्म-

---

ध्यानयोगांत जो आसक्त असेल, अशा आचार्याजवळ ( गुरूजवळ ) येऊन (१०६) वाणी, मन, शरीर यांनीं व द्रव्यानें गुरूचा संतोष जसा होईल त्याप्रमाणें त्याच्यावर शुद्ध भाव ठेवून त्याची सेवा करावी. (१०७) सर्वदा प्रयत्नानें शिष्यानें आचार्याची ( गुरूची ) पूजा करावी. व हत्ती, घोडे, रथ, रत्न, गृह, क्षेत्र, (१०८) दागीने, वस्त्र, धन, धान्य वगैरे सर्व गुरूला आपलें वैभव जसें असेल त्यामानानें भक्तीनें दान करावें. (१०९) आपल्यास सिद्धि होण्याची इच्छा असेल तर गुरूला देण्याविषयीं द्रव्यशाठ्य करूं नये. नंतर हे देवि, सालंकार सपरिवार आपल्या शरीराचें दान करावें. (११०) आपल्या शक्तीला अनुसरून गुरूची पूजा कपट न करितां करून नंतर गुरूपासून मंत्राचा स्वीकार करावा. व ज्ञान मिळवावें. (१११) याप्रमाणें संतुष्ट झालेल्या गुरूनें एक वर्षपर्यंत राहून पूजाकरणाऱ्या व सेवा करणाऱ्या अभिमान सोडलेल्या शुद्ध झालेल्या उपोषित (उपोषण केलेल्या ) शिष्याला (११२) तुपानें भरलेल्या घागरीनें शुद्धीकरितां स्नान घालावें. नंतर मंत्रानें अभिमंत्रण केलेल्या पाण्यांत सौगंधिक द्रव्य घालून त्या शिष्याला त्या पाण्यानें स्नान घालावें. (११३) नंतर गंध, वस्त्र, भूषणांनीं त्याला सजवून पुण्याहवाचन त्याच्याकडून ब्राह्मणद्वारा ( मंत्र ह्म-

णानभिपूज्य च ॥११३॥ समुद्रतीरे नद्यां च गोष्ठे देवालयेऽपि वा ॥ शुचौ देशे गृहे वापि काले सिध्दिकरे तिथौ ॥११४॥ नक्षत्रे शुभयोगे च सर्वदोषविवर्जिते ॥ अनुगृह्य ततो दद्याज्ज्ञानं मम यथाविधि ॥११५॥ स्वरेणोच्चारयेत्सम्यगेकान्तेऽतिप्रसन्नधीः ॥ उच्चार्योच्चारयित्वा तमावयोर्मन्त्रमुत्तमम् ॥११६॥ शिवश्चास्तु शुभं चास्तु शोभनोऽस्तु प्रियोऽस्त्विति ॥ एवं दद्याग्दुरुर्मन्त्रमाज्ञाश्चैव ततः परम् ॥११७॥ एवं लब्ध्वा गुरोर्मन्त्रमाज्ञाश्चैव समाहितः ॥ संकल्प्य च जपेन्नित्यं पुरश्चरणपूर्वकम् ॥११८॥ यावज्जीवं जपेन्नित्यमष्टोत्तरसहस्रकम् ॥ अनन्यस्तत्परो भूत्वा स याति परमां गतिम् ॥११९॥ जपेदक्षरलक्षं वै चतुर्गुणितमादरात् ॥ नक्ताशी संयमी यः स पौर-

---

णणाऱ्या विप्रांस बोलावून ) करवावें. व ब्राह्मणाची पूजा करवावी. (११४) समुद्र किंवा नदीच्या कांठावर गोठ्यांत, देवालयांत, शुद्ध स्थलांत, स्वगृहांत, व चांगल्या कालांत सुमुहूर्तानें युक्त अशी तिथि पाहून (११५) उत्तम नक्षत्रावर शुभयोग पाहून दोष कोणतेही ज्यादिवशीं नाहींत, असा दिवस पाहून त्या शिष्यावर अनुग्रह करून क्रमपूर्वक त्याला गुरूनें ज्ञान द्यावें. (११६) गुरूनें शिष्याला मंत्र सांगतानां अंतःकरण शुद्ध ठेवून एकांतांत मंत्र हळूंच सांगावा. हे पार्वति गुरूनें प्रथम आपण हळूं मंत्राचा उच्चार करून नंतर त्याच्याकडून हळूंच स्पष्ट आह्मा दोघांच्या मंत्राचा उच्चार करवावा. (११७) बा शिष्या, तुला शुभ असो, तुझें कल्याण होवो, तुला शोभन ( मंगल ) होवो, प्रिय होवो असा आशीर्वाद देऊन गुरूनें मंत्र द्यावा, व आज्ञा द्यावी. ( ११८) याप्रमाणें गुरूपासून शिष्यानें मंत्र घेऊन आणि गुरूची आज्ञा शांतपणानें मान्य करून नंतर संकल्प करून पुरश्चरणपूर्वक नित्य जप करावा. (११९) जीव असेपर्यंत नित्य हजार आठवेळ जप करावेत. जप करतानां दुसरीकडे मन ठेवूं नये. असा जप जो करितो, तो सद्गतीला जातो. (१२०) प्रत्येक अक्षर चार लक्ष संख्येनें आवर्तित व्हावें ( प्रत्येक अक्षराची आवृत्ति चार लक्ष व्हावी ) जपकर्त्यानें नित्य रात्रीं भोजन करावें, व निरंतर इंद्रियें स्वाधीन ठेवावींत. असा जो असेल त्याला पौ-

श्चरणिकः स्मृतः ॥१२०॥ यः पुरश्चरणं कृत्वा नित्यजापी भवेत्पुनः ॥ तस्य नास्ति समो लोके स सिद्धः सिद्धिदो भवेत् ॥१२१॥ स्नानं कृत्वा शुचौ देशे बद्ध्वा रुचिरमासनम् ॥ त्वया मां हृदि संचिन्त्य संचित्य स्वगुरुं ततः ॥१२२॥ उदङ्मुखः प्राङ्मुखो वा मौनी चैकाग्रमानसः ॥ विशोध्य पंचतत्त्वानि दहनप्लावनादिभिः ॥१२३॥ मन्त्रन्यासादिकं कृत्वा शकलीकृतविग्रहः ॥ आवयोर्विग्रहं ध्यायन्प्राणापानौ नियम्य च ॥१२४॥ विद्यास्थानं स्वकं रूपमृषिं छन्दोऽधिदैवतम् ॥ बीजं शक्तिं तथा वाक्यं स्मृत्वा पंचाक्षरीं जपेत् ॥१२५॥ उत्तमं मानसं जाप्यमुपांशु मध्यमं विदुः ॥ अधमं वाचिकं प्राहुरागमार्थविशारदाः ॥१२६॥ उत्तमं रुद्रदैवत्यं मध्यमं विष्णुदैवतम् ॥ अ-

---

.रश्चरणिक ह्मणतात. (१२१) असें पुरश्चरण करून पुनः निरंतर जो जप करितो, त्याच्याप्रमाणें सिद्ध पुरुष जगांत कोणी नाहीं असें समजावें. असा तो प्राणी जगांत सिद्धि देणारा होतो. (१२२) स्नान करून शुद्ध जागेंत सुंदर आसन घालून तुला ( पार्वतीला ) मला ( शिवाला ) गुरूला हृदयांत ठेवून ( स्मरण करून ) (१२३) उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख बसून मौनानें एकाग्र मन करून दहन प्लावनादि कर्मानें पांच तत्वांचा शोध करून (१२४) मंत्राचे न्यास वगैरे करून आपल्या शरीराचा विभाग करून ( काल्पनिक विभाग करून ) प्राणापान वायूचा रोध करून आह्मां दोघा मूर्तींचें ध्यान करावें. (१२५) विद्येचें स्थान, आपलें रूप, ऋषि, छंद, अधिदैवत, बीज, शक्ति, वाक्य यांचें स्मरण करून पंचाक्षरीमंत्राचा जप करावा. (१२६) मानसिक जप ( मनांतच जप करणें ) उत्तम मानिला असून उपांशु जप ( हळूं उच्चार करून जप करणें ) मध्यम मानिला आहे. वाचिक जप ( मोठ्यानें उच्चार करून जप करणें ) सर्वांपेक्षां अधम मानिला आहे, असें शिवागम जाणणारे पंडित ह्मणतात. (१२७) रुद्रदेवताक मंत्र ( रुद्र ज्याला देवता आहे, तो ) उत्तम असून विष्णुदेवताक मंत्र ( विष्णु ज्याला देवता आहे, तो मंत्र ) मध्यम मानिला आहे. व ब्रह्मदेवताक मंत्र ( ब्रह्मा ज्याला देवता आहे, तो मंत्र ) अधम मानिला आहे, असा मंत्राचा

धमं ब्रह्मदैवत्यमित्याहुरनुपूर्वशः ॥१२७॥ यदुच्चनीचस्वरितैः शब्दैः स्पष्टपदाक्षरैः ॥ मन्त्रमुच्चारयेद्वाचा वाचिकोऽयं जपः स्मृतः॥१२८॥ जिह्वामात्रपरिस्पन्दादीषदुच्चारितोऽपि वा ॥ अपरैरश्रुतः किंचिच्छ्रुतो वोपांशुरुच्यते ॥१२९॥ धिया यदक्षरश्रेण्या वर्णाद्वर्णं पदात्पदम् ॥ शब्दार्थचिंतनं भूयः कथ्यते मानसो जपः ॥१३०॥ वाचिकस्त्वेक एव स्यादुपांशुः शतमुच्यते ॥ साहस्रो मानसः प्रोक्तः सगर्भस्तु शताधिकः ॥१३१॥ प्राणायामसमायुक्तः सगर्भो जप उच्यते ॥ आद्यान्तयोरगर्भोऽपि प्राणायामः प्रशस्यते ॥१३२॥ चत्वारिंशत्समावृत्तिप्राणानायम्य संस्मरेत् ॥ मन्त्रमन्त्रार्थविद्धीमानशक्तः शक्तितो जपेत् ॥१३३॥ पंचकं त्रिकमेकं वा प्राणायामं समाचरेत्॥

---

क्रम पंडित सांगतात. (१२८) उच्चनीच स्वर ( वरचेखालचे स्वर ) स्पष्ट ह्मणून शब्द, अक्षर, पद यांचा उच्चार स्पष्ट वाणीनें करून मोठ्यानें जो जप करतात, त्याला वाचिक जप ह्मणतात. (१२९) नुसती जीभ मात्र हालवून किंचित् उच्चार करून दुसऱ्याच्या कानाला न ऐकवितां किंवा थोडें ऐकूं जाईल असा जो जप करितात, त्याला उपांशुजप असें ह्मणतात. (१३०) आतां वर्णापुढें वर्णाचा उच्चार पदापुढें पदाचा उच्चार अक्षरापुढें अक्षरांचा उच्चार क्रमानें बुद्धि यांचे ( उच्चारांचें ) चिंतन व त्या त्या शब्दार्थाचें चिंतन करणें जें आहे, त्याला मानसिक जप ह्मणतात. (१३१) वाचिक जप[१] एकच करावा. उपांशु जप शंभर करावेत, मानसिक जप हजार करावेत, व सगर्भजप शंभरांपेक्षां अधिक करावेत. (१३२) प्राणायामसहित जपाला सगर्भजप ह्मणतात. अगर्भजप जरी केला, तरी प्रथमतः व शेवटीं असे दोन वेळीं प्राणायाम केले पाहिजेत, तर तो जप प्रशस्त होतो, असें ह्मणतात. (१३३) ४० चाळीसवेळ प्राणाचें नियमन करून जप करावे. मंत्रांत व मंत्राच्या अर्थात् जो विद्वान् असेल, त्यानें आपली शक्ति जशी असेल, त्यामानानें जप करावेत. (१३४) पांच वेळ, किंवा तीन वेळ, किंवा एकवेळ प्राणायाम करावा. अगर्भजप सगर्भजप यांमध्यें सगर्भजप श्रेष्ठ ह्म-

---

१ वाचिक जप एकपट फळ देणारा आहे, असा हा अर्थ होतो. पुढेंही तसेंच समजावें.

अगर्भं वा सगर्भं वा सगर्भस्तत्र शस्यते ॥१३४॥ सगर्भादपि साहस्रः सध्यानो जप उच्यते ॥ एषु पंचविधेष्वेकः कर्त्तव्यः शक्तितो जपः ॥१३५॥ अंगुल्या जपसंख्यानमेकमेकमुदाहृतम् ॥ रेखयाष्टगुणं विद्यात्पुत्रजीवैर्दशाधिकम् ॥१३६॥ शतं स्याच्छंखमणिभिः प्रवालैस्तु सहस्रकम् ॥ स्फाटिकैर्दशसाहस्रं मौक्तिकैर्लक्षमुच्यते ॥१३७॥ पद्माक्षैर्दशलक्षन्तु सौवर्णैः कोटिरुच्यते ॥ कुशग्रंथ्या च रुद्राक्षैरनन्तगुणितं भवेत् ॥१३८॥ त्रिंशदक्षैः कृता माला धनदा जपकर्मणि ॥ सप्तविंशतिसंख्यातैरक्षैः पुष्टिप्रदा भवेत् ॥१३९॥ पंचविंशतिसंख्यातैः कृता मुक्तिं प्रयच्छति ॥ अक्षैस्तुपंचदशभिरभिचारफलप्रदा ॥१४०॥ अंगुष्ठं मोक्षदं विद्यात्तर्जनी शत्रुनाशिनी ॥ मध्यमा धनदा

---

णविला आहे. (१३९) सगर्भजपापेक्षां ध्यानसहितजप सहस्रपटीनें श्रेष्ठ आहे, असें ह्मणतात. एकूण तात्पर्य हें आहे कीं, पांचप्रकारचे जप जे सांगितले, त्यांमध्यें कोणतातरी एक जप आपल्या शक्तीच्या मानानें करावा. (१३६) जप करितां बोटांनीं संख्या केली असतां एकपट फळ मिळतें. रेखांनीं ( जमीनीवर रेघ मारून ) संख्या केली असतां आठपट फळ मिळतें. ( ज्यांना मुलगा आहे, अशा पुत्रवंतांनीं जपाची संख्या रेघ मारून केली असतां ) किंवा पुत्रजीव नांवाच्या मणींनीं संख्या केली असतां दसपट फल मिळतें. (१३७) शंखमणीनें जप केला असतां शतपट फळ मिळतें, पोंवळयांनीं हजारपट फळ मिळतें, स्फटिकमणींनीं दहाहजारपट फळ मिळतें, मोत्यांनीं लक्षपट फळ मिळतें, (१३८) पद्माक्षमण्यांनीं दशलक्ष फळ मिळतें, सोन्याच्या मणींनीं कोटिपट फळ मिळतें. कुशाच्या गांठींनीं किंवा रुद्राक्षमण्यांनीं अनंतफळ मिळतें. (१३९) जपाकारितां केलेली तीस रुद्राक्षांची माळ धन देणारी आहे, सत्तावीस रुद्राक्षांची माळ पुष्टि देते. (१४०) पंचवीस रुद्राक्षांची माळ मुक्ति देणारी आहे. पंधरा रुद्राक्षांची माळ अभि²चार फळ देणारी आहे. (१४१) अंगुष्ठ मोक्ष देणारा असून तर्जनी शत्रूला संहार करणारी आहे. मध्यमा धन देणारी असून अनामिका शांति देणारी

---

२ भूतप्रेत वश करून देणारें फळ.

शान्तिकरो त्वेषा अनामिका ॥१४१॥ कनिष्ठाक्षरणी प्रोक्ता जप-
कर्मणि शोभना ॥ अंगुष्ठे तं जपेज्जाप्यमन्यैरंगुलिभिः सह ॥१४२॥
अंगुष्ठेन विना जाप्यं कृतं तदफलं यतः ॥ गृहे जपं समं विद्याद्गोष्ठे
शतगुणं विदुः ॥१४३॥ पुण्यारण्ये तथारामे सहस्रगुणमुच्यते ॥ अ-
युतं पर्वते पुण्ये नद्यां लक्षमुदाहृतम् ॥१४४॥ कोटिं देवालये प्राहुर-
नन्तं मम सन्निधौ ॥ सूर्यस्याग्नेर्गुरोरिन्दोर्दीपस्य च जलस्य च ॥१४५॥
विप्राणां च गवां चैव सन्निधौ शस्यते तपः ॥ तत्पूर्वाभिमुखं वश्यं
दक्षिणं चाभिचारिकम् ॥१४६॥ पश्चिमं धनदं विद्यादौत्तरं शांतिदं
भवेत् ॥ सूर्याग्निविप्रदेवानां गुरूणामपि सन्निधौ ॥१४७॥ अन्येषां
च प्रशस्तानां मन्त्रं न विमुखो जपेत् ॥ उष्णीषी कंचुकी नग्नो मुक्त-

---

आहे. (१४२) जपाच्या कामाला कनिष्ठा ही मंगलकर असून ती क्षरणी (रक्षि-
णी) आहे, असें ह्मणतात. इतर अंगुलीसह अंगुष्ठाच्या क्रमानें मोजून जप केला
असतां फळ चांगलें मिळतें. (१४३) अंगुष्ठावांचून केलेला जप निष्फळ
आहे, असें सांगतात. आपल्या घरीं बसून जप करील, तर समफळ ( ब-
रोबर फळ ) मिळतें, गोष्ठांत ( गोठ्यांत ) करील तर त्यापेक्षां शतपटीनें
जास्त मिळतें, ( १४४) पुण्यकर अरण्यांत ( दंडक वगैरे ) जप करील तर
तसेंच बागेंत केला तर सहस्रपट फळ मिळतें, पुण्यकर पर्वतांवर ( श्रीशैल
वगैरे ) जप करील तर अयुतपट ( दहाहजारपट ) फळ मिळतें, नदीती-
रावर करील तर लक्षपट फळ मिळतें. ( १४५) देवालयांत करील तर को-
टिपट फळ मिळतें, माझ्याजवळ ( शिवाजवळ ) जप करील तर अनंतपट
फळ मिळतें. सूर्य, अग्नि, चंद्र, दीप, जल, (१४६) ब्राह्मण, गायी यांच्या-
जवळ बसून जप करील तर तो जप प्रशस्त होतो, असें ह्मणतात पूर्वेक-
डे बसून जप करील तर वश्यविद्या येते, दक्षिणेकडे बसून करील तर भू-
तप्रेत वगैरे वश होतात, (१४७) पश्चिमेकडे बसून करील तर धन मिळ-
तें, उत्तरेकडे बसून जप करील तर शांति मिळते. सूर्य, अग्नि, विप्र, देव,
गुरु यांच्या संनिधीस बसून ( समोर बसून ) (१४८) व इतर योग्य लो-
कांच्या समोर बसून जप करावा. विमुख होऊन ( तोंड फिरवून ) मंत्राचा
जप करू नये. पागोटें, आंगरखा घालून जप करू नये. नग्न होऊन, ( ना-

केशो मलावृतः ॥१४८॥ अपवित्रकरोऽशुद्धो विलपन्न जपेत्क्वचित् ॥ क्रोधं मदं क्षुतं त्रीणि निष्ठीवनविजृम्भणे ॥१४९॥ दर्शनं च श्वनीचानां वर्ज्जयेज्जपकर्मणि ॥ आचामेत्सम्भवे तेषां स्मरेद्वा मां त्वया सह ॥१५०॥ ज्योतींषि च प्रपश्येद्वा कुर्याद्वा प्राणसंयमम् ॥ अनासनः शयानो वा गच्छन्नुत्थित एव वा ॥१५१॥ रथ्यायामशिवे स्थाने न जपेत्तिमिरान्तरे ॥ प्रसार्य न जपेत्पादौ कुक्कुटासन एव वा ॥१५२॥ यानशय्याधिरूढो वा चिन्ताव्याकुलितोऽथवा ॥ शक्तश्चेत्सर्वमेवैतदशक्तः शक्तितो जपेत् ॥१५३॥ किमत्र बहुनोक्तेन समासेन वचः शृणु ॥ सदाचारो जपञ्छुध्दं ध्यायन्भद्रं समश्नुते ॥१५४॥ आचारः परमो धर्म आचारः परमं धनम् ॥ आचारः परमा विद्या

---

गव्यानें ) केंस मोकळे सोडून, मलाचा अवरोध करून, (१४९) हात मळकट असतानां, अशुद्ध असतां, लक्ष्य दुसरीकडे असतां जप करूं नये. क्रोध, मद, क्षत ( शिंकणें ), हे तीन, व थुंकणें जांभई वगैरे विकार झाले असतां जप करूं नये. (१९०) कुत्र्याचें व नीचांचें दर्शन झालें असतां जप करूं नये. कदाचित् जपाच्या वेळेस यांचें दर्शन झालेंच तर आचमन करावें, किंवा माझें ( शिवाचें ) स्मरण तुझ्यासह ( पार्वतीसह ) करावें. (१९१) किंवा सूर्य वगैरे तेजस्वी पदार्थ पहावेत. किंवा प्राणायाम पुनः करावा. आसन न घालतां, व निजल्या वेळेस, चालतानां, उभा असतानां, (१९२) रस्त्यावर असतां, अमंगळ जागेंत असतां, गाढ अंधाराच्या जागेंत जप करूं नये. पाय पसरून जप करूं नये, कोंबड्याप्रमाणें बसून ( कुक्कुटासन घालून ) जप करूं नये. (१९३) वाहनावर असतां, आंथरुणावर असतां, काळजींत असतां, जप करूं नये, इतक्या सर्व गोष्टी सांभाळून जप करावयास सामर्थ्य असेल, तर जप करावा, नाहींतर ( शक्ति नसेल तर ) जशी वेळ सांपडेल त्याप्रमाणें, व जशी शक्ति असेल, त्याप्रमाणें जप करावा. (१९४) हे पार्वति, फार बोलण्यांत काय मतलब आहे, थोडक्यांत सांगतों, ऐक. सदाचार होऊन शुचिर्भूत होऊन ध्यानपूर्वक जप जो करितो, त्याचें कल्याण होऊन उत्तम सुख त्याला मिळतें. (१९९) आचार सांभाळणें हाच मोठा धर्म आहे, व आचारच मोठें धन आहे, असें समजावें.

आचारः परमा गतिः ॥१५५॥ आचारहीनः पुरुषो लोके भवति निन्दितः ॥ परत्र च सुखी न स्यात्तस्मादाचारवान्भवेत् ॥१५६॥ यस्य यद्विहितं कर्म वेदे शास्त्रे च वैदिकैः ॥ तस्य तेन समाचारः सदाचारो न चेतरः ॥१५७॥ सद्भिराचरितत्वाच्च सदाचारः स उच्यते ॥ सदाचारस्य तस्याहुरास्तिक्यं मूलकारणम् ॥१५८॥ आस्तिकश्चेत्प्रमादाद्यैः सदाचारादपि च्युतः ॥ न दुष्यति नरो नित्यं तस्मादास्तिकतां व्रजेत् ॥१५९॥ यथेहास्ति सुखं दुःखं सुकृतैर्दुष्कृतैरपि ॥ तथा परत्र चास्तीति मतिरास्तिक्यमुच्यते ॥१६०॥ रहस्यमन्यद्वक्ष्यामि गोपनीयमिदं प्रिये ॥ न वाच्यं यस्य कस्यापि नास्तिकस्याथवा पशोः ॥१६१॥ सदाचारविहीनस्य पतितस्यान्त्यजस्य

---

आचारच श्रेष्ठ विद्या असून आचारच उत्तम गति आहे. (१९६) आचारानें जो हीन असेल, असा पुरुष जगांत फार निंद्य होतो, शिवाय त्याला परलोकांत सुख मिळत नाहीं. याकरितांच मनुष्यानें आचार सांभाळावा. (१९७) वेदांत, शास्त्रांत, वैदिक लौकिक कर्म ज्याला जें सांगितलें असेल, त्यानें तसें तें कर्म केलें तर त्याला सदाचारी ह्मणतात, नाहींतर ह्मणत नाहींत. (१९८) मोठमोठ्या लोकांनीं तसें आचरण केलें आहे, यामुळें त्या आचाराला सदाचार असें नांव मिळालें आहे. अशा सदाचाराला आस्तिक्यबुद्धि मूलकारण आहे, असें सांगतात. ( ज्याला आस्तिक्यबुद्धि असेल, तोच सदाचारी होतो. ) (१९९) आस्तिक असूनही प्रमादानें सदाचारापासून भ्रष्ट झाला तर तो दोषी होत नाहीं. ह्मणूनच मनुष्यानें आस्तिक्य बाळगावें. (१६०) चांगल्या कर्मानें किंवा वाईट कर्मानें जगांत ( या लोकांत ) अनुंक्रमानें सुख अथवा दुःख मिळतें, तसेंच पुण्यकर्मानें किंवा पापकर्मानें परलोकांत अनुक्रमानें सुखदुःखें मिळतात, अशी बुद्धि ज्याला असते, त्याला आस्तिक असें ह्मणतात. (१६१) हे सुंदरि, तुला एक रहस्य सांगतों, परंतु तें फार जपून ठेव. कोणत्याही प्राण्याला व कोणत्याही पशूला ( अज्ञान्याला ) सांगूं नकोस. विशेषेंकरून नास्तिकाला सांगूं नकोस. (१६२) जो दुराचारी असेल, जो पतित असेल, जो अंत्यज असेल, त्याला

च ॥ पंचाक्षरात्परं नास्ति परित्राणं कलौ युगे ॥१६२॥ गच्छतस्तिष्ठतो वापि स्वेच्छया कर्म कुर्वतः ॥ अशुचेर्वाशुचेर्वापि मन्त्रोऽयं न च निष्फलः ॥१६३॥ अनाचारवतां पुंसामविशुद्धषडध्वनाम् ॥ अनादिष्टोऽपि गुरुणा मन्त्रोऽयं न च निष्फलः ॥१६४॥ अन्त्यजस्यापि मूर्खस्य मूढस्य पतितस्य च ॥ निर्मर्यादस्य नीचस्य मन्त्रोऽयं न च निष्फलः ॥१६५॥ सर्वावस्थां गतस्यापि मयि भक्तिमतः परम् ॥ सिध्यत्येव न सन्देहो नापरस्य तु कस्यचित् ॥१६६॥ न लग्नतिथिनक्षत्रवारयोगादयः प्रिये ॥ अस्यात्यन्तमवेक्ष्याः स्युर्नैष सुप्तः सदोदितः ॥१६७॥ न कदाचिन्न कस्यापि रिपुरेष महामनुः ॥ सुसिद्धो वापि सिद्धो वा साध्यो वापि भविष्यति ॥१६८॥ सिध्देन गुरुणादिष्टः सुसिध्द इति कथ्यते ॥ असिध्देनापि वा दत्तः सिध्दः

---

तारणारी वस्तु ह्मणजे एक माझी पंचाक्षरी विद्या तेवढी आहे. कलियुगांत तिच्याशिवाय तारणारी कोणतीही वस्तु जगांत नाहीं. (१६३) चालणारा असो, उभा राहिलेला असो, स्वैरवर्तन करणारा असो, अशुचि असो, शुचि असो, त्यानें मंत्राचा स्वीकार केला असतां कधींही हा मंत्र निष्फळ होत नाहीं. (१६४) ज्यांनीं आचार बाळगिला नाहीं, ज्यांनीं षडध्वाची शुद्धि केली नाहीं, ज्याला गुरूपासून मंत्र मिळाला नाहीं, अशा प्राण्याला सुद्धां मंत्र निष्फळ होत नाहीं. (१६५) अंत्यज, मूर्ख, मूढ, पतित, निर्मर्याद (ज्यानें मर्यादा राखिली नाहीं, तो) नीच अशा प्राण्यांना सुद्धां मंत्र निष्फल होत नाहीं. (१६६) अति नीच स्थितीला सुद्धां जो पोहोंचला आहे, त्यानें जर माझ्यावर भक्ति ठेविली, तर त्याला सुद्धां सिद्धि मिळते, यांत संशय नाहीं. इतराला (भक्तिहीनाला) मिळत नाहीं. (१६७) लग्न, तिथि, वार, नक्षत्र, योग वगैरे या मंत्राला कांहीं पाहावे लागत नाहींत, सर्वदा हा माझा मंत्र निद्रावस्थेंत राहत नसून जागा असतो. (१६८) केव्हांही कोठेंही हा मंत्र कशालाही कोणालाही शत्रु होत नाहीं. सुसिद्ध, सिद्ध, साध्य, यांपैकीं कांहींतरी होईल. (१६९) सिद्ध झालेल्या गुरूनें मंत्राचा उपदेश केला तर त्या मंत्राला सुसिद्ध ह्मणतात. असिद्ध मनुष्याकडून उपदेश घेतला तर त्याला सिद्ध असें ह्मणतात. स्वतः मंत्राचा पाठ करून जप केला तर साध्य

साध्यस्तु केवलः ॥१६९॥ असाधितः साधितो वा सिध्यत्येव न संशयः ॥ श्रध्दातिशययुक्तस्य मयि मंत्रे तथा गुरौ ॥१७०॥ तस्मान्मन्त्रातरांस्त्यक्त्वा सोपायानधिकारतः॥ आश्रयेत्परमां विद्यां हृद्यां पंचाक्षरीं बुधः ॥१७१॥ मन्त्रान्तरेषु सिध्देषु मन्त्र एष न सिध्यति ॥ सिध्दे त्वस्मिन्महामन्त्रे ते च सिध्दा भवन्त्युत ॥१७२॥ यथादेवेष्वलब्धोऽस्मि लब्धेष्वपि महेश्वरि ॥ मयि लब्धे तु ते लब्धा मन्त्रेष्वेष समो विधिः ॥१७३॥ ये दोषाः सर्वमन्त्राणां न तेऽस्मिन्सम्भवन्त्यपि॥ अस्य मन्त्रस्य जात्यादीननपेक्ष्य प्रवर्तनात् ॥१७४॥ तथापि नैव क्षुद्रेषु फलेषु प्रतियोगिषु ॥ सहसापि नियुञ्जीत यस्मादेष महाफलः ॥१७५॥

---

मंत्र असें ह्मणतात. (१७०) माझ्यावर, मंत्रावर, गुरूवर ज्याचा विश्वास चांगला आहे, त्याचा तो मंत्र असाधित असो, साधित असो, जपकर्त्याला तो मंत्र सिद्ध होतोच. (१७१) ज्यांमध्यें अपाय फार आहेत, अशा इतर मंत्राचा जप सोडून या सुंदर हृद्य पंचाक्षरी विद्येचा आश्रय बुद्धिमान अशा अनधिकाऱ्यानें सुद्धां करावा. (१७२) पुष्कळ श्रम करून इतर सर्व मंत्रांची सिद्धि जरी केली, तथापि हा मंत्र कांहीं सिद्ध होत नाहीं. आणि सर्व मंत्र सोडून याच महामंत्राची सिद्धि केली, तर मात्र सर्व मंत्र आपोआप सिद्ध होतात. (१७३) हे सुंदरि, सर्व देव जरी प्रसन्न झाले, तथापि मी प्रसन्न होत नसून मी एकटा जर प्रसन्न झालों, तर सर्व देव जसे आपोआप प्रसन्न होतात, त्याप्रमाणें माझा मंत्र आहे, असें समज. (१७४) इतर सर्व मंत्रांमध्यें जे दोष आढळतात, ते दोष या माझ्या महामंत्रामध्यें सांपडत नाहींत. कारण इतर मंत्राला विशिष्ट जाति, विशिष्ट वर्ण यांची अपेक्षा जशी आहे, तशी इच्छा माझ्या मंत्राला मुळीं नाहीं कोणत्याही प्राण्यानें माझ्या मंत्राचा जप केला तरी मंत्र सिद्ध होतो. (१७५) असें जरी आहे, तथापि थोडक्या फलासाठीं या मंत्राचा उपयोग सहसा करूं नये. कारण या मंत्राचें फळ फार मोठें जर मिळतें, तर क्षुद्रफलाची आशा करणें ह्मणजे त्याचा हा वेडेपणा होय.

उपमन्युरुवाच ॥ एवं साक्षान्महादेव्यै महादेवेन शूलिना ॥ हिताय जगतामुक्तः पंचाक्षरविधिर्यथा ॥१७६॥ य इदं कीर्तयेद्भक्त्या शृणुयाद्वा समाहितः ॥ सर्वपापविनिर्मुक्तः प्रयाति परमां गतिम् ॥१७७

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे पंचाक्षरमन्त्रतत्वनिरूपणं नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥

---

उपमन्यु बोलला— (१७६) अरे कृष्णा, याप्रमाणें शूलधारी महादेवानें जगाच्या हिताकरितां देवी पार्वतीस हा पंचाक्षराचा विधि सांगितला. (१७७) तर जो प्राणी शांत मन करून भक्तीनें याचें कीर्तन करितो, अथवा शांत मन करून भक्तीनें ऐकतो, तो प्राणी सर्व पापांपासून मुक्त होऊन तात्काळ सद्गतीला जातो.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतला पंचाक्षरमंत्रतत्व निरूपणनांवाचा १२ बारावा अध्याय संपला.

---

## अथ त्रयोदशोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ।। भगवन्मन्त्रमाहात्म्यं भवता कथितं प्रभो ।। तत्प्रयोगविधानश्च साक्षाच्छ्रुतिसमं यथा ।।१।। इदानीं श्रोतुमिच्छामि शिवसंस्कारमुत्तमम् ।। मन्त्रसंग्रहणे किञ्चित्सूचितं न तु विस्तृतम् ।।२।।

उपमन्युरुवाच ।। हन्त ते कथयिष्यामि सर्वपापविशोधनम् ।। संस्कारं परमं पुण्यं शिवेन परिभाषितम् ।।३।। सम्यक्कृताधिकारः स्यात्पूजादिषु नरो यतः ।। संस्कारः कथ्यते तेन षडध्वपरिशोधनम् ।।४।। दीयते येन विज्ञानं क्षीयते पाशबन्धनम् ।। तस्मात्संस्कार एवायं दीक्षेत्यपि च कथ्यते ।।५।। शाम्भवी चैव शाक्ती च मान्त्री चैव शिवागमे ।। दीक्षोपदिश्यते त्रेधा शिवेन परमात्मना ।।६।। गुरोरालोकमात्रेण स्पर्शात्संभाषणादपि ।। सद्यः संज्ञा भवेज्जन्तोः पाशोपक्षयकारिणी ।।७।। सा दीक्षा शाम्भवी प्रोक्ता सा पुनर्भिद्यते द्विधा ।।

---

श्रीकृष्ण बोलतात— (१) हे भगवन् उपमन्यो, मंत्रमाहात्म्य त्वां सांगितलें, तें तर ऐकिलेंच आहे, आतां त्या मंत्राच्या प्रयोगाचें विधान केवळ श्रुतीप्रमाणेंच आहे, (२) तर त्या उत्तम शिवसंस्काराला ऐकण्याची इच्छा सांप्रत माझी आहे, तें सांग. आणि मंत्राचें ग्रहण कसें करावें ? या बाबतींत थोडा संक्षेप झाला, असून विस्तृत वर्णन केलें नाहीं, असें मला वाटतें.

उपमन्यु बोलला— (३) कृष्णा फार संतोषाची गोष्ट आहे. सर्व पाप दूर करणाऱ्या पुण्यकर उत्तम शिवसंस्काराला सांगतों, ऐक. या संस्काराचें वर्णन पूर्वीं शिवानेंच केलें आहे. (४) पूजा वगैरे कर्मांविषयीं मनुष्यानें चांगला अधिकार मिळवावा. षडध्वाच्या शुद्धीलाच संस्कार ह्मणावा, असें शिवानें सांगितलें आहे. (५) ज्यापासून ज्ञान होतें, व ज्यापासून पाशाचीं बंधनें क्षीण होतात, ह्मणून या संस्काराला दीक्षा असेंही नांव आहे. (६) शांभवी, शाक्ती, मांत्री असे तीन प्रकार दीक्षेचे शिवागमांत परमात्मा शिवानेंच सांगितले आहेत. (७) गुरूच्या केवळ दर्शनानें, स्पर्शानें, संभाषणानें प्राण्याच्या पाशाला तोडणारी अशी स्मृति तात्काळ होते. (८) अशा दीक्षेला शांभवीदीक्षा असें ह्मणतात. पुनः या शांभवीदीक्षेंत तीव्रा तीव्रतरा

तीव्रा तीव्रतरा चेति पाशोपक्षयभेदतः ॥८॥ यद्यस्य निर्वृतिः सद्यः सैव तीव्रतरा मता ॥ तीव्रा तु जीवतोऽत्यन्तं पुंसः पापविशोधिका ॥९॥ शाक्ती ज्ञानवती दीक्षा शिष्यदेहं प्रविश्य तु ॥ गुरुणा योगमार्गेण क्रियते ज्ञानचक्षुषा ॥१०॥ मान्त्री क्रियावती दीक्षा कुण्डमण्डलपूर्विका ॥ मन्दमन्दतरोद्देशात्कर्तव्या गुरुणा बहिः ॥११॥ शक्तिपातानुसारेण शिष्योऽनुग्रहमर्हति ॥ शैवधर्मानुसारस्य तन्मूलत्वात्समासतः ॥१२॥ यत्र शक्तिर्न पतिता तत्र शुद्धिर्न जायते ॥ न विद्या न शिवाचारो न मुक्तिर्न च सिद्धयः ॥१३॥ तस्माल्लिंगानि संवीक्ष्य शक्तिपातस्य भूयसः ॥ ज्ञानेन क्रियया वाथ गुरुः शिष्यं विशोधयेत् ॥१४॥ योऽन्यथा कुरुते मोहात्स विनश्यति दुर्मतिः ॥ तस्मात्सर्वप्रकारेण गुरुः शिष्यं परीक्षयेत् ॥१५॥ लक्षणं शक्तिपातस्य प्रबोधानन्दसंभवः ॥ सा यस्मात्परमा शक्तिः प्रबोधानन्दरूपि-

---

असे दोन भेद असून या दीक्षेपासून पाशांचा क्षय होतो. (९) दीक्षा घेतलेल्या प्राण्याला ज्या दीक्षेपासून तात्काळ सुख मिळतें, तीच दीक्षा तीव्रतरा होय. तीव्रादीक्षेपासून जीवंत प्राण्याचें पापशोधन फार होतें. (१०) शिष्याच्या देहामध्यें योगमार्गानें प्रवेश करून ज्ञानचक्षूनें ज्ञानविशिष्ट दीक्षा जी दिली जाते, त्या दीक्षेला शाक्ती दीक्षा ह्मणतात. (११) कुंडमंडलाची रचना करून मंत्रसहित जी दीक्षा दिली जाते, ती मांत्री दीक्षा होय. जो शिष्य मंद किंवा अतिमंद असेल, त्याला गुरूनें बाहेरच्या कृती शिष्यास दाखवून ही दीक्षा त्यास द्यावी. (१२) ज्या शिष्याच्या शरीरामध्यें मंत्रोपदेशाच्या योगानें सामर्थ्य गुरु ठेवतो तो शिष्य गुरूच्या अनुग्रहाला पात्र होतो संक्षेपानें शक्तिपातच शैवधर्माचें मूलकारण आहे. (१३) ज्या शिष्याच्या ठिकाणीं शक्तिपात झाला नाहीं, त्या शिष्याच्या ठिकाणीं शुद्धि होत नाहीं, विद्या मिळत नाहीं, शिवाचार साधत नाहीं, मुक्ति मिळत नाहीं, सिद्धि साधत नाहीं. (१४) याकरितां ज्ञानानें किंवा क्रियेनें अत्यंत शक्तिपात झाला आहे, किंवा नाहीं, हें त्या त्या लिंगाना पाहून ( चिन्हाला पाहून ) गुरूनें शिष्याचा शोध करावा. (१५) जो मूढपणानें मागें सांगितलेल्या प्रकाराविरुद्ध करितो, तो दुर्मति नष्ट होतो. याकरितां सर्व प्रकारानें गुरूनें शिष्याची परीक्षा क-

णी ॥१६॥ आनन्दबोधयोर्लिंगमन्तः स्फुरणविक्रिया ॥ यया स्यात्कम्परोमांचः स्वरनेत्रादिविक्रियाः ॥१७॥ शिष्योऽपि लक्षणैरेभिः कुर्याग्दुरुपरीक्षणम् ॥ तत्सम्पर्के शिवार्चादौ स्वगतैर्वाथ तद्गतैः ॥१८॥ शिष्यस्य शिक्षणीयत्वाग्दुरोर्गौरवकारणात् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरोर्गौरवमाचरेत् ॥१९॥ यो गुरुः स शिवः प्रोक्तो यः शिवः स गुरुः स्मृतः ॥ गुरुर्वा शिव एवाथ विद्याकारेण संस्थितः ॥२०॥ यथा शिवस्तथा विद्या यथा विद्या तथा गुरुः ॥ शिवविद्यागुरूणां च पूजया सदृशं फलम् ॥२१॥ सर्वदेवात्मकश्चासौ सर्वमन्त्रमयो गुरुः ॥

---

रावी. (१६) ज्या शिष्याला ज्ञान झालें आहे, व संतोष झाला आहे, त्या शिष्याच्या ठिकाणीं शक्तिपात झाला ह्मणून समजावें. शक्तिपाताचें लक्षण हेंच होय. कारण ती श्रेष्ठ शक्ति ज्ञानस्वरूप व आनंदरूप आहे. (१७) आनंदाचें व ज्ञानाचें चिन्ह ह्मणजे पोटांत स्फुरण होणें, व पोटांत विकार होणें हें होय. आणि त्या स्फुरणरूपी क्रियेनें आंगाला कंप सुटावा, व रोमांच आंगावर यावेत, व स्वरविकार नेत्रविकार ( डोळ्यांत अश्रु येणें वगैरे विकार ) व्हावेत. (१८) याप्रमाणेंच शिष्यानें मागें सांगितलेल्या लक्षणांनीं गुरूची परीक्षा करावी. परीक्षेचा क्रम ह्मणजे गुरूचा संपर्क करणें ( सहवास करणें ), शिवपूजेच्या वेळेस मागें सांगितलेले विकार होतात किंवा नाहीं, हें पाहणें, व आपलीं लक्षणें कशीं आहेत, व गुरूचीं लक्षणें कशीं आहेत, हें पाहणें वगैरे लक्षणांनीं गुरूची परीक्षा करावी. (१९) शिष्य हा शिक्षणीय ( शासन करावयास योग्य ) असून गुरूच्या ठिकाणीं गौरव ( श्रेष्ठपणा ) असल्यामुळें सर्व प्रयत्न करून गुरूविषयीं शिष्यानें गौरव ठेवावा. (२०) जो गुरु असेल, तो शिव समजावा, व जो शिव आहे, तोच गुरु होय. ( शिवगुरूंमध्यें भेद मानूं नये. ) गुरु होवो, शिव होवो, विद्येच्याच आकारानें आहे, असें समजावें. (२१) जसा शिव आहे, तशी विद्या आहे, जशी विद्या आहे, तसा गुरु आहे. शिवाची पूजा केली, किंवा गुरूची पूजा केली, किंवा विद्येची पूजा केली, तरी तिन्हीं फळें सारखींच आहेत, असें समजावें. (२२) गुरूच्या शरीरांत सर्व देव वास करीत असून सर्व मंत्रही वास करतात. या-

तस्मात्सर्वप्रयत्नेन तस्याज्ञां शिरसा वहेत् ॥२२॥ श्रेयोऽर्थी यदि गुर्वाज्ञां मनसापि न लंघयेत् ॥ गुर्वाज्ञापालको यस्माज्ज्ञानसम्पत्तिमश्नुते ॥२३॥ गच्छंस्तिष्ठन्स्वपन्भुञ्जन्नन्यत्कर्म समाचरन् ॥ समक्षं यदि कुर्वीत सर्वं चानुज्ञया गुरोः ॥२४॥ गुरोर्गेहे समक्षं वा न यथेष्टासनो भवेत् ॥ गुरुर्देवो यतः साक्षान्न गृहं देवमंदिरम् ॥२५॥ पापिनां च यथा सङ्गात्तत्पापात्पतितो भवेत् ॥ तद्वदाचार्यसङ्गेन तद्धर्मफलभाग्भवेत् ॥२६॥ यथेह वह्निसम्पर्कान्मलं त्यजति कांचनम् ॥ तथैव गुरुसम्पर्कात्पापं त्यजति मानवः ॥२७॥ यथा वह्निसमीपस्थो घृतकुम्भो विलीयते ॥ तथा पापं विलीयेत आचार्यस्य समीपतः ॥२८॥ यथा प्रज्वलितो वह्निः शुष्ककाष्ठं च निर्दहेत् ॥ तथायमपि

---

करितां अति प्रयत्न करून गुरूची आज्ञा शिरसा मान्य करावी. (२३) जर आपल्यास कल्याण व्हावें, अशी इच्छा असेल, तर गुरूची आज्ञा मनानें सुद्धां मोडूं नये. गुरूची आज्ञा पाळिली असतां ज्ञानसंपत्तीचा सुखोपभोग मिळतो. (२४) चालत असो, उभा असो, निजलेला असो, जेवीत असो, आणि इतर एखादें कर्म करीत असो. हीं सर्व कर्में गुरूच्या समक्ष गुरूच्या आज्ञेनें करावींत. (२५) गुरूच्या घरीं गुरूसमक्ष वाटेल तसें आसन घालून मात्र बसूं नये. कारण गुरु हा साक्षात् परमेश्वर असून त्याचें ( गुरूचें ) घर साक्षात् देवालयच आहे. (२६) पापी लोकांच्या पातकांच्या सहवासानें चांगला मनुष्यसुद्धां पतित कसा होतो, त्याचप्रमाणें गुरूच्या सहवासानें गुरुधर्माच्या फलाचा उपभोग घेणारा होतो (स्वतः गुरूच होतो.) (२७) अग्नींत सोनें घातलें असतां ( अग्नीचा सहवास झाला ह्मणून ) सोन्यांतला मळ जसा निघून जातो, तद्वत् गुरूचा संपर्क ज्याला होईल, त्याचीं सर्व पापें आपोआप नष्ट होतात. (२८) अग्नीजवळ एखादी तुपानें भरलेली घागर ठेविली, तर घागरींतील तूप जसें वितळतें, तद्वत् गुरूचा संपर्क जर शिष्याला झाला, तर त्या शिष्याच्या आंगांतलीं सर्व पापें वितळून जातात ( नाहींशीं होतात. ) (२९) अग्नींत पुष्कळ लांकडें घालून जाळ केला असतां वाळलेलीं लांकडें जशीं जळून जातात, त्याप्रमाणें गुरु जर आपल्या-

सन्तुष्टो गुरुः पापं क्षणाद्दहेत् ॥२९॥ मनसा कर्मणा वाचा गुरोः क्रोधं न कारयेत् ॥ तस्य क्रोधेन दह्यन्ते ह्यायुःश्रीज्ञानसत्क्रियाः ॥३०॥ तत्क्रोधकारिणो ये स्युस्तेषां यज्ञाश्च निष्फलाः ॥ यमाश्च नियमाश्चैव नात्र कार्या विचारणा ॥३१॥ गुरोर्विरुद्धं यद्वाक्यं न वदेज्जातुचिन्नरः ॥ वदेद्यदि महामोहाद्रौरवं नरकं व्रजेत् ॥३२॥ मनसा कर्मणा वाचा गुरुमुद्दिश्य यत्नतः ॥ श्रेयोऽर्थी चेन्नरो धीमान्न मिथ्याचारमाचरेत् ॥३३॥ नैर्गुण्ये ख्यापिते तस्य नैर्गुण्यशतवान्भवेत् ॥ गुणेऽपि ख्यापिते तस्य सर्वं पुण्यफलं लभेत् ॥३४॥ गुरोर्हितं प्रियं कुर्यादादिष्टो वा न वा सदा ॥ असमक्षं समक्षं वा तस्य कार्यं समाचरेत् ॥३५॥ इत्थमाचारवान्भक्तो नित्यमुद्युक्तमानसः ॥ गुरुप्रिय-

---

वर संतुष्ट झाला, तर तो गुरु आपलें सर्व पाप एका क्षणांत जाळून टाकितो. (३०) मनानें, कृतीनें, वाणीनें गुरूवर थोडा सुद्धां राग करूं नये. तो गुरु जर आपल्यावर रागावला, तर आयुष्य, संपत्ति, ज्ञान, व केलेलें सत्कर्म हीं सर्व नष्ट होतात. (३१) गुरूला संताप चढवून कितीही यज्ञयाग केले, तथापि त्याचे ते यज्ञ सर्व निष्फळ होऊन जातात. व सर्व यमनियम वगैरे व्यर्थ होतात, यांत विचारच करावयाला नको आहे. (३२) गुरूच्या वाक्याचे विरुद्ध वाक्य कधींही तोंडांतून काढूं नये. जर कदाचित् एखाद्यानें मूर्खपणामुळें वाक्य काढिलेंच तर, तो मनुष्य अघोर रौरव नरकाला जातो. (३३) आपल्याला कल्याण व्हावें ह्मणून ज्याची इच्छा असेल, त्यानें मनानें, कर्मानें, वाणीनें सुद्धां गुरूबरोबर खोटें आचरण करूं नये. (३४) कदाचित् एखाद्या मूर्खानें उगीच गुरूचे दोषच काढिले, तर तो स्वतः ( दोष काढणारा ) हजारवेळ निर्गुणी आपणच होतो, परंतु गुरु कांहीं याच्या बोलण्यापासून निर्गुणी ठरत नाहीं. एखाद्या शाहण्यानें गुरूचे गुण जर ज्याच्या त्याच्या पुढें गायिले, तर त्याला सर्व पुण्याचें फळ मिळतें. (३५) गुरूनें आज्ञा केली असो, नसो, परंतु आपण होऊन गुरूचें हित करावें, व गुरु समक्ष असो, किंवा नसो, परंतु गुरूचें कार्य जें कांहीं असेल, तें गुरूच्या आज्ञेची वाट न पाहतां करून टाकावें. (३६) याप्रमाणें भक्तानें आपल्या कर्तव्यावर मन ठेवून आचार पाळावा. जो शिष्य गुरूच्या कृपेला पात्र झाला

करः शिष्यः शैवधर्मास्ततोऽर्हति ॥३६॥ गुरुश्चेग्दुणवान्प्राज्ञः परमानन्दभासकः ॥ तत्वविच्छिवसंसक्तो मुक्तिदो न तु चापरः ॥३७॥ संवित्तिजननं तत्वं परमानन्दसम्भवम् ॥ तत्तत्वं विदितं येन स एवानन्ददर्शकः ॥३८॥ अन्योन्यं तारयेतां तौ किं शिलातारयेच्छिलाम् ॥ न पुनर्नाममात्रेण संवित्तिरहितस्तु यः ॥३९॥ तेषां तन्नाममात्रेण मुक्तिर्वै नाममात्रिका ॥ यैः पुनर्विदितं तत्वं ते मुक्ता मोचयन्त्यपि ॥४०॥ तत्वहीने कुतो बोधः कुतो ह्यात्मपरिग्रहः ॥ परिग्रहाद्विनिर्मुक्तः पशुरित्यभिधीयते ॥४१॥ पशुभिः प्रेरितश्चापि पशुत्वं नातिवर्तते ॥ तस्मात्तत्वविदे वेह मुक्तो मोचक इष्यते ॥४२॥ सर्व-

---

आहे, तो शैवधर्म करावयास पात्र होतो. (३७) जो गुरु सद्गुणी असून बुद्धिमान् आहे, व श्रेष्ठ आनंदाला दाखविणारा असून शिवाच्या सेवेंत निमग्न आहे, व तत्व जाणणारा आहे तोच गुरु शिष्याला मुक्ति देतो, दुसरा देत नाहीं. (३८) ज्याच्यापासून उत्तम ज्ञान होत असून आनंदही परमावधीचा होतो, अशा तत्वाला जो दाखवितो, तोच खरा आनंददर्शक होय. (३९) याप्रमाणें जीं गुरुशिष्यांचीं लक्षणें सांगितलीं, त्या लक्षणांनीं युक्त गुरु आणि शिष्य आहे, असे ते दोघे परस्पर एकमेकांस तारक होतात. खरेंच आहे. कारण दगडानें कोठें दगडाला तारिलें आहे काय ? त्याप्रमाणें ज्या दोघांनीं ज्ञान मिळविलें नाहीं, असे ते नांवाचे मात्र गुरुशिष्य जे आहेत, ते परस्पर एकमेकांस कसें तारतील बरें ? (४०) जसे ते नांवाचे गुरुशिष्य आहेत, त्याप्रमाणें त्या दोघांना नांवाचीच मुक्ति मिळते. आतां ज्या दोघांना तत्वज्ञान झालें आहे, ते दोघे मात्र आपण स्वतः खरी मुक्ति मिळवतात, व दुसऱ्याला मुक्त करतात. (४१) ज्यांना तत्वज्ञान झालें नाहीं, त्यांना कोठलें ज्ञान व्हावयाला ? कोठचा आत्मपरिग्रह ( आत्मसंयमन ) होतो ? आत्मसंयमन ज्यानें केलें नाहीं, तो शुद्ध पशु समजावा. (४२) शिवाय त्यांत पशु स्वतः असून पशूंचीच प्रेरणा जास्त झाली, ह्मणजे पशुत्वापासून तो कसचा मुक्त होतो ? याकरितां जो तत्ववेत्ता आहे, तोच मुक्त होणारा, व तोच दुसऱ्यालाही मुक्ति देणारा होय. (४३) सर्व लक्षणांनीं युक्त आहे, व

लक्षणसंयुक्तः सर्वशास्त्रविदप्ययम् ॥ सर्वोपायविधिज्ञोऽपि तत्त्वहीन-स्तु निष्फलः ॥४३॥ यस्यानुभवपर्यन्ता बुद्धिस्तत्र प्रवर्तते ॥ तस्या-वलोकनाद्यैश्च परानन्दोऽभिजायते ॥४४॥ तस्माद्यस्यैव सम्पर्कात्प्र-बोधानन्दसम्भवः ॥ गुरुं तमेव वृणुयान्नापरं मतिमान्नरः ॥४५॥ स च्छिष्यैर्विनयाचारचतुरैरुचितो गुरुः ॥ यावद्विज्ञायते तावत्सेवनीयो मुमुक्षुभिः ॥४६॥ ज्ञाते तस्मिन्स्थिरा भक्तिर्यदि स्यात्तं समाश्रयेत् ॥ न तु तं सन्त्यजेज्जातु नोपेक्षेत कथञ्चन ॥४७॥ यत्रानन्दः प्रबोधो वा नाल्पमप्युपलभ्यते ॥ वत्सरादपि शिष्येण सोऽन्यं गुरुमुपाश्रये-त् ॥४८॥ गुरुमन्यं प्रपन्नोऽपि नावमन्येत पौर्विकम् ॥ गुरोर्भ्रातॄं-स्तथापुत्रान्बोधकान्प्रेरकानपि ॥४९॥ तत्रादावुपसङ्गम्य ब्राह्मणं वेद-

---

सर्व शास्त्रांत गति आहे, व सर्व उपायांच्या विधीला जाणतो, असा जरी आहे, तथापि त्याला तत्वज्ञान जर झालें नाहीं, तर तो इतका विद्वान् अ-सूनही निष्फलच आहे. (४४) अनुभवापर्यंत ज्याची बुद्धि चालत आहे, त्या मनुष्याला नुसतें पाहिलें, तरी परानंद ( परतत्व पाहिलें असतां जो आनंद व्हावा, तो आनंद ) होतो. (४५) याकरितां ज्याचा नुसता संपर्क केला तरी ज्ञानरूपी आनंद होतो, त्या मनुष्यालाच आपला गुरु करावा. बुद्धिमा-नानें दुसऱ्याला गुरु करूं नये. (४६) ज्याच्या जवळ विनय, आचार, यांचें चातुर्य आहे, असा उत्तम शिष्यच गुरूनें पतकरावा, जोंपर्यंत आपल्यास ज्ञान करून घेणें आहे, तोंपर्यंत मुमुक्षूनें (मोक्षाची इच्छा करणाऱ्यानें) गु-रूची सेवा करावी. (४७) ज्ञानानें युक्त अशा त्या गुरूवर स्थिर भक्ति ब-सत असेल, तर त्याला आपला गुरु करावा. त्या गुरूचा त्याग कधींही करूं नये, व त्याची उपेक्षा कधींही करूं नये. (४८) ज्या गुरूचा आश्रय केला असतां थोडा सुद्धां आनंद ( परानंद ) किंवा ज्ञान होत नाहीं, अशा गुरू-जवळ एक वर्ष घालवून ( तोंपर्यंत वाट पाहून ) दुसऱ्या वर्षी दुसरा गुरु करावा. (४९) जरी दुसरा गुरु केला, तथापि पूर्वी केलेल्या गुरूचा अप-मान कधींही करूं नये, फार काय ? त्या गुरूच्या बंधूंचा, गुरूच्या पुत्रांचा, व बोधकांचा, प्रेरकांचा सुद्धां अपमान करूं नये. (५०) त्यांत प्रथमतः वे-

पारगम् ॥ गुरुमाराधयेत्प्राज्ञं सुभगं प्रियदर्शनम् ॥५०॥ सर्वाभयप्रदातारं करुणाक्रान्तमानसम् ॥ तोषयेत्तं प्रयत्नेन मनसा कर्मणा गिरा ॥५१॥ तावदाराधयेच्छिष्यः प्रसन्नोऽसौ भवेद्यथा ॥ तस्मिन्प्रसन्ने शिष्यस्य सद्यः पापक्षयो भवेत् ॥५२॥ तस्माद्धनानि रत्नानि क्षेत्राणि च गृहाणि च ॥ भूषणानि च वासांसि यानशय्यासनानि च ॥५३॥ एतानि गुरवे दद्याद्भक्त्या वित्तानुसारतः ॥ वित्तशाठ्यं न कुर्वीत यदीच्छेत्परमां गतिम् ॥५४॥ स एव जनको माता भ्राता बन्धुर्धनं सुखम् ॥ सखा मित्रं च यद्यस्मात्सर्वं तस्मै निवेदयेत् ॥५५॥ निवेद्य पश्चात्स्वात्मानं सान्वयं सपरिच्छदम् ॥ समर्प्य सोदकं तस्मै नित्यं तद्वशगो भवेत् ॥५६॥ यदा शिवाय स्वात्मानं दत्तवान्देशि-

---

दपारंगत ब्राह्मण जो असेल, व जो षड्गुणैश्वर्ययुक्त आहे, ज्याला पाहिल्याबरोवर प्रीति उत्पन्न होते, व जो बुद्धिमान् असेल, त्या गुरूची आराधना करावी. (९१) जो चोहोंकडून अभय देणारा असेल, ज्याचें मन करुणेनें कळवळत असेल, असा गुरु करून मनानें, कर्मानें, वाणीनें त्या गुरूला सर्वदां प्रयत्नपूर्वक संतुष्ट ठेवावें. (९२) जोंपर्यंत गुरु प्रसन्न होईल, तोंपर्यंत शिष्यानें गुरूची आराधना करावी. एकदां गुरूची मर्जी शिष्यावर झाली, ह्मणजे तात्काळ शिष्याचें सर्व पाप जळून गेलें ह्मणून समजावेंच. (९३) याकरितां धन, रत्न, क्षेत्र ( जमीन ), घर, भूषण, वस्त्र, यान (हत्ती, घोडे), शय्या, आसन (९४) वगैरे गुरूला द्यावें. व द्रव्याची योग्यता जशी असेल, त्यामानानें द्रव्य गुरूवर भक्ति ठेवून द्यावें. परंतु जर आपल्यास उत्तम गति व्हावी ह्मणून इच्छा असेल, तर द्रव्यशाठ्य ( द्रव्याचा कृपणपणा ) करूं नये. (९५) आई, बाप, भावू, बंधु, धन, सुख, सखा, मित्र, वगैरे शरीरसंबंधीं जितके जगांत दिसतात, तितक्यांची भावना गुरूच्या ठिकाणीं करावी. व या सर्वांना गुरूला समर्पण करावें. (९६) नंतर आपल्या वंशासहित, परिवारांसहित आपल्या शरीराचें सुद्धां गुरूला समर्मण करावें. त्यावर पाणी सोडावें. तात्पर्य हें कीं नेहमीं गुरूच्या ताब्यांत शिष्यानें असावें. (९७) जेव्हां शिवस्वरूपी श्रेष्ठ गुरूला शिष्य शरीरदान करील, तेव्हां तो

कात्मने ॥ तदा शैवो भवेद्देही न ततोऽस्ति पुनर्भवः ॥५७॥ देशिकाकृतिमास्थाय पशोः पाशानशेषतः ॥ छित्वा परं पदं देवो नयत्येवमिति श्रुतिः ॥५८॥ गुरुस्तु स्वाश्रितं शिष्यं वर्षमेकं परीक्षयेत् ॥ ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं द्विवर्षं च त्रिवर्षकम् ॥५९॥ प्राणद्रव्यप्रदानाद्यैरादेशैश्च समासमैः ॥ उत्तमांश्चाधमे कृत्वा नीचानुत्तमकर्मणि ॥६०॥ आकृष्टास्ताडिता वापि ये विषादं न यान्त्यपि ॥ ते योग्याः संयताः शुद्धाः शिवसंस्कारकर्मणि ॥६१॥ अहिंसका दयावन्तो नित्यमुद्युक्तचेतसः ॥ अमानिनो बुद्धिमन्तस्त्यक्तस्पर्द्धाः प्रियंवदाः॥६२॥ ऋजवो मृदवः स्वस्था विनीताः स्थिरचेतसः ॥ शौचाचारसमायुक्ताः शिवभक्ता द्विजातयः ॥६३॥ एवं वृत्तसमोपेता वाङ्मनःकायकर्मभिः ॥ शोध्या वोध्या यथान्यायमिति शास्त्रेषु निश्चयः ॥६४॥

---

( शिष्य ) खरा शैव झाला, ह्मणून समजावा. अशा त्या प्राण्याला मात्र पुनर्जन्म कधींही यावयाचा नाहीं. (५८) शिव हा देशिक गुरूची आकृति स्वत: घेऊन पशूंच्या सर्व पाशाला तोडून परपदाला तो देव त्या पशूला नेतो, असें श्रुति बोलते. (५९) गुरूनें सुद्धां आपल्या आश्रयास येऊन राहिलेल्या शिष्याची परीक्षा एकवर्षपर्यंत करावी. परंतु तो ब्राह्मण असावा. कदाचित् क्षत्रिय किंवा वैश्य शिष्य असेल, तर त्यांची परीक्षा अनुक्रमानें दोन वर्षे तीनवर्षपर्यंत करावी. (६०) प्राणदान, द्रव्यदान, योग्यायोग्य आज्ञा यांनीं नीचाला उत्तम कर्म सांगून, उत्तमाला नीच कर्म सांगून परीक्षा करावी. (६१) ज्या शिष्यांला मारिलें, ओढिलें तरी दुःख स्वल्पसुद्धां होत नाहीं, ते शिष्य शिवसंस्काराला योग्य असून जितेंद्रिय शुद्ध आहेत, असें समजावें. (६२) जे हिंसा करीत नसून दयाशील आहेत, व जे उद्योगप्रिय असून निरहंकारी आहेत, जे बुद्धिमान् असून स्पर्द्धा ज्यांनीं सोडिली आहे, व जे गोड बोलत असून (६३) सरळ व मृदु आहेत, व जे स्वस्थ असून सुशिक्षित आहेत, व ज्यांचें मन स्थिर असून जे शुद्ध आचारांनीं युक्त आहेत, व जे शिवभक्त ब्राह्मण आहेत, (६४) अशा स्वभावाच्या शिष्यांना पाहून वाणीनें, मनानें, कर्मानें योग्यरीतीनें त्यांचा तपास करून त्यांना बोध द्यावा.

नाधिकारः स्वतो नार्याः शिवसंस्कारकर्मणि ।। नियोगाद्भर्तुरस्त्येव भक्तियुक्ता यदीश्वरे ।।६५।। तथैव भर्तृहीनायाः पुत्रादेरभ्यनुज्ञया ।। अधिकारो भवत्येव कन्यायाः पितुराज्ञया ।।६६।। शूद्राणामन्त्यजातीनां पतितानां विशेषतः ।। तथा संकरजातीनां नाध्वशुद्धिर्विधीयते ।।६७।। तेऽप्यकृत्रिमभावाश्चेच्छिवे परमकारणे ।। पादोदकप्रदानाद्यैः कुर्युः पाशविशोधनम् ।।६८।। अत्रानुलोमजाता ये युक्ता एव द्विजातिषु ।। तेषामध्वविशुद्ध्यादि कुर्यान्मातृकुलोचितम् ।।६९।। या तु कन्या स्वपित्राद्यैः शिवधर्मे नियोजिता ।। सा भक्ताय प्रदातव्या नापराय विरोधिने ।।७०।। दत्ता चेत्प्रतिकूलाय प्रमादाद्बोधयेत्पतिम् ।। अशक्तौ तं पतिं त्यज्य मनसा धर्ममाचरेत् ।।७१।। यथा

---

असा निश्चय शास्त्रांत सांगितला आहे. (६५) शिवसंस्काररूपी कर्माचा अधिकार स्त्रियांना मात्र स्वतः नाहीं. जर एखाद्या स्त्रीची भक्ति शिवावर असेल, तर तिनें आपल्या पतीची आज्ञा घेतली तर मात्र शिवसंस्कारकर्मांत तिला अधिकार पोहोंचतो. (६६) तसेंच जी विधवा असेल, तिनें पुत्रादिकांची आज्ञा घ्यावी, ह्मणजे ती अधिकारिणी होते. कुमारी ( अल्पवयाची ) असेल तर बापाची आज्ञा घेतली असतां तिला अधिकार येतो. (६७) शूद्र, अंत्यज, पतित, संकरजातीचे लोक, यांना षडध्वशुद्धि नाहीं. (६८) जर परमकारण अशा शिवावर यांचें प्रेम निष्कपट असेल, तर पादोदक वगैरे मुख्य मुख्य उपचारांनीं यांचें पापशोधन करावें. (६९) आतां ब्राह्मणांमध्यें अनुलोमज जे असतील, त्यांना अध्वशुद्धि करावयाची झाल्यास त्यांच्या आईच्या कुलाला योग्य होईल, त्याप्रमाणें षडध्वशुद्धि करावी. (७०) जी कन्या आपल्या घरामध्यें बापाकडून शिवधर्माचा उपदेश घेऊन त्या धर्मांत निष्णात झालेली असेल, अशा त्या कन्येचें लग्न करावयाचें झाल्यास योग्य शिवभक्त एखादा वर पाहून त्याला देऊन तिचें लग्न करावें. दुसऱ्याला देऊं नये. (७१) कदाचित् प्रमादानें दुसऱ्याशींच ( प्रतिकूल वराशीं ) तिचा विवाह झाला तर त्या मुलीनें आपल्या पतीला शिवधर्माचा बोध करावा. कदाचित् शिवधर्माचा बोध करूनही तो त्या धर्माचा स्वीकार करीत नसल्यास तिनें त्या नवऱ्यास सोडून आपल्या मनानें शिवधर्म करावा. (७२) पूर्वीं

मुनिवरं त्यक्त्वा पतिमत्रिं पतिव्रता ॥ कृतकृत्याऽभवत्पूर्वं तपसाराध्य शङ्करम् ॥७२॥ यथा नाळायिनी देवं तपसाराध्य पाण्डवान् ॥ पतीँल्लब्धवती धर्मे गुरुभिर्न नियोजिता ॥७३॥ अस्वातन्त्र्यकृतो दोषो नेहास्ति परमार्थतः ॥ शिवधर्मे नियुक्तायाः शिवशासनगौरवात् ॥७४॥ वहुनात्र किमुक्तेन योऽपि कोऽपि शिवाश्रयः ॥ संस्कारो गुर्वधीनश्चेत्संस्क्रिया तु प्रभिद्यते ॥७५॥ गुरोरालोकनादेव स्पर्शात्सम्भाषणादपि ॥ यस्य सञ्जायते ह्याज्ञा तस्य नास्ति परा क्रिया ॥७६॥ मनसा यस्तु संस्कारः क्रियते योगवर्त्मना ॥ स नेह कथ्यते गुह्यो गुरुवक्त्रैकगोचरः ॥७७॥ क्रियावान्यस्तु संस्कारः कुण्डमण्डपपूर्वकः ॥ स वक्ष्यते समासेन तस्य शक्यो न विस्तरः ॥७८॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे शैवमन्त्रदीक्षाविधिर्नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥

---

अत्रिऋषीच्या पतिव्रता स्त्रीनें आपल्या मुनिश्रेष्ठ पतीला ( अत्रीला ) सोडून, श्रीशंकराची आराधना करून ती जशी कृतार्थ झाली, त्याप्रमाणें इतर पतिव्रतेनेंही तसेंच करावें. (७३) तसेंच पूर्वी नाळायिनी ( द्रौपदी ) धर्मगुरूकडून धर्मामध्यें नियुक्त झाली नव्हती, तरी स्वतंत्ररीतीनें तिनें तपश्चर्येनें शंकराची आराधना करून शंकराचे वरानें पांडव आपले पति करून घेतले. तसा इतर स्त्रियांनीं शिवधर्म करावा. (७४) शिवधर्मामध्यें निष्णात असून पारतंत्र्यामुळें शिवधर्मविरुद्ध दोष जर घडला, तर तो दोष तिला लागतच नाहीं. कारण शिवाच्या शासनाचें महत्वच तसें आहे. (७५) फार बोलण्यांत काय मतलब आहे ? कोणताही शिवाश्रयसंस्कार गुरूच्या ताब्यांत असला तर तो संस्कार निराळ्या तऱ्हेचा होतो. (७६) गुरूच्या अवलोकनानें, ( पाहण्यानें ) स्पर्शानें, संभाषणानें ज्याला ज्ञान होतें, त्याला दुसरी क्रिया करावी लागत नाहीं. (७७) योगरूपी मार्गानें मनांत जो संस्कार केला जातो, तो संस्कार मात्र येथें सांगत नाहीं. कारण तो संस्कार गुह्य असल्या कारणानें गुरूच्या तोंडूनच ऐकला पाहिजे. (७८) कुंडमंडपासह आचारासह जो संस्कार आहे, तो मात्र संक्षेपानें सांगतों, तोही विस्तारानें सांगावयास अशक्य आहे. याप्रमाणें तेरावा अध्याय संपला.

---

१ विनियोजिता.

## अथ चतुर्दशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ पुण्येऽहनि शुचौ देशे बहुदोषविवर्जिते ॥ देशिकः प्रथमं कुर्यात्संस्कारं समयाह्वयम् ॥१॥ परीक्ष्य भूमिं विधिवद्गन्धवर्णरसादिभिः ॥ शिल्पशास्त्रोक्तमार्गेण मण्डपं तत्र कल्पयेत् ॥२॥ कृत्वा वेदिञ्च तन्मध्ये कुण्डानि परिकल्पयेत् ॥ अष्टदिक्ष्वथवा दिक्षु तत्रैशान्यां पुनः क्रमः ॥३॥ प्रधानकुण्डं कुर्वीत यद्वा पश्चिमभागतः ॥ प्रधानमेकमेवाथ कृत्वा शोभां प्रकल्पयेत् ॥४॥ वितानध्वजमालाभिर्विविधाभिरनेकशः ॥ वेदिमध्ये ततः कुर्यान्मण्डलं शुभलक्षणम् ॥५॥ रत्नहेमादिभिश्चूर्णैरीश्वरावाहनोचितम् ॥ सिन्दूरशालिनीवारचूर्णैरेवाथ निर्द्धनः ॥६॥ एकहस्तं द्विहस्तं वा सितं वा रक्तमेव वा ॥ एकहस्तस्य पद्मस्य कर्णिकाष्टांगुला मता ॥७॥ केशराणि तदर्द्धानि शेषं

---

उपमन्यु बोलला— (१) पुण्यकर तिथि पाहून दोष ज्याठिकाणीं पुष्कळ आहेत, अशी जागा वर्ज्य करून शुद्ध प्रदेशांत गुरूनें प्रथमतः समयनांवाचा संस्कार करावा. (२) गंध, वर्ण, रस यांनीं जमिनीची परीक्षा विधीनें करून तेथें शिल्पशास्त्रांत सांगितलेल्या विधीनें मंडप करावा. (३) प्रथम वेदि ( ओटा ) करून तिच्या मध्यभागीं कुंड करावें, आठ दिशांमध्यें कुंड करून विदिशांतही कुंड करावें. ईशान्यदिशेला अनुसरून तो क्रम पुढें दिल्याप्रमाणें समजावा. (४) ईशान्य दिशेला मुख्य कुंड करावें. किंवा पश्चिमेला मुख्य कुंड करावें. नंतर त्याला इतर पदार्थांनीं शोभा आणावी. (५) वर छत मारावें, ध्वज उभा करावा, सभोंवतीं माळा लोंबत ठेवाव्या; व इतर अनेक द्रव्यांनीं कुंड सुशोभित करावें. वेदीच्या मध्यभागीं सुंदर लक्षणांनीं युक्त असें मंडल करावें. (६) श्रीशिवाला साजेल असें आसन रत्नाचें, सोन्याचें वगैरे करावें. दरिद्री असेल तर सिंदूराचें, तांदुळाच्या पिठाचें, नीवारधान्याच्या ( राजगिऱ्याच्या ) पिठाचें तरी त्यानें शिवाचें आसन करावें. (७) तें आसन एक हात प्रमाणाचें, किंवा दोन हात प्रमाणाचें करावें. त्या आसनाचा वर्ण पांढरा किंवा तांबडा असावा. जर एका हाताचें पद्म केलें असेल, तर त्यामध्यें कर्णिका ( करंडा ) आठ बोटांची करावी. (८) त्यांतलें केसर त्याच्या निम्या प्रमाणाचें करावें, बाकीचे आठ

चाष्टदलात्मकम् ॥ द्विहस्तस्य तु पद्मस्य द्विगुणं कर्णिकादिकम् ॥८॥ कृत्वा शोभोपशोभाढ्यमैशान्यां तस्य कल्पयेत् ॥ एकहस्तं तदर्धं वा पुनर्वेद्यान्तु मण्डलम् ॥९॥ व्रीहितण्डुलसिद्धार्थतिलपुष्पकुशास्तृते ॥ तत्र लक्षणसंयुक्तं शिवकुम्भं प्रसाधयेत् ॥१०॥ सौवर्णं राजतं वापि ताम्रजं मृन्मयन्तु वा ॥ गन्धपुष्पाक्षताकीर्णं कुशदूर्वाङ्कुराचितम् ॥११॥ सितसूत्रावृतं कण्ठे नववस्त्रयुगावृतम् ॥ शुध्दाम्बुपूर्णमुत्कूर्चं सद्रव्यं सपिधानकम् ॥१२॥ भृङ्गारं वर्ध्दनीञ्चापि शंखचक्रकमेव वा ॥ विना सूत्रादिकं सर्वं पद्मपत्रमथापि वा ॥१३॥ तस्यासनारविन्दस्य कल्पयेदुत्तरे दले ॥ अग्रतश्चन्दनाम्भोभिरस्त्रराजस्य वर्ध्दनीम् ॥१४॥ मण्डलस्य ततः प्राच्यां मन्त्रकुम्भं च पूर्ववत् ॥ कृत्वा विधिवदीशस्य महापूजामथाचरेत् ॥१५॥ अथार्णवस्य तीरे वा नद्यां गोष्ठेऽपि वा

---

दलाचे करावे. दोन हाताच्या पद्माची आकृति करावयाची असल्यास त्यांतल्या कर्णिका वगैरे दुप्पट प्रमाणानें कराव्या. (९) ईशान्य दिशेंत याप्रमाणें करून त्याच्या सभोंवतीं इतर पदार्थांनीं त्या पद्माला शोभा उपशोभा आणावी. एकाहाताचें केलेलें असो, किंवा अर्ध्याहाताचें केलेलें असो, पुनः त्या वेदींत मंडल करावें. (१०) भात, तांदूळ, अक्षता, तीळ, फुलें, कुश हे क्रमानें एकावर एक आंथरून (पसरून) त्यावर सुंदर लक्षणांनीं युक्त शिवकुंभ ठेवावा. (११) ती घागर सोन्याची, रुप्याची, तांब्याची, मातीची याप्रमाणें आपल्या योग्यतेनुरूप केलेली असावी. त्या घागरींत गंध, फुलें, अक्षता वगैरे व कुश, दूर्वा, इत्यादि पदार्थही घातलेले असावेत. (१२) त्या घागरीच्या गळ्याला पांढरा दोरा बांधलेला असून नवीं दोन वस्त्रें घातलेलीं असावीं, तींत शुद्ध पाणी घातलेलें असून कूर्च, व आच्छादक द्रव्यही घातलेलें असावें. (१३) व सभोंवतीं भृंगार (पातेली), वर्धनी, शंख, चक्र वगैरे पदार्थ ठेवावे. या सर्वांना सूत्र गुंडाळूं नये व पद्मपत्रही ठेवावें. (१४) त्या कमलासनाच्या उत्तर दलांत हे मागें सांगितलेले पदार्थ ठेवावेत. त्या दलापुढें चंदनाचें पाणी शिंपडून त्यावर अस्त्रराजाची (चक्राची) वर्धनी ठेवावी. (१५) मंडलाच्या पूर्वेला मंत्रकुंभ पूर्वोक्त क्रमानें ठेवावा. याप्रमाणें विधानोक्त सर्व कर्म करून नंतर शिवाची महापूजा करावी. (१६) समुद्र-

गिरौ ॥ देवागारे गृहे वापि देशेऽन्यस्मिन्मनोहरे ॥१६॥ कृत्वा पूर्वोदितं सर्वं विना वा मण्डपादिकम् ॥ मण्डलं पूर्ववत्कृत्वा स्थण्डिलं च विभावसोः ॥१७॥ प्रविश्य पूजाभवनं प्रहृष्टवदनो गुरुः ॥ सर्वमङ्गलसंयुक्तः समाचरितनैत्यकः ॥१८॥ महापूजां महेशस्य कृत्वा मण्डलमध्यतः ॥ शिवकुम्भे तथा भूयः शिवमावाह्य पूजयेत् ॥१९॥ पश्चिमाभिमुखं ध्यात्वा यज्ञरक्षकमीश्वरम् ॥ अर्चयेदस्त्रवर्ध्दन्यामस्त्रमीशस्य दक्षिणे ॥२०॥ मन्त्रकुम्भे च विन्यस्य मन्त्रं मंत्रविशारदः॥ कृत्वा मुद्रादिकं सर्वं मन्त्रयागं समाचरेत् ॥२१॥ ततः शिवानले होमं कुर्याद्देशिकसत्तमः ॥ प्रधानकुण्डे परितो जुहुयुश्चापरे द्विजाः ॥२२॥ आचार्यात्पादमर्ध्दं वा होमस्तेषां विधीयते ॥ प्रधानकुण्ड एवाथ जुहुयाद्देशिकोत्तमः ॥२३॥ स्वाध्यायमपरे कुर्युः स्तोत्रमंगलवाचनम् ॥ जपं च विधिवच्चान्ये शिवभक्तिपरायणाः ॥२४॥ नृत्यं गीतं च वाद्यं

---

तीरीं, नदीतीरीं, गोष्ठांत ( गोठ्यांत ) पर्वतावर, देवालयांत, आपल्या घरांत, किंवा इतर सुंदर प्रदेशांत (१७) मंडपादिकर्माशिवाय पूर्वोक्त सर्व कर्म करावें. पूर्वोक्तविधीनें मंडलरचना करून अग्नीकरितां स्थंडिलरचना करावी. (१८) नंतर प्रसन्न मन करून गुरूनें पूजागृहांत प्रवेश करावा. तो गुरु सर्व मंगलांनीं युक्त असून त्यानें पूजागृहांत प्रवेश करतांना नित्यकर्म केलेलें असावें. (१९) मंडलाच्या मध्यभागीं महेशाची महापूजा करून शिवकुंभावर पुनः शिवाचें आवाहन करून पूजा करावी. (२०) नंतर पश्चिमेकडे ज्याचें तोंड आहे, अशा यज्ञरक्षक ईश्वराचें ध्यान करून वर्धनीवर स्थापित केलेल्या अस्त्राची पूजा शिवाच्या दक्षिणेकडे करावी. (२१) मंत्रांत कुशल असलेल्या गुरूनें मंत्रकुंभांत मंत्राचा न्यास करून मुद्रा वगैरे दाखवून नंतर मंत्रयाग करावा. (२२) नंतर श्रेष्ठ गुरूनें शिवाग्नींत होम करावा. प्रधानकुंडांत चोहोंकडे इतर ब्राह्मणांनीं होम करावेत. (२३) आचार्याच्या ( गुरूच्या ) होमाच्या एकचतुर्थांशानें किंवा निम्या अंशानें इतर ब्राह्मणांनीं होम करावेत. परंतु गुरुश्रेष्ठानें मात्र प्रधानकुंडांतच होम करावा. (२४) इतरांनीं स्वाध्यायपाठ किंवा मंगल वाचनाचा पाठ करावा. व शिवभक्ति करणारे जे इतर असतील, त्यांनीं विधानोक्त जप करावेत. (२९) नर्तन, गायन, वाद्य, इतर

च मंगलान्यपराणि च ॥ पूजनं च सदस्यानां कृत्वा सम्यग्विधानतः ॥२५॥ पुण्याहं कारयित्वाथ पुनः सम्पूज्य शङ्करम् ॥ प्रार्थयेद्देशिको देवं शिष्यानुग्रहकाम्यया ॥२६॥ प्रसीद देवदेवेश देहमाविश्य मामकम् ॥ विमोचयैनं विश्वेश घृणया च घृणानिधे ॥२७॥ अथ चैवं करोमीति लब्धानुज्ञस्तु देशिकः ॥ आनीयोपोषितं शिष्यं हविष्याशिनमेव च ॥२८॥ एकाशनं वा विरतं स्नातं प्रातः कृतक्रियम् ॥ जपन्तं प्रणवं देवं ध्यायन्तं कृतमंगलम् ॥२९॥ द्वारस्य पश्चिमस्याग्रे मण्डले दक्षिणस्य वा ॥ दर्भासने समासीनं विधायोदङ्मुखं शिशुम् ॥३०॥ स्वयं प्राग्वदनस्तिष्ठन्नूर्द्धकायं कृतांजलिम् ॥ सम्प्रोक्ष्य प्रोक्षणीतोयैर्मूर्धन्यस्त्रेण मुद्रया ॥३१॥ पुष्पक्षेपेण सन्ताड्य बध्नीया-

---

मंगल स्तुतिपाठ वगैरे त्यासमयीं करावेत. होमास आलेल्या सभासदांची विधिपूर्वक पूजा करावी. (२६) मग पुण्याहवाचन करून नंतर पुनः श्रीशंकराची पूजा करावी. नंतर श्रेष्ठ गुरूनें शिष्यावर अनुग्रह करण्याच्या हेतूनें श्रीशंकराची प्रार्थना पुढें सांगितल्याप्रमाणें करावी. (२७) हे देवाधिदेवा, शंकरा, प्रसन्न हो, आणि माझ्या शरीरांत प्रवेश करून हे विश्वेशा, कृपानिधे, कृपा करून याला मुक्त कर. (२८) अशी प्रार्थना करून "आतां असेंच करितों" असें ह्मणून ईश्वराची आज्ञा घेऊन हविष्य भोजन करणारा असेल, किंवा उपोषण करणारा असेल, अशा शिष्याला गुरूनें आणावें. (२९) निरंतर एकवेळ भोजन करणारा शिष्य असला, तरी त्याला स्नान करावयास सांगून प्रातःकालचें नित्यकर्म करावयास सांगून नंतर प्रणवजप करावयास सांगावें. नंतर शिवचिंतन ( ध्यान ) केल्यानंतर मंगलपूर्ण अशा शिष्यास (३०) द्वाराच्या पश्चिमभागाला, किंवा मंडलाच्या दक्षिणभागाला दर्भासनावर उत्तरेकडे तोंड करून बसवावें. यारीतीनें त्या शिशूला बसवून (३१) आपण ( गुरू ) पूर्वेकडे तोंड करून उभा राहून वर शरीर करून हात जोडून बसलेल्या शिष्याच्या मस्तकावर अस्त्रानें किंवा मुद्रेनें प्रोक्षणीय ( अभिमंत्रण केलेल्या ) उदकानें गुरूनें प्रोक्षण करावें. (३२) नंतर फुलानें त्याला ताडन करून गुरूनें शिष्याचे डोळे बांधावेत. डोळे बांधावयाचे

ल्लोचनं गुरुः ॥ दुकूलार्धेन वस्त्रेण मन्त्रितेन नवेन च ॥३२॥ ततः प्रवेशयेच्छिष्यं गुरुर्द्वारेण मण्डलम् ॥ सोऽपि तेनेरितः शम्भोराचरेत्त्रिःप्रदक्षिणम् ॥३३॥ ततः सुवर्णसंमिश्रं दत्वा पुष्पांजलिं प्रभोः॥ प्राङ्मुखोदङ्मुखो वापि प्रणमेद्दण्डवत्क्षितौ ॥३४॥ ततः सम्प्रोक्ष्य मूलेन शिरः शस्त्रेण पूर्ववत् ॥ सन्ताड्य देशिकस्तस्य मोचयेन्नेत्रबन्धनम् ॥३५॥ स दृष्ट्वा मण्डलं भूयः प्रणमेद्दण्डवच्छिवम् ॥ अथासीनं शिवाचार्यो मण्डलस्य तु दक्षिणे ॥३६॥ उपवेश्यात्मनः सव्ये शिष्यं दर्भासने गुरुः ॥ आराध्य च महादेवं शिवहस्तं प्रविन्यसेत् ॥३७॥ शिवतेजोमयं पाणिं शिवमन्त्रमुदीरयन् ॥ शिवाभिमानसम्पन्नो न्यसेच्छिष्यस्य मस्तके ॥३८॥ सर्वाङ्गालम्बनं चैव कुर्यात्तेनैव देशिकः ॥ शिष्योऽपि प्रणमेद्भूमौ देशिकाकृतिमीश्वरम् ॥३९॥ ततः शिवानले

---

झाले तर शिष्याच्या आंगावरचें नवें वस्त्र घेऊन अभिमंत्रण करून मग त्या वस्त्रानें त्याचे नेत्र बांधावे. (३३) नंतर मंडपाच्या द्वारानें शिष्याला मंडलापर्यंत गुरूनें जाऊं द्यावें. अशी आज्ञा मिळाल्याबरोबर शिष्यानें आंत प्रवेश करून श्रीशिवाला तीन प्रदक्षिणा घालाव्या. (३४) नंतर प्रभूला सुवर्णमिश्र पुष्पांजलि देऊन पूर्वेकडे तोंड करून किंवा उत्तरेकडे तोंड करून जमिनीवर दंडाकार नमस्कार घालावेत. (३५) नंतर मूलमंत्र ह्मणून शस्त्रानें पूर्वीप्रमाणें त्याच्या डोक्यावर प्रोक्षण करून पुनः ताडन करून गुरूनें त्या शिष्याचे डोळे सोडावे. (३६) त्या शिष्यानें मंडलाला पाहून पुनः शिवाला दंडाकार नमस्कार घालावे. मंडलाच्या उजव्या बाजूला बसलेल्या शिष्याला पाहून शिवगुरूनें (३७) त्या शिष्याला आपल्या सव्य भागाकडे (डावीकडे) दर्भासनावर बसवून श्रीशिवाची आराधना करून शुभकारक हस्त शिष्याच्या मस्तकावर ठेवावा. (३८) शिवाच्या तेजानें युक्त असलेला आपला हात तोंडानें शिवमंत्राचा उच्चार करीत शिष्याच्या डोक्यावर ठेवावा. तेव्हां गुरु मात्र शिवाच्या अभिमानानें संपन्न असावा. (३९) तेव्हां तोच हात शिष्याच्या सर्व आंगावर गुरूनें फिरवावा. तेव्हां शिष्यानें सुद्धां गुरूच्या आकृतीनें बसलेल्या त्या प्रत्यक्ष शिवास जमिनीवर पडून नमस्कार घालावेत. (४०) नंतर शिवाग्नींत विधिपूर्वक शिवाची पूजा करून त्या अग्नींत

देवं समभ्यर्च्य यथाविधि ॥ हुत्वाहुतित्रयं शिष्यमुपवेश्य यथा पुरा ॥४०॥ दर्भाग्रैः संस्पृशन्तं तं विधायात्मानमात्मवित् ॥ नमस्कृत्य महादेवं नाडीसन्धानमाचरेत् ॥४१॥ शिवशास्त्रोक्तमार्गेण कृत्वा प्राणस्य निर्गमम् ॥ शिष्यदेहप्रवेशं च स्मृत्वा मन्त्रांस्तु तर्पयेत् ॥४२॥ सन्तर्पणाय मूलस्य तेनैवाहुतयो दश ॥ देयास्तिस्रस्तथाङ्गानामंगैरेव यथाक्रमम् ॥४३॥ ततः पूर्णाहुतिं दत्वा प्रायश्चितं च देशिकः ॥ पुनर्दशाहुतिं कुर्यान्मूलमन्त्रेण मन्त्रवित् ॥४४॥ पुनः सम्पूज्य देवेशं प्रणम्याचम्य देशिकः ॥ दत्वा चैव यथान्यायं स्वजात्या वैश्यमुद्धरेत् ॥४५॥ तस्यैवं जनयेत्क्षात्रमुद्धारं च ततः पुनः ॥ कृत्वा तथैव विप्रत्वं जनयेदस्य देशिकः ॥४६॥ राजन्यं चैवमुद्धृत्य कृत्वा विप्रं पुनस्तयोः ॥ रुद्रत्वं जनयेद्विप्रे रुद्रनामैव साधयेत् ॥४७॥ प्रोक्षणं ता-

---

तीन आहुति घालाव्या. त्यासमयीं शिष्याला पूर्वीप्रमाणें तेथें बसविलें असावें. (४१) नंतर आत्मवेत्त्या गुरूनें त्यावेळेस शिष्याची कल्पना अशी करावी, कीं, शिष्याच्या हातांत दर्भाचें अग्र असून त्या अग्रांनीं तो आपल्याला स्पर्श करितो, अशा थाटानें शिष्याला बसवून मग महादेवाला नमस्कार करून गुरूनें नाडीसंधान करावें. (४२) नंतर शिवशास्त्रांत जसें विधान सांगितलें असेल, त्या मार्गानें प्राणाला बाहेर आणून शिष्याच्या देहामध्यें प्रवेश करावा. मग मंत्रतृप्ति करावी. (४३) मूलमंत्राच्या तर्पणाकारितां त्याच मूलमंत्रानें दहा आहुति अग्नींत घालाव्या. नंतर अंगमंत्रांनीं क्रमाला अनुसरून तीन तीन आहुति अंगमंत्रांना द्याव्या. (४४) नंतर पूर्णाहुति घालून गुरूनें प्रायश्चित्त द्यावें. पुनः मूलमंत्र ह्मणून मंत्रज्ञ गुरूनें दहा आहुति अग्नींत घालाव्या. (४५) नंतर गुरूनें पुनः शिवाची पूजा करून आचमन करून न्यायाला अनुसरून अशी दीक्षा द्यावी. मग स्वजातीनें वैश्याचा उद्धार करावा. (४६) याप्रमाणेंच पुनः क्षत्रियाचा उद्धार करावा. नंतर गुरूनें त्या शिष्याला पुनः ब्राह्मणत्व आणावें. (४७) क्षत्रियपणा काढून टाकून त्या दोघांना ब्राह्मणत्व द्यावें. नंतर त्याच शिष्याच्या ठिकाणीं रुद्रत्व आणून रुद्रनाम ठेवून टाकावें. (४८) त्या शिष्यशिशूला प्रोक्षण ताडन क-

डनं कृत्वा शिशोः स्वात्मानमात्मनि ॥ शिवात्मकमनुस्मृत्य स्फुरन्तं विस्फुलिंगवत् ॥४८॥ नाड्या यथोक्तया वायुं रेचयन्मन्त्रतो गुरुः॥ निर्गम्य प्रविशेन्नाड्या शिष्यस्य हृदयं तथा॥४९॥ प्रविश्य तस्य चैतन्यं नीलविंदुनिभं स्मरन् ॥ स्वतेजसापास्तमलं ज्वलन्तमनुचिन्तयेत् ॥५०॥ तमादाय तया नाड्या मन्त्री संहारमुद्रया ॥ पूरकेण निवेश्यैनमेकीभावार्थमात्मनि ॥५१॥ कुम्भकेन तया नाड्या रेचकेन यथा पुरा ॥ तस्मादादाय शिष्यस्य हृदये तं निवेशयेत् ॥५२॥ तमालभ्य शिवाल्लब्धं तस्मै दत्वोपवीतकम् ॥ हुत्वाहुतित्रयं पश्चाद्द्यात्पूर्णाहुतिं ततः ॥५३॥ देवस्य दक्षिणे शिष्यमुपवेश्य वरासने ॥ कुशपुष्पपरिस्तीर्णे बद्धाञ्जलिमुदङ्मुखम् ॥५४॥ स्वस्तिकासनमारूढं

---

रून आपल्याच ठिकाणीं आपल्याला शिवस्वरूपाचें स्मरण करावें. ( आपणच शिवस्वरूप अहों असें स्मरण करावें. ) स्मरणाचा प्रकार असा कीं, अग्नीच्या स्फुलिंगाप्रमाणें ( ठिणग्याप्रमाणें ) प्रकाशमान जें रूप आहे, त्या आपल्या रूपाचें स्मरण करावें. (४९) शास्त्रोक्त मार्गानें नाडीच्या द्वारानें मंत्र ह्मणत वायूला रेचन द्यावें ( प्राण आकर्षण करावे ) त्या नाडीच्या द्वारानें बाहेर पडून शिष्याच्या नाडीच्या द्वारानें शिष्याच्या हृदयांत प्रवेश करावा. (५०) तेथें प्रवेश करून नीलबिंदूप्रमाणें शोभणाऱ्या चैतन्याला पाहून कल्पना अशी करावी कीं, आपल्या ( गुरूच्या ) तेजानें शिष्याचे सर्व मळ नाहींसे झाले आहेत, व चोहोंकडे त्याचा प्रकाश पडला आहे. (५१) अशा चैतन्याला संहार ( संकोच ) नांवाच्या मुद्रेनें नाडीच्या द्वारानें आत्म्याच्या ठिकाणीं एकीकरण करण्याकरितां पूरक प्राणायामानें प्रवेश करवावा. (५२) नंतर कुंभक प्राणायामानें त्याच नाडीच्या द्वारानें ( रेचकानें जसें पूर्वी घेतलें होतें तसें ) शिष्याच्या हृदयामध्यें प्रवेश करवावा. (५३) शिवापासून मिळालेल्या चैतन्याला त्या शिष्याला लाभ करून देऊन उपवीतक देऊन तीन आहुति द्याव्या, नंतर एक पूर्णाहुति द्यावी. (५४) नंतर शिवाच्या उजवीकडे श्रेष्ठ आसनावर शिष्याला बसवावें. तें आसन असें असावें कीं, कुश पसरून त्यावर फुलें पसरलेलीं असावीं, अशा त्या आसनावर उत्तराभिमुख होऊन हात जोडून शिष्यानें बसावें. (५५) नंतर आ-

विधाय प्राङ्मुखः स्वयम् ॥ वरासनस्थितो मन्त्रैर्महामंगलनिस्वनैः ॥५५॥ समादाय घटं पूर्णं पूर्वमेव प्रसाधितम् ॥ ध्यायमानः शिवं शिष्यमभिषिञ्चेत देशिकः ॥५६॥ अथापनुद्य स्नानाम्बु परिधाय सिताम्बरम् ॥ आचान्तोऽलंकृतः शिष्यः प्राञ्जलिर्मण्डपं व्रजेत् ॥५७॥ उपवेश्य यथा पूर्वं तं गुरुर्दर्भविष्टरे ॥ सम्पूज्य मण्डले देवं करन्यासं समाचरेत् ॥५८॥ ततस्तु भस्मना देवं ध्यायमानः स्वदेशिकः ॥ समालभेत पाणिभ्यां शिशुं शिवमुदीरयेत् ॥५९॥ अथ तस्य शिवाचार्यो दहनप्लावनादिकम् ॥ सकलीकरणं कृत्वा मातृकान्यासवर्त्मना ॥६०॥ ततः शिवासनं ध्यात्वा शिष्यमूर्धनि देशिकः ॥ तत्रावाह्य यथान्यायमर्च्चयेन्मनसा शिवम् ॥६१॥ प्रार्थयेत्प्राञ्जलिर्देवं नित्यमत्र स्थितो भव ॥ इति विज्ञाप्य तं शंभुं तेजसा भास्वरं स्मरेत् ॥६२॥ सम्पूज्याथ शिवं शैवीमाज्ञां प्राप्य शिवात्मिकाम् ॥ कर्णे शि-

---

पण ( गुरूनें ) पूर्वेकडे तोंड करून स्वस्तिकासनावर बसावें. त्या श्रेष्ठ आसनावर बसून तोंडानें मंत्र ह्मणावा. मंत्र ह्मणत असतांना मंगल वाद्यांचा घोष करावयास सांगावें. (५६) नंतर पूर्वींच अलंकृत केलेला पूर्ण घट (घागर) घेऊन शिवाचें ध्यान करीत शिष्याला त्यांतल्या उदकानें अभिषेक करावा. (५७) नंतर एका फडक्यानें अंग स्वच्छ पुसून त्याला नेसावयास शुभ्र वस्त्र द्यावें. वस्त्र नेसल्यानंतर शिष्यानें आचमन करून अंगावर अलंकार घालून हात जोडून मंडपांत प्रवेश करावा. (५८) नंतर गुरूनें शिष्याला पूर्वोक्तरीतीनें दर्भासनावर बसवून मंडलावरच्या शिवाची पूजा करावी, व करन्यास करावा. (५९) नंतर गुरूनें हातांत भस्म घेऊन शिवाचें ध्यान करावें, नंतर दोन्ही हातांनीं त्या शिशूला घेऊन शिवाची स्तुति करावी. (६०) नंतर शिवाचार्यानें मातृकान्यास क्रमानें दहन प्लावन कर्म करून कलान्यासादि कर्म करून (६१) शिष्याच्या मस्तकावर शिवाच्या आसनाचें ध्यान करावें. नंतर त्या आसनावर न्यायानुसार शिवाचें आवाहन करून शिवाची पूजा करावी. (६२) नंतर हे देवा, निरंतर येथें तूं रहा अशी हात जोडून शिवाची प्रार्थना करावी. याप्रमाणें प्रार्थना झाल्यानंतर शिष्य शिवाच्या तेजानें युक्त आहे, असें स्मरण करावें. (६३) नंतर शिवाची पूजा क-

ष्यस्य शनकैः शिवमन्त्रमुदीरयेत् ॥६३॥ स तु बद्धाञ्जलिः श्रुत्वा मन्त्रं तद्गतमानसः ॥ शनैस्तं व्याहरेच्छिष्यः शिवाचार्यस्य शासनात् ॥६४॥ ततः शाक्तश्च सन्दिश्य मन्त्रं मन्त्रविचक्षणः ॥ उच्चारयित्वा च सुखं तस्मै मंगलमादिशेत् ॥६५॥ ततः समासान्मन्त्रार्थं वाच्यवाचकयोगतः ॥ समादिश्यैश्वरं रूपं योगमासनमादिशेत् ॥६६॥ अथ गुर्वाज्ञया शिष्यः शिवाग्निगुरुसन्निधौ ॥ भक्त्यैवमभिसन्धाय दीक्षावाक्यमुदीरयेत् ॥६७॥ वरं प्राणपरित्यागश्छेदनं शिरसोऽपि वा ॥ न त्वनभ्यर्च्य भुञ्जीयां भगवन्तं त्रिलोचनम् ॥६८॥ स एवमुक्त्वा नियतो यावन्मोहविपर्ययः ॥ तावदाराधयेद्देवं तन्निष्ठस्तत्परायणः ॥६९॥ ततः स समयो नाम भविष्यतिशिवाश्रमे ॥ लब्धा-

---

रावी. नंतर शिवस्वरूपी शिवाची जी आज्ञा ( मंत्र ) आहे, तिलाच शिवमंत्र असें जाणते लोक ह्मणतात, त्या मंत्राचा उपदेश हळूच शिष्याच्या कानांत गुरूनें करावा. (६४) शिष्यानें हात जोडून त्यावर विश्वास ठेवून मंत्र ऐकावा. नंतर गुरूच्या आज्ञेप्रमाणें त्या मंत्राचा जप शिष्यानें करावा. (६५) नंतर मंत्र जाणणाऱ्या अशा गुरूनें शिष्याला शक्तीच्या मंत्राचा उपदेश करावा. नंतर " सुलभरीतीनें " त्याच्या तोंडानें मंत्राचा उच्चार करवून त्याला मंगल उपदेश करावा. (६६) नंतर संक्षेपानें वाच्यवाचक रूपानें मंत्राच्या अर्थाचा व मंत्राचा उपदेश देऊन नंतर ईश्वराच्या रूपाचे प्रकार सांगावेत. नंतर योगासनाचा उपदेश सांगावा. (६७) नंतर गुरूच्या आज्ञेनें शिष्यानें शिव, अग्नि, गुरु यांच्या संनिधीस भक्तीनें मंत्राचें अनुसंधान करून दीक्षावाक्याचा अभ्यास करावा. (६८) एकदा मंत्रोपदेश घेतल्याबरोबर शिवाची पूजा केल्याखेरीज राहूं नये, व जेवूं नये. प्राण सोडण्याचा प्रसंग आला तरी हरकत नाहीं, शिरच्छेद करून घेण्याचा प्रसंग आला तरी चिंता नाहीं, परंतु शिवपूजा केल्याविना भोजन करूं नये. (६९) याप्रमाणें बोलून नियत होऊन मोह जाईपर्यंत देवाची आराधना करावी. तोंपर्यंत देवावर निष्ठा व आसक्ति ठेवावी. (७०) नंतर तो शिष्य शिवाश्रमामध्यें राहावयास योग्य होतो, असा अधिकार मिळाल्यानंतर गुरूची आज्ञा पाळ-

धिकारो गुर्वाज्ञापालकस्तद्वशो भवेत् ॥७०॥ अतःपरं न्यस्तकरो भस्मादाय स्वहस्ततः ॥ दद्याच्छिष्याय मूलेन रुद्राक्षं चाभिमन्त्रितम् ॥७१॥ प्रतिमां वापि देवस्य गूढदेहमथापि वा ॥ पूजाहोमजपध्यानसाधनानि च सम्भवे ॥७२॥ सोऽपि शिष्यः शिवाचार्याल्लब्धानि बहुमानतः ॥ आददीताज्ञया तस्य देशिकस्य न चान्यथा ॥७३॥ आचार्यादाप्तमखिलं शिरस्याधाय भक्तितः ॥ रक्षयेत्पूजयेच्छम्भुं मठे वा गृह एव वा ॥७४॥ अतः परं शिवाचारमादिशेदस्य देशिकः ॥ भक्तिश्रद्धानुसारेण प्रज्ञायाश्चानुसारतः ॥७५ यदुक्तं यत्समाज्ञातं यच्च वान्यत्प्रकीर्तितम् ॥ शिवाचार्येण समये तत्सर्वं शिरसा वहेत् ॥७६॥ शिवागमस्य ग्रहणं वाचनं श्रवणं तथा ॥ देशिकादेशतः कुर्यान्न स्वेच्छातो न चान्यतः ॥७७॥ इति संक्षेपतः प्रोक्तः संस्कारः समया-

---

ण्यामध्यें निरत होऊन नेहमीं गुरूच्या ताब्यांत शिष्यानें राहावें. (७१) यापुढें आपल्याच हातानें भस्म घेऊन शिष्याच्या डोक्यावर हात ठेवून शिष्याला मूलमंत्रानें अभिमंत्रण केलेले रुद्राक्ष द्यावे. (७२) श्रीशिवाची प्रतिमा व गुप्त प्रतिमा ( गूढदेह ) शिष्याला देऊन पूजा, होम, जप, ध्यान, यांचीं साधनें सुद्धां मिळतील तितकीं शिष्याला द्यावीं. (७३) इतकीं साधनें गुरूपासून बहुमानानें मिळवून पुनः गुरूपासून मिळतील तितकीं साधनें त्याच्या आज्ञेनेंच स्वीकारावींत. दुसऱ्याकडून घेऊं नयेत. (७४) गुरूपासून मिळालेलें सर्व भक्तीनें शिरसा मान्य करून त्याचें रक्षण करावें. मग श्रीशिवाची पूजा घरांत, किंवा मठांत करावी. (७५) यानंतर गुरूनें शिष्याला शिवाचाराचा उपदेश द्यावा. उपदेश देतांना शिष्याची भक्ति, श्रद्धा, बुद्धि कशी काय आहे, तें पाहून तदनुसार उपदेश करावा. (७६) शिवाचार्यानें जें सांगितलें असेल, जी आज्ञा केली असेल, जें कीर्तन केलें असेल, तें तें सर्व शिष्यानें शिरसा मान्य करावें. (७७) शिवागमाचें ग्रहण, वाचन, श्रवण वगैरे गुरूची आज्ञा जशी असेल, त्याप्रमाणें करावें. परंतु स्वेच्छेनें मात्र कोणतेंही कर्म करूं नये, दुसऱ्याच्या उपदेशानेंही कर्म करूं नये. (७८) याप्रमाणें समय नांवाचा संस्कार संक्षेपानें सांगितला. मनुष्यांना शिवपुरप्राप्तीला

ह्यः ॥ पक्षाच्छिवपुरप्राप्तौ नृणां परमसाधनम् ॥७८॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे दीक्षाविधानं नामचतुर्दशोऽध्यायः ॥१४॥

---

मुख्य साधन तेवढें हेंच आहे.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील दीक्षाविधाननांवाचा चौदावा अध्याय संपला.

---

## अथ पंचदशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ अतःपरं समालक्ष्य गुरुः शिष्यस्य योग्यताम् ॥ षडध्वशुद्धिं कुर्वीत सर्वबन्धविमुक्तये ॥१॥ कलातत्वं च भुवनं वर्णं पदमतःपरम् ॥ मन्त्रश्चेति समासेन षडध्वा परिपठ्यते ॥२॥ निवृत्याद्याः कलाः पंच कलाध्वा कथ्यते बुधैः ॥ व्याप्ताः कलाभिरितरे त्वध्वानः पंच पंचभिः ॥३॥ शिवतत्वादिभूम्यन्तं तत्वाध्वा समुदाहृतः ॥ षड्विंशसंख्ययोपेतः शुद्धाशुद्धोभयात्मकः ॥४॥ आधाराद्युन्मनान्तश्च भुवनाध्वा प्रकीर्तितः ॥ विना भेदोपभेदाभ्यां षष्टिसंख्यासमन्वितः ॥५॥ पंचाशद्रुद्ररूपास्तु वर्णा वर्णाध्वसंज्ञिताः ॥ अनेकभेदसम्पन्नः पदाध्वा समुदाहृतः ॥६॥ महामन्त्रोपमन्त्राणां वर्ततेऽवयवात्मना ॥ प्रधानावयवत्वे तु सोऽध्वा पंचपदात्मकः ॥७॥ सप्तकोटिमहामन्त्रा मन्त्राध्वा समुदाहृतः ॥ सर्वोऽपि मन्त्रैर्मन्त्राध्वा

---

उपमन्यु बोलला— (१) यानंतर शिष्याची योग्यता गुरूनें जाणून त्याला सर्व बंधांपासून सोडविण्याकारितां षडध्वांची शुद्धि शिष्यास करावी. (२) कला, तत्व, भुवन, वर्ण, पद, मंत्र याप्रमाणें संक्षेपानें हे षट् ( सहा ) अध्व होत. (३) निवृत्ति वगैरे ज्या पांच कला आहेत, त्या कलांना पंडित लोक कलाध्व असें ह्मणतात. इतर जे पांच आहेत, ते प्रत्येकीं एकप्रमाणें पांचही अध्व पांच कलांनीं व्याप्त झाले आहेत. (४) शिवतत्वापासून भूमितत्वापर्यंत तत्वाध्वा होय. एकूण तत्वें सव्वीस असून त्यांमध्यें शुद्ध, अशुद्ध, उभय, असे भेद आहेत. (५) आधारापासून उन्मनापर्यंत भुवनाध्व ह्मणतात. यांमध्यें मात्र कांहीं भेद व उपभेद नसून यांची एकंदर संख्या साठ आहे. (६) रुद्राचें स्वरूपच, अशीं जीं पन्नास अक्षर आहेत, त्यांना वर्णाध्व असें ह्मणतात. ज्यामध्यें अनेक भेद आहेत, त्याला पदाध्व असें ह्मणतात. (७) महामंत्र, उपमंत्र यांचे पद वगैरे जे अवयव आहेत, आणि यांचा मुख्य अवयव जो असेल, हे सर्व अवयव मिळून पांच अवयव होतात, या अवयवांनीं युक्त जें पद असेल, त्याला पदाध्व असें ह्मणतात. (८) सातकोटि महामंत्र जे असतील, त्यांनाच मंत्राध्व ह्मणतात. या मंत्राध्वांमध्यें सर्व मंत्र

व्याप्तः परमविद्यया ॥८॥ यथाशिवो न तत्वेषु गण्यते तत्वनायकः॥ मन्त्राध्वनि न गण्येत तथासौ मन्त्रनायकः ॥९॥ कलाध्वनो व्यापकत्वं व्याप्यत्वं चेतराध्वनाम् ॥ न वेत्ति तत्वतो यः स नैवार्हत्यध्वशोधनम् ॥१०॥ षड्विधस्याध्वनो रूपं न येन विदितं भवेत् ॥ व्याप्यव्यापकता तेनज्ञातुमेव न शक्यते ॥११॥ तस्मादध्वस्वरूपञ्च व्याप्यव्यापकतां तथा ॥ यथावदवगम्यैव कुर्यादध्वविशोधनम् ॥१२॥ कुण्डमण्डलपर्यन्तं तत्र कृत्वा यथा पुरा ॥ द्विहस्तमानं कुर्वीत प्राच्यां कलशमण्डलम् ॥१३॥ ततः स्नातः शिवाचार्यः सशिष्यः कृतनैत्यकः ॥ प्रविश्य मण्डलं शम्भोः पूजां पूर्ववदाचरेत् ॥१४॥ तत्राढकावरैः सिद्धं तण्डुलैः पायसं प्रभोः ॥ अर्धं निवेद्य होमार्थं शेषं समुपकल्पयेत् ॥१५॥ पुरतः कल्पिते वाथ मण्डले वर्णमण्डिते ॥ स्था-

---

असून श्रेष्ठ विद्या ही आहे. (९) तत्वांचा नायक जो शिव आहे, त्याची गणना जशी तत्वांमध्यें होत नाहीं, त्याप्रमाणें सर्व मंत्रांचा नायक जो मूलमहामंत्र, त्याची गणना मंत्राध्वांमध्यें होत नाहीं. (१०) कलाध्वांमध्यें जो व्यापकपणा असेल, व इतर अध्वांमध्यें जो व्याप्यपणा असेल, या व्याप्यव्यापकभावाला जो जाणीत नाहीं, तो अध्वशुद्धीला पात्र होत नाहीं. (११) सहा प्रकारच्या या अध्वांच्या स्वरूपाला जो जाणत नाहीं, त्याला व्याप्यव्यापकपणा कळणें फार कठिण आहे, असें जाणावें. फार काय ? त्याला समजतच नाहीं, ह्मटलें तरी चालेल. (१२) याकरितां अध्वांच्या स्वरूपाला, व त्यांच्या व्याप्यव्यापकतेला चांगल्या तऱ्हेनें समजून घेऊन नंतर अध्वशुद्धि करावी. (१३) कुंडमंडलापर्यंत अध्वशुद्धि करून नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें दोन हातांच्या प्रमाणानें पूर्वेकडे कलशाचें मंडल करावें. (१४) नंतर गुरूनें स्नान करून शिष्याला स्नान करावयास सांगून, त्याच्यासहित नित्यकर्म करून मग मंडलांत प्रवेश करून, श्रीशिवाची पूर्वोक्त विधीप्रमाणें पूजा करावी. (१५) तेव्हां एक आढक प्रमाणानें (पायलीप्रमाणानें) तांदूळ घेऊन पायस करावें. तें पायस सिद्ध झाल्यानंतर त्यांतला अर्धा भाग नैवेद्यास ठेवून बाकी राहिलेला भाग होमाकरितां ठेवावा. (१६) पुढें रचलेल्या अनेक रंगांनीं सुशोभित केलेल्या मंडलावर गुरूनें सभोंवतीं सर्व दिशेला

पयेत्पंचकलशान्दिक्षु मध्ये च देशिकः ॥१६॥ तेषु ब्रह्माणि मूलाणैर्बिन्दुनादसमन्वितैः ॥ नमाद्यैश्च यकारान्तैः कल्पयेत्कल्पवित्तमः ॥१७॥ ईशानं मध्यमे कुम्भे पुरुषं पुरतः स्थिते ॥ अघोरं दक्षिणे वा मे वामं सद्यं च पश्चिमे ॥१८॥ रक्षां विधाय मुद्रां च बद्ध्वा कुम्भाभिमन्त्रणम् ॥ कृत्वा शिवानले होमं प्रारभेत यथा पुरा ॥१९॥ यदर्धं पायसं पूर्वं होमार्थमुपकल्पितम् ॥ हुत्वा शिष्यस्य तच्छेषं भोक्तुं समुपकल्पयेत् ॥२०॥ तर्पणान्तश्च मन्त्राणां कृत्वा कर्म यथा पुरा ॥ हुत्वा पूर्णाहुतिं तेषां ततः कुर्यात्प्रदीपनम् ॥२१॥ ओङ्कारादनुहुङ्कारं ततो मूलं फडन्तकम् ॥ स्वाहान्तं दीपने प्राहुरङ्गानि च यथाक्रमम् ॥२२॥ तेषामाहुतयस्तिस्रो देया दीपनकर्मणि ॥ मन्त्रैरेकैकशस्तैस्तु

---

पांच कलशांची स्थापना करावी. ( चोहोंकडे चार, मध्यें एक, अशी स्थापना करावी ). (१७) त्या कलशांमध्यें बिंदु नादसहित मूल ब्रह्ममंत्राची स्थापना करावी. कल्प जाणणाऱ्या लोकांमध्यें श्रेष्ठ अशा गुरूनें 'नम' हें पद आदि करून 'य' हें अक्षर ज्याच्या शेवटीं आहे, अशा मूलमंत्राची कल्पना करावी ( स्थापना करावी ). (१८) मधल्या कलशांत ईशानाची स्थापना करावी, व पुढल्या कलशांत तत्पुरुषाची स्थापना करावी; व उजव्या बाजूच्या कलशांत अघोराची स्थापना करावी, वाम कलशांत वामदेवाची स्थापना करावी, आणि पश्चिमेकडच्या कलशांत सद्याची स्थापना करावी. (१९) नंतर रक्षाबंधन करून मुद्रा दाखवून कलशांना अभिमंत्रण करावें. अभिमंत्रण झाल्यानंतर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें शिवाग्नींत होम करावयास आरंभ करावा. (२०) पायसाचा अर्धा भाग होमाकरितां ठेवावा, ह्मणून पूर्वीं जें सांगितलें होतें, त्यानेंच होम करून होमाचा जो शेष राहील, तो भाग शिष्याला भोजन करण्याकरितां द्यावा. (२१) नंतर मांत्रिककर्म तर्पणापर्यंत पूर्वोक्तविधीनें करून नंतर होम करून पूर्णाहुति देऊन त्या मंत्राचें प्रज्वलन करावें ( मंत्र जागृत करावा ). (२२) ॐकाराबरोबर हुंकार, नंतर फट्कार शेवटीं ठेवून मूलमंत्र, नंतर स्वाहांतमंत्र या सर्वांचा जो क्रमिक पाठ आहे, त्याला प्रदीपन ह्मणतात. त्या मंत्राबरोबर मंत्रांगाचा पाठही करावा. (२३) या दीपनकर्मांत मंत्रांना तीन तीन आहुति द्याव्या. प्रत्येक मंत्रानें क-

विचिन्त्यादीप्तमूर्तयः ॥२३॥ त्रिगुणं त्रिगुणीकृत्य द्विजकन्याकृतं सितम् ॥ सूत्रं सूत्रेण संमन्त्र्य शिखाग्रे बन्धयेच्छिशोः ॥२४॥ चरणांगुष्ठपर्यन्तमूर्द्धकायस्य तिष्ठतः ॥ लम्बयित्वा तु तत्सूत्रं सुषुम्णां तत्र योजयेत् ॥२५॥ शान्तया मुद्रयादाय मूलमन्त्रेण मन्त्रवित् ॥ हुत्वाहुतित्रयं तस्याः सान्निध्यमुपकल्पयेत् ॥२६॥ हृदि सन्ताड्य शिष्यस्य पुष्पक्षेपेण पूर्ववत् ॥ चैतन्यं समुपादाय द्वादशान्ते निवेश्य च ॥२७॥ सूत्रं सूत्रेण संयोज्य संरक्ष्यास्त्रेण वर्मणा ॥ अवगुण्ठ्याथ तत्सूत्रं शिष्यदेहं विचिंतयेत् ॥२८॥ मलत्रयमलं भोगभोग्यभोक्तृत्वलक्षणम् ॥ विषयेन्द्रियदेहादिजनकं तस्य भावयेत् ॥२९॥ व्योमादिभूतरूपिण्यः शान्त्यतीतादयः कलाः ॥ सूत्रे स्वनामभिर्योज्याः पू-

---

मानें दीप्तमूर्तीचें स्मरण करावें. याप्रमाणें सर्व मूर्तींचें स्मरण करावें. (२४) ब्राह्मणाच्या कन्येनें केलेलें पांढरें सूत्र घेऊन प्रथम तीन तंतूंचें एकसूत्र करून नंतर त्याचें (सूत्राचें) तिप्पट करून, सूत्रोक्तमंत्रानें अभिमंत्रण करून, तें सूत्र शिशूच्या शेंडीच्या अग्राला बांधावें. (२५) एकूणएक शरीर पायाच्या अंगठ्यापर्यंत मोकळें सोडून उभा राहिलेल्या शिष्याच्या शरीरावर तें सूत्र लोंबत सोडून त्या सूत्राच्या ठिकाणीं सुषुम्ना नाडीची योजना करावी. (२६) नंतर शांत मुद्रेनें मूलमंत्र ह्मणत मंत्र जाणत्यानें तें घेऊन तिला जवळ ठेवून तिच्या संनिधीलाच तिला ( सुषुम्नेला ) तीन आहुति द्याव्या. (२७) नंतर पूर्वीप्रमाणें शिष्याच्या हृदयावर पुष्पानें ताडन करून हृदयांतल्या चैतन्याला स्वीकार करून द्वादशचक्राच्या ठिकाणीं ठेवावें. (२८) नंनर सूत्रानें सूत्राची योजना करून अस्त्रनांवाच्या वर्मानें ( कवचानें ) रक्षण करून तें सूत्र अवगुंठन ( बंधन ) करून नंतर शिष्याच्या देहाचें चिंतन ( शोधन ) करावें. (२९) शिष्याच्या शरीरांतले आणव, माया, कर्म असे तीन मल, व भोग, भोग्य, भोक्तृत्व यांविषयीं अलंबुद्धि झाली आहे, किंवा नाहीं, याचें लक्षण, व विषय, इंद्रिय, देह यांना उत्पन्न करणारी वस्तु वगैरे विषयांचा त्याच्या शरीरांत शोध करावा. (३०) आकाश वगैरे पांच भूतांच्या स्वरूपिणी ज्या पांच शांत्यतीतादि कला असतील, त्या सूत्राच्या ठिकाणीं आपल्या नामांनीं योजना कराव्या, व नम शब्द पूर्वीं लावून त्यांची

ज्याश्चैव नमोयुतैः ॥३०॥ अथवा भूतबीजैस्तत्कृत्वा पूर्वोदितं क्रमात् ॥ ततो मलादेस्तत्वादौ व्याप्तिं समवलोकयेत् ॥३१॥ कलाव्याप्तिं मलादौ च हुत्वा सन्दीपयेत्कलाः ॥ शिष्यं शिरसि सन्ताड्य तत्र देहे यथाक्रमम् ॥३२॥ शान्त्यतीतपदे सूत्रं लाञ्छयेन्मन्त्रमुच्चरन् ॥ एवं कृत्वा निवृत्यन्तं शान्त्यतीताद्यनुक्रमात् ॥३३॥ हुत्वाहुतित्रयं पश्चान्मण्डले च शिवं यजेत् ॥ देवस्य दक्षिणे शिष्यमुपवेश्योत्तरामुखम् ॥३४॥ सदर्भे मण्डले दद्याद्धोमशिष्टं चरुं गुरुः ॥ शिष्यस्तद्गुरुणा दत्तं सत्कृत्य शिवपूर्वकम् ॥३५ भुक्त्वा पश्चाद्द्विराचम्य शिवमन्त्रमुदीरयेत् ॥ अपरे मण्डले दद्यात्पञ्चगव्यं तथा गुरुः ॥३६॥ सोऽपि तच्छक्तितः पीत्वा द्विराचम्य शिवं स्मरेत् ॥ तृतीये मण्डले शिष्यमुपवेश्य यथा पुरा ॥३७॥ प्रदद्याद्दन्तपवनं यथाशास्त्रोक्तलक्षणम् ॥ अग्रेण तस्य मृदुना प्राङ्मुखो वाप्युदङ्मुखः ॥३८॥

---

पूजा करावी. (३१) अथवा बीजस्वरूप त्या मंत्रांनीं क्रमानें पूर्वोक्त कर्म करून नंतर तत्वादिकांच्या ठिकाणीं मलादिकांची व्याप्ति पहावी. (३२) मलादिकांच्या ठिकाणीं कलाव्याप्ति पाहून मग होम करून कला प्रदीप्त कराव्या. पुनः डोक्यावर शिष्याला ताडन करून त्याच्या देहांत अनुक्रमानें सर्व पहावें. (३३) तोंडानें मंत्राचा उच्चार करीत शांत्यतीत पदाच्या ठिकाणीं सूत्राचें लांछन ( चिन्ह ) करावें. याप्रमाणें अनुक्रमानें शांत्यतीतापासून निवृत्तिकलापर्यंत करून (३४) मग तीन आहुति घाळून नंतर मंडलांत शिवाची पूजा करावी. नंतर देवाच्या उजवीकडे शिष्याला उत्तरेकडे तोंड करून बसवावें. (३५) मग गुरूनें दर्भसहित मंडलावर होम करून राहिलेल्या चरूला शिष्याच्या हातांत द्यावें. नंतर शिष्यानें शिवनामाचा उच्चार करीत गुरूनें दिलेलें तें अन्न सत्कारपूर्वक घ्यावें. (३६) नंतर चरूचें भोजन करून दोन वेळ आचमन करावें. मग शिवमंत्र ह्मणावा. नंतर गुरूनें दुसऱ्या मंडलावर शिष्याला पंचगव्य द्यावें. (३७) शिष्यानें तें घेऊन आपल्या शक्त्यनुससार पंचगव्य प्राशन करावें. मग दोनवेळ आचमन करून शिवस्मरण करावें. नंतर तिसऱ्या मंडलावर पूर्वोक्तविधीनें शिष्याला बसवून (३८) शास्त्रोक्त लक्षणाला अनुसरून केलेली दंतशुद्धीची दांतकाडी द्यावी. नंतर शिष्यानें पूर्वे-

वाचं नियम्य चासीनः शिष्यो दन्तान्विशोधयेत् ॥ प्रक्षाल्य दन्तपवनं त्यक्त्वाचम्य शिवं स्मरेत् ॥३९॥ प्रविशेद्देशिकादिष्टः प्राञ्जलिः शिवमण्डलम् ॥ त्यक्तं तद्दन्तपवनं दृश्यते गुरुणा यदि ॥४०॥ प्रागुदक्पश्चिमे चाग्रं शिवमन्यच्छिवेतरत् ॥ अशस्ताशामुखे तस्मिन्गुरुस्तद्दोषशान्तये ॥४१॥ शतमर्द्धं तदर्द्धं वा जुहुयान्मूलमन्त्रतः ॥ ततः शिष्यं समालभ्य जपित्वा कर्णयोः शिवम् ॥४२॥ देवस्य दक्षिणे भागे तं शिष्यमधिवासयेत् ॥ अहतास्तरणास्तीर्णे सदर्भशयने शुचिः ॥४३॥ मन्त्रितेऽन्तः शिवं ध्यायन्प्राक्छिरस्को निशि स्वपेत् ॥ शिखायां बद्धसूत्रस्य शिखया तच्छिखां गुरुः ॥४४॥ आवेष्ट्याहतवस्त्रेण तमाच्छाद्य च वर्मणा ॥ रेखात्रयं च परितो भस्मनातिलसर्षपैः

---

कडे किंवा उत्तरेकडे तोंड करून दांतकाड्यांच्या मृदु अग्रांनीं (३९) दंतशोधन करावें. दंतशुद्धि करावयाच्या वेळेस बोलूं नये. नंतर मुख प्रक्षालन करून दंतपवन ( दांतकाडी ) टाकून देऊन आचमन करून शिवाला स्मरावें. (४०) नंतर गुरूची आज्ञा घेऊन दोनी हात जोडून शिवमंडलांत शिष्यानें प्रवेश करावा. टाकलेलें तें दंतपवन गुरूनें जर पाहिलें तर (४१) व त्या दंतपवनाचा अग्रभाग पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे पडला असला तर तो शिव असो, किंवा शिवेतर असो, अप्रशस्त दिग्भागाला पडलेला तो अग्रभाग पाहून जो दोष येतो, त्याच्या शांतीकरितां (४२) पन्नास किंवा पंचवीस आहुति मूलमंत्रानें अग्नींत द्याव्या. नंतर शिष्याजवळ येऊन त्याच्या कानांत गुरूनें शिवमंत्र सांगावा. (४३) देवाच्या दक्षिण बाजूला त्या शिष्याला बसवावें, तेथें शिष्याला बसण्याकरितां दर्भाचें आसन घातलेलें असून त्यावर रेशमीवस्त्र अंथरलेलें असावें. अशा आसनावर शुद्ध होऊन शिष्यानें बसावें. (४४) रात्रीच्या वेळेस अभिमंत्रण केलेल्या त्याच आसनावर पूर्वेकडे डोकें करून मनांत शिवाचें ध्यान करीत निजावें. मग गुरूनें शेंडीला बांधलेल्या सूत्राच्या अग्रानें त्या शिष्याच्या शिखेला (४५) गुंडाळून वर अंगरक्षण करणाऱ्या रेशमी वस्त्रानें त्याला आच्छादन घालून त्याच्या सभोंवतीं तीळ, मोहऱ्या ( यांचें पीठ ) व भस्म यांच्या तीन रेखा काढाव्या. (४६)

॥४५॥ कृत्वास्त्रजप्तैस्तद्बाह्ये दिगीशानां बलिं हरेत् ॥ शिष्योऽपि प-
रतोऽनश्नन्कृत्वैवमधिवासनम् ॥४६॥ प्रबुध्योत्थाय गुरवे स्वप्नं दृष्टं
निवेदयेत् ॥ ततः स्नानादिकं सर्वं समाप्याचार्यचोदितः ॥४७॥ ग-
च्छेद्बद्धांजलिर्ध्यायञ्छिवमण्डलपार्श्वतः ॥ अथ पूजां विना सर्वं कृत्वा
पूर्वदिने यथा ॥४८॥ नेत्रबन्धनपर्यन्तं दर्शयेन्मण्डलं गुरुः ॥ बध्दने-
त्रेण शिष्येण पुष्पावकिरणे कृते ॥४९॥ यत्रापतन्ति पुष्पाणि तस्य
नामास्य सन्दिशेत् ॥ ततोऽपनीय निर्माल्यं मण्डलेऽस्मिन्यथा पुरा
॥५०॥ पूजयेद्देवमीशानं जुहुयाच्च शिवानले ॥ शिष्येण यदि दुःस्व-
प्नो दृष्टस्तद्दोषशान्तये ॥५१॥ शतमर्द्धं तदर्द्धं वा जुहुयान्मूलविद्य-
या ॥ ततः सूत्रं शिखाबध्दं लम्बयित्वा यथा पुरा ॥५२॥ आधार-
पूजाप्रभृति यन्निवृत्तिकलाशयम् ॥ वागीश्वरीपूजनान्तं कुर्याध्दोमपु-
रःसरम् ॥५३॥ अथ प्रणम्य वागीशां निवृत्तेर्व्यापिकां सतीम् ॥ म-

---

व त्याच्या सभोंवतीं अस्त्रांची राखण रेषेच्या रूपानें करून त्याच्या बाहेर दि-
शांच्या स्वामींना बलिदान द्यावें. शिष्यानें दुसऱ्या दिवशीं उठून न जेवतां
अधिवासन करावें. (४७) दुसऱ्या दिवशीं उठून रात्री जें स्वप्न पडलें असे-
ल, तें गुरूला सांगावें. नंतर गुरूची आज्ञा घेऊन स्नान वगैरे सर्व नित्य-
कर्म करावें. (४८) नंतर शिवाच्या पार्श्वभागीं जाऊन हात जोडून शिवाचें
ध्यान करावें. मग एक शिवपूजा सोडून पूर्वदिवशीं केल्याप्रमाणें सर्व कर्म क-
रावें. (४९) गुरूनें शिष्याला त्याचे डोळे बांधीतोंपर्यंत मंडल दाखवावें.
नंतर डोळे बांधल्यानंतर शिष्यानें फुलें उधळावीत. (पुष्पावकिरण क-
रावें.) (५०) जेथें तीं फुलें पडतील, त्या फुलांचीं नांवें शिष्याला गुरूनें
सांगावींत. नंतर निर्माल्य एकूणएक काढून पूर्वीप्रमाणें त्या मंडलावर (५१)
शिवाची पूजा करावी, पूजा झाल्यानंतर शिवाग्नींत होम करावा. कदाचित्
रात्रीं शिष्यानें दुष्ट स्वप्न पाहिलें असेल तर त्याच्या शांतीकरितां (५२) प-
न्नास किंवा पंचवीस आहुति मूलमंत्रानें अग्नींत घालाव्या. नंतर शिखेला बां-
धिलेलें सूत्र पूर्वींप्रमाणें लोंबत सोडून (५३) आधारपूजेपासून निवृत्ति क-
लाशयापर्यंत व वागीश्वरीच्या पूजेपर्यंत सर्व पूजा कराव्या, व होम करावेत.
(५४) निवृत्ति कलेला व्याप्त होऊन राहिलेल्या सती वागीशेला नमन क-

ण्डले देवमभ्यर्च्य हुत्वा चैवाहुतित्रयम् ॥५४॥ प्रार्थयेच्च शिशोः प्राप्तिं युगपत्सर्वयोनिषु ॥ सूत्रदेहेऽथ शिष्यस्य ताडनप्रोक्षणादिकम् ॥५५॥ कृत्वात्मानं समादाय द्वादशान्ते निवेद्य च ॥ ततोऽप्यादाय मूलेन मुद्रया शास्त्रदृष्टया ॥५६॥ योजयेन्मनसाचार्यो युगपत्सर्वयोनिषु ॥ देवानां जातयश्चाष्टौ तिरश्चां पंच जातयः ॥५७॥ जात्यैकया मानुषया योनयश्च चतुर्दश ॥ तासु सर्वासु युगपत्प्रवेशाय शिशोर्धिया ॥५८॥ वागीशान्यां यथान्यायं शिष्यात्मानं निवेशयेत् ॥ गर्भनिष्पत्तये देवं सम्पूज्य प्रणिपत्य च ॥५९॥ हुत्वा चैव यथान्यायं निष्पन्नं तदनुस्मरेत् ॥ निष्पन्नस्यैवमुत्पत्तिमनुवृतिश्च कर्मणः ॥६०॥ आर्जवं भोगनिष्पत्तिं कुर्यात्प्रीतिं परां तथा ॥ निष्कृत्यर्थश्च जात्यायु-

---

रून मंडलामध्यें देवाची पूजा करून तीन आहुति घालाव्या. (५९) नंतर सर्वयोनीमध्यें एककालीं शिशूच्या प्राप्तीकरितां प्रार्थना करावी. नंतर शिष्याच्या सूत्रदेहामध्यें ताडन प्रोक्षण वगैरे कर्म करावें. (५६) मग आत्म्याला जागृत करून द्वादशाच्या ( नाडीच्या ) शेवटीं नेऊन ठेवावें. तेथूनही जागृत करून मूलमंत्रानें व शास्त्रोक्त मुद्रेनें (५७) गुरूनें आपल्या मनांत एककालींच सर्व योनीमध्यें त्याची (शिष्याची) योजना करावी. देवांच्या आठ जाती, तिर्यग्योनीच्या पांच जाती, (५८) मानुषयोनीची एक जात एकूण चौदा योनि होतात, त्यांमध्यें शिशूच्या बुद्धीनें एककालीं प्रवेश करण्याकरितां (५९) वागीशानीच्या ठिकाणीं न्यायाला अनुसरून शिष्याच्या आत्म्याला प्रवेश करवावा. नंतर गर्भाच्या उत्पत्तीकरितां श्रीशिवाची पूजा करावी, व शिवाला नमस्कार करावा. (६०) मग विधिपूर्वक होम करून गर्भोत्पत्ति झाली, असें स्मरण करावें. नंतर त्या गर्भापासून जन्मास आला अशी कल्पना करून मग कर्माच्या प्रवृत्तीमध्यें तो सांपडला आहे, अशी कल्पना करावी. (६१) मग आर्जवाची कल्पना करून ( सरळपणाची कल्पना करून ) भोगामध्यें निमग्न आहे, अशी करून त्या भोगाविषयीं परमप्रीति करतो, अशी कल्पना करावी. नंतर त्या त्या जातीमध्यें आयुष्य, भोग, संस्कार यांच्या सिद्धीकरितां व निष्कृतीकरितां ( प्रायश्चित्ताकारितां )

भोगसंस्कारसिध्दये ॥६१॥ हुत्वाहुतित्रयं देवं प्रार्थयेद्देशिकोत्तमः ॥ भोक्तृत्वविषयासङ्गमलं तत्कार्यशोधनम् ॥६२॥ कृत्वैवमेव शिष्यस्य च्छिन्द्यात्पाशत्रयं ततः ॥ निवृत्या परिबध्दस्य पाशस्यात्यन्तभेदनम् ॥६३॥ कृत्वा शिष्यस्य चैतन्यं स्वच्छं मन्येत केवलम् ॥ हुत्वा पूर्णाहुतिं वह्नौ ब्रह्माणं पूजयेत्ततः ॥६४॥ हुत्वाहुतित्रयं तस्मै शिवाज्ञामनुसन्दिशेत् ॥ पितामह त्वया नास्य यातुः शैवं परं पदम् ॥६५॥ प्रतिबंधो विधातव्यः शैवाज्ञैषा गरीयसी ॥ इत्यादिश्य तमभ्यर्च्य विसृज्य च विधानतः ॥६६॥ समभ्यर्च्य महादेवं जुहुयादाहुतित्रयम् ॥ निवृत्या शुध्दमृध्दृत्य शिष्यात्मानं यथा पुरा ॥६७॥ निवेश्यात्मनि सूत्रे च वागीशां पूजयेत्ततः ॥ हुत्वाहुतित्रयं तस्मै प्रणम्य च विसृज्यताम् ॥६८॥ कुर्यान्निवृत्तेः सन्धानं प्रतिष्ठाकलया सह ॥ स-

---

(६२) तीन आहुति देवाला देऊन मग शिवाला श्रेष्ठ गुरूनें प्रार्थना करावी. भोक्त्याच्या विषयासक्तीनें जो मल आलेला असतो, त्याच्या कार्याच्या शोधाकारितां ( तो दोष जाण्याकारितां ) अग्नींत तीन आहुति घालाव्या. (६३) याप्रमाणें करून शिष्याचे तीन पाश तोडून टाकावे. तसेंच निवृत्तीनें (मायेनें) चोहोंकडून जो बांधला गेलेला असतो, त्या पाशाला सबंध तोडून टाकावें. (६४) पाश तोडल्यानंतर शिष्याचें चैतन्य अतिशय निर्मल झालें आहे, असें मानावें. नंतर अग्नींत पूर्णाहुति देऊन नंतर ब्रह्मदेवाची पूजा करावी. (६५) त्या ब्रह्मदेवाला तीन आहुति देऊन त्याला शिवाची आज्ञा सांगावी, कीं, हे ब्रह्मदेवा, हा माझा शिष्य शिवाच्या पदाला चालला आहे, तर या शिष्याला मध्यें तूं (६६) आडवूं नकोस. कारण श्रीशिवाची श्रेष्ठ आज्ञाच तशी झाली आहे. याप्रमाणें ब्रह्मदेवाला शिवाची आज्ञा सांगून, त्याची पूजा करून विधिपूर्वक विसर्जनही करून टाकावें. (६७) नंतर महादेवाची पूजा करून तीन आहुति देऊन टाकाव्या. निवृत्तीनें (निवृत्तीपासून) शुद्ध झाला आहे, असें मानून पूर्ववत् शिष्याच्या आत्म्याचा उद्धार करून ( तेथून जागृत करून ) (६८) शरीरामध्यें सूत्रामध्यें प्रवेश करवून वागीशा देवीची पूजा करावी. नंतर तिला तीन आहुति देऊन नमस्कार करून विधिपूर्वक तिचें विसर्जन करावें. (६९) नंतर निवृत्तिकलेचें अनुसंधान प्रति-

न्धाने युगपत्पूजां कृत्वा हुत्वाहुतित्रयम् ॥६९॥ शिष्यात्मनःप्रतिष्ठा-
यां प्रवेशन्त्वथ भावयेत् ॥ ततः प्रतिष्ठामावाह्य कृत्वाशेषं पुरोदितम्
॥७०॥ तद्व्याप्तिं व्यापिकां तस्य वागीशानीञ्च भावयेत् ॥ पूर्णेन्दु-
मण्डलप्रख्यां कृत्वाशेषञ्च पूर्ववत् ॥७१॥ विष्णवे सन्दिशेदाज्ञां शि-
वस्य परमात्मनः॥ विष्णोर्विसर्जनाद्यञ्च कृत्वाशेषं च विद्यया ॥७२॥
प्रतिष्ठामनुसन्धाय तस्यां चापि यथा पुरा॥ कृत्वानुचिन्त्य तद्व्याप्तिं
वागीशाञ्च यथाक्रमम् ॥७३॥ दीप्ताग्नौ पूर्णहोमान्तं कृत्वाशेषञ्च पू-
र्ववत् ॥ नीलरुद्रमुपस्थाय तस्मै पूजादिकं तथा ॥७४॥ कृत्वा कर्म-
शिवाज्ञाञ्च दद्यात्पूर्वोक्तवर्त्मना ॥ ततस्तमपि चोद्वास्य कृत्वा तस्या-
थ शान्तये ॥७५॥ विद्याकलां समाधाय तद्व्याप्तिञ्चावलोकयेत् ॥

---

ष्ठा कलेच्या बरोबरीनें करावें, त्या अनुसंधानाच्या वेळेस एककालीं दोघींची पूजा करून दोघींना तीन आहुति द्याव्या. (७०) नंतर शिष्याच्या आत्म्याचा प्रवेश प्रतिष्ठाकलेंत झाला आहे, अशी कल्पना करावी. नंतर प्रतिष्ठाकलेचें आवाहन करून पूर्वीं जसें सांगितलें आहे, त्याप्रमाणें राहिलेलें सर्व कर्म करावें. (७१) त्याची जी व्याप्ति असेल, व त्याची जी व्यापिका असेल, अशा वागीशानी देवीची भावना करावी. त्या देवीची कांति पूर्णचंद्राच्या मंडलाप्रमाणें आहे, अशी भावना करून राहिलेलें सर्व पूर्वींप्रमाणेंच करावें. (७२) नंतर श्रीशिवाची आज्ञा विष्णूला सांगावी, मग विष्णूची पूजा, विसर्जन, होम वगैरे करून पूर्ववत् सर्व कर्म करून (७३) विद्याकलेशीं प्रतिष्ठाकलेचें अनुसंधान करून विद्याकलेमध्यें सुद्धां पूर्वींप्रमाणें चिंतन करून व्याप्ति व्यापिका वगैरे क्रमानें चिंतन करून वागीशानीची भावना करावी. (७४) नंतर प्रज्वलित अग्नींत पूर्वींप्रमाणें होमांत कर्म करून बाकीचें पूर्वींप्रमाणें सर्व कर्म करावें. तेव्हां नीलरुद्राची उपासना करावी, व त्याची पूजा वगैरे (७५) सर्व कर्म करून पूर्वीं सांगितलेल्या मार्गानें त्याला शिवाची आज्ञा सांगावी. नंतर त्याचें उद्वासन ( विसर्जन ) करून त्याची पूजा हवन वगैरे करून नंतर शांतिकलेशीं (७६) विद्याकलेचें अनुसंधान करून तिची व्याप्ति व व्यापिका यांची भावना करावी. नंतर आत्म्याची भावना तिच्याठिकाणीं

स्वात्मनो व्यापिकां तद्वद्वागीशां च यथा पुरा ॥७६॥ बालार्कसदृशाकारां भासयन्तीं दिशो दश ॥ ततः शेषं यथा पूर्वं कृत्वा देवं महेश्वरम् ॥७७॥ आवाह्याराध्य हुत्वास्मै शिवाज्ञां मनसादिशेत् ॥ महेश्वरं ततोत्सृज्य कृत्वा पंचकलामिमाम् ॥७८॥ शान्त्यतीतां कलां नीत्वा तद्व्याप्तिमवलोकयेत् ॥ स्वात्मनो व्यापिकां तद्वद्वागीशांच विचिंतयेत् ॥७९॥ नभोमण्डलसङ्काशां पूर्णान्तंचापि पूर्ववत् ॥ कृत्वाशेषविधानेन समभ्यर्च्य सदाशिवम् ॥८०॥ तस्मै समादिशेदाज्ञां शम्भोरमितकर्मणः ॥ तत्रापि च यथापूर्वं शिवं शिरसि पूर्ववत्॥८१॥ समभ्यर्च्य च वागीशां प्रणम्य च विसर्जयेत् ॥ ततः शिवेन सम्प्रोक्ष्य शिष्यं शिरसि पूर्ववत् ॥८२॥ विलयं शान्त्यतीतायाः शक्तितत्वेऽथ चिन्तयेत् ॥ षडध्वनः परे पारे सर्वाध्वव्यापिनीं पराम्॥८३॥

---

करून पूर्ववत् वागीशादेवीची भावना करावी. (७७) तिची कांति बालसूर्याप्रमाणें असून तिचा आकारही बालसूर्याप्रमाणें आहे, अशी कल्पना करून दशदिशांमध्यें तिचा प्रकाश पडला आहे, अशी भावना करावी. नंतर बाकीचें कर्म पूर्वींप्रमाणें करून महेश्वर देवाचें (७८) तिच्याठिकाणीं आवाहन करून पूजा करून त्याला आहुति देऊन नंतर शिवाची आज्ञा त्या महेश्वराला आपल्या मनानें सांगावी. मग महेश्वराचें विसर्जन करून पांच कलेची पूजा वगैरे करून नंतर (७९) शांत्यतीतनांवाच्या कलेला नेऊन ( भावना करून ) त्या कलेची व्याप्ति पहावी ( भावना करावी ) त्याप्रमाणें स्वात्म्याची भावना करून वागीशादेवीचें चिंतन पूर्ववत् करावें. (८०) ही देवी आकाशमंडलाप्रमाणें आहे, अशी कल्पना करून पूर्णाहुतीपर्यंत पूर्वींप्रमाणें सर्व कर्म करावें. शेषविधानानें सर्व कर्म करून सदाशिवाची पूजा करावी. (८१) नंतर अपरिमित तेजस्वी श्रीशंभूची आज्ञा त्या सदाशिवाला सांगून तेव्हांही पूर्वींप्रमाणें सर्व कर्म करून शिवाची पूजा करावी. (८२) नंतर वागीशा देवीची पूजा करून नमन करून तिचें विसर्जन करावें. मग शुभ उदकानें शिष्याच्या डोक्यावर पूर्ववत् प्रोक्षण करून (८३) शांत्यतीतकलेचा विलय शक्तितत्वामध्यें झाला, अशी भावना करावी. या षडध्वांच्या पलीकडच्या तीरावर जी राहत असून सर्व अध्वांमध्यें व्याप्त होऊन राहिली

कोटिसूर्यप्रतीकाशां शैवीं शक्तिश्च चिंतयेत् ॥ तदग्रे शिष्यमानीय शुद्धस्फटिकनिर्मलम् ॥८४॥ प्रक्षाल्य कर्तरीं पश्चाच्छिवशास्त्रोक्तमार्गतः॥ कुर्यात्तस्य शिखाच्छेदं सह सूत्रेण देशिकः ॥८५॥ ततस्तां गोमये न्यस्य शिवाग्नौ जुहुयाच्छिखाम् ॥ वौषडन्तेन मूलेन पुनः प्रक्षाल्य कर्तरीम् ॥८६॥ हस्तौ च शिष्यचैतन्यं तद्देहे विनिवेशयेत् ॥ ततः स्नातं समाचान्तं कृतस्वस्त्ययनं शिशुम् ॥८७॥ प्रवेश्य मण्डलाभ्याशं प्रणिपत्य च दण्डवत् ॥ पूजां कृत्वा यथान्यायं क्रियावैकल्यशुद्धये ॥८८॥ उपांशूच्चारयोगेन जुहुयादाहुतित्रयम् ॥ पुनः सम्पूज्य देवेशं मन्त्रवैकल्यशुद्धये ॥८९॥ मानसोच्चारयोगेन जुहुयादाहुतित्रयम् ॥ ततः शिवं समाराध्य मण्डलस्थं सहाम्बया ॥९०॥ हुत्वाहुतित्रयं पश्चात्प्रार्थयेत्प्राञ्जलिर्गुरुः ॥ भगवंस्त्वत्प्रसादेन शुद्धिरस्य ष-

---

आहे, अशी जी पराशक्ति आहे, (८४) तिची कांति कोटिसूर्याप्रमाणें असून तिला शिवशक्ति असें ह्मणतात, त्या शक्तीची भावना करून तिच्यापुढें शुद्ध स्फटिकाप्रमाणें भासणाऱ्या त्या शिष्याला आणून (८५) बसवावें. मग शिवशास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें कातरी स्वच्छ धुवून गुरुवर्यानें शिष्याच्या शिखा सूत्रासह तोडून टाकाव्या. (८६) नंतर ती शिखा गायीच्या शेणांत ठेवून शिवाग्नींत ती शिखा टाकावी. वौषट्पर्यंत मूलमंत्राचा जप करून कातरी स्वच्छ पुनः धुवून काढावी. (८७) मग हस्तप्रक्षालन करून शिष्याचें चैतन्य त्याच्या देहामध्यें निविष्ट करावें. (देहामध्यें चैतन्याला नेऊन सोडावें). नंतर त्याला स्नान घालून आचमन करावयास सांगून पुण्याहवाचन वगैरे स्वस्तिवाचन कर्म झाल्यानंतर त्या शिशूला (८८) मंडलाजवळ प्रवेश करवून शिवाला नमस्कार करावयास सांगावें. नंतर विधिपूर्वक शिवाची पूजा करून कर्मातल्या दोषाच्या परिहाराकरितां (८९) हळूच मंत्राचा उच्चार करून तीन आहुति अग्नींत घालाव्या. पुनः शिवाची पूजा करून मंत्रदोषपरिहाराकरितां (९०) मनांतच मंत्राचा उच्चार करून तीन आहुति अग्नींत घालाव्या. नंतर मंडलस्थ शिवाची पूजा करून अंबेची (पार्वतीची) सुद्धां त्याबरोबर पूजा करून (९१) तीन आहुति अग्नींत घालाव्या. नंतर गुरूनें हात जोडून शिवाची प्रार्थना करावी, कीं, हे भगवन्, तुझ्या प्रसादानें ष-

डध्वनः ॥९१॥ कृता तस्मात्परं धाम गमयैनं तवाव्ययम् ॥ इति विज्ञाप्य देवाय नाडीसन्धानपूर्वकम् ॥९२॥ पूर्णान्तं पूर्ववत्कृत्वा ततो भूतानि शोधयेत् ॥ स्थिरास्थिरे ततः शुध्यै शीतोष्णे च ततः परम् ॥९३॥ ध्यायेद्व्याप्त्यैकताकारे भूतशोधनकर्मणि ॥ भूतानां ग्रंथिविच्छेदं कृत्वा त्यक्त्वा सहाधिपैः॥९४॥ भूतानि स्थितियोगेन योजयेत्परमे शिवे ॥ विशोध्यास्य तनुं दग्ध्वा प्लावयित्वा सुधाकणैः ॥९५॥ स्नाप्यात्मानं ततः कुर्याद्विशुद्धाध्वमयं वपुः ॥ तत्रादौ शान्त्यतीतान्तु व्यापिकां स्वाध्वनः कलाम् ॥९६॥ शुद्धामेव शिशोर्मूर्ध्नि न्यसेच्छान्तिमुखे तथा ॥ विद्यां गलादिनाभ्यन्तं प्रतिष्ठां तदधःक्रमात् ॥९७॥ जान्वन्तं तदधोन्यस्येन्निवृत्तिश्चानुचिन्तयेत् ॥ स्व-

---

डध्वांची शुद्धि (९२) केली, तर या माझ्या शिष्याला तुझ्या अव्यय (नाशरहित) स्थानाला घेऊन जा. याप्रमाणें नाडीसंधानासह देवाची प्रार्थना करून (९३) पूर्णाहुतीपर्यंत सर्व कर्म करून पंचभूतांचा शोध करावा. नंतर स्थावर जंगमांची शुद्धि करून शीतोष्णांची शुद्धि करावी. त्यानंतर (९४) पंचमहाभूतांचा शोध करीत असतांना आकृतीमध्यें व्याप्तीची एकता ध्यानांत आणावी. तेव्हां पंचमहाभूतांचा परस्पर ग्रंथिविच्छेद ( गांठ सोडवून ) करून त्या भूतांच्या अधिपतींसह सोडून (९५) पंचमहाभूतांची स्थिति कशी आहे, त्याप्रमाणें पंचमहाभूतांची परम शिवाच्या ठिकाणीं योजना करावी. नंतर शरीराचा शोध करून त्याचें दहन करून अमृताच्या कणांनीं तो देह भिजवावा. (९६) नंतर स्नान करून आपलें सर्व शरीर शुद्ध झालें आहे, असें मानून षडध्वमय झालें आहे, असें समजावें. त्यांत प्रथमतः निजअध्वाची जी शांत्यतीतनांवाची कला आहे, ती व्याप्त आहे, अशी भावना करून (९७) शुद्ध अशा त्या कलेचा शिशूच्या मस्तकावर न्यास करावा. परंतु तें शिर शांतिमुखाचें मात्र असावें. नंतर गळ्यापासून नाभीपर्यंत विद्यानांवाच्या कलेचा न्यास करावा. त्याच्याखालीं क्रमानें प्रतिष्ठा कलेचा न्यास (९८) जानूपर्यंत (गुडघ्यापर्यंत) करावा. त्याच्याखालीं निवृत्तिकलेचा न्यास करावा. नंतर सर्व शरीरांत बीजाक्षरांसह सूत्रमंत्राचा न्यास करावा. मग तो

बीजैः सूत्रमन्त्रं च न्यस्याङ्गैस्तं शिवात्मकम् ॥९८॥ बुद्ध्वा तं हृदयाम्भोजे देवमावाह्य पूजयेत् ॥ आशास्य नित्यसान्निध्यं शिवस्वात्म्यं शिशौ गुरुः ॥९९॥ शिवतेजोमयस्यास्य शिशोरापादयेद्गुणान् ॥ अणिमादीन्प्रसीदेति प्रदद्यादाहुतित्रयम् ॥१००॥ तथैव तु गुणानेव पुनरस्योपपादयेत् ॥ सर्वज्ञतां तथा तृप्तिं बोधं चाद्यन्तवर्जितम् ॥१०१॥ अलुप्तशक्तिं स्वातन्त्र्यमनन्तांशक्तिमेव च ॥ ततो देवमनुज्ञाप्य सद्यादिकलशैस्तुतम् ॥१०२॥ अभिषिञ्चेत देवेशं ध्यायमानो यथा क्रमम् ॥ अथोपवेश्य तं शिष्यं शिवमभ्यर्च्य पूर्ववत् ॥१०३॥ लब्धानुज्ञः शिवाच्छैवीं विद्यामस्मै समादिशेत् ॥ ओङ्कारपूर्विकां तेन सम्पुटान्तु नमोऽन्तगाम् ॥१०४॥ शिवशक्तियुताञ्चैव शक्तिविद्यां च

---

( शिष्य ) शिवस्वरूपच आहे, असें (९९) जाणून त्याच्या हृदयकमलांत श्रीशिवाचें आवाहन करून त्याची पूजा करावी. नंतर गुरूनें शिशूच्या सर्व शरीरांत शिव हा निरंतर प्रत्यक्ष सान्निध्यानें राहतो, असें शिवस्वात्म्य सांगून (१००) शिवाचें तेजच जो बनला आहे, अशा शिशूचे जे गुण असतील, त्या अणिमादि गुणांचें प्रतिपादन करून "आतां तूं प्रसन्न हो" असें बोलून तीन आहुति अग्नींत द्याव्या. (१०१) तसेंच पुनः त्याच्या गुणाचें प्रतिपादन करावें. गुण ह्मणजे सर्वज्ञता, तृप्ति, आदि ज्याला नाहीं, व अंत्य नाहीं, असा बोध, (१०२) ज्याच्या शक्तीचा लोप कधीं होत नाहीं, अशी ती शक्ति, स्वातंत्र्य, अनंत शक्ति इत्यादि गुणांचें प्रतिपादन करावें. नंतर त्या शिवाची आज्ञा घेऊन सद्यादि पांच कलशांनीं त्याचा १०३)) अभिषेक करावा. अभिषेक करतांना क्रमानें शिवाचें ध्यान करावें. नंतर त्या शिष्याला बसवून पूर्वीप्रमाणें शिवाची पूजा करावी. (१०४) नंतर शिवाची आज्ञा घेऊन शिवसंबंधीं विद्येचा उपदेश त्या शिष्याला करावा. त्या विद्येचा क्रम असा आहे, कीं, ॐकार त्या विद्येच्या आधीं ठेवून तिच्या शेवटीं नमशब्द ठेवावा. यारीतीनें संपुटाकार करून त्या विद्येचा बोध करावा. (१०५) आणि ती विद्या शिवशक्तीनें युक्त असून तिला शक्तिविद्या असें ह्मणतात. अशा त्याविद्येचा ऋषि, छंद, दैवत, शिवत्व वगैरे सर्व शिष्याला

तादृशीम् ॥ ऋषिं छन्दश्च दैवं च शिवतां शिवयोस्तथा ॥१०५॥ पूजां सावरणां शम्भोरासनानि च सन्दिशेत् ॥ पुनः सम्पूज्य देवेशं यन्मया समनुष्ठितम् ॥१०६॥ सुकृतं कुरु तत्सर्वमिति विज्ञापयेच्छिवम् ॥ सह शिष्यो गुरुर्देवं दण्डवत्क्षितिमण्डले ॥१०७॥ प्रणम्योद्वासयेत्तस्मान्मंडलात्पावकादपि ॥ ततः सदसिकाः सर्वे पूज्याः पूजार्हकाः क्रमात् ॥१०८॥ सेव्या वित्तानुसारेण सदस्याश्च सहर्त्विजः ॥ वित्तशाठ्यं न कुर्वीत यदीच्छेच्छिवमात्मनः ॥१०९॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे षडध्वशुद्ध्यादिकथनं नाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥

---

सांगावें. नंतर शिव आणि शक्ति यांची (१०६) आवरणसहित पूजा सांगावी, व श्रीशिवाचीं आसनें जितकीं असतील तितक्या आसनांचा बोध करावा. नंतर पुनः श्रीशिवाची पूजा करून तोंडानें ह्मणावें, कीं, मीं जें अनुष्ठान केलें आहे, (१०७) तें सर्व सुकृत कर, अशी शिवाची प्रार्थना करावी. नंतर शिष्यासह गुरूनें पृथ्वीमंडलावर शिवाला नमन करावें. (१०८) नमस्कार करून त्या मंडलापासून व अग्नीपासून शिवाचें उद्वासन (विसर्जन) करावें. नंतर क्रमानें तेथें बसलेल्या सर्व सभासदांची पूजा करावी. परंतु ते सभासद पूजेला पात्र मात्र असावेत. (१०९) आणि आपल्या द्रव्याच्या योग्यतेप्रमाणें ऋत्विजांची व सदस्यांची तृप्ति करावी. परंतु आपल्यास कल्याणाची इच्छा असेल, तर त्यावेळेस द्रव्यशाठ्य मात्र करूं नये.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील षडध्वशुद्ध्यादि कथननांवाचा पंधरावा अध्याय संपला.

## अथ षोडशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ अतःपरं प्रवक्ष्यामि साधकं नाम नामतः ॥ संस्कारं मन्त्रमाहात्म्यकथने सूचितं मया ॥१॥ सम्पूज्य मंडले देवं स्थाप्य कुम्भं च पूर्ववत् ॥ हुत्वा शिष्यमनुष्णीषं प्रापयेद्भूमिमंडलम् ॥२॥ पूर्णान्तं पूर्ववत्कृत्वा हुत्वाहुतिशतं तथा ॥ सन्तर्प्य मूलमङ्गानि दशांशैर्देशिकोत्तमः ॥३॥ सन्दीप्य च यथापूर्वं कृत्वा पूर्वोदितं क्रमात् ॥ अभिषिच्य यथापूर्वं प्रदद्यान्मंत्रमुत्तमम् ॥४॥ तत्र विद्योपदेशान्तं कृत्वा विस्तरशः क्रमात् ॥ पुष्पाम्बुना शिशोः पाणौ विद्यां शैवीं समर्पयेत् ॥५॥ तवैहिकामुष्मिकयोः सर्वसिध्दिफलप्रदः ॥ भवत्वेष महामंत्रः प्रसादात्परमेष्ठिनः ॥६॥ इत्युक्त्वा देवमभ्यर्च्य लब्धानुज्ञः शिवाद्गुरुः ॥ साधनं विनियोगं च साधकाय समादिशेत् ॥७॥

---

उपमन्यु बोलला— (१) मंत्राचें माहात्म्य जेव्हां सांगितलें, तेव्हां साधकनांवाचा संस्कार एक आहे, असें सांगितलें होतें, तर आतां त्या संस्काराचें वर्णन करितों, ऐक. (२) मंडलावर देवाची पूजा करून पूर्वोक्त विधीप्रमाणें कलशाची स्थापना करावी, होम करावा. नंतर डोक्यावर पागोटें वगैरे न घालतां शिष्याला जमिनीवर आणावें. (३) नंतर शंभर आहुति घालून पूर्वी सांगितल्याप्रमाणें पूर्णाहुतीपर्यंत कर्म करून मूलमंत्राचें संतर्पण करून गुरुवर्यांनें मूलमंत्राच्या दशांशभागानें अंगमंत्राचें संतर्पण करावें. (४) पूर्ववत् सर्व जागृत ( संदीपन ) करून क्रमानें पूर्वोक्त सर्व कर्म करून शिष्याला अभिषेक घालून पूर्वोक्तविधीनें त्याला उत्तम मंत्र द्यावा (उपदेश करावा). (५) विद्येच्या उपदेशापर्यंत उपदेश करून त्यांत सविस्तर क्रमानें सर्व सांगून व सविस्तर कर्म करून गुरूनें हातांत फूल व पाणी घेऊन शिष्याच्या हातांत शैवीविद्येचें अर्पण करावें ( शैवीविद्या गुरूनें कृतार्थ बुद्धीनें शिष्याला सांगावी ) (६) विद्योपदेश देऊन बा शिष्या, तुला हा मंत्र श्रीशिवाच्या प्रसादानें इहलोकांत उत्तम सुख देणारा होऊन परलोकांत सिद्धि देणारा होवो, असा आशीर्वाद गुरूनें द्यावा. (७) असें बोलून शिवाची पूजा करून शिवाची आज्ञा गुरूनें घेऊन, साधन आणि विनियोग हे दोनी साधक शिष्याला गुरूनें सांगावेत ( त्यांचा उपदेश गुरूनें शिष्याला करावा ).

तच्छ्रुत्वा गुरुसंदेशं क्रमशो मंत्रसाधकः ॥ पुरतो विनियोगस्य मंत्रसाधनमाचरेत् ॥८॥ साधनं मूलमंत्रस्य पुरश्चरणमुच्यते ॥ पुरतश्चरणीयत्वाद्विनियोगाख्यकर्मणः ॥९॥ नात्यन्तकरणीयन्तु मुमुक्षोर्मन्त्रसाधनम् ॥ कृतन्तु तदिहान्यत्र तस्यापि शुभदं भवेत् ॥१०॥ शुभेऽहनि शुभे देशे काले वा दोषवर्जिते ॥ शुक्लदन्तनखः स्नातः कृतपूर्वाह्णिकक्रियः ॥११॥ अलंकृत्य यथालब्धैर्गन्धमाल्यविभूषणैः ॥ सोष्णीषः सोत्तरासंगः सर्वशुक्लः समाहितः ॥१२॥ देवालये गृहेऽन्यस्मिन्देशे वा सुमनोहरे ॥ सुखेनाभ्यस्तपूर्वेण त्वासनेन कृतासनः ॥१३॥ तनुं कृत्वात्मनः शैवीं शिवशास्त्रोक्तवर्त्मना ॥ सम्पूज्य देव-

---

(८) तो गुरूचा उपदेश ऐकून क्रमानें मंत्र साधणाऱ्या शिष्यानें गुरूच्या पुढेंच विनियोगाचें मंत्रसाधन करावें (मंत्रसाधन करावयास गुरूपुढेंच शिष्यानें शिकावें). (९) मूलमंत्राच्या साधनाला पुरश्चरण अशी संज्ञा आहे, असें ह्मणतात. कारण विनियोग नांवाचें जें कर्म आहे, त्या कर्मापुढें त्या मंत्राचें साधन करावयाचें असल्यामुळें पुरश्चरण असें नांव मिळालें आहे. (१०) त्यांत मुमुक्षु प्राणी जो असेल ( मोक्षालाच जाणारा जो असेल ), त्याला या मंत्राचें साधन केलेंच पाहिजे, असा कांहीं निर्बंध नाहीं. परंतु त्यानें कदाचित् मंत्रसाधन केलें तर त्यालाही इहलोकांत व परलोकांत सुख मिळेल. (११) असो. मंत्रसाधन करावयास शुभदिवस, शुभस्थल, शुभकाल, वगैरे पाहून कांहीं दोष ज्यादिवशीं नाहीं, अशा सुमुहूर्तावर दांत व नखें घासून शुभ्र स्वच्छ करून स्नान करावें, नंतर प्रातःकालीं करावयाचें सर्व कर्म करून (१२) मिळेल त्यामानानें गंध व फुलांची माळ यांनीं शरीर अलंकृत करून डोक्यावर पांढरें स्वच्छ पागोटें घालून अंगावर पांढरें उत्तरीय वस्त्र घेऊन समाधानवृत्तीनें (१३) देवालयांत, किंवा घरांत अथवा सुंदर अशा इतर स्थलांत सुखानें ( बिन आयासानें ) आसन घालावें. परंतु आसन घालवयाचा अभ्यास मात्र पूर्वींच केलेला असावा. (१४) त्या आसनावर ( आसन घातल्यानंतर ) आपलें सर्व शरीर शिवमय करून शिवशास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें देवाधिदेव समर्थ नकुलीश्वराची पूजा यथा-

देवेशं नकुलीश्वरमीश्वरम् ॥१४॥ निवेद्य पायसं तस्मै समाप्याराधनक्रमम् ॥ प्रणिपत्य च तं देवं प्राप्तानुज्ञश्च तन्मुखात् ॥१५॥ कोटिवारं तदर्द्धं वा तदर्ध्दं वा जपेच्छिवम् ॥ लक्षविंशतिकं वापि दशलक्षमथापि वा ॥१६॥ अहिंसकः क्षमी शान्तो दान्तश्चैव सदा भवेत् ॥ ततश्च पायसाक्षारालवणैकमिताशनः ॥१७॥ अलाभे पायसस्याश्नन् फलमूलादिकानि वा ॥ विहितानि शिवेनैव विशिष्टान्युत्तरोत्तरम् ॥१८॥ चरुं भक्ष्यमथो सक्तुकणान्यावकमेव च ॥ शाकं पयोदधिघृतं मूलं फलमथोदकम् ॥१९॥ अभिमन्त्र्य च मन्त्रेण भक्ष्यभोज्यादिकानि च ॥ साधनेऽस्मिन्विशेषेण नित्यं भुंजीत वाग्यतः ॥२०॥ मन्त्राष्टशतपूतेन जलेन शुचिना व्रती ॥ स्नायान्नदीनदोत्थेन प्रोक्षयेद्वाथ श-

---

सांग करावी. (१९) नंतर नकुलीश्वराला पायसाचा नैवेद्य दाखवून आराधनेचा क्रम समाप्त करावा. नंतर त्या देवाला नमस्कार करून त्याच्या मुखानें आज्ञा मिळवून (१६) कोटसंख्यापर्यंत किंवा अर्धकोटिसंख्यापर्यंत किंवा पावकोटिसंख्यापर्यंत शिवमंत्राचा जप करावा. तितकी शक्ति नसेल, तर लक्षजप दशलक्षजप तरी करावेत. जपकर्ता जो असेल, तो (१७) अहिंसक असावा. त्याच्याजवळ क्षमा असावी, स्वभाव शांत असावा, त्यानें सर्व इंद्रियें जिंकलेलीं असावींत. अशा स्थितीमध्यें सर्वदां असून पायस व अक्षार (खारट नसलेलें), व मीठ वगैरे पदार्थ फार मितप्रमाणानें खावेत (मितभुक् असावा ). (१८) पायस जर मिळत नसेल तर कंद, मूल, फल हीं भक्षण करावीं. याप्रमाणें उत्तरोत्तर (एकापेक्षां एक श्रेष्ठ कर्म) कर्म करावें असें शिवानें स्वतः सांगितलें आहे. (१९) कंदादि पदार्थ मिळत नसतील, तर चरु भक्षण करावे, चरूच्या अभावीं सक्तूचे कण खावेत, त्यांच्या अभावीं यावक ( अंविल ) करून खावी. त्याच्या अभावीं शाकभक्षण करावें. किंवा दूध, दहीं, तूप, मूल ( मुळी ), फल, उदक (२०) वगैरे भक्ष्य भोज्य जे काय पदार्थ असतील, त्यांना अभिमंत्रण करून या मंत्रसाधनाच्या वेळेस विशेषेंकरून भोजन करावें. भोजन करितांना मौनव्रत स्वीकारावें. (२१) नंतर आठशेवेळ मंत्रोच्चारांनीं पुनीत झालेलें जें उदक असेल, त्या शुद्ध पाण्यानें स्नान करावें. तें पाणी नदीचें किंवा नदाचें असावें. अशा पाण्यानें

क्तितः ॥२१॥ तर्पयेच्च तथा नित्यं जुहुयाच्च शिवानले ॥ सप्तभिः पञ्चभिर्द्रव्यैस्त्रिभिर्वाथ घृतेन वा ॥२२॥ इत्थं भक्त्या शिवं शैवो यः साधयति साधकः ॥ तस्येहामुत्र दुष्प्रापं न किंचिदिह विद्यते ॥२३॥ अथवाहरहर्मन्त्रं जपेदेकाग्रमानसः ॥ अनश्नन्नेव साहस्रं विना मन्त्रस्य साधनम् ॥२४॥ न तस्य दुर्लभं किंचिन्न तस्यास्त्यशुभं क्वचित् ॥ इह विद्यां श्रियं सौख्यं लब्ध्वा मुक्तिंच विन्दति ॥२५॥ साधने विनियोगे च नित्ये नैमित्तिके तथा ॥ जपेज्जलैर्भस्मना च स्नात्वा मन्त्रेण च क्रमात् ॥२६॥ शुचिर्बध्दशिखः सूत्री सपवित्रकरस्तथा ॥ धृतत्रिपुण्ड्ररुद्राक्षो विद्यां पंचाक्षरीं जपेत् ॥२७॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे मन्त्रसाधनप्रकारो नाम षोडशोऽध्यायः ॥१६॥

---

स्नान करण्याची शक्ति जर नसेल, तर प्रोक्षण तरी करून घ्यावें. (२२) निरंतर शिवाग्नीची तृप्ति होमाच्या रूपानें करावी. होमांत द्रव्यें सात, पांच, तीन, असावींत. किंवा निदान एका तुपानें तरी आहुति घालावी. (२३) याप्रमाणें भक्तीनें जो शैव साधक मंत्रसाधन करितो, त्या साधकाला इहलोकांत व परलोकांत कांहीं दुष्प्राप्य वस्तु ( न मिळणारी वस्तु ) नाहीं. अर्थात सर्व पदार्थ त्याला मिळतात. (२४) अथवा प्रतिदिवशीं एकाग्र मन करून न जेवतां हजारापेक्षां जास्त मंत्राचा जप करावा. याप्रमाणें जो जप करील, त्याला मंत्रसाधनावांचून सर्व फळ मिळेल. (२५) त्या साधकाला किंवा जप करणाऱ्याला कांहीं दुर्लभ नाहीं. व त्याला कांहीं कोठेंही अशुभ नाहीं. तो या लोकांत विद्या, लक्ष्मी मिळवून सुख भोगतो, व परलोकांत मुक्तीला जातो. (२६) साधन करीत असतांना, विनियोग करीत असतांना, ( जप करीत असो ), अथवा नित्य व नैमित्तिक कर्म करीत असतांना मंत्राचा जप करावा. परंतु जपाच्या आधीं जलानें किंवा भस्मानें स्नान केलें पाहिजे. किंवा मंत्रस्नान तरी करून मग क्रमानें मंत्राचा जप करावा. (२७) शुद्ध होऊन शिखा बांधून सूत्र ( यज्ञोपवीत ) घातलें असून हातांत पवित्र घालून त्रिपुंड् धारण करून पंचाक्षरीविद्येचा जप करावा. याप्रमाणें श्रीशैव महापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील मंत्रसाधनप्रकार नांवाचा अध्याय संपला.

## अथ सप्तदशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ अथैवं संस्कृतं शिष्यं कृतपाशुपतव्रतम् ॥ आचार्यत्वेऽभिषिञ्चेत तद्योग्यत्वे न चान्यथा ॥१॥ मण्डलं पूर्ववत्कृत्वा सम्पूज्य परमेश्वरम् ॥ स्थापयेत्पञ्च कलशान्दिक्षु मध्ये च पूर्ववत् ॥२॥ निवृत्तिं पुरतो न्यस्य प्रतिष्ठां पश्चिमे घटे ॥ विद्यां दक्षिणतः शान्तिमुत्तरे मध्यतः पराम् ॥३॥ कृत्वा दीक्षादिकं तत्र बद्ध्वा मुद्राञ्च धैनवीम् ॥ अभिमन्त्र्य घटान्हुत्वा पूर्णांतञ्च यथा पुरा ॥४॥ प्रवेश्य मण्डलं शिष्यमनुष्णीषञ्च देशिकः ॥ तर्पणाद्यन्तु मन्त्राणां कुर्यात्पूर्णावसानकम् ॥५॥ ततः सम्पूज्य देवेशमनुज्ञाप्य च पूर्ववत् ॥ अभिषेकाय तं शिष्यमासनन्त्वधिरोहयेत् ॥६॥ सकलाकृत्य तं पश्चात्कलापञ्चकरूपिणम् ॥ न्यस्तमन्त्रतनुं बुद्ध्वा शिवं शिष्यं समर्पये-

---

उपमन्यु बोलला— (१) याप्रमाणें संस्कारानें युक्त झालेल्या व पाशुपतव्रत केलेल्या त्या शिष्याला आचार्यत्वाचे ठिकाणीं अभिषेक करावा ( आचार्यपणा त्याला द्यावा ), परंतु त्या पदवीची योग्यता त्याच्या अंगांत आहे, किंवा नाहीं, याची परीक्षा करावी. योग्यता नसेल तर आचार्यत्व देऊं नये. (२) पूर्वीप्रमाणें मंडल करून त्या मंडलांत परमेश्वराची पूजा करून पूर्वोक्तविधीनें चारीदिशेला चार कलश व मध्यें एक कलश अशी पांच कलशांची स्थापना करावी. (३) पुढच्या कलशांत निवृत्तिकलेची स्थापना करून पश्चिम कलशांत प्रतिष्ठाकलेची स्थापना करावी. दक्षिणदिशेंतल्या कलशांत विद्याकलेची स्थापना करून उत्तरदिशेंतल्या कलशांत शांतिकलेची स्थापना करावी, व मधल्या कलशांत पराशक्तीची स्थापना करावी. (४) याप्रमाणें दीक्षादि कर्म करून धेनुमुद्रा बांधून ( दाखवून ) सर्व कलशांना अभिमंत्रण करून पूर्वोक्तविधीनें पूर्णाहुतीपर्यंत आहुति घालाव्या. (५) नंतर शिष्याच्या डोक्यावर कांहीं न घालतां गुरूनें मंडलांत शिष्याचा प्रवेश करवून मंत्रादिकांचें तर्पण वगैरे करून पूर्णाहुतीपर्यंत आहुति घालाव्या. (६) नंतर शिवाची पूजा करून पूर्ववत् शिवाची अनुज्ञा घेऊन शिष्याला अभिषेक घालण्याकरितां त्याला आसनावर बसवावें. (७) नंतर त्याच्या शरीरांत कलांची स्थापना करून पंचकलास्वरूपी शिष्याच्या तनूमध्यें कलान्यास केले

त् ॥७॥ ततो निवृत्तिकुम्भादिसमुद्धृत्य घटान्क्रमात् ॥ मध्यमान्तं शिवेनैव शिष्यं तमभिषेचयेत् ॥८॥ शिवहस्तं समर्प्याथ शिशोः शिरसि देशिकः ॥ शिवभावं समापन्नः शिवाचार्यं तमादिशेत् ॥९॥ अथालंकृत्य तं देवमाराध्य शिवमण्डले ॥ शतमष्टोत्तरं हुत्वा दद्यात्पूर्णाहुतिं ततः ॥१०॥ पुनः सम्पूज्य देवेशं प्रणम्य भुवि दण्डवत् ॥ शिरस्यञ्जलिमाधाय शिवं विज्ञापयेद्गुरुः ॥११॥ भगवंस्त्वत्प्रसादेन देशिकोऽयं मया कृतः ॥ अनुगृह्य त्वया देव दिव्याज्ञास्मै प्रदीयताम् ॥१२॥ एवं विज्ञाप्य शिष्येण सह भूयः प्रणम्य च ॥ शिवं शिवागमं दिव्यं पूजयेच्छिववद्गुरुः ॥१३॥ पुनः शिवमनुज्ञाप्य शिवज्ञानस्य पुस्तकम् ॥ उभाभ्यामथ पाणिभ्यां दद्याच्छिष्याय देशिकः ॥१४॥ सतां मूर्ध्नि समाधाय विद्यां विद्यासनोपरि ॥ अधिरोप्य य-

---

आहेत, असें जाणून शिष्याला शिवास अर्पण करावें ( तनुयुक्त शिष्याला शिवार्पण करावें ). (८) नंतर निवृत्ति वगैरे कलांनीं युक्त कलशांना क्रमानें उचलून मध्यमकलशापर्यंत शिष्याला अभिषेक शिवमंत्रानें घालावा. (९) मग गुरूनें शिशूच्या डोक्यावर शिवहस्त ( मंगलहस्त किंवा शिवस्वरूपीहस्त ) ठेवून शिवभावाला पावलेल्या त्या शिष्याला शिवाचार्य याप्रमाणें समजावें. (१०) नंतर त्या देवाला अलंकार घालून शिवमंडलावर त्याची आराधना ( पूजा ) करून एकशेंआठवेळ आहुति घालून शेवटीं पूर्णाहुति घालावी. (११) पुनः शिवाची पूजा करून भूमीवर दंडाकार नमस्कार त्याला घालून डोक्यावर हात जोडून गुरूनें शिवाची प्रार्थना करावी. (१२) भगवन्, तुझ्या प्रसादानें मी याला देशिक ही पदवी दिली आहे, तर हे देवा, तूं याच्यावर अनुग्रह करून तुझी दिव्य आज्ञा याला दे. (१३) अशी प्रार्थना करून शिष्यासह वारंवार त्याला नमस्कार घालून गुरूनें शुभकर अशा शिवागमाची पूजा शिवाप्रमाणेंच करावी. (१४) पुनः शिवाची प्रार्थना करून शिवज्ञानाचें जें पुस्तक असेल, तें दोन्हीं हातांनीं घेऊन शिष्याला परम आदरपूर्वक गुरूनें द्यावें. (१५) शिष्यानें गुरूनें दिलेली ती विद्या शिरसा मान्य करून विद्येच्या आसनावर ( पुस्तकाच्या आसनावर ) ठेवून वि-

थान्यायमभिवन्द्य समर्चयेत् ॥१५॥ अथ तस्मै गुरुर्दद्याद्राजोपकरणान्यपि ॥ आचार्यपदवीं प्राप्तो राज्यश्चापि यतोऽर्हति ॥१६॥ अथानुशासनं कुर्यात्पूर्वैराचरितं यथा ॥ यथा च शिवशास्त्रोक्तं यथा लोकेषु पूज्यते ॥१७॥ शिष्यान्परीक्ष्य यत्नेन शिवशास्त्रोक्तलक्षणैः ॥ संस्कृत्य च शिवज्ञानं दातुमर्हसि नान्यथा ॥१८॥ प्रतिष्ठां चापि देवस्य विधिवत्कर्तुमर्हसि ॥ परार्थमपि देवस्य पूजाहोमादिकं कुरु ॥१९॥ अकार्पण्यमनायासं शौचं क्षान्तिं दयां तथा ॥ अस्पृहामप्यसूयांच यत्नेन च विभावयेत् ॥२०॥ इत्थमादिश्य तं शिष्यं शिवमुद्वास्य मण्डलात् ॥ शिवकुम्भानलादींश्च सदस्यानपि पूजयेत् ॥२१॥ युगपद्वाथ संस्कारान्कुर्वीत गुणिनो गुरुः ॥ तत्र त्रयं द्वयं वापि प्रयोगस्योपदिश्यते ॥२२॥ तदादावेव कलशान्कल्पयेदध्वशुद्धिवत् ॥

---

धिपूर्वक त्या पुस्तकाला नमस्कार करून त्याची पूजा करावी. (१६) नंतर राजकीय उपकरणें जीं असतील, तीं सर्व उपकरणें त्या शिष्याला द्यावींत. कारण ज्याला 'आचार्य' ही पदवी मिळाली आहे, तो राज्य करावयास सुद्धां पात्र होतो. (१७) नंतर पूर्वजांचें आचरण परंपरा क्रमानें जसें चालत असेल, त्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवावें, ( पूर्वजांची आज्ञा मानावी ); व शिवशास्त्रांत जसें सांगितलें असेल, तसें चालावें, व जशी जगांत आपली पूजा होईल तसें वागावें. (१८) शिवशास्त्रांत सांगितलेल्या लक्षणाला अनुसरून प्रयत्नपूर्वक शिष्यांची परीक्षा करावी. नंतर त्यांना संस्कार देऊन शिवज्ञान द्यावें; शिष्याची योग्यता नसेल, तर शिवज्ञान देऊं नको. असा गुरूनें उपदेश द्यावा, (१९) आणि देवाची प्रतिष्ठा विधानपूर्वक कर, व परोपकाराकरितां देवाची पूजा कर, परोपकाराकरितां होमादि कर्म कर. (२०) कृपणपणा सोड, ( दैन्य दाखवूं नकोस ), आयास करून घेऊं नको, शुद्धता, क्षांति, दया, निराशा, असूया न करणें, वगैरे धर्मांचा अंगिकार कर. (२१) याप्रमाणें शिष्याला गुरूनें बोध देऊन मंडलापासून शिवाचें उद्वासन ( विसर्जन ) करावें. नंतर शिवकुंभ, शिवाग्नि, सभासद यांची पूजा सत्कार वगैरे करावेत. (२२) गुरूनें गुणयुक्त संस्कार जे असतील ते सर्व एककालीं करावेत. त्यांत तीन प्रयोग किंवा दोन प्रयोग सांगावेत. (२३) प्रयोगाच्या

कृत्वा समयसंस्कारमभिषेकं विनाखिलम् ॥२३॥ समभ्यर्च्य शिवं भूयः कृत्वा चाध्वविशोधनम् ॥ तस्मिन्परिसमाप्ते तु पुनर्देवं प्रपूजयेत् ॥२४॥ हुत्वा मन्त्रन्तु सन्तर्प्य सन्दीप्याशास्य चेश्वरम् ॥ समर्प्य मंत्रं शिष्यस्य पाणौ शेषं समापयेत् ॥२५॥ अथवा मन्त्रसंस्कारमनुचिंत्याखिलं क्रमात् ॥ अध्वशुद्धिं गुरुः कुर्यादभिषेकावसानिकाम् ॥२६॥ तत्र यः शांत्यतीतादिकलासु विहितो विधिः ॥ स सर्वोऽपि विधातव्यस्तत्वत्रयविशोधने ॥२७॥ शिवविद्यात्मतत्वाख्यं तत्वत्रयमुदाहृतम् ॥ शक्तौ शिवस्ततो विद्यात्तस्यास्त्वात्मा समुद्भवौ ॥२८॥ शिवेन शान्त्यतीताध्वा व्याप्तस्तदपरः परः ॥ विद्यया परिशिष्टोऽध्वा ह्यात्मना निखिलः क्रमात् ॥२९॥ दुर्लभं शाम्भवं मत्वा मन्त्रमूलं मनीषिणः ॥ शाक्तं शंसन्ति संस्कारं शिवशास्त्रार्थपारगाः ॥३०॥ इति ते सर्वमाख्यातं संस्काराख्यस्य कर्मणः ॥ चातुर्विध्य-

---

आधीं अध्वशुद्धीच्या क्रमानें कलशांची भावना करावी, त्यांत एक अभिषेकावांचून सर्व समयसंस्कार करून (२४) पुनः शिवाची पूजा करून अध्वशुद्धि यथाक्रमानें करावी. अध्वशुद्धि झाल्यानंतर व सर्व कर्म समाप्त झाल्यानंतर पुनः शिवाची पूजा करावी. (२५) नंतर होम करून मंत्रसंतर्पण करून मग प्रदीप्त करून पूर्ववत् ईश्वराची आज्ञा घेऊन शिष्याला मंत्र समर्पण करावे ( मंत्रोपदेश द्यावा ), नंतर त्याच्या हातांत अवशिष्ट सर्व समर्पण करावे. (२६) अथवा सर्व मंत्रसंस्काराचें चिंतन क्रमानें करून गुरूनें अभिषेकापर्यंत अध्वशुद्धि करावी. (२७) त्यांत शांत्यतीतादि कलेमध्यें जो विधि सांगितला आहे, तें सर्व विधान तत्वत्रयाच्या शोधनामध्यें ( तीन तत्वांचा शोध करीत असतां ) करावें. (२८) तत्वत्रय ह्मणजे शिवतत्व, आत्मतत्व, व विद्यातत्व हीं तीन तत्वें होत. शक्तीमध्यें शिव असून विद्याकलेमध्यें आत्मा हा प्रकाशतो आहे. (२९) शांत्यतीत नांवाचा अध्व शिवानें व्यापिला गेला असून त्याहून भिन्न जो दुसरा आहे, तो विद्येनें युक्त असून क्रमानें आत्मा हा व्याप्त होऊन त्यांत राहिला आहे. (३०) पंडित लोक शंभूचा मूलमंत्र परम दुर्लभ आहे, असें ह्मणत असून शिवशास्त्रांत पारंगत झालेले लोक शाक्तसंस्काराचा उपदेश देत असतात. (३१) याप्रमाणें तुला

मिदं कृष्ण किं भूयः श्रोतुमिच्छसि ॥३१॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागेऽभिषेकादि-संस्कृतिर्नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥

---

संस्कारनांवाच्या कर्माचें सर्व आख्यान सांगितलें. यांत काय चार प्रकार आहेत ते सर्व तुला सांगितले. कृष्णा, आतां तुला काय ऐकावयाची इच्छा आहे ? सांग.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील अ-भिषेकादि संस्कारनांवाचा सतरावा अध्याय संपला.

## अथाष्टादशोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ भगवञ्छ्रोतुमिच्छामि शिवाश्रमनिषेवणम् ॥
शिवशास्त्रोदितं कर्म नित्यं नैमित्तिकं तथा ॥१॥

उपमन्युरुवाच ॥ प्रातरुत्थाय शयनाद्ध्यात्वा देवं सहाम्बया ॥
विचार्य कार्यं निर्गच्छेद्गृहादभ्युदितेऽरुणे ॥२॥ अबाधे विजने देशे
कुर्यादावश्यकं ततः ॥ कृत्वा शौचं विधानेन दन्तधावनमाचरेत् ॥३॥
अलाभे दन्तकाष्ठानामष्टम्यादिदिनेषु च ॥ अपां द्वादशगण्डूषैः कु-
र्यादास्यविशोधनम् ॥४॥ आचम्य विधिवत्पश्चाद्वारुणं स्नानमाचरे-
त् ॥ नद्यां वा देवखाते वा ह्रदे वाथ गृहेऽपि वा ॥५॥ स्नानद्रव्या-
णि तत्तीरे स्थापयित्वा बहिर्मलम् ॥ व्यपोह्य मृदमालिप्य स्नात्वा
गोमयमालिपेत् ॥६॥ स्नात्वा पुनः पुनर्वस्त्रं त्यक्त्वा वाथ विशोध्य

---

श्रीकृष्ण बोलला— (१) हे भगवन्, शिवाश्रमांत कसें रहावें ? हें ऐ-
कण्याची इच्छा करितों, व त्या आश्रमांत राहून शिवशास्त्रांत सांगितल्याप्र-
माणें नित्यनैमित्तिक कर्म कसें करावें ? हें सांग.

उपमन्यु बोलला— (२) कृष्णा, प्रातःकालीं आंथरुणावरून उठून अं-
बिकेसह श्रीशिवाचें ध्यान करावें. मग अरुणोदय झाल्यानंतर मनांत कांहीं
कार्याची योजना करून घराबाहेर निघावें. (३) जेथें कोणाचा उपद्रव नाहीं,
अशा एकांत स्थलांत आवश्यककर्म करून नंतर शुद्धता विधानपूर्वक करून
मग दंतशुद्धि ( दांत घांसणें ) करावी. (४) दांत शुद्ध करावयाच्या काड्या
मिळाल्या नाहींत, तर अष्टमी वगैरे तिथींच्या दिवशीं पाण्यानें बारावेळ गु-
ळण्या करून मुख स्वच्छ करावें. (५) नंतर विधिपूर्वक आचमन करून मग
वारुण स्नान ( पाण्याचें स्नान ) करावें. तें स्नान नदींत, देवखातांत ( वी-
ज पडून झालेल्या आडांत ), डोहांत, गृहांत ( घरांतल्या पाण्यानें ) करावें.
(६) त्या त्या तीरावर स्नानास लागणारें द्रव्य ठेवून नदीच्या बाहेर ( पा-
ण्याबाहेर ) मल सोडून मृत्तिका अंगास लावून स्नान करावें, नंतर पुनः
गोमय अंगास लावावें, (७) पुनः स्नान करून पुनः वस्त्र नेसलेलें सोडा-
वें, ( जितकीं स्नानें होतील तितक्यावेळपर्यंत अंगावरचीं वस्त्रें सोडावींत );

वा ॥ सुस्नातो नृपवद्भूयः शुद्धं वासो वसेत्ततः ॥७॥ मलस्नानं सुगन्धाद्यैः स्नानं दन्तविशोधनम् ॥ न कुर्याद्ब्रह्मचारी च तपस्वी विधवा तथा ॥८॥ सोपवीतः शिखां बद्धा प्रविश्य च जलान्तरम् ॥ अवगाह्य समाचान्तो जले न्यस्येत्रिमण्डलम् ॥९॥ सौम्ये मग्नः पुनर्मन्त्रं जपेच्छक्त्या शिवं स्मरन् ॥ उत्थायाचम्य तेनैव स्वात्मानमभिषेचयेत् ॥१०॥ गोशृङ्गेण सदर्भेण पालाशेन दलेन वा ॥ पाद्मेन वाथ पाणिभ्यां पञ्चकृत्वस्त्रिरेव वा ॥११॥ उद्यानादौ गृहे चैव वर्द्धन्या कलशेन वा ॥ अवगाहनकालेऽद्भिर्मन्त्रितैरभिषेचयेत् ॥१२॥ अथ चेद्वारुणं कर्तुमशक्तः शुद्धवाससा ॥ आर्द्रेण शोधयेद्देहमापादतलमस्तकम् ॥१३॥ आग्नेयं वाथ वा मान्त्रं कुर्यात्स्नानं शिवेन वै ॥ शिव-

---

किंवा वस्त्र धुऊन स्वच्छ स्नान राजाप्रमाणें करून शुद्ध वस्त्र नेसावें. (८) मलस्नान ( अभ्यंग ) सुगंधद्रव्याचें स्नान किंवा दंतशोधन करूं नये. हा नियम ब्रह्मचाऱ्याला, वानप्रस्थाला, विधवेला लागू आहे, यांशिवाय इतर लोकांना हा नियम लागू नाहीं. (९) स्नान करितांना सोपवीत होऊन (मालाकार सूत्र घालून ) शिखा बांधून पाण्यामध्यें प्रवेश करावा, नंतर एकवेळ अवगाहन करून ( बुडीमारून ) आचमन करून पाण्यावर तीन मंडलाच्या रेषा काढाव्या. (१०) शांत अशा पाण्यांत स्नान करून पुनः मंत्राचा जप शक्त्यनुसार करावा, व शिवस्मरण करावें. पुनः उठून आचमन करून त्याच पाण्यानें अभिषेक करून घ्यावा. (११) गोशृंग, दर्भ, पालाशपत्र, पद्म, निदान आपले हात यांनीं पांचवेळ किंवा तीनवेळ (१२) बागेंत, घरांत, वर्धनीनें ( मडक्यानें ) किंवा घागरीनें अवगाहन करतांना अभिमंत्रण केलेल्या पाण्याचें प्रोक्षण ( अभिषेक ) करून घ्यावें. (१३) आतां थंडपाण्याचें स्नान जर अशक्तपणामुळें सोसत नसेल, तर शुद्धवस्त्र घेऊन तें पाण्यांत भिजवून त्या ओल्या वस्त्रानें पायांपासून डोक्यापर्यंत अंग पुसून काढावें. (१४) अथवा तोंडानें शिवमंत्र ह्मणत आग्नेयस्नान ( भस्मस्नान ) मंत्रस्नान तरी करावें. योग्य प्राणी असेल, तर त्याला स्नान करणें ह्मणजे शिवाची चिंता ( ध्यान ) करणें हेंच त्याचें स्नान होय. याला आत्मीयस्ना-

चिन्तापरं स्नानं युक्तस्यात्मीयमुच्यते ॥१४॥ स्वसूत्रोक्तविधानेन मन्त्राचमनपूर्वकम् ॥ आचरेद्ब्रह्मयज्ञान्तं कृत्वा देवादितर्पणम् ॥१५॥ मण्डलस्थं महादेवं ध्यात्वाभ्यर्च्य यथाविधि ॥ दद्यादर्घ्यं ततस्तस्मै शिवायादित्यरूपिणे ॥१६॥ अथवैतत्स्वसूत्रोक्तं कृत्वा हस्तौ विशोधयेत् ॥ करन्यासं ततः कुर्यात्सकलीकृतविग्रहः ॥१७॥ वामहस्तगताम्भोभिर्गंधसिद्धार्थकान्वितैः ॥ कुशपुंजेन वाभ्युक्ष्य मूलमन्त्रसमन्वितैः ॥१८॥ आपोहिष्ठादिभिर्मन्त्रैः शेषमाघ्राय वै जलम् ॥ वामनासापुटेनैव देहं सम्भावयेत्सितम् ॥१९॥ अघमादाय देहस्थं सव्यनासापुटेन च ॥ कृष्णवर्णेन बाह्यस्थं भावयेच्च शिलागतम् ॥२०॥ तर्पयेदथ देवेभ्य ऋषिभ्यश्च विशेषतः ॥ भूतेभ्यश्च पितृभ्यश्च दद्यादर्घ्यं यथाविधि ॥२१॥ रक्तचन्दनतोयेन हस्तमात्रेण मण्डलम् ॥ सु-

---

न ह्मणतात. (१५) आपआपल्या सूत्रांत ( शाखेंत ) जसें सांगितलें असेल, त्याप्रमाणें मंत्राचमनपूर्वक ब्रह्मयज्ञापर्यंत कर्म करावें. देवतातर्पणापासून ब्रह्मयज्ञांत कर्म करावें. (१६) नंतर मंडलांत सन्निहित असलेल्या महादेवाचें ध्यान करून विधिपूर्वक शिवाची पूजा करावी. मग आदित्यस्वरूपी शिवाला अर्घ्यदान द्यावें. (१७) अथवा निजसूत्रांत सांगितल्याप्रमाणें कर्म करून हात शुद्ध करून शरीरांत कलान्यास वगैरे करून मग करन्यास करावा. (१८) डाव्या हातांत पाणी घेऊन त्यांत गंध अक्षता मिसळून दर्भपुंजानें मूलमंत्र ह्मणत ह्मणत तें पाणी अंगावर शिंपडून घ्यावें ( प्रोक्षण करून घ्यावें ). (१९) किंवा ‘ आपोहिष्ठा ’ इत्यादि मंत्रांनीं तरी प्रोक्षण करून घ्यावें. बाकी राहिलेलें पाणी डाव्या नाकपुडीनें आघ्राण करून ( वास घेऊन ) देहांतल्या पापाचें विसर्जन करावें ( पाणी खालीं टाकून द्यावें ). (२०) सव्यनासापुटानें (उजव्या नाकपुडीनें) देहांतल्या पापाला घेऊन ( उदकाचा वास घेऊन ) “ काळ्या रंगानें बाहेरच्या बाजूस पडलेल्या शिळेवर हें पाप पडलें ” असें समजून तें पाणी सोडून द्यावें. (२१) नंतर देवतातर्पण करावें, मागून विशेषेंकरून ऋषितर्पण करावें, नंतर भूततर्पण करून विधानपूर्वक पितरांना अर्घ्य द्यावे ( पितृतर्पण करावें ). (२२) मग रक्तचंदन मिसळलेलें पाणी घेऊन एका हाताच्या प्रमाणानें सारवून मंडल करावें. तें व-

वृत्तं कल्पयेद्भूमौ रत्नचूर्णाद्यलंकृतम् ॥२२॥ तत्र सम्पूजयेद्भानुं स्वकीयावरणैः सह ॥ खखोल्कायेति मन्त्रेण साङ्गतः सुखसिद्धये ॥२३॥ पुनश्च मण्डलं कृत्वा तदङ्गैः परिपूज्य च ॥ तत्रस्थं हेमपात्राद्यं मागधप्रस्थसम्मितम् ॥२४॥ पूरयेद्गन्धतोयेनरक्तचन्दनयोगिना ॥ रक्तपुष्पैस्तिलैश्चैव कुशाक्षतसमन्वितैः ॥२५॥ दूर्वापामार्गगव्यैश्च केवलेन जलेन वा ॥ जानुभ्यां धरणीं गत्वा नत्वा देवञ्च मण्डले ॥२६॥ कृत्वा शिरसि तत्पात्रं दद्यादर्घ्यं शिवाय तत् ॥ अथवांजलिना तोयं सदर्भं मूलविद्यया ॥२७॥ उत्क्षिपेदम्बरस्थाय शिवायादित्यमूर्तये॥ कृत्वा पुनः करन्यासं करशोधनपूर्वकम् ॥२८॥ बुद्धेशानादिसद्यान्तं पंच ब्रह्ममयं शिवम् ॥ गृहीत्वा भसितं मन्त्रैर्विमृज्यांगानि संस्पृशेत्

---

र्तुलाकार केलेलें असून त्यावर रत्नचूर्णानें ( रत्नाच्या रांगोळीनें ) चित्रें काढावींत. (२३) त्या मंडलांत त्याच्या आवरणांसह सूर्याची पूजा करावी. " खखोल्काय " हा मंत्र ह्मणून सूर्याची सांगपूजा आपल्या सुखाकरितां करावी. (२४) पुनः मंडल करून त्याच्या अवयवांसह पूजा करून त्या मंडलावर असलेल्या सोन्याच्या पात्रांत ( तें पात्र मगध देशांतल्या प्रस्थ नांवाच्या मापाएवढें असावें ) (२५) गंध मिसळून पाणी भरावें, व त्यांत रक्तचंदन मिसळावें, तांबडीं फुलें त्यांत घालावींत, आणि तीळ, कुश, अक्षता वगैरे पदार्थ त्या पात्रांत घालावेत. (२६) दूर्वा, अघाडा, गव्य ( गायीचें दूध, दहीं, तूप ) किंवा नुसतें पाणी यांपैकीं सांपडतील तितक्या पदार्थांनीं तें पात्र भरावें. नंतर जमिनीला गुडघा टेंकून मंडलावरच्या देवाला नमस्कार करावा. (२७) तें पात्र आपल्या डोक्यावर घेऊन शिवाला अर्घ्य द्यावें. अथवा दोन्हीं हातानें दर्भसहित उदक घेऊन तोंडानें मूलमंत्र ( ॐनमः शिवाय ) ह्मणत (२८) आकाशांत असलेल्या आदित्यस्वरूपी शिवाला वरच्यावरच अर्घ्य द्यावे ( हातानें तें पाणी वर उडवावें नंतर करशोधन करून ( हात धुवून ) करन्यास करावा. (२९) नंतर ईशानादि सद्यांत पंचब्रह्मस्वरूपी शिवाला जाणून ( ध्यान करून ) हातांत भस्म घेऊन मंत्र ह्मणत तें भस्म सर्व अंगाला लावावें. मग अंगस्पर्श करावा ( न्यास क-

॥२९॥ यादिनान्तैः शिरोवक्त्रहृद्गुह्यचरणक्रमात् ॥ ततो मूलेन सर्वांगमालभ्य वसनान्तरम् ॥३०॥ परिधाय द्विराचम्य प्रोक्ष्यैकादशमन्त्रितैः ॥ जलैराच्छाद्य वासोऽन्यद्द्विराचम्य शिवं स्मरेत् ॥३१॥ पुनर्न्यस्तकरो मन्त्री त्रिपुंड्रं भस्मना लिखेत् ॥ अवक्रमाय तं व्यक्तं ललाटे गन्धवारिणा ॥३२॥ वृत्तं वा चतुरस्रं वा विन्दुमर्द्धेन्दुमेव वा ॥ ललाटे यादृशं पुण्ड्रं लिखितं भस्मना पुनः ॥३३॥ तादृशं भुजयोर्मूर्ध्नि स्तनयोरन्तरे लिखेत् ॥ सर्वांगोद्धूलनञ्चैव न समानं त्रिपुण्ड्रकैः ॥३४॥ तस्मात्रिपुंड्रमेवैकं लिखेदुद्धूलनं विना ॥ रुद्राक्षान्धारयेन्मूर्ध्नि कंठे श्रोत्रे करे तथा ॥३५॥ सुवर्णवर्णमच्छिन्नं शुभं नान्यधृतं शुभम् ॥ विप्रादीनां क्रमाच्छ्वेतं पीतं रक्तमथासितम् ॥३६॥

---

रावा ). (३०) यकारापासून नकारापर्यंत डोकें, मुख, हृदय, गुह्य, चरण या अवयवांच्या क्रमानें अक्षरांचा न्यास करावा. नंतर मूलमंत्रानें सर्व अंगावर हात फिरवून दुसरें वस्त्र (३१) परिधान करून दोनवेळ आचमन करावें. अकरावेळ मंत्र ह्मणून अभिमंत्रण केलेल्या पाण्यानें प्रोक्षण करून घेऊन दुसरें वस्त्र आच्छादन करून ( पांघरून ) पुनः दोन वेळ आचमन करावें. नंतर शिवस्मरण करावें. (३२) पुनः करन्यास करून मंत्रोच्चार करीत भस्माचे त्रिपुंड्र करावे ( भस्माचे तीन पट्टे लावावेत ). कपाळावर स्पष्ट तीन पुंड्र भस्माचे रेखून गंधोदकानें (३३) वर्तुळ किंवा चौकोनी बिंदु (तिलक) कपाळावर करावा. किंवा अर्धचंद्राकृति गंध तरी लावावें. कपाळावर जसे भस्माचे पट्टे लाविले असतील, तसेच पुनः (३४) दोन्हीं भुजांवर, मस्तकावर, स्तनाच्या मध्यभागीं ( उरावर ) लावावे. नंतर तें शेषभस्म सर्व अंगावर उधळून घ्यावें. त्रिपुंड्र धारणासारखें पुण्य कोणत्याही कर्मानें मिळत नाहीं. (३५) भस्मोद्धूलन एकवेळ जरी केलें नाहीं, तरी हरकत नाहीं, परंतु त्रिपुंड्रलेखन मात्र अवश्य केलेंच पाहिजे. नंतर मस्तक, कंठ, कान, हात या अवयवांच्या ठिकाणीं रुद्राक्ष धारण करावेत. (३६) ते रुद्राक्ष सोन्यासारख्या रंगाचे असून फुटलेले नसावेत, व शुभकर असून दुसऱ्यांनीं धारण केलेले नसावेत. अशा रुद्राक्षांमध्यें ब्राह्मणानें पांढरे रुद्राक्ष घ्यावेत, क्षत्रियानें पिंवळे घ्यावेत, वैश्यानें तांबडे घ्यावेत, शूद्रानें काळे घ्यावेत.

तदलाभे यथालाभं धारणीयमदूषितम् ॥ तत्रापि नोत्तरं नीचैर्धार्यं नीचमथोत्तरैः ॥३७॥ नाशुचिर्धारयेदक्षं सदा कालेषु धारयेत् ॥ इत्थं त्रिसन्ध्यमथवा द्विसन्ध्यं सकृदेव वा ॥३८॥ कृत्वा स्नानादिकं शक्त्या पूजयेत्परमेश्वरम् ॥ पूजास्थानं समासाद्य बद्ध्वा रुचिरमासनम् ॥३९॥ ध्यायेद्देवं च देवींच प्राङ्मुखो वाप्युदङ्मुखः ॥ श्वेतादीन्नकुलीशान्तान्सशिष्यान्प्रणमेद्गुरून् ॥४०॥ स्वगुरुञ्च पुनर्देवं ततो नामाष्टकं जपेत् ॥ शिवो महेश्वरश्चैव रुद्रो विष्णुः पितामहः ॥४१॥ संसारवैद्यः सर्वज्ञः परमात्मेति चाष्टकम् ॥ अथवा शिवमेवैकं जपित्वैकादशाधिकम् ॥४२॥ जिह्वाग्रे तेजसो राशिं ध्यात्वा व्याध्यादिशान्तये ॥ प्रक्षाल्य च करौ पश्चात्कृत्वा चन्दनचर्चितौ ॥४३॥ प्रकुर्वीत करन्यासं करशोधनपूर्वकम् ॥ न्यासस्तु त्रिविधः प्रोक्तः स्थित्यु-

---

(३७) या क्रमानें रुद्राक्ष जर सांपडले नाहींत, तर जसे मिळतील तसे निर्दोष रुद्राक्ष मिळवून धारण करावेत. त्यांतही श्रेष्ठ रुद्राक्ष नीचांनीं घेऊं नयेत, ( श्रेष्ठजातीचे श्वेत क्षत्रियानें घेऊं नये. पुढें असेंच समजावें ) कमी दर्जाचे रुद्राक्ष श्रेष्ठांनीं घ्यावेत. (३८) अशुचि असतांना रुद्राक्ष धारण करूं नये. सर्वदां रुद्राक्ष धारण करूं नयेत (सर्वदां योग्यकालीं धारण करावेत). याप्रमाणें तीन संधिकालांत, ( प्रातःकाल, माध्यान्ह, सायान्ह ) किंवा द्विसंध्येंत, किंवा एकवेळ तरी (३९) स्नानादि कर्म करून शक्त्यनुसार परमेश्वराची पूजा करावी. पूजास्थानाच्या ठिकाणीं येऊन सुंदर आसन घालावें. (४०) आसन घालून शिवाचें ध्यान करावें, व देवीचें ध्यान करावें. परंतु तेव्हां पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड केलें असलें पाहिजे. नंतर श्वेतादीपासून नकुलीशापर्यंत शिष्यसहित सद्गुरूंना नमस्कार करावेत. (४१) नंतर आपल्या गुरूला नमस्कार करून पुनः शिवाला नमन करून नामाष्टकाचा जप करावा. शिव, महेश्वर, रुद्र, विष्णु, पितामह, (४२) संसारवैद्य, सर्वज्ञ, परमात्मा हींच आठ नांवें होत. अथवा एकादशरुद्रांचा जो स्वामी शिव, त्याचा तरी जप करावा. (४३) रोगादिकांच्या शांतीकरितां अग्रावर तेजोराशि शिवाचें ध्यान करावें. मग हस्तप्रक्षालन करून हाताला चंदन फांसावें. (४४) नंतर करशोधन करून करन्यास करावा. हा न्यास स्थिति, उत्पत्ति,

त्पत्तिलयक्रमात् ॥४४॥ स्थितिन्यासो गृहस्थानामुत्पत्तिर्ब्रह्मचारिणाम् ॥ यतीनां संहृतिन्यासो वनस्थानां तथैव च ॥४५॥ स एव भर्तृहीनायाः कुटुम्बिन्याः स्थितिर्भवेत् ॥ कन्यायाः पुनरुत्पत्तिर्वक्ष्ये न्यासस्य लक्षणम् ॥४६॥ अंगुष्ठादिकनिष्ठान्तं स्थितिन्यास उदाहृतः ॥ दक्षिणांगुष्ठमारभ्य वामांगुष्ठान्तमेव च ॥४७॥ उत्पत्तिन्यास आख्यातो विपरीतस्तु संहृतिः ॥ सबिन्दुकान्नकारादीन्वर्णान्न्यस्येदनुक्रमात् ॥४८॥ अंगुलीषु शिवं न्यस्य तलयोरप्यनामयोः ॥ अस्त्रन्यासं ततः कृत्वा दशदिक्ष्वस्त्रमन्त्रतः ॥४९॥ निवृत्त्यादिकलाः पंच पंचभूतस्वरूपिणीः ॥ पंचभूताधिपैः सार्द्धं तत्तच्चिह्नसमन्विताः ॥५०॥ हृत्कंठताल्वुभ्रूमध्यब्रह्मरन्ध्रसमाश्रयाः ॥ तत्तद्बीजेन संग्रन्थीस्तत्तद्बीजेषु भावयेत् ॥५१॥ तासां विशोधनार्थाय विद्यां पंचाक्षरीं

---

लय या तीन क्रमानें तीन प्रकारचा आहे, असें समजावें. (४५) त्यांत स्थितिन्यास हा गृहस्थांना सांगितला असून उत्पत्तिन्यास ब्रह्मचाऱ्याला सांगितला आहे. वानप्रस्थांना व संन्यास्यांना संहृतिन्यास सांगितला आहे. (४६) तोच संहृति ( संहार ) न्यास विधवेला सांगितला असून सुवासिनीला स्थितिन्यास सांगितला आहे. कन्येला उत्पत्तिन्यास सांगितला आहे. आतां सर्व न्यासांचें लक्षण सांगतों. (४७) अंगुष्ठापासून कनिष्ठिकेपर्यंत जो अंगुलिन्यास आहे, त्याला स्थितिन्यास असें ह्मणतात, आतां उजव्या आंगठ्यापासून डाव्या आंगठ्यापर्यंत जो अंगुलिन्यास आहे, (४८) त्याला उत्पत्तिन्यास ह्मणतात, व याच्या विपरीत जो न्यास आहे, त्याला संहारन्यास ह्मणतात. असें न्यासाचें लक्षण समजावें. बिंदुसहित नकारादि वर्णांचा न्यास अनुक्रमानें करावा. (४९) अंगुलीवर शिवनामांचा न्यास करून नामरहित दोन्हीं तळहातांवर न्यास करावा. दशदिशांमध्यें अस्त्रमंत्रानें अस्त्रन्यास करावा. (५०) पंचभूतस्वरूपिणी ज्या निवृत्त्यादि पांच कला आहेत, त्या पंचभूतांच्या पांच स्वामींसह व त्यांच्या आयुधांसह (चिन्हांसह) घेऊन (५१) हृदय, कंठ, तालु, भ्रूमध्य, ब्रह्मरंध्र यांठिकाणीं त्यांचा न्यास करावा, व त्या त्या बीजमंत्रानें बीजाक्षरांमध्यें ग्रंथिकांची भावना करावी. (५२) त्या कलांच्या शोधनाकरितां पंचाक्षरीविद्येचा जप करावा. जप करतांना प्राणवायूचा व वाणीचा निरोध

जपेत् ॥ निरुद्धवाक्प्राणवायुर्गुणसंख्यानुसारतः ॥५२॥ भूतग्रन्थिं ततश्छिन्द्यादस्त्रेणैवास्त्रमुद्रया ॥ नाड्या सुषुम्नयात्मानं प्रेरितं प्राणवायुना ॥५३॥ निर्गतं ब्रह्मरन्ध्रेण योजयेच्छिवतेजसा ॥ विशोष्य वायुना पश्चाद्देहं कालाग्निना दहेत् ॥५४॥ ततश्चोपरिभावेन कलाः संहृत्य वा न वा ॥ देहं संहृत्य वै दग्धं कलाः स्पृष्ट्वा सहाधिपम् ॥५५॥ प्लावयित्वा मृतैर्देहं यथास्थानं निवेशयेत् ॥५६॥ अथासंहृत्य वै दग्धः कलासर्गं विनैव तु ॥ अमृतप्लावनं कुर्याद्भस्मीभूतस्य तस्य वै ॥५७॥ ततो विद्यामये तस्मिन्देहे दीपशिखाकृतिम् ॥ शिवान्निर्गतमात्मानं ब्रह्मरन्ध्रेण योजयेत् ॥५८॥ देहस्यान्तः प्रविष्टं तं ध्यात्वा हृदयपंकजे ॥ पुनश्चामृतवर्षेण सिंचेद्विद्यामयं वपुः ॥५९॥ पुनः कु-

---

करावा, परंतु जितक्या संख्येपर्यंत वाक् प्राणांचा निरोध करणें शक्य असेल, तितकीच जपाची संख्या मोजावी. ( तितकेच जप करावेत ). (९३) नंतर अस्त्रानें (अस्त्रमंत्रानें)च व अस्त्रमुद्रेनें भूतांची ग्रंथि तोडावी ( पांच भूतें सोडवावीं ). नंतर सुषुम्नानाडीनें व प्राणवायूनें प्रेरित झालेल्या आत्म्याला ( प्राणवायूचा निरोध करून सुषुम्नानाडींतून उठविलेल्या आत्म्याला ) (९४) ब्रह्मरंध्रांत ठेवून नंतर ब्रह्मरंध्रांतून बाहेर आणून शिवाच्या तेजाबरोबर त्या आत्म्याची योजना करावी. नंतर वायूच्या योगानें देह शुष्क करून कालाग्नीनें देह जाळून टाकावा. (९५) नंतर वरच्यावर कलांचा संहार ( संकोच ) करून किंवा न करून दग्ध देहाचा संहार करून कलांचा स्पर्श करावा, व कलांच्या स्वामींचाही स्पर्श करावा, (९६) नंतर अमृतवृष्टीनें देह भिजवून त्या त्या स्थानाला अनुसरून त्याचा निवेश करावा ( पूर्ववत् देह करावा ). (९७) दग्ध झालेल्या आत्म्यानें कलासृष्टीवांचून देहाचा स्वीकार करून भस्मवत् झालेला देह अमृतानें भिजवून ओला करावा. (९८) नंतर ज्ञानमय ( विद्यामय ) अशा देहांत दीपशिखेच्या आकृतीच्या आत्म्याची ( जो शिवापासून बाहेर आला, त्या आत्म्याची ) ब्रह्मरंध्रानें योजना करावी. (९९) देहाच्या आंत प्रवेश केलेल्या त्या आत्म्याचें हृदयकमलांत ध्यान करून पुनः अमृतवृष्टि करून विद्यामय शरीर भिजवावें. (६०)

र्यात्करन्यासं करशोधनपूर्वकम् ॥ देहन्यासं ततः पश्चान्महत्या मुद्रया चरेत् ॥६०॥ अङ्गन्यासं ततः कृत्वा शिवोक्तेन तु वर्त्मना ॥ वर्णन्यासं ततः कुर्याद्धस्तपादादिसन्धिषु ॥६१॥ षडङ्गानि ततो न्यस्य जातिषट्कयुतानि च ॥ दिग्बन्धमाचरेत्पश्चादाग्नेयादि यथाक्रमम् ॥६२॥ यद्वा मूर्द्धादिपंचाङ्गं न्यासमेव समाचरेत् ॥ तथा षडंगन्यासं वा भूतशुद्ध्यादिकं विना ॥६३॥ एवं समासरूपेण कृत्वा देहात्मशोधनम् ॥ शिवभावमुपागम्य पूजयेत्परमेश्वरम् ॥६४॥ अथ यस्यास्त्यवसरो नास्ति वा मतिविभ्रमः ॥ स विस्तीर्णेन कल्पेन न्यासकर्म समाचरेत् ॥६५॥ तत्राद्यो मातृकान्यासो ब्रह्मन्यासस्ततः परः॥ तृतीयः प्रणवन्यासो हंसन्यासस्तदुत्तरः ॥६६॥ पंचमः कथ्यते सद्भिर्न्यासः पंचाक्षरात्मकः ॥ एतेष्वेकमनेकं वा कुर्यात्पूजादिकर्मसु

---

पुनः करशुद्धि करून करन्यास करावा. नंतर महती नांवाच्या मुद्रेनें देहन्यास करावा ( महतीमुद्रेचा न्यास देहांत करावा). (६१) नंतर शिष्यानें, जो मार्ग सांगितला आहे त्या मार्गानें अंगन्यास करून, मग हात, पाय, सांधे वगैरे अवयवांवर वर्णांचा न्यास करावा. (६२) सहा जातींसह षडंगन्यास करून नंतर आग्नेयी दिशेपासून क्रमानें मंत्रानें दिग्बंधन करावें. (६३) किंवा मस्तक वगैरे पांच अवयवांवर न्यास करून ( पंचांगन्यास करून ) दिग्बंधादि कर्म करावें, अथवा पंचभूतांची शुद्धि वगैरे कर्म न करितां षडंगन्यास ( सहा अवयवांवर न्यास ) करावा. (६४) याप्रमाणें संक्षेपरूपानें देहशोधन व आत्मशोधन करून शिवावर चांगला भाव ठेवून परमेश्वर शिवाची पूजा करावी. (६५) ज्या मनुष्याला पुष्कळ काल कर्म करावयास सांपडतो, व ज्याची बुद्धि कर्म करतांना भ्रष्ट होत नाहीं, अशा मनुष्यानें विस्तृतकल्पानें ( कल्पांत जसा विस्तार असेल, त्याप्रमाणें ) न्यासकर्म करावें. (६६) त्यांत प्रथमतः मातृकान्यास ( अक्षरन्यास ) करून नंतर ब्रह्मन्यास ( पंचब्रह्मन्यास ) करावा. नंतर प्रणवन्यास तिसरा करून चौथा हंसन्यास त्याच्या मागून करावा. (६७) पंचाक्षरांचा जो न्यास आहे, त्या न्यासाला सज्जन लोक पांचवा न्यास ह्मणतात. इतक्या न्यासांपैकीं एक किंवा सगळे

॥६७॥ अकारो मूर्ध्नि विन्यस्य ह्याकारोऽथ ललाटके ॥ इई च नेत्रयोस्तद्वदुऊ श्रवणयोस्तथा ॥६८॥ ऋॠ कपोलयोश्चैव ऌॡ नासापुटद्वये ॥ एऐ ओष्ठद्वये ओऔ दन्तपंक्तिद्वये क्रमात् ॥६९॥ अं जिह्वायामथो तालुन्यः प्रयोज्यो यथाक्रमम् ॥ कवर्गं दक्षिणे हस्ते न्यसेत्पंचसु सन्धिषु ॥७०॥ चवर्गं च तथा वामहस्तसन्धिषु विन्यसेत् ॥ टवर्गश्च तवर्गं च पादयोरुभयोरपि ॥७१॥ पफौ तु पार्श्वयोः पृष्ठे नाभौ चापि बभौ ततः ॥ न्यसेन्मकारं हृदये त्वगादिषु यथाक्रमम् ॥७२॥ यकारादिसकारान्तान्सप्तसप्तसु धातुषु ॥ हकारं हृदयस्यान्तः क्षकारं भ्रुयुगान्तरे ॥७३॥ एवं वर्णान्प्रविन्यस्य पञ्चाशद्रुद्रवर्त्मना ॥ अङ्गवक्त्रकलाभेदात्पञ्चब्रह्माणि विन्यसेत् ॥७४॥ क-

---

पूजा वगैरे कर्मांच्यावेळीं न्यास करावेत. (६८) मस्तकावर अकाराचा न्यास करून आकाराचा ललाटावर ( कपाळावर ) न्यास करावा. इई या दोन अक्षरांचा न्यास दोन्ही नेत्रांवर करून उ ऊ या दोन अक्षरांचा न्यास दोन्ही कानांवर करावा. (६९) ऋ ॠ या अक्षरांचा न्यास गालांवर करून ऌ ॡ या अक्षरांचा न्यास दोन्ही नाकपुड्यांत करावा. ए ऐ या अक्षरांचा न्यास ओठांवर करून ओ औ या अक्षरांचा न्यास वरच्या खालच्या दंतपंक्तींवर क्रमानें करावा. (७०) अं अक्षराचा न्यास जिभेवर करून टाळूवर 'अः' अक्षराचा न्यास करावा. नंतर क्रमानें उजव्या हातावर कवर्गाचा न्यास करून पांचही सांध्यांमध्यें (७१) चवर्गाचा न्यास करावा. तसेंच डाव्या हाताच्या सांध्यामध्येंही चवर्गाचा न्यास करावा. दोन्ही पायांवर टवर्ग तवर्गाचा न्यास करावा. (७२) पार्श्वभागावर प फ या अक्षरांचा न्यास करून पृष्ठभागावर व नाभीवर ब भ या अक्षरांचा न्यास करावा. हृदयावर मकाराचा न्यास करून पुढें क्रमानें त्वचा वगैरे (७३) सप्तधातूंवर यपासून सपर्यंत सात अक्षरांचा न्यास करावा. हृदयाच्या मध्यभागीं हकाराचा न्यास करून दोन्ही भिवयांमध्यें क्षकाराचा न्यास करावा. (७४) याप्रमाणें पंचाशद्रुद्रोक्त ( पन्नास रुद्रगणानें सांगितलेल्या ) मार्गानें अक्षरांचा न्यास करून अंग मुख वगैरे कलांच्या भेदानें पंचब्रह्मांचा न्यास करावा ( कलान्यास पूर्वक ब्रह्मन्यास करावा). (७५) त्याच पंचब्रह्ममंत्रांनीं व कलामंत्रांनीं क-

रन्यासाद्यमपि तैः कृत्वा वाथ न वा क्रमात् ॥ शिशोर्वदनहृद्गुह्यपादेष्वेतानि कल्पयेत् ॥७५॥ ततश्चोर्ध्वादिवक्त्राणि पश्चिमान्तानि कल्पयेत् ॥ ईशानस्य कलाः पंच पंचस्वेतेषु च क्रमात् ॥७६॥ ततश्चतुर्षु वक्त्रेषु पुरुषस्य कला अपि ॥ चतस्रः प्रणिधातव्याः पूर्वादिक्रमयोगतः ॥७७॥ हृत्कंठांसेषु नाभौ च कुक्षौ पृष्ठे च वक्षसि ॥ अघोरस्य कलाश्चाष्टौ योजनीया यथाक्रमम् ॥७८॥ पश्चात्त्रयोदश कलाः पायुमेढ्रोरुजानुषु ॥ जंघास्फिक्कटिपार्श्वेषु वामदेवस्य भावयेत् ॥७९॥ सद्यस्यापि कलाश्चाष्टौ पादयोरपि हस्तयोः ॥ घ्राणे शिरसि बाह्वोश्च कल्पयेत्कल्पवित्तमः ॥८०॥ अष्टत्रिंशत्कलान्यासमेवं कृत्वानुपूर्वशः ॥ पश्चात्प्रणवविद्धीमान्प्रणवन्यासमाचरेत् ॥८१॥ बाहुद्वये कूर्परयोस्तथा च मणिबन्धयोः ॥ पार्श्वोदरोरुजंघेषु पादयोः पृष्ठतस्तथा ॥८२॥ इत्थं प्रणवविन्यासं कृत्वा न्यासविचक्षणः ॥ हंसन्यासं

---

रन्यास केला तरी हरकत नाहीं, न केला तरी चालतें. नंतर क्रमानें शिशूच्या वदनावर ( मुखावर ) व हृदय, गुह्य, पाद या अवयवांवर पंचब्रह्मांचा न्यास करावा. (७६) पंचब्रह्माचीं ऊर्ध्वादि मुखें जीं आहेत, त्यांत पूर्वमुखापासून पश्चिममुखापर्यंत न्यास करून याच मुखांवर ईशानाच्या पांच कला ज्या असतील, त्यांचा न्यासही क्रमानें करावा. (७७) नंतर पुरुषाच्या चार ज्या कला आहेत, त्यांचा न्यास पूर्वादि क्रमानें चार मुखांवर करावा. (७८) हृदय, कंठ, अंस ( स्कंध ), नाभि, कुक्षि, पृष्ठ, ऊर या अवयवांवर क्रमानें अघोराच्या आठ कला योजाव्या ( आठ कलांचा न्यास करावा ). नंतर (७९) पायु, मेढ्र, ऊरु, जानु, जंघा, स्फिक्, कटि, पार्श्व या अवयवांवर वामदेवाच्या तेरा कलांचा न्यास करावा. (८०) पाद, हस्त, नाक, शिर, बाहु या अवयवांवर सद्याच्या आठ कलांचा न्यास करावा. (८१) याप्रमाणें अडतीस कलांचा न्यास क्रमानें करून नंतर प्रणव जाणणाऱ्या बुद्धिमानानें प्रणवाचा न्यास करावा. (८२) दोन बाहु, दोन कूर्पर (कोपरें), मणिबंध ( मनगट ), पार्श्व, उदर, ऊरु ( मांड्या ), जंघा, पाद, पृष्ठ इत्यादि अवयवांवर (८३) न्यास जाणणाऱ्या विद्वानानें प्रणवन्यास करावा. नं-

प्रकुर्वीत शिवशास्त्रे यथोदितम् ॥८३॥ बीजं विभज्य हंसस्य नेत्रयोर्घ्राणयोरपि ॥ विभज्य बाहुनेत्रास्यललाटे घ्राणयोरपि ॥८४॥ कक्षयोः स्कन्धयोश्चैव पार्श्वयोः स्तनयोस्तथा ॥ कट्योः पाण्योर्गुल्फयोश्च यद्वा पञ्चांगवर्त्मना ॥८५॥ हंसन्यासमिमं कृत्वा न्यसेत्पञ्चाक्षरीं ततः ॥ यथापूर्वोक्तमार्गेण शिवत्वं येन जायते ॥८६॥ नाशिवः शिवमभ्यस्येन्नाशिवः शिवमर्चयेत् ॥ नाशिवस्तु शिवं ध्यायेन्नाशिवः शिवमाप्नुयात् ॥८७॥ तस्माच्छैवीं तनुं कृत्वा त्यक्त्वा च पशुभावनाम् ॥ शिवोऽहमिति सञ्चिन्त्य शैवं कर्म समाचरेत् ॥८८॥ कर्मयज्ञस्तपोयज्ञो जपयज्ञस्तदुत्तरः ॥ ध्यानयज्ञो ज्ञानयज्ञः पञ्चयज्ञाः प्रकीर्तिताः ॥८९॥ कर्मयज्ञरताः केचित्तपोयज्ञरताः परे ॥ जपयज्ञरताश्चान्ये ध्यानयज्ञरतास्तथा ॥९०॥ ज्ञानयज्ञरताश्चान्ये विशिष्टा-

---

तर शिवशास्त्रांत जसें सांगितलें असेल, त्याप्रमाणें हंसन्यास करावा. (८४) नेत्र, नाक, या अवयवांवर हंसाचा विभाग करून ('हं' 'स') न्यास करावा, पुनः बाहु, नेत्र, मुख, ललाट, नाक या अवयवांवर हंसमंत्राचा विभाग करून न्यास करावा. (८५) तसेंच कक्ष (काख), स्कंध, पार्श्व, स्तन, कटि (कंबर), पाणि (हात), गुल्फ यांवरही हंसाचा न्यास करावा. किंवा पंचांगाच्या मार्गानें (पांच अवयवांच्या मार्गानें) (८६) हा हंसन्यास करून नंतर पंचाक्षरीचा न्यास करावा. पंचाक्षरन्यास करावयाची रीत पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच असून शिवत्व जसें आपल्यास येईल त्याप्रमाणें न्यास करावा. (८७) जो अशिव आहे (शिवत्व ज्याला मिळालें नाहीं), त्यानें शिवाचा अभ्यास करूं नये. जो अशिव आहे, त्यानें शिवाची पूजा करूं नये. जो अशिव असेल, त्यानें शिवाचें ध्यान करूं नये. जो अशिव असेल, त्याला शिव कधीं मिळत नाहीं. (८८) याकरितां आपलें शरीर शिवमय करून पशुत्वबुद्धि सोडून 'मी शिवच आहें' असा विचार करून शिवसंबंधीं कर्म करावें. (८९) कर्मयज्ञ, तपोयज्ञ, जपयज्ञ, ध्यानयज्ञ, ज्ञानयज्ञ उत्तरोत्तर श्रेष्ठ असे हे पांच यज्ञ होत. (९०) कांहीं लोक कर्मयज्ञ करणारे असून कांहीं लोक तपोयज्ञांत रत असतात. व कांहीं लोक जपयज्ञांत रत असून कांहीं लोक ध्यानयज्ञांत रत असतात. (९१) कांहीं लोक

श्चोत्तरोत्तरम् ॥ कर्मयज्ञो द्विधा प्रोक्तः कामाकामविभेदतः ॥९१॥ कामान्कामी ततो भुक्त्वा कामसक्तः पुनर्भवेत् ॥ अकामो रुद्रभवने भोगान्भुक्त्वा ततश्च्युतः ॥९२॥ तपोयज्ञरतो भूत्वा जायते नात्र संशयः ॥ तपस्वी च पुनस्तस्मिन्भोगान्भुक्त्वा ततश्च्युतः ॥९३॥ जपध्यानरतो भूत्वा जायते भुवि मानवः ॥ जपध्यानरतो मर्त्यस्तद्वैशिष्ट्यवशादिह ॥९४॥ ज्ञानं लब्ध्वाचिरादेव शिवसायुज्यमाप्नुयात् ॥ तस्मान्मुक्तो शिवाज्ञप्तः कर्मयज्ञोऽपि देहिनाम् ॥९५॥ अकामः कामसंयुक्तो बन्धायैव भविष्यति ॥ तस्मात्पञ्चसु यज्ञेषु ध्यानज्ञानपरो भवेत् ॥९६॥ ध्यानं ज्ञानञ्च यस्यास्ति तीर्णस्तेन भवार्णवः ॥ हिंसादिदोषनिर्मुक्तो विशुद्धश्चित्तसाधनः ॥९७॥ ध्यानयज्ञः परस्तस्मादपवर्गफलप्रदः ॥ बहिः कर्मकरा यद्वन्नातीव फलभागिनः ॥९८॥

---

ज्ञानयज्ञांत रत असतात. यांमध्यें अनुक्रमानें एकापेक्षां एक श्रेष्ठ आहेत, असें जाणावें. त्यांत कर्मयज्ञामध्यें काम्य व निष्काम असे दोन भेद आहेत. (९२) यांत काम्यकर्म करणारा जो असेल, तो पुष्कळ सुखाचा उपभोग घेऊन शेवटीं पुनः कामासक्तच होऊन जन्माला येतो. आतां निष्काम कर्म करणारा जो असेल, तो रुद्रलोकांत भोगांचा उपभोग घेऊन पुनः भ्रष्ट होऊन (९३) तपोयज्ञांत रत होऊन जन्माला येतो, यांत संशय नाहीं. तपस्वी असा योगी पुनः भोगोपभोग घेऊन पुनः भ्रष्ट होऊन (९४) जपध्यानांत रत असा मानव भूलोकांत उत्पन्न होतो ( जन्मास येतो. ) असा तो जपध्यानरत मनुष्य त्या जपध्यानाच्या योगानें या लोकांतच (९५) ज्ञान संपादन करून लौकरच शिवसायुज्याला जातो. याकरितां कर्मयज्ञ हा शिवानें मुक्तीविषयीं जरी सांगितला आहे, (९६) तथापि निष्काम कर्म करितों असा संकल्प करून, कर्म करितांना मनांत इच्छा धरून कर्म केलें तर तें कर्म बंधाला कारण होतें. याकरितां पांच यज्ञांमध्यें ध्यान व ज्ञान यांत मनुष्यानें रत व्हावें. (९७) ज्याला ध्यान व ज्ञान आहे, तो संसारसमुद्र तरलाच ह्मणून समजावें. ज्यांत हिंसा वगैरे दोष नाहींत, व जो शुद्ध असून चित्ताला आनंद देणारा आहे, (९८) असा हा ध्यानयज्ञ श्रेष्ठ असून मोक्षफळ देणारा आहे. घराच्या बाहेर काम करणाऱ्या सेवकांना जसें वि-

दृष्टा नरेन्द्रभवने तद्वदत्रापि कर्मिणः ॥ ध्यानिनां हि वपुः सूक्ष्मं भवेत्प्रत्यक्षमैश्वरम् ॥९९॥ तथेह कर्मिणां स्थूलं मृत्काष्ठाद्यैः प्रकल्पितम् ॥ ध्यानयज्ञरतास्तस्माद्देवान्पाषाणमृण्मयान् ॥१००॥ नात्यन्तं प्रतिपद्यन्ते शिवयाथात्म्यवेदनात् ॥ आत्मस्थं यः शिवं त्यक्त्वा बहिरभ्यर्चयेन्नरः ॥१०१॥ हस्तस्थं फलमुत्सृज्य लिहेत्कूर्परमात्मनः ॥ ज्ञानाद्ध्यानं भवेद्ध्यानाज्ज्ञानं भूयः प्रवर्तते ॥१०२॥ तदुभाभ्यां भवेन्मुक्तिस्तस्माद्ध्यानरतोभवेत् ॥ द्वादशान्ते तथा मूर्ध्नि ललाटे भ्रूयुगान्तरे ॥१०३॥ नासाग्रे वा तथास्ये वा कन्धरे हृदये तथा ॥ नाभौ वा शाश्वतस्थाने श्रद्धाविद्धेन चेतसा ॥१०४॥ बहिर्यागोपचारेण देवं देवीश्च पूजयेत् ॥ अथवा पूजयेन्नित्यं लिंगे वा कृतकेऽपि वा ॥१०५॥ वह्नौ वा स्थण्डिले वाथ भक्त्या वित्तानुसारतः ॥ अ-

---

शेष फळ मिळत नसून (९९) राजाच्या खासगींत काम करणाऱ्या सेवकांचें एकदम कल्याण होतें, त्याप्रमाणें ध्यानयज्ञांत रत झालेल्या लोकांचें शरीर प्रत्यक्ष ईश्वराचेंच सूक्ष्म शरीर आहे, असें जाणावें, (१००) व काम्यकर्मे करणाऱ्यांचें शरीर मृत्तिका काष्ठ यांनीं रचलेलें स्थूल शरीर आहे, असें समजावें. याकरितां ध्यानयज्ञांत रत झालेले लोक दगडमातीच्या देवांना (१०१) शरण जातच नाहींत. कारण शिवाचें यथार्थज्ञान त्यांना झालेलें असतें. आत्मस्थ ( आपल्या शरीरांत असलेल्या ) शिवाला सोडून बाहेरच्या देवाला कोण मूढ पत्करील ? (१०२) हातांत आलेलें फळ टाकून आपलें कोंपर चाटीत कोणी बसेल काय ? ज्ञानापासून ध्यानाची उत्पत्ति असून ध्यानापासून पुनः ज्ञान उत्पन्न होतें. (१०३) अशा ज्ञानध्यानापासूनच मुक्ति मिळते, याकरितां मनुष्यानें ध्यानज्ञानांत रत व्हावें. द्वादशांतीं ( बारा दलांच्या कमलांत ) मस्तक, ललाट, भिवयांचा मध्यभाग, (१०४) नासिकाग्र, मुख, गळा, हृदय, नाभि, शाश्वतस्थान यांत विश्वासयुक्त मनानें (१०५) बहिर्यागाच्या उपचारानें शिवाची व देवीची पूजा करावी. अथवा निरंतर कृत्रिमलिंगाची पूजा तरी करावी ( शिवबुद्धीनें कृत्रिमाची किंवा सहजाची पूजा करावी ). (१०६) अग्नींत, स्थंडिलावर आपल्या द्रव्याच्या

थवान्तर्बहिश्चैव पूजयेत्परमेश्वरम् ॥ अन्तर्यागरतः पूजां बहिः कुर्वीत वा न वा ॥१०६॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे दीक्षाविधानादिकथनं नामाष्टादशोऽध्यायः ॥१८॥

---

मानानें परमेश्वराची अंतःपूजा करो, किंवा बहिःपूजा करो, भक्तीनें मात्र पूजा करावी. जो अंतर्यागरत असेल, त्यानें बहिःपूजा केली तरी चालते, न केली तरी चालते.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरार्धांतील दीक्षाविधानादि कथननांवाचा अठरावा अध्याय संपला.

## अथैकोनविंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ व्याख्यां पूजाविधानस्य प्रवदामि समासतः॥ शिवशास्त्रे शिवेनैव शिवायैकथितस्य तु ॥१॥ अंगमभ्यन्तरं यागमग्निकार्यावसानकम् ॥ विधाय वा न वा पश्चाद्बहिर्यागं समाचरेत् ॥२॥ तत्र द्रव्याणि मनसा कल्पयित्वा विशोध्य च ॥ ध्यात्वा विनायकं देवं पूजयित्वा विधानतः ॥३॥ दक्षिणे चोत्तरे चैव नन्दीशं सुयशां तथा ॥ आराध्य मनसा सम्यगासनं कल्पयेद्बुधः ॥४॥ आराधनादिकैर्युक्तः सिंहयोगासनादिकम् ॥ पद्मासनं वा विमलतत्वत्रयसमन्वितम् ॥५॥ तस्योपरि शिवं ध्यायेत्साम्बं सर्वमनोहरम् ॥ सर्वलक्षणसम्पन्नं सर्वावयवशोभनम् ॥६॥ सर्वातिशयसंयुक्तं सर्वा-

---

उपमन्यु बोलला— (१) आतां संक्षेपानें पूजाविधानाची व्याख्या सांगतों. ती व्याख्या स्वतःची नसून शिवशास्त्रांत शिवानें सतीला जी व्याख्या सांगितली, तीच व्याख्या सांगतों. (२) अग्निकार्यापर्यंत सांग अंतर्याग केल्यानंतर बहिर्याग ( कर्मरूपानें बाहेर करावयाचा ) केला तरी चालतो, केला नाहीं तरी चालतो. (३) अंतर्याग कसा करावा, तो प्रकार सांगतों, त्यांत प्रथम यागाला लागणारी जी सामुग्री असेल, ती मनामध्यें कल्पनेनें सर्व आणून घ्यावी, नंतर त्या पदार्थांची शुद्धि कल्पनेनेंच करावी, मग गणपतीचें ध्यान करून विधानोक्त त्याची पूजा करावी. (४) त्याच्या उजवीकडे व डावीकडे नंदीशाची व सुयशा देवीची मनानें चांगली आराधना करून बुद्धिमानानें मग आसनाची कल्पना करावी. (५) आराधना वगैरे कर्म केल्यानंतर सिंहासन, योगासन वगैरे आसनांची कल्पना करावी, किंवा पद्मासनाची तरी कल्पना करावी. तें आसन निर्मळ अशा तीन तत्वांनीं युक्त असलें पाहिजे, (६) अशा त्या आसनावर चोहोंकडून सुंदर अशा शिवाचें व सतीचें ध्यान करावें. ती शिवाची मूर्ति अशी असावी, कीं, शास्त्रोक्त सर्व लक्षणांनीं युक्त असून सर्व अवयवांनीं सुंदर दिसत असावी. (७) जगांत अतिशय ह्मणून काय आहे, त्या अतिशयानें ती मूर्ति युक्त असून सर्वांगावर दागिने घातलेले असावेत, त्या मूर्तीचे पाय, हात, मुख हे तांबडे अ-

भरणभूषितम् ॥ रक्तास्यपाणिचरणं कुन्दमन्दस्मिताननम् ॥७॥ शुद्धस्फटिकसङ्काशं फुल्लपद्मविलोचनम् ॥ चतुर्भुजमुदारांगं चारुचन्द्रकलाधरम् ॥८॥ वरदाभयहस्तञ्च मृगटङ्कधरं हरम् ॥ भुजंगहारवलयं चारुनीलगलान्तरम् ॥ सर्वोपमानरहितं सानुगं सपरिच्छदम् ॥९॥ ततः सञ्चिन्तयेत्तस्य वामभागे महेश्वरीम् ॥ प्रफुल्लोत्पलपत्राभां विस्तीर्णायतलोचनाम् ॥१०॥ पूर्णचन्द्राभवदनां नीलकुञ्चितमूर्द्धजाम् ॥ नीलोत्पलदलप्रख्यां चन्द्रार्द्धकृतशेखराम् ॥११॥ अतिवृत्तघनोत्तुंगस्निग्धपीनपयोधराम् ॥ तनुमध्यां पृथुश्रोणीं पीतसूक्ष्मवराम्बराम् ॥१२॥ सर्वाभरणसम्पन्नां ललाटतिलकोज्वलाम् ॥ वि-

---

सून कुंदाच्या फुलाप्रमाणें ती मूर्ति मंदहास्य करीत असावी, व (८) शुद्ध स्फटिक मण्याप्रमाणें तिची कांति असून उमललेल्या कमळाप्रमाणें तिचे डोळे असावेत, त्या मूर्तीला चार हात असून उत्कृष्ट अंग असावें, व तिच्या डोकीवर सुंदर चंद्रकला असावी, (९) आणि त्या मूर्तीचा एक हात वरदचिन्हाचा असून दुसरा हात अभयचिन्हाचा केलेला असावा. तिसऱ्या हातांत मृगचिन्ह असून चौथ्या हातांत टंकनांवाचें ( टांकी ) आयुध असावें. व गळ्यांत भुजंगाचा हार असून मनगटांत भुजंगाचें केलेलें कडें असावें, आणि त्या मूर्तीचा गळा निळ्या रंगाचा असून तिला ( मूर्तीला ) जगांत दुसरी उपमाच सांपडूं नये, अशी ती मूर्ति असावी. शिवाय त्या मूर्तीच्या भोंवतीं अनुचर उभे केले असून तिची इतर सामुग्री जी असेल, ती त्या मूर्तीजवळ ठेविलेली असावी. (१०) अशा मूर्तीची कल्पना आसनावर करून तिच्या डाव्या भागाकडे महेश्वरीची कल्पना करावी. ती महेश्वरी अशी असावी, कीं, विकासित नीलकमलाच्या कांतीप्रमाणें तिचे डोळे असून ते विस्तीर्ण व दीर्घ असावेत. (११) तिचें मुख पूर्ण चंद्रमंडलाप्रमाणें असून तिचे केश काळेभोर असून किंचित् कुरळ असावेत, तिची कांति नीलकमळासारखी असून वेणीवर चंद्राची कोर धरिलेली असावी. (१२) तिचे स्तन सुरेख वर्तुलाकृति असून उंच दाट व पुष्ट असावेत, तिची कंबर सूक्ष्म असून ढुंगण फार मोठें असावें, व तिनें हळदीच्या रंगाचें बारीक रेशमाचें श्रेष्ठ वस्त्र नेसलेलें असावें, (१३) अंगावर सर्व तऱ्हेचे डागिने घातलेले अ-

चित्रपुष्पसंकीर्णकेशपाशोपशोभिताम् ॥१३॥ सर्वतोऽनुगुणाकारां किंचिल्लज्जायितान्नाम् ॥ हेमारविन्दं विकसद्दधानां दक्षिणे करे ॥१४॥ दण्डवच्चापरं हस्तं न्यस्यासीनां महासने ॥ पाशविच्छेदिकां साक्षात्सच्चिदानन्दरूपिणीम् ॥१५॥ एवं देवंच देवींच ध्यात्वासनवरे शुभे ॥ सर्वोपचारवद्भक्त्या भावपुष्पैः समर्चयेत् ॥१६॥ अथवा परिकल्प्यैवं मूर्तिमन्यतमां विभोः ॥ शैवीं सदाशिवाख्यां वा तथा माहेश्वरीं पराम् ॥१७॥ षड्विंशकाभिधानां वा श्रीकण्ठाख्यामथापि वा ॥ मन्त्रन्यासादिकञ्चापि कृत्वा स्वस्यां तनौ यथा ॥१८॥ अस्यां मूर्तौ मूर्तिमन्तं शिवं सदसतः परम् ॥ ध्यात्वा बाह्यक्रमेणैव पूजां निर्वर्तयेद्धिया ॥१९॥ समिदाज्यादिभिः पश्चान्नाभौ होमञ्च भावयेत् ॥ भ्रूमध्ये च शिवं ध्यायेच्छुद्धदीपशिखाकृतिम् ॥२०॥ इत्थम-

---

सून कपाळावर बारीक तिलक ( कुंकू ) लाविलेला असावा, व तिच्या वेणींत चित्रविचित्र फुलांची माळ घातलेली असावी. (१४) चोहोंकडून तिची आकृति योग्य तऱ्हेची असून किंचित् लज्जेची झांक तोंडावर दिसत असावी, व तिनें आपल्या उजव्या हातांत सोन्याचें उमललेलें कमळ धरिलेलें असावें. (१५) व दुसऱ्या हातांत दंड धरिलेला असून तो हात ठेवून मोठ्या सिंहासनावर ती बसलेली असावी, आणि ती पाश छेदणारी असून तिचें रूप चिदानंदात्मक असावें. (१६) अशी ती देवी कल्पनेनें मनांत आणून तिचें ध्यान करावें, व त्या शुभ आसनावर सर्व उपचारांनीं भक्तीनें भावनारूप फुलांनीं तिची पूजा करावी. (१७) अथवा श्रीशंकराची दुसरी शक्ति तरी मनांत कल्पनेनें आणून पूजा करावी. दुसरी शक्ति ह्मणजे शैवी, सदाशिवा, माहेश्वरी, परा, (१८) सव्वीस नांवाची श्रीकंठा इत्यादि शक्तींपैकीं एक शक्तीची कल्पना करावी. नंतर आपल्या शरीरावर मंत्रन्यासादि कर्म करून (१९) या मूर्तीच्या ठिकाणीं सदसत्पदार्थों पलीकडे असणाऱ्या मूर्तिमंत शिवाची योजना करून बाह्यक्रमानें मनांतच बुद्धीच्या योगानें शिवाची पूजा करावी. (२०) नंतर समिधा, आज्य वगैरे पदार्थांची कल्पना करून आपल्या नाभींत होमाची कल्पना करावी ( होम करावा ); नंतर भिवयांमध्यें दीपकलिकेच्या आकृती एवढ्या शिवाचें ध्यान करावें. (२१) याप्रमाणें आ-

ङ्गे स्वतन्त्रे वा योगे ध्यानमये शुभे ॥ अग्निकार्यावसानञ्च सर्वश्चैष समो विधिः ॥२१॥ अथ चिंतामयं सर्वं समाप्याराधनक्रमम् ॥ लिङ्गे च पूजयेद्देवं स्थण्डिले वानलेऽपि वा ॥२२॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे एकोनविंशोऽध्यायः ॥१९॥

---

पल्या स्वतंत्र शरीरांत किंवा ध्यानमय योगांत अग्निकार्यापर्यंत सर्व कर्माची कल्पना करावी, असा हा सर्व विधि आहे. (२२) नंतर कल्पनामय सर्व कर्म समाप्त करून व आराधनेचा क्रम संपवून लिंगांत, स्थंडिलांत, अग्नींत तरी श्रीशिवाची पूजा करावी.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील एकोणविसावा अध्याय संपला.

## अथ विंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ प्रोक्षयेन्मूलमन्त्रेण पूजास्थानं विशुद्धये ॥ गन्धचन्दनतोयेन पुष्पं तत्र विनिक्षिपेत् ॥१॥ अस्त्रेणोत्सार्य वै विघ्नानवगुण्ठ्य च वर्मणा ॥ अस्त्रं दिक्षु प्रविन्यस्य कल्पयेदर्चनाभुवम् ॥२॥ तत्र दर्भान्परिस्तीर्य क्षालयेत्प्रोक्षणादिभिः ॥ संशोध्य सर्वपात्राणि द्रव्यशुद्धिं समाचरेत् ॥३॥ प्रोक्षणीमर्घ्यपात्रञ्च पाद्यपात्रमतःपरम् ॥ तथैवाचमनीयस्य पात्रंचेति चतुष्टयम् ॥४॥ प्रक्षाल्य प्रोक्ष्य वीक्ष्याथ क्षिपेत्तेषु जलं शिवम् ॥ पुण्यद्रव्याणि सर्वाणि यथालाभं विनिक्षिपेत् ॥५॥ रत्नानि रजतं हेमगन्धपुष्पाक्षतादयः ॥ फलपल्लवदर्भाश्च पुण्यद्रव्याण्यनेकधा ॥६॥ स्नानोदके सुगन्धादि पानीये च विशेषतः ॥ शीतलानि मनोज्ञानि कुसुमादीनि निक्षिपेत् ॥७॥ उशीरं चन्दनंचैव पाद्ये तु परिकल्पयेत् ॥ जातिकंकोलकर्पूरबहुमूलतमालकान् ॥८॥ क्षिपेदाचमनीये च चूर्णयित्वा विशेषतः ॥ एलां सर्वेषु

---

उपमन्यु बोलला— (१) पूजेचें स्थल शुद्ध व्हावें ह्मणून मूलमंत्रानें प्रोक्षण करावें, नंतर सुगंधयुक्त चंदनाचें पाणी त्यावर शिंपडून वर फूल टाकावें. (२) नंतर अस्त्रानें सर्व विघ्नाचें निवारण करून वर कवचानें अवगुंठन ( आच्छादन ) करून सर्व दिशांमध्यें अस्त्रन्यास करून पूजाभूमीची कल्पना करावी. (३) त्या भूमीवर दर्भ आंथरून प्रोक्षण वगैरे करून दर्भ प्रक्षालन करावें ( धुवावें ). नंतर सर्व पात्रांची शुद्धि करून द्रव्यशुद्धि करावी. (४) प्रोक्षणी, अर्घ्यपात्र, पाद्यपात्र, आचमनीयपात्र हीं चारी पात्रें (५) स्वच्छ धुवून वर प्रोक्षण करावें. नंतर पुनः पाहून त्यांवर पाणी टाकावें, जितकीं पुण्यद्रव्यें मिळालीं असतील, तितकीं द्रव्यें पूजास्थानांत ठेवावीं. (६) रत्न, रुपें, सोनें, गंध, पुष्प, अक्षता वगैरे, फल, पत्र, दर्भ वगैरे हींच पुण्यद्रव्यें होत. (७) स्नानाच्या पाण्यांत व विशेषेंकरून पिण्याच्या पाण्यांत सौगंधिक पदार्थ, थंड पदार्थ, सुंदर फुलें वगैरे टाकावींत. (८) वाळा चंदन पाद्यामध्यें टाकावे, जायफळ, कंकोळ, कापूर, बहुमूल, तमाल (९) वगैरेंचें चूर्ण करून विशेषतः आचमनीय पात्रांत टाकावें, व वे-

पात्रेषु कर्पूरं चन्दनं तथा ॥९॥ कुशाग्राण्यक्षतांश्चैव यवव्रीहितिलानपि ॥ आज्यसिद्धार्थपुष्पाणि भसितश्चार्घ्यपात्रके ॥१०॥ कुशपुष्पयवव्रीहिबहुमूलतमालकान् ॥ प्रक्षिपेत्प्रोक्षणीपात्रे भसितंच यथाक्रमम् ॥११॥ सर्वत्र मन्त्रं विन्यस्य वर्मणावेष्ट्य बाह्यतः ॥ पश्चादस्त्रेण संरक्ष्य धेनुमुद्रां प्रदर्शयेत् ॥१२॥ पूजाद्रव्याणि सर्वाणि प्रोक्षणीपात्रवारिणा ॥ सम्प्रोक्ष्य मूलमन्त्रेण शोधयेद्विधिवत्ततः ॥१३॥ पात्राणां प्रोक्षणीमेकामलाभे सर्वकर्मसु ॥ साधयेदर्घ्यमद्भिस्तत्सामान्यं साधकोत्तमः ॥१४॥ ततो विनायकं देवं भक्ष्यभोज्यादिभिः क्रमात् ॥ पूजयित्वा विधानेन द्वारपार्श्वेऽथ दक्षिणे ॥१५॥ अन्तःपुराधिपं साक्षान्नन्दिनं सम्यगर्चयेत् ॥ चामीकराचलप्रख्यं सर्वाभरणभूषितम् ॥१६॥ बालेन्दुमुकुटं सौम्यं त्रिनेत्रं च चतुर्भुजम् ॥ दीप्त-

---

लदोडे सर्व पात्रांत टाकावे. कापूर, चंदन, (१०) कुशाचे अग्र, अक्षता, यव, व्रीहि, तिल, आज्य, सिद्धार्थ ( अक्षता ), फुलें, भस्म इत्यादि पदार्थ अर्घ्यपात्रांत टाकावे. (११) कुश (दर्भ), पुष्प, यव (जव), व्रीहि (तांदूळ), बहुमूल, तमाल यांचें चूर्ण व भस्म क्रमानें प्रोक्षणीपात्रांत टाकावें. (१२) सर्व पात्रांत मंत्राचा न्यास करून बाहेरच्या भागाला कवचाचें वेष्टन करून नंतर अस्त्रानें रक्षण करून नंतर धेनुमुद्रा दाखवावी. (१३) मग प्रोक्षणी पात्रांतल्या उदकानें सर्व पूजाद्रव्यांवर प्रोक्षण करून मूलमंत्रानें संप्रोक्षण करून विधिपूर्वक त्यांची शुद्धि करावी. (१४) पात्रामध्यें प्रोक्षणीपात्र हें मुख्य आहे, हें जर मिळालें नाहीं, तर साधक श्रेष्ठानें सर्व कर्मामध्यें अर्घ्य पात्रांतल्या उदकाची योजना करावी. परंतु हें अर्घ्यपात्र सामान्यांत गणिलें गेलें आहे. (१५) नंतर भक्ष्य, भोज्य वगैरे पदार्थांनीं क्रमानें विनायक देवाची ( गणपतीची ) पूजा करून ( विधानपूर्वक गणपतीची पूजा करून ) उजव्या द्वाराच्या पार्श्व भागांत (१६) अंतःपुराचा जो स्वामी नंदी आहे, त्या साक्षात् नंदीची पूजा चांगली करावी. नंतर सोन्याच्या पर्वताप्रमाणें जो शोभतो, व ज्याच्या अवयवांवर सर्व आभरणें आहेत, (१७) बालचंद्र ज्याच्या डोक्यावर आहे, व जो सौम्य असून तीन डोळे ज्याला आहेत, व ज्याला चार बाहु असून चारी हातांत अनुक्रमानें प्रज्वलित शूल, मृगी,

शूलमृगीटंकतिग्मवेत्रधरं प्रभुम् ॥१७॥ चन्द्रबिम्बाभवदनं हरिवक्रमथापि वा ॥ उत्तरे द्वारपार्श्वस्य भार्यां च मरुतां सुताम् ॥१८॥ सुयशां सुव्रतामम्बापादमण्डनतत्पराम् ॥ पूजयित्वा प्रविश्यान्तर्भवनं परमेष्ठिनः ॥१९॥ सम्पूज्य लिङ्गं तैर्द्रव्यैर्निर्माल्यमपनोदयेत् ॥ प्रक्षाल्य पुष्पं शिरसि न्यसेत्तस्य विशुद्धये ॥२०॥ पुष्पहस्तो जपेच्छक्त्या मन्त्रं मन्त्रविशुद्धये ॥ ऐशान्यां चण्डमाराध्य निर्माल्यं तस्य दापयेत् ॥२१॥ कल्पयेदासनं पश्चादाधारादि यथाक्रमम् ॥ आधारशक्तिं कल्याणीं श्यामां ध्यायेदथो भुवि ॥२२॥ तस्याः पुरस्तादुत्कण्ठमनन्तं कुण्डलाकृतिम् ॥ धवलं पञ्च फणिनं लेलिहानमिवाम्बरम् ॥२३॥ तस्योपर्यासनं भद्रं कण्ठीरवचतुष्पदम् ॥ धर्मो ज्ञानं च

---

टंक, तीक्ष्णवेत अशीं चार आयुधें आहेत, व जो प्रभु ह्मणवितो, (१८) व चंद्रबिंबाच्या कांतीप्रमाणें ज्याच्या मुखाची कांति आहे, किंवा सिंहाप्रमाणें ज्याचें मुख आहे, अशा पुरुषाची व त्याची भार्या जी मरुद्गणाची मुलगी, तिची पूजा द्वारपार्श्वाच्या उत्तरभागीं करावी. (१९) अंबेचें पादमंडन करण्यांत जी तत्पर असून जी उत्तम व्रत करणारी आहे, अशा सुयशादेवीची पूजा करून शिवाच्या अंतर्मंदिरांत (गाभाऱ्यांत) प्रवेश करावा. (२०) तेथें त्या द्रव्यांनीं लिंगाची पूजा करून निर्माल्य बाहेर काढावें. मग प्रक्षालन करून त्याच्या डोक्यावर त्याच्या शुद्धीकारितां एक फूल ठेवावें. (२१) नंतर हातांत फूल घेऊन मंत्रशुद्धी होण्याकरितां शक्त्यनुसार मंत्राचा जप करावा. ईशान्य दिशेला चंडाची आराधना करून त्याला शिवाचें निर्माल्य द्यावें ( ईशान्येकडे शिवनिर्माल्य फेंकून द्यावें ). (२२) नंतर क्रमानें आधारादि आसन घालावें. प्रथम भूमीवर कल्याणकारक श्यामवर्णाच्या आधारशक्तीचें ध्यान करावें. (२३) नंतर ज्याचा गळा वर असून ज्याचा आकार कुंडलासारखा आहे, व शुभ्र असून पांच फडा ज्याला आहेत, व जो आकाशाला चाटतो, कीं, काय ? असा दिसतो, अशा त्या अनंताचें ध्यान तिच्यापुढें करावें ( तिच्यापुढें अनंत आहे, अशी कल्पना करावी ). (२४) त्या शेषावर सिंहाचें आसन घातलें आहे, अशी कल्पना करून धर्म, ज्ञान, वैरा-

वैराग्यमैश्वर्यं च पदानि वै ॥२४॥ आग्नेयादिश्वेतरक्तपीतश्यामानि वर्णतः ॥ अधर्मादीनि पूर्वादीन्युत्तरान्तान्यनुक्रमात् ॥२५॥ राजावर्तमणिप्रख्यान्यस्य गात्राणि भावयेत् ॥ अस्योर्ध्वच्छादनं पद्मासनं विमलं सितम् ॥२६॥ अष्टपत्राणि तस्याहुरणिमादिगुणाष्टकम् ॥ केशराणि च वामाद्यारुद्रावामादिशक्तिभिः ॥२७॥ वीजान्यपि च ता एव शक्तयोऽन्तर्मनोन्मनी ॥ कर्णिकापरवैराग्यं नालं ज्ञानं शिवात्मकम् ॥२८॥ कन्दश्च शिवधर्मात्मा कर्णिकान्ते त्रिमण्डले ॥ त्रिमण्डलोपर्यात्मादितत्वत्रितयमासनम् ॥२९॥ सर्वासनोपरि सुखं विचित्रास्तरणास्तृतम् ॥ आसनं कल्पयेद्दिव्यं शुद्धविद्यासमुज्वलम् ॥३०॥ आवाहनं स्थापनं च सन्निरोधं निरीक्षणम् ॥ नमस्कारं च कुर्वीत बद्ध्वा मुद्रां पृथक्पृथक् ॥३१॥ पाद्यमाचमनञ्चार्घ्यं गन्धं पुष्पं ततःप-

---

ग्य, ऐश्वर्य हे चार पाय त्या सिंहाचे आहेत, अशी भावना करावी. (२५) त्याचा वर्ण आग्नेयादि दिशांच्या क्रमानें पांढरा, तांबडा, पिंवळा, निळा असा आहे, अशी कल्पना करून पूर्वादि उत्तरापर्यंत अधर्मादिकांची कल्पना करावी. (२६) त्याचे अवयव राजावर्त नांवाच्या मण्याप्रमाणें आहेत, अशी भावना करून, त्याच्यावर ( सिंहावर ) निर्मळ शुभ्र कमळ हें आसनरूपानें आहे, अशी कल्पना करावी. (२७) त्या कमळाचें पान अणिमादि आठगुणच आहेत, असें सांगतात, त्या पद्माचें केसर वामादि शक्तींसह वामादि रुद्रच आहेत, असें सांगतात. (२८) आणि त्याचें बीज त्या शक्तीच आहेत. त्या पद्माची कर्णिका मनोन्मनी नांवाची शक्ति असून त्याचा नाल, श्रेष्ठ वैराग्यानें युक्त शिवाचें ज्ञान होय. (२९) त्याचा कांदा शिवाचा धर्मच आहे. अशा पद्माच्या कर्णिकेच्या त्रिमंडलावर आत्मादि तीन तत्वांचें आसन आहे, अशी भावना करावी. (३०) अशा सर्व आसनावर सुखकर आस्तरण पसरलेलें आहे, अशी भावना करून, त्यावर शुद्धविद्येनें प्रकाशमान अशा, दिव्य आसनाची कल्पना करावी. (३१) नंतर त्या आसनावर आवाहन, स्थापन, सन्निरोध, निरीक्षण, वगैरे हीं निरनिराळ्या मुद्रा दाखवून करावींत. (३२) पाद्य, आचमन, अर्घ्य, गंध, पुष्प, धूप, दीप, तांबूल वगैरे

रम् ॥ धूपं दीपं च ताम्बूलं दत्वाथ स्नापयेच्छिवौ ॥३२॥ अथवा परिकल्प्यैवमासनं मूर्तिमेव च ॥ सकलीकृत्य मूलेन ब्रह्मभिश्चापरैस्तथा ॥३३॥ आवाहयेत्ततो देव्या शिवं परमकारणम् ॥ शुद्धस्फटिकसङ्काशं देवं निश्चलमक्षरम् ॥३४॥ कारणं सर्वलोकानां सर्वलोकमयं परम् ॥ अन्तर्बहिःस्थितं व्याप्य अणोरणु महत्तरम् ॥३५॥ भक्तानामप्रयत्नेन दृश्यमीश्वरमव्ययम् ॥ ब्रह्मेन्द्रविष्णुरुद्राद्यैरपि देवैरगोचरम् ॥३६॥ वेदसारञ्च विद्वद्भिरगोचरमिति श्रुतम् ॥ आदिमध्यान्तरहितं भेषजं भवरोगिणाम् ॥३७॥ शिवतत्वमिति ख्यातं शिवार्थं जगति स्थितम् ॥ पञ्चोपचारवद्भक्त्या पूजयेल्लिङ्गमूर्द्धनि ॥३८॥ लिंगमूर्तिर्महेशस्य शिवस्य परमात्मनः ॥ स्नानकाले प्रकुर्वीत जयशब्दादिमंगलम् ॥३९॥ पञ्चगव्यघृतक्षीरदधिमध्वादिपूर्वकैः ॥ फलैः फ-

---

शिवाला व सतीला देऊन मग त्यांना स्नान घालावें. (३३) अथवा आसनाची व मूर्तीची व कलांची कल्पना करून नंतर मूलमंत्रानें, पंचब्रह्ममंत्रांनीं, किंवा इतर मंत्रांनीं (३४) शुद्ध स्फटिकाप्रमाणें ज्याची कांति असून जो नाशरहित आहे, व जो निश्चल असून परमकारण आहे, अशा शिवाचें देवीसहित आवाहन करावें. (३५) जो शिव सर्व लोकांना कारण असून सर्व लोकांत व्याप्त होऊन राहिला आहे, ज्याला श्रेष्ठ असें ह्मणत असून जो आंत बाहेर व्याप्त होऊन राहिला आहे, आणि अणुपदार्थांपेक्षां अणु असून मोठ्यांपेक्षां मोठा आहे, (३६) व भक्तांना अनायासें दिसणारा असून जो सर्वांचा ईश्वर आहे, व ज्याला अव्यय ह्मणत असून जो ब्रह्मा, इंद्र, विष्णु, रुद्र या देवांनाही दिसत नाहीं, (३७) जो वेदाचा सार असून विद्वानांनाही अगोचर आहे, असें ऐकिलें आहे, व ज्याला आदि, मध्य, अंत नसून भवरोगाला जो औषध आहे, (३८) अशा देवाला शिवतत्व ह्मणत असून तो जगाच्या कल्याणाकरितां जगांत राहिला आहे. अशा शिवतत्वाची लिंगाच्या मस्तकावर भक्तीनें पंचोपचार पूजा करावी. (३९) लिंगमूर्ति ही महेश, परमात्मा शिवाचीच आहे. त्याच्या अभिषेकाच्या वेळेस जयजयकार वगैरे मंगल शब्दांचा घोष करावा. (४०) पंचगव्य, घृत, क्षीर,

लानां सारैश्च तिलसर्षपसक्तुभिः ॥४०॥ वीजैर्यवादिभिः शस्तैश्चूर्णैर्माषादिसंभवैः ॥ संस्नाप्यालिप्य पिष्टाद्यैः स्नापयेदुष्णवारिभिः ॥४१॥ घर्षयेद्विल्वपत्राद्यैर्लेपगन्धापनुत्तये ॥ पुनः संस्नाप्य सलिलैश्चक्रवर्त्युपचारतः ॥४२॥ सुगन्ध्यामलकं दद्याद्धरिद्रांच यथाक्रमम् ॥ ततः संशोध्य सलिलैर्लिंगंबेरमथापि वा ॥४३॥ स्नापयेद्गन्धतोयेन कुशपुष्पोदकेन च ॥ हिरण्यरत्नतोयैश्च मन्त्रसिध्दैर्यथाक्रमम् ॥४४॥ असम्भवे तु द्रव्याणां यथासम्भवसम्भृतैः ॥ केवलैर्मन्त्रतोयैर्वा स्नापयेच्छ्रध्दया शिवम् ॥४५॥ कलशेनाथ शंखेन वर्ध्दन्या पाणिना तथा ॥ सकुशेन सपुष्पेण स्नापयेन्मन्त्रपूर्वकम् ॥४६॥ पवमानेन रुद्रेण नीलेन त्वरितेन च ॥ लिंगसूक्तादिसूक्तैश्च शिरसाथर्वणेन च ॥४७॥ ऋग्भिश्च सामभिःशैवैर्ब्रह्मभिश्चापि पंचभिः ॥

---

दहीं, मध वगैरे; फल, फलांतलें सार, तीळ, मोहऱ्या, सक्तु (सातु), (४१) यव वगैरे बीज, प्रशस्त असें उडीद वगैरे धान्यांचें पीठ इत्यादि पदार्थांनीं स्नान घालून पिठांनीं वर घासून उष्णोदकानें अभिषेक घालावा. (४२) नंतर लेप, गंध वगैरे जाण्याकरितां बिल्वपत्रांनीं उजळावें. नंतर पुनः चक्रवर्ति राजाच्या उपचारांप्रमाणें उदकाचा अभिषेक करावा. (४३) नंतर सुगंधि, व आमलक ( आंवळा ) देऊन क्रमानें हळद द्यावी ( यांनीं घासावे ). असें शुद्ध करून पाण्यानें पुनः स्नान घालून पुनः लिंगाला, किंवा बेराला (४४) गंधोदकानें, कुशपुष्पमिश्र केलेल्या उदकानें, सोनें व रत्न मिसळलेल्या पाण्यानें, मंत्रसिद्ध उदकानें क्रमाला अनुसरून अभिषेक घालावा. (४५) कांहीं द्रव्यें जरी मिळालीं नाहींत, तरी जितकीं मिळतील तितक्या द्रव्यांनीं मिश्र केलेल्या पाण्यानें किंवा नुसत्या मंत्रोदकानें ( मंत्रानें अभिमंत्रण केलेल्या उदकानें ) शिवाला श्रद्धापूर्वक स्नान घालावें. (४६) कलश, शंख, वर्द्धनी ( मडके ), हस्त यांपैकीं कशानें तरी कुश व पुष्प पाण्यांत मिसळून त्या पाण्याचा अभिषेक मंत्र ह्मणत घालावा. (४७) अभिषेकाच्या वेळेस पवमान, रुद्र, नील, त्वरित, लिंगसूक्त, अथर्वणशीर्ष, (४८) ऋग्वेद, सामवेद, शैवमंत्र, पंचब्रह्ममंत्र, शुभ असा प्रणव यांपैकीं कोणत्यातरी मंत्रा-

स्नापयेद्देवदेवेशं शिवेन प्रणवेन च ॥४८॥ यथा देवस्य देव्याश्च कुर्यात्स्नानादिकं तथा ॥ न तु कश्चिद्विशेषोऽस्ति तत्र तौ सदृशौ यतः ॥४९॥ प्रथमं देवमुद्दिश्य कृत्वा स्नानादिकाः क्रियाः ॥ देव्यै पश्चात्प्रकुर्वीत देवदेवस्य शासनात् ॥५०॥ अर्द्धनारीश्वरे पूज्ये पौर्वापर्यंच विद्यते ॥ तत्र तत्रोपचाराणां लिंगे वान्यत्र वा क्वचित् ॥५१॥ कृताभिषेकं लिंगाद्यं शुचिना च सुगन्धिना ॥ संमृज्य वाससा दद्यादम्बरश्चोपवीतकम् ॥५२॥ पाद्यमाचमनश्चार्घ्यं गन्धपुष्पश्च भूषणम् ॥ धूपं दीपश्च नैवेद्यं पानीयं मुखशोधनम् ॥५३॥ पुनश्चाचमनीयश्च मुखवासं ततः परम् ॥ मुकुटश्च शुभं भद्रं सर्वरत्नैरलंकृतम् ॥५४॥ भूषणानि विचित्राणि माल्यानि विविधानि च ॥ अञ्जनं चामरं छत्रं तालवृन्तश्च दर्पणम् ॥५५॥ दत्वा नीराजनं कुर्यात्सर्वमंगलनिस्वनैः ॥ गीतनृत्यादिभिश्चैव जयशब्दसमन्वितैः ॥५६॥ हैमे च

---

नें देवाधिदेवाला अभिषेक घालावा. (४९) जसें शिवाला स्नान घालावें लागतें, तद्वत् देवीलाही घालावें. कारण पूजासमयी ते समान (सारिखे) आहेत. त्यांच्यांत थोडा देखील भेद नाहीं. (५०) प्रथम शिवाला उद्देशून स्नानादि क्रिया करून देवीला मागाहून स्नानादि घालावें. याला कारण शिवानें स्वतः सांगितलें आहे. (५१) पूज्य अशा अर्धनारीनरेश्वरामध्यें पूर्वापर भाव दिसतच आहे, अथवा दुसरीकडे लिंगादिकाच्या ठिकाणीं पूर्वापरभाव जेथें जेथें दिसेल, तेथें तेथें उपचारांमध्येंही पूर्वापरभाव करावा. (५२) लिंगादिकांचा अभिषेक झाल्यानंतर शुद्ध सौगंधिक पदार्थांचा लेप देऊन वस्त्र उपवीत (सूत्र) वगैरे अर्पण करावें. (५३) नंतर पाद्य, आचमन, अर्घ्य, गंध, पुष्प, भूषण, धूप, दीप, नैवेद्य, पानीय, मुखशोधन, (५४) पुनः आचमन, मुखवास वगैरे क्रमानें अर्पण करावेत, नंतर सर्व रत्नांनीं सुशोभित केलेला मंगलकर मुकुट शिवाच्या डोक्यावर घालून (५५) चित्रविचित्र अलंकार अंगावर घालावे. मग अनेक तऱ्हेच्या माळा अंजन, चामर, छत्र, ताडाचे पंखे, आरसा वगैरे अर्पण करावेत. (५६) नंतर मंगलवाद्यांच्या घोषामध्यें शिवाला नीराजन करून गायन, नर्तन, वादन, जयघोष वगैरे देवापुढें करावें. (५७) सोनें, रुपें, ताम्र, यांपैकीं कशाच्या तरी पात्रांत, निदान मातीच्या

राजते ताम्रे पात्रे वा मृण्मये शुभे ॥ पद्मकैः शोभितैः पुष्पैर्बीजैर्दध्यक्षतादिभिः ॥५७॥ त्रिशूलशंखयुग्माब्जनन्द्यावर्तैः करीषजैः ॥ श्रीवत्सस्वस्तिकादर्शवज्रैर्वह्न्यादिचिह्नितैः ॥५८॥ अष्टौ प्रदीपान्परितो विधायैकन्तु मध्यतः ॥ तेषु वामादिकाश्चिन्त्याः पूज्याश्च नवशक्तयः ॥५९॥ कवचेन समाच्छाद्य संरक्ष्यास्त्रेण सर्वतः ॥ धेनुमुद्रां च सन्दर्श्य पाणिभ्यां पात्रमुद्धरेत् ॥६०॥ अथवारोपयेत्पात्रे पंचदीपान्यथाक्रमम् ॥ विदिक्ष्वपि च मध्ये च दीपमेकमथापि वा ॥६१॥ ततस्तत्पात्रमुध्दृत्य लिङ्गादेरुपरि क्रमात् ॥ त्रिःप्रदक्षिणयोगेन भ्रामयेन्मूलविद्यया ॥६२॥ दद्यादर्घ्यं ततो मूर्ध्नि भसितं च सुगन्धितम् ॥ कृत्वा पुष्पांजलिं पश्चादुपहारान्निवेदयेत् ॥६३॥ पानीयं च ततो दद्याद्दत्वाचाचमनं पुनः ॥ पंचसौगन्धिकोपेतं ताम्बूलं च निवेदयेत् ॥६४॥ प्रोक्षयेत्प्रोक्षणीयानि गाननाट्यादि कारयेत् ॥ लिंगादौ शिवयोश्चिन्तां कृत्वा शक्त्या जपेच्छिवम् ॥६५॥ प्रदक्षिणं प्रणामं च

---

पात्रांत सुशोभित पद्मक, बीज, पुष्प, दधि, अक्षता वगैरे घालून शिवाला आरती करावी. (५८) त्रिशूल, शंखयुग्म, अब्ज, नंद्यावर्त, करीषज, श्रीवत्स, स्वस्तिक, आदर्श, वज्र वगैरे चिन्हें पात्रावर लिहून (५९) आठ दीप सभोंवती करून मध्यें एक दीप करून त्यांमध्यें पूज्य अशा वामादि नव शक्तींची भावना करून (६०) कवचानें आच्छादन करून चोहोंकडून अस्त्राचें रक्षण वांधून धेनुमुद्रा दाखवून दोन्ही हातानें तें पात्र उचलावें. (६१) अथवा पात्रांत पांच दीप क्रमानें ठेवून ( विदिशांमध्यें चार, मध्यें एक, असे पांच दीप ठेवून ) (६२) नंतर तें पात्र उचलून क्रमानें लिंगादिकांवर तीन प्रदक्षणेच्या क्रमानें तोंडानें मूलमंत्र ह्मणत ओवाळावें. (६३) नंतर अर्घ्य देऊन मस्तकाला सुगंध भस्म लावून पुष्पांजली द्यावी, नंतर उपहाराचा नैवेद्य दाखवावा. (६४) नंतर पानीय देऊन पुनः आचमन देऊन पांच सुगंध पदार्थांनीं युक्त तांवूल निवेदन करावें. (६५) नंतर प्रोक्षणीय स्थलावर प्रोक्षण करून गायन नर्तन वगैरे करावे. लिंगादिकांच्या ठिकाणीं शिवसतीचें ध्यान करून शक्त्यनुसार शिवमंत्राचा जप करावा. (६६) नंतर प्रदक्षिणा, प्रणाम, स्तोत्र, आत्मसमर्पण, विज्ञापन वगैरे करावे, नंतर विन-

स्तवं चात्मसमर्पणम् ।। विज्ञापनं च कार्याणां कुर्याद्विनयपूर्वकम् ॥६६॥ अर्घ्यं पुष्पांजलिं दत्वा बद्धा मुद्रां यथाविधि ।। पश्चात्क्षमापयेद्देवमुद्वास्यात्मनि चिन्तयेत् ॥६७॥ पाद्यादिमुखवासान्तमर्घ्याद्यं चातिसङ्कटे ।। पुष्पनिक्षेपमात्रं वा कुर्याद्भावपुरःसरम् ॥६८॥ तावतैव परो धर्मो भावेन सुकृतो भवेत् ।। असम्पूज्य न भुञ्जीत शिवमाप्राणसंचरात् ॥६९॥ यदि पापस्तु भुञ्जीत स्वैरं तस्य न निष्कृतिः ॥ प्रमादेन तु भुक्तं चेत्तदुद्गीर्य प्रयत्नतः ॥७०॥ स्नात्वा द्विगुणमभ्यर्च्य देवं देवीमुपोष्य च ।। शिवस्यायुतमभ्यस्येद्ब्रह्मचर्यपुरःसरम् ॥७१॥ परेद्युः शक्तितो दत्वा सुवर्णाद्यं शिवाय च ।। शिवभक्ताय वा कृत्वा महापूजां शुचिर्भवेत् ॥७२॥ अनुक्तं चात्र पूजायाः क्रमलोपभयादिना ।। यत्तदन्यत्प्रवक्ष्यामि समासान्न तु विस्तरात् ॥७३॥ हविर्नि-

---

यपूर्वक आपल्या कार्यासाठीं विज्ञापना करावी. (६७) मग अर्घ्य पुष्पांजलि देऊन विधानपूर्वक मुद्राबंधन करून नंतर देवाला क्षमा मागावी, मग उद्वासन करून आपल्या आत्म्याच्या ठिकाणीं शिवाचा प्रत्याहार करावा. (६८) पाद्यापासून मुखवासापर्यंत व अर्घ्यादि कर्म वगैरे करावें किंवा भक्तिपूर्वक एक फूल तरी देवावर टाकून कर्म समाप्त करावें. (६९) तितक्यानेंच श्रेष्ठ धर्म केल्यासारिखा होऊन तो धर्म सुकृत होईल. परंतु शरीरांत जोंपर्यंत प्राण आहेत, तोंपर्यंत शिवाची पूजा न करितां भोजन करूं नये. (७०) जर एखाद्या पाप्यानें शिवपूजा केल्यावांचून स्वैर भोजन केलें, तर त्या पाप्याला कोणतेंही प्रायश्चित्त नाहीं. प्रमादामुळें चुकून भोजन केलें तर तें अन्न प्रयत्नपूर्वक वमनाच्या रूपानें बाहेर आणावें. (७१) मग स्नान करून देवाची व देवीची पूजा दुपटीनें करून उपोषण करून ब्रह्मचर्यानें राहून शिवमंत्राचा हजारवेळ जप करावा. (७२) दुसऱ्या दिवशीं शक्त्यनुसार शिवाला सुवर्णादिकांचें दान देऊन किंवा शिवभक्ताला दान देऊन मग महापूजा करून शुचिर्भूत व्हावे. (७३) क्रमाचा लोप होईल या भीतीनें येथें पूजेचें विधान सांगितलें नाहीं, याकरितां दुसरें विधान संक्षेपानें सांगतों. विस्तारानें सांगणें मात्र व्हावयाचें नाहीं. (७४) हविष्याचें निवेदन कराव-

वेदनात्पूर्वं दीपदानादनन्तरम् ॥ कुर्यादावरणाभ्यर्चां प्राप्ते नीराजनेऽथवा ॥७४॥ तत्रेशानादिसद्यान्तं हृदाद्यस्त्रान्तमेव च ॥ शिवस्य च शिवायाश्च प्रथमावरणे यजेत् ॥७५॥ ईशान्यां पूर्वभागे च दक्षिणे चोत्तरे तथा ॥ पश्चिमे च तथाग्नेयामैशान्यां निर्ऋतौ ततः ॥७६॥ वायव्यां पुनरीशान्यां चतुर्दिक्षु ततःपरम् ॥ गर्भावरणमाख्यातं मन्त्रसंघातमेव वा ॥७७॥ हृदयाद्यस्त्रपर्यन्तमथवापि समर्चयेत् ॥ तद्बहिः पूर्वतः शक्रं यमं दक्षिणतो यजेत् ॥७८॥ वरुणं वारुणे भागे धनदं चोत्तरे बुधः ॥ ईशमैशेऽनलं स्वीये नैर्ऋते निर्ऋतिं यजेत् ॥७९॥ मारुते मारुतं विष्णुं नैर्ऋते विधिमैश्वरे ॥ बहिः पद्मस्य वज्रादीन्यब्जान्तान्यायुधान्यपि ॥८०॥ प्रसिद्धरूपाण्याशासु लोकेशानां क्रमाद्यजेत् ॥ देवं देवीश्च सम्प्रेक्ष्य सर्वावरणदेवताः ॥८१॥ बद्धांजलिपुटा ध्येयाः समासीना यथासुखम् ॥ सर्वावरणदेवानां स्वाभिधा-

---

याच्या आधीं व दीप निवेदन केल्यानंतर किंवा नीराजन समय आला असतां आवरणसहित पूजा करावी. (७५) त्यांत ईशानापासून सद्यापर्यंत तसेंच हृदादि अस्त्रापर्यंत शिवाची व सतीची पूजा पहिल्या आवरणांत करावी. (७६) ईशान्येस, पूर्वभागांत, दक्षिणेस, उत्तरेस, पश्चिमेस, आग्नेयदिशेस, पुनः ईशान्येस, नंतर निर्ऋति दिशेस (७७) वायव्येस, पुनः ईशान्येस, नंतर पूर्वादि चारी दिशांस जी पूजा करावयाची, त्या क्रमाला गर्भावरण असें ह्मणतात, अथवा मंत्रसंघात असें ह्मणतात. येथपर्यंत किंवा (७८) हृदयादि अस्त्रापर्यंत तरी पूजा करावी. बहिर्भागाला पूर्वेस इंद्राची, दक्षिणेस यमाची पूजा करावी. (७९) वारुण दिशेस वरुणाची, उत्तरेस कुबेराची, ईशान्येस ईशाची, आग्नेयीला अग्नीची, नैर्ऋत्येला निर्ऋतीची पूजा करावी. (८०) वायव्येला वायूची, नैर्ऋत्येला विष्णूची, ईशान्येस ब्रह्मदेवाची पूजा करावी, आणि पद्माच्या बाहेर वज्रापासून अब्जापर्यंत आयुधांची पूजा करावी. (८१) त्या आयुधांचीं रूपें जगांत प्रसिद्ध आहेतच. लोकाधिपतींच्या त्या त्या दिशेला क्रमानें लोकाधिपतींची पूजा करावी. तेथें तेथें देवाला व देवीला पाहून सर्व आवरणदेवता (८२) हात जोडून उभ्या आहेत, व सुखानें बसल्या आहेत, असें ध्यान करावें. सर्व आवरणदेवां-

नैर्नमोयुतैः ॥८२॥ पुष्पैः सम्पूजनं कुर्यान्नत्वा स्मृत्वा यथाक्रमम् ॥ गर्भावरणमेवापि यजेत्स्वावरणेन वा ॥८३॥ योगे ध्याने जपे होमे बाह्येवाभ्यन्तरेऽपि वा ॥ बहिश्च षड्विधं देयं शुद्धं मुद्गान्नमेव च ॥८४॥ पायसं दधिसंमिश्रं गौडं च मधुना प्लुतम् ॥ एतेष्वेकमनेकं वा नानाव्यंजनसंयुतम् ॥८५॥ गुडखण्डान्वितं दद्यान्मथितं दधि चोत्तमम् ॥ भक्षाण्यपूपमुख्यानि स्वादुमन्ति फलानि च ॥८६॥ एलाचन्दनपुष्पाढ्यं पानीयं चातिशीतलम् ॥ मृदुतैलरसाक्तं च खंडं पूगफलस्यच ॥८७॥ दलानि नागवल्याश्च गौराणि च शिवानि च ॥ शैलमेव सितं चूर्णं नातिरूक्षं न दूषितम् ॥८८॥ कर्पूरं चाथ कङ्कोलं जात्यादि च नवं शुभम् ॥ आलेपनं चन्दनं स्यान्मूलकाष्ठरजोमयम् ॥८९॥ कस्तूरिका कुंकुमं च रसो मृगमदात्मकः ॥ पुष्पा-

---

च्या त्या त्या नांवांनीं नमःशब्दपूर्वक (८३) फुलांनीं त्यांची पूजा करावी, व क्रमानें नमन स्मरण करून गर्भावरणाच्या क्रमानें पूजा करावी, अथवा निजावरणाच्या क्रमानें तरी पूजा करावी. (८४) योग, ध्यान, जप, होम, हे बाह्यतः करोत, किंवा अंततः करोत, कोणतें तरी एक कर्म करावें. त्यांत बहिःकर्मांत सहा प्रकारचें शुद्ध मुगाचें अन्न नैवेद्याकरितां द्यावें लागतें. (८५) तें पायस दह्यानें मिश्र केलेलें असून त्यांत मध व गूळ घातलेला असावा. यांमध्यें एक पदार्थ घातलेला असो, किंवा अनेक पदार्थ घातलेले असोत, कसें असलें तरी त्याबरोबर अनेक व्यंजनें केलेलीं असलीं पाहिजेत, (८६) असलीं द्रव्यें नैवेद्याला ठेवावीं व गुळाचा खडा घातलेला उत्तम दह्याचा मठ्ठा नैवेद्यास द्यावा, व भक्ष्य, अपूप (अनारसे करंज्या वगैरे), उत्तम गोड फळें, अर्पण करावींत व (८७) वेलदोडे, चंदन, व फुलें घालून थंडगार केलेलें पाणी पानीय ह्मणून द्यावें. तैलरसानें माखलेलें व मऊ असें सुपारीचें खांड द्यावें. व (८८) पांढरीं सफेत केलेलीं विड्याचीं पक्कीं पानें घेऊन कळीचा चुना लावून अति तिखट किंवा दूषित असें न करितां (८९) त्यांत कापूर, कंकोळ, नवीन जायफळ, लेपन ( तांबूलविहार ) घालून विडा करून द्यावा. नंतर मुळींतलें, व रज असलेलें चांगलें चंदनाचें लांकूड वासाकरितां द्यावें. (९०) कस्तुरी, कुंकुम, रस, मृगमद ( कस्तुरीचा रस ), सुगंध पवित्र मंगलकर

णि सुरभीण्येव पवित्राणि शुभानि च ॥९०॥ निर्गन्धान्युग्रगन्धानि दूषितान्युषितानि च ॥ स्वयमेवविशीर्णानि नादेयानि शिवार्चने ॥९१॥ वासांसि च मृदून्येव नवानि च शुभानि च ॥ दुकूलपट्टदेवाङ्गमयानि च सितानि च ॥९२॥ नवरत्नचितान्येव तपनीयमयानि च ॥ विद्युद्वलयकल्पानि भूषणानि विशेषतः ॥९३॥ सर्वाण्येतानि कर्पूरनिर्यासागुरुचन्दनैः ॥ प्रधूपितानि पुष्पौघैर्वासितानि समन्ततः ॥९४॥ चन्दनागुरुकर्पूरकुष्ठगुग्गुलुचूर्णकैः ॥ घृतेन मधुना चैव सिद्धो धूपः प्रशस्यते ॥९५॥ कपिलासम्भवेनैव घृतेनापि सुगन्धिना ॥ नित्यं प्रदीपिता दीपाः शस्ताः कर्पूरसंयुताः ॥९६॥ पंचगव्यं च मधुरं पयो दधि घृतं तथा ॥ कपिलासम्भवं शम्भोरिष्टं स्नाने च पानके ॥९७॥ आसनानि च भद्राणि गजदन्तमयानि च ॥ सुवर्णरत्नचित्राणि चित्राण्यास्तरणानि च ॥९८॥ मृदूपधानयुक्तानि सूक्ष्म-

---

अशीं फुलें वासाकरितां अर्पण करावींत. (९१) निर्गंध, उग्रगंध ( उग्रवासाचे ) दूषित, शिळीं, पाकळ्या सुटलेलीं अशीं फुलें शिवपूजेला देऊं नयेत. (९२) व मऊ वस्त्रें नवीन असून चांगलीं आणावींत, व त्यांत दुकूल, पट्टदेवांगमय ( रेशमी वस्त्र ) शुभ्र, अशीं वस्त्रें द्यावींत. (९३) नवरत्नांनीं खचित झालेले, सोन्याचे, वीज जशी चमकते, त्याप्रमाणें चमकणारे असे दागिने विशेषेंकरून शिवाला अर्पण करावेत. (९४) हे सर्व पदार्थ कापूर, निर्यास ( सुगंधी चीक ), अगरु, चंदन यांनीं धूपित झालेले असावेत. व चोहोंकडून त्या पदार्थांना चांगल्या फुलांचा वास दिलेला असावा. (९५) चंदन, अगरु, कापूर, कोष्ठ, गुग्गुल, यांचें चूर्ण करून त्यांत घृत आणि मधु घालून त्या चूर्णाचा धूप दिला असतां प्रशस्त धूपांमध्यें याची गणना होते. (९६) काळ्या गायीच्या सुगंध तुपानें निरंतर दीप लावावेत. हेच दीप प्रशस्त आहेत, असें ह्मणतात, व कापराचा दिवाही प्रशस्त आहे. (९७) पंचगव्य, मधुर दूध, दहीं, घृत, हे सर्व पदार्थ काळ्या गायीचे असले, तर शंभूच्या स्नानाला व पानाला प्रशस्त समजले जातील. (९८) मंगलकर हस्तिदंती आसन करवून देवाला द्यावें, व सुवर्णानें व रत्नांनीं चित्रविचित्र केलेलें आस्तरण ( कांबळी वगैरे ) देवाला द्यावें. (९९) परा-

तूलमयानि च ॥ उच्चावचानि रम्याणि शयनानि सुखानि च ॥९९॥ नद्याः समुद्रगामिन्या नदाद्वाम्भः समाहृतम् ॥ वस्त्रपूतं च शीतं च विशिष्टं स्नानपानयोः ॥१००॥ छत्रं शशिनिभं चारु मुक्तादामविराजितम् ॥ नवरत्नचितं दिव्यं हेमदंडमनोहरम् ॥१०१॥ चामरे च सिते सूक्ष्मे चामीकरपरिष्कृते ॥ राजहंसद्वयाकारे रत्नदंडोपशोभिते ॥१०२॥ दर्पणं चापि सुस्निग्धं दिव्यगन्धानुलेपनम् ॥ समन्ताद्रत्नसंछन्नं स्रग्वरैश्चापि भूषितम् ॥१०३॥ गम्भीरनिनदः शंखो हंसकुन्देन्दुसन्निभः ॥ आस्यपृष्ठादिदेशेषु रत्नचामीकरांचितः ॥१०४॥ काहलानि च रम्याणि नानानादकराणि च ॥ सुवर्णनिर्मितान्येव मौक्तिकालंकृतानि च ॥१०५॥ भेरीमृदङ्गमुरजतिमिच्छापटहादयः ॥ समुद्रकल्पसन्नादाः कल्पनीयाः प्रयत्नतः ॥१०६॥ भाण्डान्यपि च

---

चा कापूस घालून मऊ केलेली उशी देवाला द्यावी. यांशिवाय उंची उंची सुंदर सुखकर शयनें देवाला द्यावीं. (१००) समुद्राला जाऊन मिळणाऱ्या नदीचें किंवा नदाचें पाणी आणून वस्त्रानें शोधून थंड करून देवाला प्यावयास किंवा स्नानास अर्पण करावें. (१०१) चंद्राच्या कांतीप्रमाणें शोभणारें छत्र, मोत्यांच्या दाव्यांनीं सुशोभित करून नवरत्नांनीं मंडित करून देवाला अर्पण करावें. त्या छत्राला उत्तम सोन्याची काठी घातलेली असून सुंदर दिसत असावी. (१०२) सोन्यानें मढविलेलें, शुभ्र सूक्ष्म चामर देवाला द्यावे, चामराचा आकार राजहंसाप्रमाणें केलेला असून त्याला रत्नाचें दंड घातलेले असावेत. (१०३) नंतर दाट असा दगडी आरसा द्यावा, त्या आरशाची चौकट चांगल्या चंदनाच्या लांकडाची केलेली असून त्याच्या भोंवतीं रत्नें बसवलेलीं असावींत, व चोहोंबाजूंनीं माळा लोंबत ठेवलेल्या असाव्यात. (१०४) नंतर ज्याचा नाद गंभीर आहे, व ज्याचा वर्ण हंसाप्रमाणें किंवा कुंदाप्रमाणें किंवा चंद्राप्रमाणें असून, ज्याच्या तोंडाला व पृष्ठाला सोनें मढविलेलें आहे, असा शंख देवाला द्यावा. (१०५) चित्रविचित्र नादाचे काहळे आणून त्यांच्या भोंवतीं मोतीं लावून सोनें मढवून देवास अर्पण करावे. (१०६) समुद्राप्रमाणें गंभीर नादाचीं नौबत, मृदंग, मुरज, तिमिच्छा, पटह वगैरे वाद्यें प्रयत्नानें मिळवून देवाला द्यावीं. (१०७) सुंदर

रम्याणि पात्राण्यपि च कृत्स्नशः ॥ तदाधाराणि सर्वाणि सौवर्णान्येव धारयेत् ॥१०७॥ आलयश्च महेशस्य शिवस्य परमात्मनः ॥ राजावसथवत्कल्प्यं शिल्पशास्त्रोक्तलक्षणम् ॥१०८॥ उच्चप्राकारसम्भिन्नं भूधराकारगोपुरम् ॥ अनेकरत्नसञ्छन्नं हेमद्वारकपाटकम् ॥१०९॥ तप्तजाम्बूनदमयं रत्नस्तम्भशतावृतम् ॥ मुक्तादामवितानाढ्यं विद्रुमद्वारतोरणम् ॥११०॥ चामीकरमयैर्दिव्यैर्मुकुटैःकुम्भलक्षणैः ॥ अलंकृतशिरोभागमस्त्रराजेन चिह्नितैः ॥१११॥ राजन्यार्हनिवासैश्च राजवीथ्यादिशोभितैः ॥ प्रक्षिप्तप्रांशुशिखरैः प्रासादैश्च समन्ततः ॥११२॥ आस्थानस्थानवर्यैश्च स्थितैर्दिक्षु विदिक्षु च ॥ अत्यन्तालंकृतप्रान्तमन्तरावरणैरिव ॥११३॥ उत्तमस्त्रीसहस्रैश्च नृत्यगे-

---

भांड, व सर्व पात्र व त्यांचें आधारपात्र देवाला अर्पण करावे, परंतु आधारपात्र सोन्याचें केलेलें असावें. (१०८) सर्वांचा ईश, अशा परमात्मा शिवाचें मंदिर शिल्पशास्त्रांत सांगितलेल्या लक्षणांप्रमाणें बांधलेलें असून एखाद्या राजवाड्याप्रमाणें मोठें सुंदर असावें. (१०९) त्या मंदिराचे प्राकार फार उंच केलेले असून त्याचें गोपुर पर्वताप्रमाणें केलेलें असावें, व त्या मंदिराचें दार व कपाट (लहान दार) अनेक रत्नांनीं आच्छादिलेलें असावें. (११०) त्या मंदिराच्या भिंती सोन्याच्या केलेल्या असून मंदिरांतील खांब रत्नाचे केलेले असावे (रत्नें खांबाला लावलेलीं असावीं) असे खांब हजारो तेथें असावेत, त्या मंदिरांत छत मारलेलें असून सभोंवती मोत्यांच्या झालरी सोडलेल्या असाव्यात, व मंदिराचें दार पोंवळ्याचें असून दाराला पोंवळ्यांचें तोरण बांधलेलें असावें (१११) त्या मंदिरावरचे कळस सोन्याचे केलेले असून घागरीच्या आकृतीचे केलेले असावेत, आणि मंदिराचा पुढचा भाग नेहमीं श्रृंगारलेला असावा. व अस्त्रराजाच्या चिन्हांनीं युक्त असलेले, (११२) राजेलोकांच्या बागबगीच्याप्रमाणें तेथें बागबगीचे केलेले असावे, व त्याच्या सभोंवतीं मोठमोठे राजरस्ते केलेले असावे, व त्या मंदिराचे भोंवतालचे कोट चांगले उंच असून त्यांवर उंच शिखरे केलेलीं असावींत. (११३) त्या मंदिराच्या दिशा विदिशांमध्यें सभामंडप केलेले असावेत, अशा त्या मंडपांत उत्तम शोभा आणलेली असून आंत आवरण केलेलें असावें. (११४) अ-

यविशारदैः ॥ वेणुवीणाविदग्धैश्च पुरुषैर्बहुभिर्युतम् ॥११४॥ रक्षितं रक्षिभिर्वीरैर्गजवाजिरथान्वितैः ॥ अनेकपुष्पवाटीभिरनेकैश्च सरोवरैः ॥११५॥ दीर्घिकाभिरनेकाभिर्दिग्विदिक्षु विराजितम् ॥ वेदवेदाङ्गतत्वज्ञैः शिवशास्त्रपरायणैः ॥११६॥ शिवाश्रमरतैर्भक्तैः शिवशास्त्रोक्तलक्षणैः ॥ शान्तैः स्मितमुखैः स्फीतैः सदाचारपरायणैः ॥११७॥ शैवैर्माहेश्वरैश्चैव श्रीमद्भिः सेवितं द्विजैः ॥ एवमन्तर्बहिर्वाथ यथाशक्तिविनिर्मिते ॥११८॥ स्थाने शिलामये दान्ते दारवे चेष्टकामये ॥ केवलं मृण्मये वापि पुण्यारण्येऽपि वा गिरौ ॥११९॥ नद्यां देवालयेऽन्यत्र देशे वाथ गृहे शुभे ॥ आढ्योवाथ दरिद्रो वा स्वकां शक्ति-

---

शा मंदिरांत हजारो चांगल्या चांगल्या स्त्रिया नर्तन, गायन करीत बसलेल्या असाव्यात, आणि वीणा वेणु यांत पंडित असलेले लोक पुष्कळ तेथें गायन करीत बसलेले असले पाहिजेत. (११५) व मंदिराच्या भोंवतीं हत्ती, घोडे, रथ यांनीं युक्त असलेले पाहरेकरी पाहरा करीत उभे राहिलेले असले पाहिजेत. त्यांत अनेक पुष्पवाटिका केलेल्या असून तेथें अनेक सरोवरें असावींत, (११६) व अनेक विहिरी बांधलेल्या असून त्या विहिरींनीं मंदिराच्या दिशा विदिशा सुशोभित झालेल्या असाव्यात, व त्या मंदिरांत वेदवेदांगांमध्यें व त्यांच्या तत्वांमध्यें पंडित असलेले, शिवशास्त्रांत परायण असलेले, (११७) शिवाश्रमांत रत असलेले, शिवशास्त्रांत सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेले, शिवभक्त असलेले, शांत असून मंदहास्य करणारे, समृद्ध असून सदाचारांत रत असलेले, (११८) असे शैवमाहेश्वर श्रीमंत ब्राह्मण बसलेले असून त्या ब्राह्मणांनीं मंदिराला शोभा आणलेली असावी, याप्रमाणें शक्त्यनुसार निर्माण केलेल्या मंदिरांत शिवाची पूजा करावी. तें मंदिर बाह्यकर्मानें केलेलें असो, किंवा अंतरकर्मानें केलेलें असो ( कल्पनेनें रचलेलें असो ). त्यांत (११९) शिलामय ( दगडाचें ), हस्तिदंताचें, लांकडाचें, विटांचें केवळ मातीचें स्थान करून त्यावर बसून किंवा पुण्यारण्यांत, पर्वतावर, (१२०) नदीकांठावर, देवालयांत, इतर शुभस्थलांत, मंगलकर गृहांत ( घरांत ) बसून धनिक असो, दरिद्री असो, आपल्या शा-

मवंचयन् ॥१२०॥ द्रव्यैर्न्यायार्जितैरेव भक्त्या देवं समर्चयेत् ॥ अथान्यायार्जितैश्चापि भक्त्या चेच्छिवमर्चयेत् ॥१२१॥ न तस्य प्रत्यवायोऽस्ति भाववश्यो यतः प्रभुः ॥ न्यायार्जितैरपि द्रव्यैरभक्त्या पूजयेद्यदि ॥१२२॥ न तत्फलमवाप्नोति भक्तिरेवात्र कारणम् ॥ भक्त्या वित्तानुसारेण शिवमुद्दिश्य यत्कृतम् ॥१२३॥ अल्पे महति वा तुल्यं फलमाढ्यदरिद्रयोः ॥ भक्त्या प्रचोदितः कुर्यादल्पवित्तोऽपि मानवः ॥१२४॥ महाविभवसारोऽपि न कुर्याद्भक्तिवर्जितः ॥ सर्वस्वमपि यो दद्याच्छिवे भक्तिविवर्जितः ॥१२५॥ न तेन फलभाक् स स्याद्भक्तिरेवात्र कारणम् ॥ न तत्तपोभिरत्युग्रैर्न च सर्वैर्महामखैः ॥१२६॥ गच्छेच्छिवपुरं दिव्यं मुक्त्वा भक्तिं शिवात्मिकाम् ॥ गुह्याद्गुह्यतरं कृष्ण सर्वत्र परमेश्वरे ॥१२७॥ शिवे भक्तिर्न सन्देहस्तया

---

क्तीची वंचना न करतां (१२१) न्यायानें मिळविलेल्या द्रव्यांनीं भक्तिपूर्वक देवाची पूजा करावी. आतां अन्यायानें मिळविलेल्या द्रव्यांनीं शिवाची पूजा भक्तीनें केली तर (१२२) त्याला कांहीं प्रत्यवाय नाहीं (दोष येत नाहीं), कारण देव हा भावालाच वश्य आहे. न्यायानें जरी द्रव्य मिळविलें आहे, तथापि अभक्तीनें पूजा केली, तर (१२३) तिचें फळ त्याला मिळत नाहीं. पूजेला मुख्य कारण भक्तीच आहे. भक्ति ठेवून द्रव्यानुसार शिवाला उद्देशून जें कृत्य केलें असेल, (१२४) तर तें अल्प असो, मोठें असो, धनिकाला व दरिद्र्याला सारखेंच फळ मिळतें. एखाद्या मनुष्याजवळ द्रव्य जरी थोडें आहे, तथापि त्यानें भक्तीनें युक्त होऊन शिवकृत्य केलें तर (१२५) त्याला जें फळ मिळतें, तें फळ मोठ्या श्रीमंतानें भक्तीवांचून शिवकृत्य केलें तर त्याला मिळत नाहीं, किंवा एखाद्या धनिकानें आपलें सर्वस्व जरी शिवाला भक्तीशिवाय दिलें, तथापि (१२६) त्या दरिद्र्याला जें फळ मिळतें, तें फळ याला मिळत नाहीं. कारण शिवकृत्याला मुख्य कारण भक्तीच आहे. अथवा उग्र तप केलें, किंवा एकूणएक मोठे यज्ञ केले, (१२७) तरी शिवस्वरूपभक्ति मात्र त्या कर्मांत नसेल तर तो शिवपुराला जात नाहीं. हे कृष्णा, गुप्त गोष्टींमध्यें अति गुप्तगोष्ट तुला सांगतों, कीं, सर्वव्यापी परमेश्वरावर भक्ति ठेव. (१२८) शिवावर भक्ति ठेविली असतां त्या भक्तीनें

युक्तो विमुच्यते ॥ शिवमन्त्रजपो ध्यानं होमो यज्ञस्तपःश्रुतम् ॥१२८॥ दानमध्ययनं सर्वं भावार्थं नात्र संशयः ॥ भावहीनो नरः सर्वं कृत्वापि न विमुच्यते ॥१२९॥ भावयुक्तः पुनः सर्वमकृत्वापि विमुच्यते ॥ चान्द्रायणसहस्रैश्च प्राजापत्यशतैस्तथा ॥१३०॥ मासोपवासैश्चान्यैश्च शिवभक्तस्य किं फलम् ॥ अभक्ता मानवाश्चास्मिँल्लोके गिरिगुहासु च ॥१३१॥ तपन्ति चाल्पभोगार्थे भक्तो भावेन मुच्यते ॥ सात्विकं मुक्तिदं कर्म सत्वे वै योगिनः स्थिताः ॥१३२॥ राजसं सिद्धिदं कुर्युः कर्मिणो रजसावृताः ॥ असुरा राक्षसाश्चैव तमोगुणसमन्विताः ॥१३३॥ ऐहिकार्थं यजन्तीशं नराश्चान्येऽपि तादृशाः ॥ तामसं राजसं वापि सात्विकं भावमेव वा ॥१३४॥ आश्रित्य भ-

---

मुक्त होतो, यांत संशय नाहीं. शिवमंत्र जप, ध्यान, होम, यज्ञ, तप, बहुश्रवण, (१२९) दान, अध्ययन, हीं सर्व भाव ठेवला असतां उपयुक्त होतात यांत संशय नाहीं, परंतु कोणत्याही मनुष्यानें भाव न ठेवतां दान वगैरे हें सर्व केलें असतांही तो मनुष्य पापांपासून मुक्त होत नाहीं. (१३०) जो प्राणी दान वगैरे कृत्य न करतां शिवावर नुसता भाव ठेवतो तो तितक्यानेंच मुक्त होतो. हजारो चांद्रायणें, शेंकडो प्राजापत्य, तसेंच (१३१) इतर मासोपवासादि व्रतें वगैरे हीं शिवभक्ताला घेऊन काय करावयाचीं आहेत? जे अभक्त ( शिवभक्त नव्हेत ते ) मानव जगांत असतील, ते पर्वताच्या गुहेच्या ठिकाणीं (१३२) अल्पभोगाच्या प्राप्तीकरितां तप करतात. जो शिवभक्त असेल, तो मात्र नुसत्या भावानें मुक्त होतो. जें सात्विककर्म असेल, तेंच मुक्ति देणारें असतें. ह्मणूनच मोठमोठे योगी सत्वकर्मांतच निरत असतात. (१३३) जे लोक राजस असतील, ते रजोगुणानें युक्त असल्यामुळें सिद्धि देणारें राजस कर्म करितात. तमोगुणानें युक्त असुर, राक्षस वगैरे तामसलोक (१३४) ऐहिक फलसिद्धी करतां ईशाची आराधना करतात. इतर तामस प्राणीसुद्धां ऐहिकाकरतांच शिवाची आराधना करीत असतात. तामस, राजस, सात्विक कोणी असो, भावाला ( भक्तीला ) (१३५) ठेवून शिवाची पूजा वगैरे कर्म त्यांनीं केलें तर त्यांना कल्याण प्राप्त होतें.

त्त्या पूजाद्यं कुर्वन्भद्रं समश्नुते ॥ यतः पापार्णवात्त्रातुं भक्तिर्नौरिव निर्मिता ॥१३५॥ तस्माद्भक्त्युपपन्नस्य रजसा तमसा च किम् ॥ अन्त्यजो वाधमो वापि मूर्खो वा पतितोऽपि वा ॥१३६॥ शिवं प्रपन्नश्चेत्कृष्ण पूज्यः सर्वसुरासुरैः ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन भक्त्यैव शिवमर्चयेत् ॥१३७॥ अभक्तानां क्वचिदपि फलं नास्ति यतस्ततः ॥ वक्ष्याम्यतिरहस्यं ते शृणु कृष्ण वचो मम ॥१३८॥ वेदैः शास्त्रैर्वेदविद्भिर्विचार्य सुविनिश्चितम् ॥ ब्रह्मघ्नो वा सुरापो वा स्तेयी वा गुरुतल्पगः ॥१३९॥ मातृहा पित्रहा वापि वीरहा भ्रूणहापि वा ॥ सम्पूज्यामन्त्रकं भक्त्या शिवं परमकारणम् ॥१४०॥ तैस्तैः पापैर्विमुच्येत वर्षैर्द्वादशभिः क्रमात् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन पतितोऽपि यजेच्छिवम् ॥१४१॥ भक्तश्चेन्नापरः कश्चिद्भिक्षाहारो जितेन्द्रियः ॥ कृ-

---

( फलसिद्धि मिळते ). ज्याअर्थी पापरूपी समुद्रांतून तरून जावयासाठींच भक्तिरूप नावेची रचना केली आहे, त्याअर्थी भक्तीचा आश्रय केल्यावांचून मनुष्य मुक्त होईल कसा ? (१३६) अर्थात जो भक्तीनें युक्त आहे, त्याला रज आणि तम यांला घेऊन काय करावयाचें आहे ? अंत्यज, अधम, मूर्ख, पतित यांमध्यें कोणी असो, (१३७) तो जर शिवाला शरण गेला, तर तो प्राणी देवांना व दैत्यांना मान्य होतो. याकरतां हरतऱ्हेचे प्रयत्न करून शिवावर भक्ति ठेवून शिवाची पूजा करावी. (१३८) शिवाची भक्ति न करणारे जे लोक असतील, त्यांना कोणीकडूनही फल मिळत नाहीं. हे कृष्ण, तुला रहस्यांतलें रहस्य सांगतों ऐक. (१३९) वेद जाणणाऱ्या लोकांनीं वेदांचा व शास्त्रांचा ( वेदशास्त्रांनीं वर्णन केलेल्या अर्थांचा ) विचार करून असा ठराव सांगितला आहे, कीं, ब्रह्महत्या करणारा, सुरापान करणारा, चौर्यकर्म करणारा, गुरुस्त्रीसहवास करणारा, (१४०) मातृहत्या करणारा, पितृहत्या करणारा, वीरांना कपटानें मारणारा, भ्रूणहत्या (गर्भहत्या) करणारा असा जरी पातकी आहे, तरी त्यानें मंत्ररहित पूजा परमकारण शिवाची केली असतां (१४१) बारावर्षांनीं क्रमानें त्या त्या पापांपासून तो मुक्त होतो. याकरतां अति प्रयत्नानें शिवाची पूजा पतितानें सुद्धां करावी. (१४२) परंतु तो शिवभक्त असेल तर मुक्त होईल, दुसरा कोणी भिक्षा-

त्वापि सुमहत्पापं भक्त्या पंचाक्षरेण तु ॥१४२॥ पूजयेद्यदि देवेशं तस्मात्पापात्प्रमुच्यते ॥ अब्भक्षा वायुभक्षाश्च ये चान्ये व्रतकर्शिताः ॥१४३॥ तेषामेतैर्व्रतैर्नास्ति शिवलोकसमागमः ॥ भक्त्या पंचाक्षरेणैव यः शिवं सकृदर्चयेत्॥ १४४॥ सोऽपि गच्छेच्छिवस्थानं शिवमन्त्रस्य गौरवात् ॥ तस्मात्तपांसि यज्ञाश्च सर्वे सर्वस्वदक्षिणाः ॥१४५॥ शिवमूर्त्यर्चनस्यैते कोट्यंशेनापि नो समाः ॥ बद्धो वाप्यथ मुक्तो वा पाशात्पंचाक्षरेण चेत्॥१४६॥ पूजयेन्मुच्यते भक्तो नात्र कार्या विचारणा ॥ अरुद्रो वा सरुद्रो वा सूक्तेन शिवमर्चयेत् ॥१४७॥ यः सकृत्पतितो वापि मूढो वा मुच्यते नरः ॥ षडक्षरेण वा नित्यं तथा पंचाक्षरेण वा ॥१४८॥ सब्रह्माङ्गेन वा तेन सहंसेन विमुच्यते ॥ तस्मान्नित्यं शिवं भक्त्या सूक्तमन्त्रेण पूजयेत्॥१४९॥ शिवभक्तो जितक्रोधो ह्यलब्धो लब्ध एव च ॥ अलब्धाल्लुब्ध एवा-

---

न्न भक्षण करणारा जितेंद्रिय जरी असला तरी मुक्त होणार नाहीं. मोठें पाप करूनही भक्तीनें पंचाक्षराचा जप करून (१४३) श्रीशिवाची पूजा करील तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो. पाणी पिऊन राहणारे, वायुभक्षण करणारे, व इतर व्रतांनीं कृश झालेले जे असतील (१४४) त्यांना या व्रतादिकांच्या योगेंकरून शिवलोकाची प्राप्ति होणार नाहीं. भक्ति ठेवून पंचाक्षरमंत्रानें शिवाची पूजा एकवार जो करील, (१४५) तो सुद्धां त्या मंत्राच्या सामर्थ्यानें शिवाच्या स्थानाला जाईल. याकरितां तप, यज्ञ, सर्वस्वदान वगैरे हे सर्व (१४६) शिवमूर्तीच्या पूजेच्या कोटि अंशाच्या बरोबरीला सुद्धां येत नाहींत. बद्ध असो, मुक्त असो, त्यानें पंचाक्षरमंत्रानें भक्तिपूर्वक शिवाची पूजा केली तर पाशापासून (१४७) तो भक्त मुक्त होतो, यांत विचार करावयास नको आहे. अरुद्र असो, सरुद्र असो, ( रुद्राध्ययन केलेला असो किंवा नसो ) त्यानें सूक्तानें ( रुद्रसूक्तानें ) शिवाची पूजा केली तर (१४८) तो मूढ जरी असला तरी एकवार केलेल्या पूजेनें मुक्त होतो. षडक्षरमंत्रानें किंवा पंचाक्षरमंत्रानें, (१४९) ब्रह्मांगसहितमंत्रानें हंसमंत्रासहित शिवाची पूजा केली, तर मुक्त होतो. याकरतां निरंतर भक्ति ठेवून सूक्तमंत्रानें शिवाची पूजा करावी. (१५०) शिवभक्त असून ज्यानें

त्र विशिष्टो नात्र संशयः ॥१५०॥ तस्माल्लब्ध्वैव देवेशं सूक्तमन्त्रेण पूजयेत् ॥ एककालं द्विकालं वा त्रिकालं नित्यमेव वा ॥१५१॥ येऽर्चयन्ति महादेवं विज्ञेयास्ते गणेश्वराः ॥ ज्ञानेनात्मसहायेन नार्चितो भगवाञ्छिवः॥१५२॥ स चिरं संसरत्यस्मिन्संसारे दुःखसागरे ॥ दुर्लभं प्राप्य मानुष्यं मूढो नार्चयते शिवम् ॥१५३॥ निष्फलं तस्य तज्जन्म मोक्षाय न भवेद्यतः ॥ दुर्लभं प्राप्य मानुष्यं येऽर्चयन्ति पिनाकिनम् ॥१५४॥ तेषां हि सफलं जन्म कृतार्थास्ते नरोत्तमाः ॥ भवभक्तिपरा ये च भवप्रणतचेतसः ॥१५५॥ भवसंस्मरणोद्युक्ता न ते दुःखस्य भागिनः ॥ भवनानि मनोज्ञानि विभ्रमाभरणाः स्त्रियः ॥१५६॥ धनञ्चातृप्तिपर्यन्तं शिवपूजाविधेः फलम् ॥ ये वाञ्छन्ति महाभोगान्राज्यं च त्रिदशालये ॥१५७॥ ते वाञ्छ-

---

क्रोध जिंकिला आहे, तो अलब्ध असो सलब्ध असो ( मंत्रोपदेश घेतलेला असो नसो ), त्यांत अलब्धापेक्षां सलब्ध श्रेष्ठ मानिला गेलेला आहे; यांत संशय नाहीं. (१५१) याकरितां मंत्रोपदेश घेऊन देवेशाची ( शिवाची ) पूजा सूक्तमंत्रानें करावी. एकवेळ, दोनवेळ, त्रिकाल (तीनवेळ) किंवा निरंतर (१५२) जे लोक महादेवाची पूजा करतात, ते गणेश्वर आहेत, असें समजावें. आत्म्याला सहाय्यभूत अशा ज्ञानानें भगवान शिवाची पूजा केली नाहीं, तर (१५३) तो प्राणी दुःखाचा केवळ समुद्र, अशा संसारांत पुष्कळ कालपर्यंत फिरत असतो. दुर्लभ अशा मनुष्यजन्माला येऊन जो मूढ शिवाची पूजा करीत नाहीं, (१५४) त्याचा जन्म व्यर्थ आहे, असें समजावें. कारण त्याचा जन्म मोक्षाच्या उपयोगीं पडत नाहीं. दुर्लभ मनुष्य योनीला येऊन शिवाची पूजा जे करतात, (१५५) त्यांचा जन्म सफल आहे, असें समजावें. कारण ते श्रेष्ठ मानव कृतार्थ आहेत. जे शिवभक्ति करण्यांत रत असतात, जे शिवावर मन ठेवणारे आहेत, (१५६) जे शिवाच्या स्मरणांत रत असतात, ते लोक दुःखाला पात्र होत नाहींत. सुंदर सुंदर वाडे, विलासयुक्त आभरणयुक्त स्त्रिया, (१५७) तृप्ति होईपर्यंत धनप्राप्ति, वगैरे फलप्राप्ति शिवाच्या पूजेनें मिळते, असें समजावें. जे लोक मोठमोठे भोग भोगतात, व स्वर्गराज्य जे करतात, (१५८) ते लोक सर्वदा श्रीशि-

न्ति सदाकालं हरस्य चरणाम्बुजम् ॥ सौभाग्यं कान्तिमद्रूपं सत्वं त्यागार्द्रभावता ॥१५८॥ शौर्यञ्च जगति ख्यातिः शिवमर्चयतो भवेत् ॥ तस्मात्सर्वं परित्यज्य शिवैकाहितमानसः ॥१५९॥ शिवपूजाविधिं कुर्याद्यदीच्छेच्छिवमात्मनः ॥ त्वरितं जीवितं याति त्वरितं याति यौवनम् ॥१६०॥ त्वरितं व्याधिरप्येति तस्मात्पूज्यः पिनाकधृक् ॥ यावन्नायाति मरणं यावन्नाक्रमते जरा ॥१६१॥ यावन्नेन्द्रियवैकल्यं तावत्पूजय शङ्करम् ॥ न शिवार्चनतुल्योऽस्ति धर्मोऽन्यो भुवनत्रये ॥१६२॥ इति विज्ञाय यत्नेन पूजनीयः सदाशिवः ॥ द्वारयागञ्च वनिकां परिवारबलिक्रियाम् ॥१६३॥ नित्योत्सवञ्च कुर्वीत प्रासादे यदि पूजयेत् ॥ हविर्निवेदनादूर्ध्वं स्वयञ्चानुचरोऽपि वा ॥१६४॥ प्रासादपरिवारेभ्यो बलिं दद्याद्यथाक्रमम् ॥ निर्गम्य सहवादित्रैस्तदाशाभिमुखः स्थितः ॥१६५॥ पुष्पं धूपं च दीपं च द-

वाची चरणकमलेच्छा करतात. सौभाग्य, तेजानें युक्त, रूप, सत्व, दान करण्याची बुद्धि, (१५९) शौर्य, जगांत प्रसिद्धि वगैरे फलें शिवाची पूजा केली असतां मिळतात. याकरतां शिवाच्या ठिकाणीं मन ठेवून सर्वसंगाचा त्याग करून (१६०) शिवपूजेचें विधान करावें ( शिवपूजा करावी ). आपल्यास कल्याणप्राप्ति व्हावी, अशी इच्छा ज्याची असेल, त्यानें शिवपूजा करावी. जीवित हें क्षणिक असल्यामुळें लौकर जातें, व यौवन क्षणिक असल्यामुळें लौकर निघून जातें, (१६१) लौकर शरीरांत रोग शिरतात, याकरितां शिवाची पूजा करावी. जोंपर्यंत मरण जवळ आलें नाहीं, जोंपर्यंत शरीराला जरेनें व्यापिलें नाहीं ( ह्यातारपण आलें नाहीं ), (१६२) जोंपर्यंत इंद्रियांमध्यें शैथिल्य आलें नाहीं, तोंपर्यंत शंकराची पूजा कर. तीन लोकांमध्यें शिवपूजेसमान दुसरा धर्म नाहीं. (१६३) याप्रमाणें जाणून सदाशिवाची पूजा करावी. तसेच द्वारयाग, वनिका, परिवार बलिक्रिया (१६४) नित्योत्सव वगैरे शिवाचे करावेत, प्रासादावर ( दुमजल्यावर ) शिवाची पूजा करावी, व हविष्याचें निवेदन ( नैवेद्य ) करण्याच्या पूर्वीं स्वतः किंवा अनुचरानें (१६५) प्रासादांतल्या परिवारांना क्रमानुसार बलि द्यावेत. मग बहेर निघून वाजंत्र्यांसह त्यादिशेला अभिमुख होऊन राहून (१६६) पुष्प,

द्यादन्नं जलैः सह ॥ ततो दद्यान्महापीठे तिष्ठन्बलिमुदङ्मुखः ॥१६६॥ ततो निवेदितं देवे यत्तदन्नादिकं पुरा ॥ तत्सर्वं सावशेषं वा चण्डाय विनिवेदयेत् ॥१६७॥ हुत्वा च विधिवत्पश्चात्पूजाशेषं समापयेत् ॥ कृत्वा प्रयोगं विधिवद्यावन्मन्त्रं जपं ततः ॥१६८॥ नित्योत्सवं प्रकुर्वीत यथोक्तं शिवशासने ॥ विपुले तैजसे पात्रे रत्नपद्मोपशोभिते ॥१६९॥ अस्त्रं पाशुपतं दिव्यं तत्रावाह्य समर्चयेत् ॥ शिरस्यारोप्य तत्पात्रं द्विजस्यालंकृतस्य च ॥१७०॥ न्यस्तास्त्रवपुषा तेन दीप्तयष्टिधरस्य च ॥ प्रासादपरिवारेभ्यो बहिर्मङ्गलनिस्वनैः ॥१७१॥ नृत्यगेयादिभिश्चैव सह दीपध्वजादिभिः ॥ प्रदक्षिणत्रयं कृत्वा न द्रुतं न विलम्बितम् ॥१७२॥ महापीठं समावृत्य त्रिःप्रदक्षिणयोगतः ॥ पुनः प्रविष्टो द्वारस्थो यजमानः कृतांजलिः ॥१७३॥ आदायाभ्यन्तरं नीत्वा ह्यस्त्रमुद्वासयेत्ततः ॥ प्रदक्षिणादिकं कृत्वा यथापू-

---

धूप, दीप, जलसहित अन्न वगैरे महापीठावर उभा राहून द्यावे. उत्तरेकडे तोंड करून बलि द्यावे. (१६७) पूर्वी जे अन्नादि पदार्थ शिवाला दिले असतील, ते सर्व पदार्थ शेषासहित चंडाला निवेदन करून टाकावे. (१६८) नंतर विधिपूर्वक होम करून नंतर राहिलेली पूजा समाप्त करावी. विधिपूर्वक प्रयोग करून एकूणएक मंत्रांचा जप करून (१६९) नित्योत्सव शिवशासनांत ( शिवशास्त्रांत ) जसे सांगितले असतील, तसे करावेत. रत्नांनीं व पद्मानें सुशोभित केलेल्या मोठ्या तैजसपात्रांत ( पान्याच्या पात्रांत ) (१७०) दिव्य पाशुपत अस्त्राचें आवाहन करून पूजा करावी. नंतर अलंकारयुक्त ब्राह्मणाच्या डोक्यावर तें पात्र देऊन (१७१) अस्त्रानें आपलें शरीर आच्छादन करून घेऊन प्रदीप्त काठी धरलेल्या ब्राह्मणाच्या भोंवती व प्रासादांतल्या परिवार देवतांना मंगलवाद्यांसह (१७२) नर्तन गायन यांसह दीप ध्वज यांसह फार जलद नव्हे, व फार सावकाश नव्हे अशा तीन प्रदक्षिणा घालाव्या. (१७३) तीन प्रदक्षिणेच्या योगानें महापीठा भोंवती फिरून पुनः द्वारांत यजमानानें प्रवेश करून द्वारांत राहून हात जोडून (१७४) अस्त्राचा स्वीकार करून आंत आणून अस्त्राचें उद्वासन करावें. नं-

वोदितं क्रमात् ॥ प्रदाय चाष्टपुष्पाणि पूजामथ समापयेत् ॥१७४॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे शिवपूजाविधिर्नाम विंशोऽध्यायः ॥२०॥

---

तर पूर्वोक्त क्रमानें प्रदक्षिणादि कर्म करून आठ तऱ्हेचीं फुलें देऊन पूजा समाप्त करावी.

याप्रमाणें श्रीशैव महापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील शिवपूजाविधाननांवाचा विसावा अध्याय संपला.

---

## अथैकविंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ अथाग्निकार्यं वक्ष्यामि कुण्डे वा स्थण्डिलेऽपि वा ॥ वेद्यां वा ह्यायसे पात्रे मृण्मये वा नवे शुभे ॥१॥ आधायाग्निं विधानेन संस्कृत्य च ततः परम् ॥ तत्राराध्य महादेवं होमकर्म समाचरेत् ॥२॥ कुण्डं द्विहस्तमानं वा हस्तमात्रमथापि वा ॥ वृत्तं वा चतुरस्रं वा कुर्याद्वेदीञ्च मण्डलम् ॥३॥ कुण्डं विस्तारवन्निम्नं तन्मध्येऽष्टदलाम्बुजम् ॥ चतुरंगुलमुत्सेधं तस्य द्व्यंगुलमेव वा ॥४॥ वितस्तिद्विगुणोन्नत्या नाभिमन्तः प्रचक्षते ॥ मध्यं च मध्यमांगुल्या मध्यमोत्तमपर्वणोः ॥५॥ अंगुलिः कथ्यते सद्भिस्तच्चतुर्विंशतिः करः॥ मेखलानां त्रयं वापि द्वयमेकमथापि वा ॥६॥ यथाशोभं प्रकुर्वीत श्लक्ष्णमिष्टं मृदा स्थिरम् ॥ अश्वत्थपत्रवद्योनिं गजाधरवदेव वा ॥७॥ मेखलामध्यतः कुर्यात्पश्चिमे दक्षिणेऽपि वा ॥ शोभनामग्रतः किंचि-

---

उपमन्यु बोलला— (१) आतां अग्निकार्य सांगतों, ऐक. कुंड, स्थंडिल, वेदि, लोहपात्र, नवीन चांगलें मातीचें पात्र, (२) यांपैकीं कशांत तरी अग्नीचें आधान करून (अग्नि ठेवून) विधिपूर्वक संस्कार करून नंतर त्यांत महादेवाची आराधना करून होमकर्म करावें. (३) कुंड करावयाचें असल्यास दोन हातांच्या प्रमाणाचें किंवा एक हाताच्या प्रमाणाचें करावें. त्याची आकृति वर्तुल किंवा चौकोनी करावी. याचप्रमाणें वेदि करावी. (४) कुंडाचा विस्तार चांगला करून कुंड गंभीर करावें. त्यामध्यें आठ दळाचें कमल करावें. आणि चार अंगुलांचा किंवा दोन अंगुलांचा (५) व दोन वीतभर उंचीचा नाभि करावा. नाभि आंतल्या प्रदेशांत करावा असें सांगतात. मधल्या बोटाच्या प्रमाणानें त्याचा ( नाभीचा ) मध्यभाग करावा. मध्यमोत्तम पर्वाच्या भागाला (६) एक अंगुलि ह्मणतात, तशीं चोवीस बोटें झालीं ह्मणजे एक हात झाला, असें ह्मणतात. कुंडाच्या भोंवती तीन किंवा दोन किंवा एक, शोभा येईल त्याप्रमाणें मेखला कराव्या. (७) कुंड जसें शोभेल त्याप्रमाणें करून सुंदर करावें. व मजबूत करावें. त्याची आकृति पिंपळाच्या पानाप्रमाणें किंवा हत्तीच्या ओंठाप्रमाणें केलेली असावी. (८) कुंडाची योनि मेखलेच्या मध्यभागीं ह्मणजे किंचित् पश्चिमेकडे किंवा किंचित् दक्षिणे-

न्निम्नामुन्मीलिकां शनैः ॥८॥ अग्रेण कुण्डाभिमुखीं किञ्चिदुत्सृज्य मेखलाम् ॥ नोत्सेधनियमो वेद्याः सा मार्दी वाथ सैकती ॥९॥ मण्डलं गोशकृत्तोयैर्मानं पात्रस्य नोदितम् ॥ कुण्डं च मृण्मयीं वेदीमालिपेद्गोमयाम्बुना ॥१०॥ प्रक्षाल्य तापयेत्पात्रं प्रोक्षयेदन्यदम्भसा ॥ स्वसूत्रोक्तप्रकारेण कुण्डादौ विलिखेत्ततः ॥११॥ सम्प्रोक्ष्य कल्पयेद्दर्भैः पुष्पैर्वा वह्निविष्टरम् ॥ अर्चनार्थं च होमार्थं सर्वद्रव्याणि साधयेत् ॥१२॥ प्रक्षाल्य क्षालनीयानि प्रोक्षण्या प्रोक्ष्य शोधयेत् ॥ मणिजं काष्ठजं वाथ श्रोत्रियागारसम्भवम् ॥१३॥ अन्यं वा गर्हितं वह्निं ततः साधारमानयेत् ॥ त्रिःप्रदक्षिणमावृत्य कुण्डादेरुपरि क्रमात् ॥१४॥ वह्निबीजं समुच्चार्य त्वादधीताग्निमासने ॥ योनि-

---

कडे करावी. ती सुंदर केलेली असून किंचित् उंच केलेली असावी, व उन्मीलिका ( उघडलेली ) केलेली असावी. (९) पुढच्या भागाला कुंडाच्या सन्मुख केलेली असून किंचित् मेखलेला सोडून केलेली असावी. वेदीला उत्सेधाचा ( वृद्धीचा ) नियम कांहीं नाहीं. ती वेदि मातीची किंवा वाळूची करावी. (१०) यांत पात्राचें प्रमाण मात्र सांगितलें नाहीं. नंतर गायीचें शेण व पाणी घेऊन मंडल, कुंड, वगैरे सर्व सारवावें मातीच्या वेदीवरही गोमय पाणी घालून लिंपून काढावें (११) पात्र स्वच्छ धुवून मग तापवावें. नंतर दुसऱ्या पाण्यानें शिंपडून काढावें. नंतर आपापल्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें कुंडादिकांवर काय लेखन करावयाचें असल्यास लेखन करावें. (१२) मग संप्रोक्षण करून दर्भाचें किंवा फुलाचें अग्नीला आसन करावें पूजेकरितां होमाकरितां सर्व द्रव्यें मिळवून ठेवावीं. (१३) धुण्यास योग्य असतील त्या पदार्थांला धुवून काढून नंतर प्रोक्षणीनें प्रोक्षण करून शुद्ध करावे. नंतर मण्याच्या घर्षणानें उत्पन्न झालेला, किंवा लांकडाच्या घर्षणानें उत्पन्न झालेला, किंवा श्रोत्रियाच्या घरांतला अग्नि आणून (१४) किंवा दुसरा निर्दोष अग्नि आधारसहित आणून कुंडादिकांवर क्रमानें तीन प्रदक्षिणा अग्नीला करवून ( फिरवून ) (१५) अग्नि बीजमंत्राचा उच्चार करून आसनावर (अग्नि ठेवावयाच्या जागेवर ) अग्नीचें आधान करावें. योनीच्या मार्गानें किंवा

मार्गेण वा तद्वदात्मनः संमुखेन वा ॥१५॥ योनिप्रदेशगः सर्वे कुण्डे कुर्याद्विचक्षणः॥ स्वनाभ्यन्तः स्थितं वह्निं तद्रंध्राद्विस्फुलिङ्गवत् ॥१६॥ निर्गम्य पावके बाह्ये लीनं विम्बाकृतिं स्मरेत् ॥ आज्यसंस्कारपर्यन्तमन्वाधानपुरःसरम् ॥१७॥ स्वसूत्रोक्तक्रमात्कुर्यान्मूलमन्त्रेण मन्त्रवित् ॥ शिवमूर्तिं समभ्यर्च्य ततो दक्षिणपार्श्वतः ॥१८॥ न्यस्य मन्त्रं घृते मुद्रां दर्शयेद्धेनुसंज्ञिताम् ॥ स्रुक्स्रुवौ तैजसौ ग्राह्यौ न कांस्यायससैसकाः ॥१९॥ यज्ञदारुमयौ वापि स्मार्तौ वा शिल्पसंमतौ ॥ पर्णे वा ब्रह्मवृक्षादेरच्छिद्रे मध्य उत्थिते ॥२०॥ संमृज्य दर्भैस्तौ वह्नौ सन्ताप्य प्रोक्षयेत्पुनः ॥ परिषिच्य स्वसूत्रोक्तक्रमेण शिवपूर्वकैः ॥२१॥ जुहुयादष्टभिर्वीजैरग्निसंस्कारसिद्धये ॥ भ्रुं स्तुं व्रुं श्रुं क्रमेणैव पुं डुं द्रुमित्यतःपरम् ॥२२॥ वीजानि सप्तसप्तानां जिह्वानाम-

---

आपल्या सन्मुखानें आधान करावें. (१६) सर्व अग्नि कुंडाच्या योनिप्रदेशावर बुद्धिमानानें ठेवावा. नंतर आपल्या नाभीच्या ( बेंबीच्या ) आंत अग्नि आहे, अशी कल्पना करून नाभीच्या रंध्रापासून ठिणग्या निघत आहेत, अशी कल्पना करावी. (१७) नंतर बाह्य अग्नीच्या ठिकाणीं तोच अग्नि लीन झाला आहे, अशी कल्पना करून तो वाह्याग्नि विंबाकृतीचा आहे, असें स्मरण करावें. अन्वाधान वगैरे सहित आज्यसंस्कारापर्यंत (१८) आपल्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें मंत्रवेत्त्या ब्राह्मणानें मूलमंत्रानें संस्कार करावा. नंतर दक्षिण बाजूला शिवमूर्तीची पूजा करून (१९) मंत्राचा न्यास करून तुपांत धेनुनांवाची मुद्रा न्यास करून ( मुद्रा दाखवून ) स्रुक् स्रुव घ्यावेत. ते पाऱ्याचे केलेले असावेत. कांस्य, लोखंड, शिसें यांचे स्रुक् स्रुव घेऊं नयेत. (२०) यज्ञोपयोगीं लांकडाचे स्रुक् स्रुव केले तरी हरकत नाहीं, किंवा शिल्पकाराला संमत असे स्मार्त स्रुक्स्रुव करावेत, किंवा छिद्ररहित असून मध्यभागीं उंच असलेलें असें पिंपळाचें पान तरी घ्यावें. (२१) नंतर स्रुक्स्रुवाला संमार्जन करून ते दोन्ही अग्नींत तापवून पुनः प्रोक्षण करावें. नंतर आपल्या सूत्रांत सांगितलेल्या क्रमानें परिषेचन करून शिवपूर्वक (२२) आठ वीजमंत्रांनीं अग्नीच्या संस्कारसिद्धीकरितां होम करावा. " भ्रुं, स्तुं, व्रुं, श्रुं, पुं, डुं, द्रुं " असे हे (२३) अग्नीच्या सात जिभांचे अनुक्रमानें सात

नुपूर्वशः ॥ त्रिशिखा मध्यमा जिह्वा बहुरूपसमाह्वया ॥२३॥ तस्याः शिखैका दक्षिणतो ज्वलन्ती वामतः परा ॥ हिरण्या प्रागुदग्जिह्वा कनका पूर्वतः स्थिता ॥२४॥ रक्ताग्नेयी नैर्ऋती च कृष्णान्या सुप्रभा मता ॥ अतिरक्ता मरुज्जिह्वा स्वनामानुगुणप्रभा ॥२५॥ स्वबीजानन्तरं वाच्याः स्वाहान्ताश्च यथाक्रमम् ॥ जिह्वामन्त्रैस्तुतैर्हुत्वा जिव्हास्वेकैकशः क्रमात् ॥२६॥ रुं वह्नये च स्वाहेति मध्ये हुत्वाहुतित्रयम् ॥ सर्पिषा वा समिद्भिर्वा परिषेचनमाचरेत् ॥२७॥ एवं कृते शिवाग्निः स्यात्स्मरेत्तत्र शिवासनम् ॥ तत्रावाह्य यजेद्देवमर्द्धनारीश्वरं शिवम् ॥२८॥ दीपान्तं परिषिच्याथ समिद्धोमं समाचरेत् ॥ ताः पालाश्यपरा वापि यज्ञिया द्वादशाङ्गुलाः ॥२९॥ अवक्रा न

---

बीजमंत्र आहेत. त्यांत मध्य जिव्हेला तीन शिखा असून तिला पुष्कळ रूपें व पुष्कळ नांवें आहेत. (२४) तिची एक शिखा दक्षिणेकडे असून डावीकडे एक शिखा प्रज्वलित होऊन राहिली आहे: प्राचीकडे व उत्तरेकडे मिळून जी जिव्हा आहे, तिला हिरण्या ह्मणतात. कनकानांवाची जिव्हा पूर्वेकडे आहे, (२५) रक्तानांवाची जिव्हा आग्नेयी दिशेकडे आहे, नैर्ऋत्येकडे कृष्णानांवाची जिव्हा आहे, आणि दुसऱ्या जिव्हेला सुप्रभा हें नांव आहे. तसेंच अतिरिक्ता आणि मरुजिव्हा या दोन्ही आपापल्या नांवाला अनुसरून गुण व कांति दाखविणाऱ्या आहेत. (२६) त्या त्या बीजमंत्राच्या उच्चारानंतर स्वाहापर्यंत जिव्हांच्या त्या त्या मंत्रांनीं क्रमानें एक एक आहुति द्यावी. (२७) रुं या बीजमंत्रानें 'स्वाहा' असें ह्मणून अग्नीच्या मध्यभागीं तीन आहुति द्याव्या. होमद्रव्यें, तूप किंवा समिधा असाव्या. नंतर परिषेचन करावें. (२८) याप्रमाणें केलें असतां त्याला शिवाग्नि असें नांव मिळतें. नंतर त्या शिवाग्नींत शिवाच्या आसनाची कल्पना करावी. त्या आसनावर अर्धनारीनरेश्वर शिवाचें आवाहन करून पूजा करावी. (२९) नंतर दीपांत परिषेचन करून समिधा घालून होम करावा. त्या समिधा पलाशाच्या ( पळसाच्या ) असून यज्ञाला उपयोगीं पडणाऱ्या ह्मणजे बारा बोटें लांब या प्रमाणाच्या केलेल्या असाव्यात. (३०) त्या

स्वयं शुष्काः सत्वचो निर्व्रणाः समाः ॥ दशाङ्गुला वा विहिताः कनिष्ठाङ्गुलिसम्मिताः ॥३०॥ प्रादेशमात्रा वालाभे होतव्याः सकला अपि ॥ दूर्वापत्रसमाकारां चतुरङ्गुलमायताम् ॥३१॥ दद्यादाज्याहुतिं पश्चादन्नमक्षप्रमाणतः ॥ लाजांस्तथा सर्षपांश्च यवांश्चैव तिलांस्तथा ॥३२॥ सर्पिषाक्तानि भस्मानि लेह्यचोष्याणि सम्भवे ॥ दशैवाहुतयस्तत्र पञ्च वा तिस्र एव वा ॥३३॥ होतव्याः शक्तितो दद्यादेकामेवाथ वाहुतिम् ॥ स्रुवेणाज्यं समित्पाण्या स्रुचा शेषान्करेण वा ॥३४॥ तत्र दिव्येन होतव्यं तीर्थेनार्षेण वापि च ॥ द्रव्येणैकेन वालाभे जुहुयाच्छ्रद्धया पुनः ॥३५॥ प्रायश्चित्ताय जुहुयान्मन्त्रयित्वाहुतित्रयम् ॥ ततो होमावशिष्टेन घृतेनापूर्य वै स्रुचम् ॥३६॥ निधाय पुष्पं तस्याग्रे स्रुवेणाधोमुखेन ताम् ॥ सदर्भेण समाच्छाद्य मू-

---

वांकड्या नसून आपोआप वाळलेल्या नसाव्यात, व त्यांवर साल असून व्रणरहित असाव्यात, व सरळ असाव्यात. आपल्या करंगळी एवढाल्या असून दहा बोटें प्रमाणाच्या तरी असाव्या. (३१) कदाचित् अशा समिधा मिळाल्या नाहींत तर प्रादेशमात्र ( टीचभर ) तरी आणून सर्व समिधा अग्नींत घालून होम करावा. दूर्वेच्या पानाच्या आकृतीप्रमाणें चार बोटांच्या विस्तारानें (३२) तुपाची आहुति द्यावी. नंतर एक अक्षाच्या प्रमाणानें अन्नाची आहुति द्यावी. नंतर लाजा, सर्षप ( मोहऱ्या ), यव ( जव ), तीळ, वगैरेंची आहुति द्यावी. (३३) तुपानें माखलेल्या भस्माची आहुति व लेह्य चोष्याची आहुति मिळाली असतां द्यावी. या क्रमामध्यें दहा, पांच, किंवा तीन आहुति द्याव्या. (३४) शक्त्यनुसार होम करावा, कमींत कमी एक तरी आहुति द्यावी. स्रुवानें ( पळीनें ) तुपाची आहुति द्यावी, समिधा हातानें घालाव्या, इतर पदार्थ स्रुचानें घालावे, किंवा हातानें घालावेत. (३५) त्यांत दिव्य व आर्ष अशा तीर्थांनें ( गुरूच्या सहाय्यानें ) होम करावा. इतर पदार्थ जरी मिळाले नाहींत, तथापि एका द्रव्यानें श्रद्धापूर्वक होम करावा. (३६) नंतर तीन आहुतींला अभिमंत्रण करून प्रायश्चित्ताकरितां होम करावा. नंतर होम करून राहिलेल्या तुपानें स्रुच भरून (३७) त्याच्या अग्रभागीं एक फूल ठेवून खालीं तोंड असलेल्या ( केलेल्या ) दर्भसहित स्रु-

लेनाञ्जलिनोत्थितः ॥३७॥ वौषडन्तेन जुहुयाद्धारान्तु यवसम्मिताम् ॥ इत्थं पूर्णाहुतिं कृत्वा परिषिञ्चेच्च पूर्ववत् ॥३८॥ तत उद्वास्य देवेशं गोपयेत्तु हुताशनम् ॥ तमप्युद्वास्य वा नाभौ यजेत्सन्धाय नित्यशः ॥३९॥ अथवा वन्हिमानीय शिवशास्त्रोक्तवर्त्मना ॥ वागीशो गर्भसम्भूतं संस्कृत्य विधिवद्यजेत् ॥॥४०॥ अन्वाधानं पुरः कृत्वा परिधीन्परिधाय च ॥ पात्राणि द्वन्द्वरूपेण निक्षिप्येष्ट्वा शिवं तथा ॥४१॥ संशोध्य प्रोक्षणीपात्रं प्रोक्ष्यान्यानि तदम्भसा ॥ प्रणीतापात्रमैशान्यां विन्यस्यापूरितं जलैः ॥४२॥ आज्यसंस्कारपर्यन्तं कृत्वा संशोध्य स्रुक्स्रुवौ ॥ गर्भाधानं पुंसवनं सीमन्तोन्नयनं ततः ॥४३॥ कृत्वा पृथक्पृथग्हुत्वा जातमग्निं विचिन्तयेत् ॥ त्रिपादं सप्तहस्तश्च चतुःशृङ्गं द्विशीर्षकम् ॥४४॥ मधुपिङ्गत्रिनयनं सकपर्देन्दुशेखरम् ॥

---

वानें स्रुचाला झांकून तोंडानें मूलमंत्राचा उच्चार करीत अंजलीनें तें घेऊन, (३८) वौषट् येथपर्यंत मंत्र ह्मणून जवाएवढ्या धारेनें होम करावा. याप्रमाणें पूर्णाहुति देऊन पूर्वोक्तविधीनें परिषेचन करावें. (३९) नंतर शिवाचें उद्वासन करून अग्नि तसाच राखून ठेवावा. अथवा अग्नीचेंही उद्वासन (विसर्जन ) करून आपल्या नाभींत ठेवून निरंतर अनुसंधान करून यजन करावें. (४०) अथवा शिवशास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें अग्नि आणून गर्भांत उद्भूत ( उत्पन्न ) झालेल्या अग्नीचा संस्कार करून विधिपूर्वक यजन करावें. (४१) अन्वाधान पुढें करून परिधि आच्छादन करून जोडीजोडीनें पात्रनिक्षेप करून शिवाची आराधना करून (४२) प्रोक्षिणी पात्राचा शोध करून ( शुद्ध करून ) अन्य पदार्थांवर तेंच उदक प्रोक्षण करून (शिंपडून) प्रणीतापात्र ईशान्य दिशेला ठेवून त्यांत पाणी भरून (४३) तुपाच्या संस्कारापर्यंत स्रुक्स्रुवाचें संशोधन करावें ( शुद्ध करावें ). गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन (४४) यांचें पृथक्करण करून प्रत्येकीं होम करावा. नंतर जाताग्नीचें स्मरण करावें. ज्याला तीन पाय, सात हात, चार शिंगें, दोन मस्तकें (४५) आहेत, व जो मधाप्रमाणें पिंगट वर्णाचा असून तीन डोळे ज्याला आहेत, व ज्याच्या जटेमध्यें चंद्र असून जो रक्त वर्णाचा आ-

रक्तं रक्ताम्बरालेपमाल्यभूषणभूषितम् ॥४५॥ सर्वलक्षणसम्पन्नं सोपवीतं त्रिमेखलम् ॥ शक्तिमन्नं स्रुक्स्रुवौ च दधानं दक्षिणैः करैः ॥४६॥ तोमरं तालवृन्तं च घृतपात्रं तथेतरैः ॥ जातं ध्यात्वैवमाकारं जातकर्म समाचरेत् ॥४७॥ नालापनयनं कृत्वा ततः संशोध्य सूतकम् ॥ शिवाग्नेरुचिनामास्य कृत्वाहुतिपुरःसरम् ॥४८॥ पित्रोर्विसर्जनं कृत्वा चौलोपनयनादिकम् ॥ आप्तोर्यामावसानान्तं कृत्वा संस्कारमस्य तु ॥४९॥ इध्माघारादिहोमं च कृत्वा स्विष्टकृतं ततः ॥ रुमित्यनेन बीजेन परिषिञ्चेत्ततः परम् ॥५०॥ ब्रह्मविष्णुशिवेशानां लोकेशानां तथैव च ॥ तदस्त्राणां च परितः कृत्वा पूजां यथाक्रमम् ॥५१॥ धूपदीपादिसिद्ध्यर्थं वन्हिमुध्दृत्य कृत्यवित् ॥ साधयित्वाज्यपूर्वाणि द्रव्याणि पुनरेव च ॥५२॥ कल्पयित्वासनं वन्हौ तत्रावाह्य यथा पुरा ॥ सम्पूज्य देवं देवीं च ततः पूर्णान्तमाचरेत् ॥५३॥ अ-

---

हे, व जो रक्तवस्त्र नेसलेला असून रक्तलेपन, रक्तमाळा यांनीं जो भूषित झाला आहे, (४६) व जो सर्व लक्षणांनीं संपन्न असून जो उपवीतासहित आहे, व ज्याला तीन मेखला असून ज्यानें उजव्या हातांत शक्ति, अन्न स्रुक्, स्रुव, हे धरिले आहेत, (४७) तोमर, तालवृंत ( ताडाचा पंखा), तुपाचें पात्र हीं ज्यानें डाव्या हातांत धरिलीं आहेत, अशा जात अग्नीचें ध्यान करून जातकर्म करावें. (४८) नालापनयन करून ( नाळ काढून ) सूतकाची ( जाताशौचाची ) शुद्धि करून रुचिनांवाच्या शिवाग्नींत आहुति द्याव्या. (४९) नंतर मातापितरांचें विसर्जन करून चौलोपनयनादि कर्म करून आप्तोर्यामाच्या समाप्तीपर्यंत कर्मांचा संस्कार करून (५०) इध्माघारादि होम करून स्विष्टकृत होम करावा. नंतर 'रुं' या बीजमंत्रानें परिषेचन करावें. (५१) ब्रह्मा, विष्णु, शिव, ईश, लोकेश व यांचीं अस्त्रें यांची क्रमानें पूजा करावी. (५२) धूपदीपादिकांच्या सिद्धिकरतां कर्म जाणणाऱ्यानें अग्नीचा उद्धार करावा. पुनः आज्यापासून एकंदर पदार्थ मिळवून (५३) आसनाचें स्मरण करून त्यावर पूर्वोक्तविधीनें अग्नीचें आवाहन करावें. नंतर शिवपार्वतीची पूजा करून पूर्णाहुति द्यावी. (५४) अथवा आपआपल्या

थवा स्वाश्रमोक्तन्तु वन्हिकर्म शिवार्पणम् ॥ बुद्धा शिवाश्रमी कुर्यान्न च तत्रापरो विधिः ॥५४॥ शिवाग्नेर्भस्म संग्राह्यमग्निहोत्रोद्भवन्तु वा ॥ वैवाहाग्निभवञ्चापि पक्कं शुचि सुगन्धि च ॥५५॥ कपिलायाः शकृच्छस्तं गृहीतं गगनेऽपतत् ॥ न क्लिन्नं नातिकठिनं न दुर्गन्धं न शोषितम् ॥५६॥ उपर्यधः परित्यज्य गृह्णीयात्पतितं यदि ॥ पिण्डीकृत्य शिवाग्न्यादौ तत्क्षिपेन्मूलमन्त्रतः ॥५७॥ अपक्कमतिपक्कञ्च सन्त्यज्य भसितं सितम् ॥ आदाय वाससमालोड्य भस्माधारे विनिक्षिपेत् ॥॥५८॥ सुकृते सुदृढे शुद्धे क्षालिते प्रोक्षिते शुभे ॥ विन्यस्तमन्त्रे मन्त्रेण पात्रे भस्म विनिक्षिपेत् ॥५९॥ तैजसं दारवं वापि मृण्मयं शैलमेव च ॥ अन्यद्वा शोभनं शुद्धं भस्माधारं प्रकल्पयेत् ॥६०॥ समे देशे शुभे शुद्धे धनवद्भस्म निक्षिपेत् ॥ प्रस्थितो भस्म गृह्णीया-

---

आश्रमाच्या धर्मांत सांगितल्याप्रमाणें अग्निकार्य करून तें कर्म शिवार्पण करावें. शिवाश्रमांत राहणाऱ्यानें चांगलें जाणून कर्म करावें यांत दुसरें विधान नाहीं. (९५) शिवाग्नीचें भस्म घ्यावें किंवा अग्निहोत्रापासून उत्पन्न झालेलें भस्म घ्यावें किंवा विवाहांतल्या अग्नीपासून उत्पन्न झालेलें शुद्ध, सुगंध, पक्क असें भस्म घ्यावें. (९६) भस्म करावयास अधांतरीं पडत असलेलें काळ्या गायीचें शेण घ्यावें. तें प्रशस्त मानिलें आहे. तें शेण पातळ असूं नये, अतिशय कठिण असूं नये, दुर्गंध असूं नये, वाळलेलें असूं नये. (९७) खालीं पडलेलें घ्यावयाचें असल्यास वरील दोषांनीं रहित असलेलें शेण वरचें खालचें सोडून घ्यावें. त्या शेणाचा गोळा करून मूलमंत्र ह्मणत शिवाग्नींत तो गोळा टाकावा. (९८) पक्क न झालेलें किंवा फार जळलेलें सोडून शुभ्र असलेलें मधलेंच तेवढें भस्म घ्यावें. नंतर तें भस्म वस्त्रगाळ करून भस्म ठेवण्याच्या पात्रांत घालून ठेवावें. (९९) तें पात्र चांगलें केलेलें असून मजबूत असावें, त्याचें प्रक्षालन करून शुद्ध करून त्याला प्रोक्षण करावें, अशा पात्रांत मंत्रानें भस्माचा निक्षेप करावा. (६०) भस्मपात्र पाण्याचें किंवा लांकडाचें, किंवा मातीचें, किंवा दगडाचें किंवा दुसऱ्या कशाचें तरी सुंदर शुद्ध असें असावें. (६१) सरळ, शुभ, शुद्ध अशा प्रदेशांत द्रव्याप्रमाणें भस्म जपून ठेवावें. कोठें बाहेरगांवाला जावयाचें झा-

त्स्वयश्चानुचरोऽपि वा ॥६१॥ न चायुक्तकरे दद्यान्नैवाशुचितले क्षिपेत् ॥ न संस्पृशेच्च नीचाङ्गैर्नोपेक्षेत न लंघयेत् ॥६२॥ तस्माद्भसितमादाय विनियुञ्जीत मन्त्रतः॥ कालेषूक्तेषु नान्यत्र नायोग्येभ्यः प्रदापयेत् ॥६३॥ भस्मसंग्रहणं कुर्याद्देवेऽनुद्वासिते सति ॥ उद्वासने कृते यस्माच्चण्डभस्म प्रजायते ॥६४॥ अग्निकार्ये कृते पश्चाच्छिवशास्त्रोक्तमार्गतः ॥ स्वसूत्रोक्तप्रकाराद्वा बलिकर्म समाचरेत् ॥६५॥ अथ विद्यासनं न्यस्य सुप्रलिप्ते तु मण्डले ॥ विद्याकोशं प्रतिष्ठाप्य यजेत्पुष्पादिभिः क्रमात् ॥६६॥ विद्यायाः पुरतः कृत्वा गुरोरपि च मण्डलम् ॥ तत्रासनवरं कृत्वा पुष्पाद्यैर्गुरुमर्चयेत् ॥६७॥ ततोऽनुपूजयेत्पूज्यान्भोजयेच्च बुभुक्षितान् ॥ ततः स्वयश्च भुञ्जीत शुद्धमन्नं यथासुखम् ॥६८॥ निवेदितश्च वा देवे तच्छेषश्चात्मशुध्दये ॥ श्रध्द-

---

ल्यास स्वतः किंवा चाकराच्या हातांत भस्म द्यावें. (६२) अयोग्य मनुष्याच्या हातांत तें देऊं नये, व अशुद्ध स्थलांत ठेवूं नये. अमंगळ अवयवांनीं भस्माला स्पर्श करूं नये. भस्माची उपेक्षा करूं नये, व भस्माला ओलांडूं नये. (६३) याकरितां हातांत घेऊन मंत्रानें भस्माची योजना करावी. उक्तकालांतच भस्माचा विनियोग करावा, अयोग्य मनुष्याला भस्म देऊं नये. (६४) देवाच्या ( शिवाच्या ) उद्वासना पूर्वींच भस्माचें ग्रहण करावें, उद्वासन केल्यानंतर तें भस्म प्रचंड होतें, याकरितां तें घेऊं नये. (६५) अग्निकार्य केल्यानंतर शिवशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें किंवा आपआपल्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें बलिकर्म करावें. (६६) नंतर विद्यासनाचा न्यास करून चांगल्या तऱ्हेनें सारविलेल्या मंडलावर विद्याकोशाची प्रतिष्ठापना करून पुष्पादिकांच्या योगानें पूजा करावी. (६७) विद्येच्या पुढें किंवा गुरूच्या पुढें मंडल करून त्यावर श्रेष्ठ आसन घालून पुष्पादिकांनीं गुरूची पूजा करावी. (६८) नंतर पूज्य, व भुकेलेल्या लोकांची पूजा करून त्यांना भोजन घालावें. नंतर शुद्ध अन्नाचें स्वतः सुखानें भोजन करावें.(६९) देवाला ( शिवाला ) निवेदित झालेलें शेष अन्न आत्मशुद्धीकरितां भक्षण करावें. निवेदित अन्नावर श्रद्धा ठेवून लोभ न धरितां व चंडाला समर्पण न करितां भ-

धानो न लोभेन न चण्डाय समर्पितम् ॥६९॥ गन्धमाल्यादि यच्चान्यत्तत्राप्येष समो विधिः ॥ तत्र तत्र शिवोऽस्मीति बुध्दिं कुर्याद्विचक्षणः ॥७०॥ भुक्त्वाचम्य शिवं ध्यात्वा हृदये मूलमुच्चरेत् ॥ कालशेषं नयेद्योग्यैः शिवशास्त्रकथादिभिः ॥७१॥ रात्रौ व्यतीते पूर्वांशे कृत्वा पूजां मनोहराम् ॥ शिवयोः शयनन्त्वेकं कल्पयेदतिशोभनम् ॥७२॥ भक्ष्यभोज्याम्बरालेपपुष्पमालादिकं तथा ॥ मनसा कर्मणा वापि कृत्वा सर्वं मनोहरम् ॥७३॥ ततो देवस्य देव्याश्च पादमूले शुचिः स्वपेत् ॥ गृहस्थो भार्यया सार्ध्दं तदन्योऽपि तु केवलः ॥७४॥ प्रत्यूषसमये बुद्धा मन्त्रमाद्यमुदीरयेत् ॥ प्रणम्य मनसा देवं साम्बं सगणमव्ययम् ॥७५॥ देशकालोचितं कृत्वा शौचाद्यमपि शक्तितः ॥ शंखादिनिनदैर्दिव्यैर्देवं देवीं च बोधयेत् ॥७६॥ ततस्त-

---

क्षण करावें. (७०) गंध माला वगैरे इतर पदार्थ जे असतील त्यांत सुद्धां हेंच विधान सरळ आहे, असें जाणावें. त्या त्या ठिकाणीं शिव मीच आहें, अशी कल्पना करून बुद्धिमानानें वागावें. (७१) भोजन केल्यानंतर आचमन करून शिवाचें ध्यान करून हृदयामध्यें मूलमंत्राचा उच्चार करावा. इतर्के करून राहिलेला काळ योग्य माणसांशीं भाषण करण्यामध्यें किंवा शिवशास्त्र कथा वगैरे ऐकण्यामध्यें घालवावा. (७२) रात्र सरल्यानंतर पूर्वांशामध्यें ( अरुणोदयाच्या सुमारास ) सुंदर पूजा करून संध्याकालच्या वेळेसही पूर्वरात्रीं ( प्रदोषकालीं ) शिवपूजा करून शिवपार्वतीकरितां सुंदर शयन घालावें. (७३) भक्ष्य, भोज्य, वस्त्र, आलेपन, पुष्प, माला वगैरे पदार्थ मनानें किंवा कृतीनें शिवपार्वतीला अर्पण करावयाचे ते मनोहर रीतीनें अर्पण करावेत. (७४) नंतर शिवपार्वतीच्या पायांजवळ शुद्धपणानें झोंप घ्यावी. गृहस्थाश्रमी असेल तर भार्येसहित तेथें निजावे, ब्रह्मचारी असेल तर एकट्यानें निजावें. (७५) दुसऱ्या दिवशीं प्रात:कालीं उठून आद्यमंत्राचा उच्चार करावा. नंतर मनानें गणसहित पार्वतीसहित अव्यय अशा शिवाचें स्मरण करून (७६) देशकालाला उचित असें कर्म करून शक्तीला अनुसरून शौचादि ( शुद्धपणा वगैरे ) कर्म करावें. नंतर शंख वगैरे वाद्यांच्या दिव्य शब्दांनीं देवाला ( शिवाला ) व पार्वतीला जागें करावें. (७७) नंतर

त्समयोन्निद्रैः पुष्पैरतिसुगन्धिभिः ॥ निर्वर्त्य शिवयोः पूजां प्रारभेत पुरोदितम् ॥७७॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे होमादिविधिकथनं नाम एकविंशोऽध्यायः ॥२१॥

---

त्याच वेळेस अर्धी मुर्धी उमलेलीं सुगंध फुलें आणून पूर्वोक्त विधीनें शिवपार्वतीची पूजा करावी.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील होमादि विधिकथननांवाचा एकविसावा अध्याय संपला.

## अथ द्वाविंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ अतःपरं प्रवक्ष्यामि शिवाश्रमनिषेविणाम् ॥ शिवशास्त्रोक्तमार्गेण नैमित्तिकविधिक्रमम् ॥१॥ सर्वेष्वपि च मासेषु पक्षयोरुभयोरपि ॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां तथा पर्वणि च क्रमात् ॥२॥ अयने विषुवे चैव ग्रहणेषु विशेषतः ॥ कर्तव्या महती पूजा ह्यधिका वापि शक्तितः ॥३॥ मासि मासि यथान्यायं ब्रह्मकूर्चं प्रसाध्य तु ॥ स्नापयित्वा शिवं तेन पिबेच्छेषमुपोषितः ॥४॥ ब्रह्महत्यादिदोषाणामतीवमहतामपि ॥ निष्कृतिर्ब्रह्मकूर्चस्य पानान्नान्या विशिष्यते ॥५॥ पौषे तु पुष्यनक्षत्रे कुर्यान्नीराजनं विभोः ॥ माघे मघाख्ये नक्षत्रे प्रदद्याद्घृतकम्बलम् ॥६॥ फाल्गुने चोत्तरान्ते वै प्रारभेत महोत्सवम् ॥ चैत्रे चित्रापौर्णमास्यां दोलां कुर्याद्यथाविधि ॥७॥ वैशाखेऽपि च वैशाख्यां कुर्यात्पुष्पमहालयम् ॥ ज्येष्ठे मूलाख्यनक्षत्रे शी-

---

उपमन्यु बोलला— (१) आतां शिवाश्रमांत राहणाऱ्या लोकांनीं शिवशास्त्रांत सांगितलेल्या विधीनें नित्य नैमित्तिक कर्में कशीं करावीं, तीं सांगतों ऐक. (२) सर्व मासांमध्यें ( बारा महिन्यांमध्यें ) दोन्ही पक्षांत ( शुक्लकृष्णपक्षांत ) क्रमानें अष्टमी, चतुर्दशी, पर्वतिथि, (३) अयन, विषुव (समरात्र समदिवसकाल), विशेषेंकरून ग्रहण, या दिवशीं शक्त्यनुसार अधिक मोठी शिवाची पूजा करावी. (४) प्रत्येक महिन्यांत न्यायानुसार ब्रह्मकूर्च मिळवून शिवाला स्नान ( अभिषेक ) घालून तें राहिलेलें तीर्थ उपोषित होऊन प्यावें. (५) ब्रह्महत्यादि दोष व इतर मोठे जे दोष असतील ते सुद्धां ब्रह्मकूर्चाच्या पानापासून निःशेष होतात. अशा पातकांना हेंच प्रायश्चित्त होय दुसरें नाहीं. (६) पौष महिन्यांत पुष्य नक्षत्राच्या दिवशीं शिवाला नीराजन करावें. माघांत मघा नक्षत्राच्या दिवशीं तूप व कांबळी यांचें दान करावें. (७) फाल्गुनांत उत्तराफाल्गुनी नक्षत्राच्या दिवशीं शिवाच्या महोत्सवाचा आरंभ करावा. चैत्रांत चित्रा नक्षत्राच्या दिवशीं ( पौर्णिमेच्या दिवशीं ) विधिपूर्वक दोलाउत्सव ( झोंपाळ्याचा उत्सव ) करावा. (८) वैशाखांत विशाखा नक्षत्राच्या दिवशीं पुष्पमंदिर करून त्यांत शिवाची पूजा करावी. ज्येष्ठ महिन्यांत मूळा नक्षत्राच्या दिवशीं थंडपाण्यानें भरलेली घागर

तकुम्भं प्रदापयेत् ॥८॥ आषाढे चोत्तराषाढपवित्रारोपणं तथा ॥ श्रावणे प्राकृतान्यानि मण्डलानि प्रकल्पयेत् ॥९॥ श्रविष्ठाख्ये तु नक्षत्रे प्रौष्ठपद्यां ततःपरम् ॥ प्रोक्षयेच्च जलक्रीडां पूर्वाषाढाश्रये दिने ॥१०॥ आश्वयुज्यां ततो दद्यात्पायसं च नवौदनम् ॥ अग्निकार्यं च तेनैव कुर्याच्छतभिषग्दिने ॥११॥ कार्त्तिक्यां कृत्तिकायोगे दद्याद्दीपसहस्रकम् ॥ मार्गशीर्षे तथार्द्रायां घृतेन स्नापयेच्छिवम् ॥१२॥ अशक्तस्तेषु कालेषु कुर्यादुत्सवमेव वा ॥ आस्थानं वा महापूजामधिकं वा समर्चनम् ॥१३॥ प्रवृत्तेऽपि च कल्याणे प्रशस्तेष्वपि कर्मसु ॥ दौर्मनस्ये दुराचारे दुःस्वप्ने दुष्टदर्शने ॥१४॥ उत्पाते वाशुभेऽन्यस्मिन्रोगे वा प्रबलेऽथवा ॥ स्नानपूजाजपध्यानहोमदानादिकाः क्रियाः ॥१५॥ निमित्तानुगुणाः कार्याः पुरश्चरणपूर्विकाः ॥ शिवानले च विहते पुनः सन्धानमाचरेत् ॥१६॥ य एवंशिवधर्मिष्ठो वर्तते नित्य-

---

द्यावी. (९) आषाढांत उत्तराषाढा नक्षत्राच्या दिवशीं पवित्रारोपण करावें. श्रावणांत प्राकृत मंडल वगैरे करावें. (१०) भाद्रपदांत श्रविष्ठा नक्षत्राच्या दिवशीं प्रोक्षण करावें. पूर्वाषाढा नक्षत्राच्या दिवशीं शिवाला जलक्रीडा करवावी ( मूर्ति पाण्यांत ठेवावी ). (११) अश्विनांत पायस व नूतन अन्न यांचें दान करावें. शततारा नक्षत्राच्या दिवशीं त्याच अन्नानें व पायसानें अग्निकार्य करावें. (१२) कार्तिकांत कृत्तिकेच्या दिवशीं सहस्र दीप दान करावे. मार्गशीर्षांत आर्द्रा नक्षत्राच्या दिवशीं शिवाला घृताभिषेक घालावा. (१३) त्या त्या कालांमध्यें पूर्वोक्त कर्म करावयास अशक्त असेल तर नुसता उत्सव करावा. आस्थान, महापूजा, विशेष पूजा वगैरे कर्में करावींत. (१४) कल्याण ( उत्सव ) आरंभ झालें असतां, सर्व कर्म प्रशस्तपणें चाललें असतां, मन विमुख झालें तर, दुराचार घडला तर, दुष्ट स्वप्न पडलें असतां, स्वप्नांत अमंगळ पाहिलें असतां, (१५) उत्पात, अशुभ, प्रबल रोग, वगैरे आले असतां स्नान, पूजा, जप, ध्यान, होम, दान वगैरे कर्म (१६) त्या त्या निमित्ताला अनुसरून पुरश्चरणपूर्वक करावें. शिवाग्नि हत झाला असतां ( अग्नि गेला असतां ) पुनः संधान करावें. ( पुनः अग्नि जागृत करावा ). (१७) याप्रमाणें जो प्राणी शिवधर्मांत रत होऊन नित्य उद्योग करतो,

मुद्यतः ॥ तस्यैकजन्मना मुक्तिं प्रयच्छति महेश्वरः ॥१७॥ एतद्यथोत्तरं कुर्यान्नित्यनैमित्तिकेषु यः ॥ दिव्यं श्रीकण्ठनाथस्य स्थानमाद्यं स गच्छति ॥१८॥ तत्र भुक्त्वा महाभोगान्कल्पकोटिशतं नरः ॥ कालान्तरे च्युतस्तस्मादौमं कौमारमेव च ॥१९॥ सम्प्राप्य वैष्णवं ब्राह्मं रुद्रलोकं विशेषतः ॥ तत्रोषित्वा चिरं कालं भुक्त्वा भोगान्यथेप्सितान् ॥२०॥ पुनश्चोर्ध्वं गतस्तस्मादतीत्य स्थानपंचकम् ॥ श्रीकण्ठाज्ज्ञानमासाद्य परं शिवपुरं व्रजेत् ॥२१॥ अर्ध्दचर्यारतश्चापि द्विरावृत्त्यैवमेव तु ॥ पश्चाज्ज्ञानं समासाद्य शिवसायुज्यमाप्नुयात् ॥२२॥ अर्ध्दार्ध्दचरितो यस्तु देही देहक्षयात्परम् ॥ अण्डान्तं बौध्दमव्यक्तमतीत्य भुवनद्वयम् ॥२३॥ सम्प्राप्य पौरुषं रौद्रं स्थानमद्रीन्द्रजापतेः अनेकयुगसाहस्रं भुक्त्वा भोगाननेकधा ॥२४॥ पुण्यक्षये क्षितिं प्राप्य कुले महति जायते ॥ तत्रापि पूर्वसंस्कारवशेन स महाद्युतिः ॥२५॥ पशुधर्मान्परित्यज्य शिवधर्मरतो भवेत् ॥ तध्दर्म-

---

त्याच्या एका जन्मांतच महेश्वर मुक्ति देतो. (१८) नित्यनैमित्तिक कर्मांमध्यें उत्तरोत्तर होईल तितकें कर्म जो करितो, तो प्राणी श्रीकंठनाथाच्या दिव्य व आद्य स्थानाला जातो. (१९) त्या स्थानांत शंभरकोटि कल्पांपर्यंत महाभोगाचा उपभोग घेऊन नंतर कालांतरानें तेथून भ्रष्ट होऊन उमास्थान, षण्मुखस्थान, (२०) वैष्णवस्थान, ब्रह्मस्थान, विशेषेंकरून रुद्रलोक या स्थानांला येऊन तेथें वास करून चिरकाल यथेच्छ भोगांचा उपभोग घेऊन, (२१) पुनः वर जाऊन स्थानपंचकाला अतिक्रमण करून तेथें श्रीकंठापासून ज्ञान संपादन करून तो प्राणी श्रेष्ठ शिवपुराला जातो. (२२) जो अर्धचर्येंत रत असेल, त्याची पुनरावृत्ति होऊन नंतर ज्ञान संपादन करून शिवसायुज्याला तो पावतो. (२३) पादचर्या करणारा जो शरीरी असेल, त्याचा देहक्षय झाल्यानंतर बुद्धिस्थ अंडांत अव्यक्त तत्वाचें अतिक्रमण करून दोन्ही लोकांला (२४) येऊन नंतर श्रीशंकराच्या पौरुष नांवाच्या रौद्रस्थानाला येऊन तेथें हजारो युगेंपर्यंत अनेक उपभोग घेऊन (२५) पुण्याचा क्षय झाल्यानंतर भूलोकांत येऊन उत्तम वंशांतल्या घराण्यामध्यें तो जन्म घेतो. तेथेंही पूर्वसंस्काराच्या योगानें मोठा तेजस्वी पुरुष होतो. (२६) नंतर

गौरवादेव ध्यात्वा शिवपुरं व्रजेत् ॥२६॥ भोगांश्च विविधान्भुक्त्वा विद्येश्वरपदं व्रजेत् ॥ तत्र विद्येश्वरैः सार्द्धं भुक्त्वा भोगान्बहून्क्रमात् ॥२७॥ अण्डस्यान्तर्बहिर्वाथ सकृदावर्तते पुनः ॥ ततोलब्ध्वा शिवज्ञानं परां भक्तिमवाप्य च ॥२८॥ शिवसाधर्म्यमासाद्य न भूयो विनिवर्तते ॥ यश्चातीव शिवासक्तो विषयासक्तचित्तवत् ॥२९॥ शिवधर्मानसौ कुर्वन्नकुर्वन्वापि मुच्यते ॥ एकावृत्तो द्विरावृत्तस्त्रिरावृत्तो निवर्तकः ॥३०॥ न पुनश्चक्रवृत्तः स्याच्छिवधर्माधिकारवान् ॥ तस्माच्छिवाश्रितो भूत्वा येन केनापि हेतुना ॥३१॥ शिवधर्मे मतिं कुर्याच्छ्रेयसे चेत्कृतोद्यमः ॥ नात्र निर्बन्धयिष्यामो वयं कश्चन केनचित् ॥३२॥ निर्बन्धोऽप्यत्र पापेभ्यः प्रकृत्यैव न रोचते ॥ रोच-

---

त्या जन्मामध्यें पशुधर्म सर्व सोडून ( कर्ममार्ग सोडून ) शिवधर्मांत रत होतो. नंतर त्या धर्माच्या गौरवानेंच शिवध्यान करून शिवपुराला जातो. (२७) शिवपुरांत अनेक उपभोग घेऊन तेथून विद्येश्वर पदाला जातो. तेथें विद्येश्वरांसहित क्रमानें पुष्कळ उपभोग भोगून (२८) ब्रह्मांडाच्या आंत किंवा बाहेर एकवेळ पुनः परत फिरतो. नंतर शिवज्ञान मिळवून शिवाच्या ठिकाणीं उत्तम भक्ति करून (२९) शिवसारूप्याला पावून पुनः तो मागें फिरत नाहीं ( जन्माला येत नाहीं ). विषयासक्त प्राण्याप्रमाणें जो प्राणी शिवाच्या ठिकाणीं अत्यंत आसक्ति करतो, (३०) तो प्राणी शिवधर्म करो, किंवा न करो तरी त्या आसक्तिमात्रानें मुक्त होतो. हा प्राणी एकावृत्त (पुनर्जन्म एकवेळ, दोनवेळ, तीनवेळ, घेणारा), द्विरावृत्त, त्रिरावृत्त, निवर्तक ( नेहमीं फिरणारा ) वगैरे प्राण्यांप्रमाणें (३१) पुनः चक्रवृत्त होत नाहीं ( फेऱ्यांत येत नाहीं ). कारण तो शिवधर्माचा अधिकारी असतो. याकरितां कोणत्याही कारणानें शिवाचा आश्रय करून (३२) शिवधर्मामध्यें बुद्धि ठेवावी. व आपल्या खऱ्या कल्याणासाठीं उद्योग करावा. या कर्मामध्यें आह्मीं कोणालाही कोणत्याही कारणानें प्रतिबंध करीत नाहीं. (३३) यांत निर्बंध ह्मणजे पापी लोकांना स्वभावतःच हा शिवधर्म रुचत नाहीं, हाच आमचा निर्बंध होय. पुण्यवान लोकांना पुण्य संस्काराच्या गौरवानें सहजच शिवध-

ते वा परेभ्यस्तु पुण्यसंस्कारगौरवात् ॥३३॥ संसारकारणं ह्येषां न प्ररोढुमलं भवेत् ॥ प्रकृत्यनुगुणं तस्माद्विमृश्यैतदशेषतः ॥३४॥ शिवधर्मेऽधिकुर्वीत यदीच्छेच्छिवमात्मनः ॥३५॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे द्वाविंशोऽध्यायः ॥२२॥

---

र्म रुचतो. (३४) अशा पुण्यवान लोकांच्या हातून संसाराला कारणभूत अशीं कर्मे घडतच नाहींत. याकरितां त्यांच्या त्यांच्या प्रकृतीला अनुसरून व सर्व तऱ्हेनें विचार करून, (३५) शिवधर्मांत मनुष्यानें रत व्हावें ह्मणजे त्याचें खरें कल्याण होईल.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील बाविसावा अध्याय संपला.

## अथ त्रयोविंशोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ भगवंस्त्वन्मुखादेव श्रुतं श्रुतिसमं मया ॥ स्वाश्रितानां शिवप्रोक्तं नित्यं नैमित्तिकं तथा ॥१॥ इदानीं श्रोतुमिच्छामि शिवधर्माधिकारिणाम् ॥ काम्यमप्यस्ति चेत्कर्म वक्तुमर्हसि साम्प्रतम् ॥२॥

उपमन्युरुवाच ॥ अस्त्यैहिकफलं किञ्चिदामुष्मिकफलं तथा ॥ ऐहिकामुष्मिकञ्चापि तच्च पञ्चविधं पुनः ॥३॥ किंचित्क्रियामयं कर्म किंचित्कर्म तपोमयम् ॥ जपध्यानमयं किंचित्किंचित्सर्वमयं तथा ॥४॥ क्रियामयं तथाभिन्नं होमदानार्चनक्रमात् ॥ सर्वं शक्तिमतामेव नान्येषां सफलं भवेत् ॥५॥ शक्तिश्चाज्ञा महेशस्य शिवस्य परमात्मनः ॥ तस्मात्काम्यानि कर्माणि कुर्यादाज्ञाधरो द्विजः ॥६॥ अथ वक्ष्यामि काम्यानामिहामुत्रफलप्रदम् ॥ शैवैर्माहेश्वरैश्चैव कार्यमन्त-

---

श्रीकृष्ण बोलतो— (१) हे भगवन्, स्वाश्रित लोकांसाठीं शिवानें जें नित्यनैमित्तिक कर्म सांगितलें, तें श्रुतिसमान कर्म तुझ्या मुखानें मीं ऐकिलें. (२) आतां शिवधर्मांतल्या अधिकारी लोकांचें काम्यकर्म असेल, तर तेंही ऐकण्याची इच्छा करतों, तर सांप्रत तूं सांगावयास योग्य आहेस.

उपमन्यु बोलतो— (३) हे कृष्णा, ऐहिकफल ( याच लोकांत मिळणारें फल ) आणि आमुष्मिकफल ( परलोकांत मिळणारें फल ) हीं दोन्हीं फलें आहेत. त्या ऐहिक आमुष्मिक फलांमध्यें पांच पांच प्रकार आहेत. (४) कांहीं कर्म क्रियामय असून कांहीं कर्म तपोमय आहे. व कांहीं कर्म जपमय, ध्यानमय असून कांहीं कर्म सर्वमय आहे. (५) यांमध्यें क्रमानें होम, दान, अर्चन या क्रियांनीं क्रियामय कर्म अनेक स्वरूपानें झालें आहे. हें सर्व शक्तिमानाला फलदायक होणार असून निःशक्त मनुष्याला सफल होणार नाहीं. (६) परमात्मा, महेश शिवाची जी शक्ति आहे, ती शिवाची आज्ञा आहे, असें समजावें. याकरितां ब्राह्मणानें ही शिवाची आज्ञा मनांत बाळगून काम्यकर्म करावें. (७) या लोकांत फल देणारें काम्यकर्म सांगतों, ऐक. जे

बहिःक्रमात् ॥७॥ शिवो महेश्वरश्चेति नात्यन्तमिह भिद्यते ॥ यथा तथा न भिद्यन्ते शैवा माहेश्वरा अपि ॥८॥ शिवाश्रितेषु ते शैवा ज्ञानयज्ञरता नराः ॥ माहेश्वराः समाख्याताः कर्मयज्ञरता भुवि ॥९॥ तस्मादभ्यन्तरे कुर्युः शैवा माहेश्वरा बहिः ॥ नातिप्रयोगे भिद्येत वक्ष्यमाणस्य कर्मणः ॥१०॥ परीक्ष्य भूमिं विधिवद्गन्धवर्णरसादिभिः ॥ मनोऽभिलषिते तत्र वितानविततांबरे ॥११॥ सुप्रलिप्ते महीपृष्ठे दर्पणोदरसन्निभे ॥ प्राचीमुत्पादयेत्पूर्वं शास्त्रदृष्टेन वर्त्मना ॥१२॥ एकहस्तं द्विहस्तं वा मण्डलं परिकल्पयेत् ॥ आलिखेद्विमलं पद्ममष्टपत्रं सकर्णिकम् ॥१३॥ रत्नहेमादिभिश्चूर्णैर्यथासम्भवसम्भृतैः ॥ पंचावरणसंयुक्तं बहुशोभासमन्वितम् ॥१४॥ दलेषु सिद्धयः कल्प्याः केशरेषु सशक्तिकाः ॥ रुद्रा वामादयस्त्वष्टौ पूर्वादिदलतः

---

शैव व माहेश्वर असतील, त्यांनीं क्रमानें आंतर व बाह्यकर्म करावें. (८) शिव आणि महेश्वर यांमध्यें जसा भेद नाहीं, त्याप्रमाणें शैव व माहेश्वर यांमध्यें मुळींच भेद नाहीं, असें जाणावें. (९) शिवाचा आश्रय करून राहणारे जे असतील, ते शैव होत, व शिवज्ञानांत रत होणारे जे मानव असतील, ते माहेश्वर आहेत, असें समजावें. हे दोघेही भूलोकांत कर्मयज्ञांत रत होणारे आहेत. (१०) यांत शैव जे असतील, ते आभ्यंतर कर्मांत रत होणारे जाणावे, व माहेश्वर जे असतील, ते बाह्यकर्म करणारे जाणावेत. पुढें जें कर्म सांगावयाचें आहे, त्यांत विशेष भेद कांहीं नाहीं. (११) गंध, वर्ण, रस यांनीं भूमीची परीक्षा विधिपूर्वक करून जेथें मन लागेल त्याठिकाणीं विस्तारयुक्त छत मारून (१२) ती जमीन सारवून सुरेख आरशासारखी करावी, नंतर शास्त्रोक्त मार्गानें तेथें प्रथम पूर्वदिशा साधावी. (१३) नंतर एक हात, दोन हात प्रमाणाचें मंडल करावें, त्या मंडलावर स्वच्छ करंड्यासह आठ दळाचें कमळ काढावें (१४) त्या कमळांत रत्न सोनें वगैरेंच्या चूर्णांनीं किंवा जें मिळेल त्या चूर्णानें पांच आवरणें करावींत, व तीं पुष्कळ सुशोभित केलेलीं असावींत. (१५) आठही दलांवर आठ सिद्धि लिहून केसरांवर शक्ति लिहाव्या. तसेंच पूर्वादि दिशांच्या क्रमानें वामादि आठ रु-

क्रमात् ॥१५॥ कर्णिकायांच वैराग्यं बीजेषु नवशक्तयः ॥ कन्दे शिवात्मको धर्मो नाले ज्ञानं शिवात्मकम् ॥१६॥ कर्णिकोपरि वाह्नेयं मण्डलं सौरमैन्दवम् ॥ शिवविद्यात्मतत्वाख्यं तत्वत्रयमतःपरम् ॥१७॥ सर्वासनोपरि सुखं विचित्रकुसुमान्वितम् ॥ पंचावरणसंयुक्तं पूजयेदम्बया सह ॥१८॥ शुद्धस्फटिकसङ्काशं जटामुकुटभूषितम् ॥ शार्दूलचर्मवसनं किंचित्स्मितमुखाम्बुजम् ॥१९॥ रक्तपद्मदलप्रख्यपादपाणितलाधरम् ॥ सर्वलक्षणसंपन्नं सर्वाभरणभूषितम् ॥२०॥ दिव्यायुधवरैर्युक्तं दिव्यगन्धानुलेपनम् ॥ पंचवक्रं दशभुजं चन्द्रखण्डशिखामणिम् ॥२१॥ अस्य पूर्वमुखं सौम्यं बालार्कसदृशप्रभम् ॥ त्रिलोचनारविन्दाढ्यं कृतबालेन्दुशेखरम् ॥२२॥ दक्षिणं नीलजीमूत-

---

द्रमूर्ति दलांवर लिहाव्या. (१६) कर्णिकेंत वैराग्याचें चिन्ह करावें, व बीजांच्या ठिकाणीं नऊ शक्ति रेखाव्या. कमळाच्या कंदभागावर शिवस्वरूपी धर्म काढावा, व नाळावर शिवात्मक ज्ञानाचें चिन्ह काढावें. (१७) कर्णिकेवर अग्नीचें, सूर्याचें, चंद्राचें, मंडल काढावें. त्याच्या वरच्या भागावर शिवविद्या नांवाच्या आत्मतत्वाला व तत्वत्रयाला काढावें. (१८) सर्व आसनावर सुखकर चित्रविचित्र फुलें आंथरून सभोंवती पांच आवरणें करून त्यावर अंबिकेसह ( पार्वतीसह ) शिवाची पूजा करावी. (१९) शुद्ध स्फटिकाप्रमाणें ज्याची कांति असून डोक्यावर जटा व मुकुट यांचें भूषण आहे, व जो वाघाचें कातडें नेसला असून किंचित् मंदहास्य करीत आहे, (२०) व ज्याचे हातापायाचे तळवे तांबड्या कमळाच्या दळाप्रमाणें शोभतात, व जो सर्व लक्षणांनीं युक्त असून सर्व आभरणांनीं सुशोभित आहे, (२१) ज्याच्या हातांमध्यें दिव्य दिव्य आयुधें असून ज्यानें सर्वांगाला गंध लेपन केलें आहे, व ज्याला पांच मुखें असून दहा भुजा आहेत, व ज्याच्या डोक्यावर चंद्रशकल ( चंद्राची कोर ) शोभत आहे, (२२) असा श्रीशिव आहे, त्याचें पूर्वेकडचें तोंड बालसूर्याप्रमाणें झळकत आहे, आणि त्या तोंडाला तीन डोळे कमळाप्रमाणें शोभणारे दिसतात, व त्या डोक्यावर बालचंद्र शोभतो आहे. (२३) तसेंच दक्षिणेकडचें तोंड निळ्या मेघाप्रमाणें

समानरुचिरप्रभम् ॥ भृकुटीकुटिलं घोरं रक्तवृत्तेक्षणत्रयम् ॥२३॥ दंष्ट्राकरालं दुर्द्धर्षं स्फुरिताधरपल्लवम् ॥ उत्तरं विद्रुमप्रख्यं नीलालकविभूषितम् ॥२४॥ सविलासं त्रिनयनं चन्द्राभरणशेखरम् ॥ पश्चिमं पूर्णचन्द्राभं लोचनत्रितयोज्वलम् ॥२५॥ चन्द्ररेखाधरं सौम्यं मन्दस्मितमनोहरम् ॥ पञ्चमं स्फटिकप्रख्यमिन्दुरेखासमुज्वलम् ॥२६॥ अतीवसौम्यमुत्फुल्ललोचनत्रितयोज्वलम् ॥ दक्षिणे शूलपरशुवज्रखड्गानलोज्वलम् ॥२७॥ सव्ये च नागनाराचघण्टापाशांकुशोज्वलम् ॥ निवृत्या जानुसम्बद्धमानाभेश्च प्रतिष्ठया ॥२८॥ आकण्ठं विद्यया तद्वदाललाटन्तु शान्तया ॥ तदूर्द्ध्वं शान्त्यतीताख्यकलया परया तथा

---

शोभत असून सुंदर दिसतें, व वांकड्या भिंवयामुळें जें भयंकर दिसत आहे व ज्याच्यावर तीन तांबडे डोळे शोभत आहेत (२४) अशा त्या मुखांतल्या दाढा कराळ असून दोन्ही ओंठ स्फुरण पावत आहेत, त्यामुळें तें तोंड असह्य दिसत आहे. उत्तरेकडचें तोंड पोंवळ्याप्रमाणें शोभत असून ज्यावर नील कुरळ केंस शोभत आहेत, (२५) व ज्याचे डोळे तीन असून ते विलासानें युक्त आहेत, त्या डोक्यावर चंद्र हा आभरणरूपानें राहिला आहे. तसेंच पश्चिमेकडचें तोंड पूर्णचंद्राप्रमाणें असून तीन डोळ्यांनीं तें तोंड प्रज्वलित दिसत आहे, (२६) त्याच्या डोक्यावर चंद्ररेखा असून तें मुख सौम्य आहे, व मंदहास्य करीत असल्यामुळें फार मनोहर दिसत आहे, तसेंच पांचवें तोंड स्फटिकासारखें असून त्याच्या डोक्यावर चंद्ररेखा असल्यामुळें झळकत आहे, (२७) त्या मुखावर अत्यंत सौम्य व विकासित असे तीन डोळे प्रकाशत आहेत, अशा पांच तोंडांच्या शिवाच्या उजव्या हातांत शूल, परशु, वज्र, खड्ग, अग्नि हीं आयुधें शोभत आहेत, (२८) व डाव्या हातांत नाग, बाण, घंटा, पाश, अंकुश वगैरे आयुधें आहेत. असा तो शिव पायांपासून गुडघ्यांपर्यंत निवृत्ति कलेनें बांधला गेला आहे, व गुडघ्यांपासून नाभीपर्यंत प्रतिष्ठा कलेनें बांधला गेला आहे. (२९) नाभीपासून कंठापर्यंत विद्या कलेनें बद्ध झाला आहे, व कंठापासून कपाळापर्यंत शांतिकलेनें बद्ध झाला आहे. त्याच्यावर श्रेष्ठ शांत्यतीतकलेनें बांधला गेला

॥२९॥ पञ्चाध्वव्यापिनं तस्मात्कलापञ्चकविग्रहम् ॥ ईशानमुकुटं देवं पुरुषास्यं पुरातनम् ॥३०॥ अघोरहृदयं तद्वद्वामगुह्यं महेश्वरम् ॥ सद्यपादश्च तन्मूर्तिमष्टत्रिंशत्कलामयम् ॥३१॥ मातृकामयमीशानं पञ्चब्रह्ममयं तथा ॥ ओंकाराख्यमयश्चैव हंसशक्त्या समन्वितम् ॥३२॥ पंचाक्षरमयं देवं षडक्षरमयन्तु वा ॥ अङ्गषट्कमयंचैव जातिषट्कसमन्वितम् ॥३३॥ तथेच्छात्मिकया शक्त्या समारूढांकमण्डलम् ॥ ज्ञानाख्यया दक्षिणतो वामतश्च क्रियाख्यया ॥३४॥ तत्वत्रयमयं साक्षाद्विद्यामूर्तिं सदाशिवम् ॥ मूर्तिमूलेन संकल्प्य सकलीकृत्य च क्रमात् ॥३५॥ सम्पूज्य च यथान्यायमर्घ्यान्तं मूलविद्यया ॥ मूर्तिमन्तं शिवं साक्षाच्छक्त्या परमया सह ॥३६॥ तत्रावाह्य महादेवं सदसद्व्यक्तिवर्जितम् ॥ पंचोपकरणं कृत्वा पूजयेत्परमेश्वरम् ॥३७॥ ब्र-

---

आहे. (३०) ज्यानें पांच अध्व व्यापिलें आहेत, व ज्याचें शरीर पांच कलांचें आहे, ईशान ज्याच्या मुकुटावर आहे, अशा पुरातन देवाला तत्पुरुषमुख असें ह्मणतात. (३१) तसेंच अघोरहृदय, वामगुह्य, महेश्वर, सद्यपाद अशीं नांवें ज्याचीं आहेत, त्या मूर्ति अडतीस कलांनीं व्याप्त आहेत. (३२) असा तो शिव मातृकामय ( अक्षरमय ) असून पंचब्रह्ममय आहे. अशा शिवाला ईशान ह्मणतात, हा ईशान ओंकारमय असून हंसशक्तींनीं युक्त आहे. (३३) तो देव पंचाक्षरमय असो, किंवा षडक्षरमय असो, परंतु सहा अंगांनीं युक्त असून सहा जातींनीं युक्त आहे. (३४) अशा त्या देवाच्या मांडीवर इच्छा नांवाची शक्ति बसली असून उजवीकडे ज्ञानशक्ति बसली आहे, व डावीकडे क्रिया शक्ति बसली आहे. (३५) असा जो देव तीन तत्वांनीं युक्त आहे, व जो साक्षात् विद्यामूर्ति ह्मणवून घेत असून सदाशिव या नांवानें जगांत प्रख्यात आहे. अशा मूर्तीचा मूलमंत्रानें संकल्प करून मग क्रमानें कलांसहित कल्पना करून (३६) यथाविधि मूलविद्येनें अर्घ्यांत पूजा करावी. नंतर साक्षात् श्रेष्ठ शक्तिसहित मूर्तिमंत शिवाचें (३७) त्या ठिकाणीं आवाहन करावें. जो सव्यक्तीपासून व असव्यक्तीपासून रहित आहे, अशा महादेवाचें पंचोपकरण करून त्या परमेश्वराची पूजा करावी. (३८) नंतर

ह्मभिश्च षडङ्गैश्च ततो मातृकया सह ॥ प्रणवेन शिवेनैव शक्तियुक्तेन च क्रमात् ॥३८॥ शान्तेन च तथान्यैश्च वेदमन्त्रैश्च कृत्स्नशः ॥ पूजयेत्परमं देवं केवलेन शिवेन वा ॥३९॥ पाद्यादिमुखवासान्तं कृत्वाथ स्नपनं विना ॥ पंचावरणपूजान्तु आरभेत यथाक्रमम् ॥४०॥ तत्रादौ शिवयोः पार्श्वे दक्षिणे वामतः क्रमात् ॥ गंधाद्यैरर्च्चयेत्पूर्वं देवौ हेरम्बषण्मुखौ ॥४१॥ ततो ब्रह्माणि परित ईशानादि यथाक्रमम् ॥ सशक्तिकानि सद्यान्तं प्रथमावरणं यजेत् ॥४२॥ षडङ्गान्यपि तत्रैव हृदयादीन्यनुक्रमात् ॥ शिवस्य च शिवायाश्च वाह्नयादि समर्चयेत् ॥४३॥ तत्र वामादिकान्रुद्रानष्टौ वामादिशक्तिभिः ॥ अर्चयेद्वा न वा पश्चात्पूर्वादिपरितः क्रमात् ॥४४॥ प्रथमावरणं प्रोक्तं द्वितीयावरणं शृणु ॥ अनन्तं पूर्वदिक्पत्रे तच्छक्तिं तस्य वामतः ॥४५॥ सूक्ष्मं दक्षिणदिक्पत्रे शक्त्या सह समर्चयेत्॥ततः पश्चिमदिक्पत्रे सह शक्त्या

---

पंचब्रह्ममंत्रांनीं, व षडंगांनीं, नंतर मातृकामंत्रानें, प्रणवमंत्रानें, शक्तियुक्त शिवमंत्रानें क्रमानें पूजा करावी. (३९) नंतर शांतमंत्रानें, व इतर सर्व वेदमंत्रांनीं श्रेष्ठ देवाची पूजा करावी. किंवा केवळ शिवमंत्रानें तरी पूजा करावी. (४०) पाद्यापासून मुखवासापर्यंत स्नान तेवढें सोडून पूजा ( देवाला स्नान न घालतां ) करून नंतर क्रमानें पंचावरणाच्या पूजेला आरंभ करावा. (४१) त्यांत प्रथम शिवपार्वतीच्या उजवीकडे, डावीकडे क्रमानें गंधादिकांनीं गणपति, षण्मुखांची पूजा करावी. (४२) नंतर ईशानादि यथाक्रमानें सद्यापर्यंत शक्तिसहित पंचब्रह्मांची पूजा प्रथमावरणांत करावी. (४३) त्याच ठिकाणीं षडंगाची अनुक्रमानें हृदयादि पूजा करावी. शिवाची व पार्वतीची पूजा आग्नेयीपासून करावी. (४४) त्या ठिकाणीं शक्तिसहित वामादि आठ रुद्रांची पूजा करावी. किंवा त्यांची मागून पूजा केली तरी चालते. पूर्वादि दिशांच्या क्रमानें चोहोंकडे (४५) एक फिरती झाली ह्मणजे त्याला प्रथमावरण ह्मणतात. आतां द्वितीयावरण सांगतों ऐक. पूर्वदिशेच्या दळावर अनंताची पूजा करावी, त्याच्या डावीकडे अनंताच्या शक्तीची पूजा करावी. (४६) दक्षिणदिशेकडच्या दळावर शक्तिसहित सूक्ष्म देवाची पूजा करावी. नंतर पश्चिमदिशेच्या दळावर शक्तिसहित श्रेष्ठ शिवाची पूजा करा-

शिवोत्तमम् ॥४६॥ तथैवोत्तरदिक्पत्रे एकनेत्रं समर्चयेत् ॥ एकरुद्रं च तच्छक्तिं पश्चादीशानदिग्दले ॥४७॥ त्रिमूर्तिं तस्य शक्तिं च पूजयेदग्निदिग्दले ॥ श्रीकण्ठं नैऋते पत्रे तच्छक्तिं तस्य वामतः ॥४८॥ तथैव मारुते पत्रे शिखण्डीशं समर्चयेत् ॥ द्वितीयावरणे चेज्याः सर्वेतश्चक्रवर्तिनः ॥४९॥ तृतीयावरणे पूज्याः शक्तिभिश्चाष्टमूर्तयः ॥ अष्टासु क्रमशो दिक्षु पूर्वादिपरितः क्रमात् ॥५०॥ भवः शर्वस्तथेशानो रुद्रः पशुपतिस्ततः ॥ उग्रो भीमो महादेव इत्यष्टौ मूर्तयःक्रमात् ॥५१॥ अनन्तरं ततश्चैषां महादेवादयः क्रमात् ॥ शक्तिभिः सह सम्पूज्यास्तत्रैकादशमूर्तयः ॥५२॥ महादेवः शिवो रुद्रः शङ्करो नीललोहितः ॥ ईशानो विजयो भीमो देवदेवो भवोद्भवः ॥५३॥ कपालीशश्च कथ्यन्ते तथैकादश शक्तयः ॥ तत्राष्टौ प्रथमं पूज्या वाग्नेयादि यथाक्रमम् ॥५४॥ देवदेवः पूर्वपत्र ईशान्यामग्निगोचरे ॥ भ-

---

वी. (४७) तसेंच उत्तरदिशेकडच्या दळावर एकनेत्राची पूजा करावी. नंतर ईशानदिशेच्या दळावर शक्तिसहित एकरुद्राची पूजा करावी. (४८) आग्नेयदिशेच्या दळावर शक्तिसहित त्रिमूर्तींची पूजा करावी. नैर्ऋत्यदिशेकडच्या दळावर श्रीकंठाची पूजा करावी, व त्याच्या डावीकडे त्याच्या शक्तीची पूजा करावी. (४९) तशीच वायव्यदिशेकडच्या दळावर शिखंडीशाची पूजा करावी. द्वितीयावरणाच्या भोंवती असलेल्या चक्रवर्ति देवांची पूजा करावी. (५०) तृतीयावरणांत शक्तिसहित अष्टमूर्तींची पूजा करावी, या अष्टमूर्ति पूर्वादि आठ दिशांच्या क्रमानें आठ दिशांमध्यें स्थापित झालेल्या असतात. (५१) भव, शर्व, ईशान, रुद्र, पशुपति, उग्र, भीम, महादेव याच आठ मूर्ति पूर्वादि क्रमानें जाणाव्या. (५२) यांच्यानंतर क्रमानें शक्तिसहित महादेवादि अकरा मूर्तींची पूजा करावी. (५३) महादेव, शिव, रुद्र, शंकर, नीललोहित, ईशान, विजय, जय, भीम, देवाधिदेव भवोद्भव, (५४) कपालीश वगैरे या अकरा मूर्ति होत. तशाच यांच्या अकरा शक्ति जाणाव्या. त्यांत प्रथम आग्नेयादि या क्रमानें आठ मूर्तींची पूजा करावी, नंतर (५५) पूर्व दळावर देवदेवाची पूजा करावी, ईशान्य दिशेच्या दळावर भवोद्भवाची

वोद्भवस्तयोर्मध्ये कपालीशस्ततःपरः ॥५५॥ तस्मिन्नावरणे भूयो वृषेन्द्रं पुरतो यजेत् ॥ नन्दिनं दक्षिणे तस्य महाकालं तथोत्तरे ॥५६॥ शास्तारं वन्हिदिक्पत्रे मातृर्दक्षिणदिग्दले ॥ गजास्यं नैऋते पत्रे षण्मुखं वारुणे पुनः ॥५७॥ ज्येष्ठां वायुदले गौरीमुत्तरे चण्डमैश्वरे ॥ शास्त्रनन्दीशयोर्मध्ये मुनीन्द्रं वृषभं यजेत् ॥५८॥ महाकालस्योत्तरतः पिंगलन्तु समर्चयेत् ॥ शास्तृमातृसमूहस्य मध्ये भृंगीश्वरं ततः ॥५९॥ मातृविघ्नेशमध्ये तु वीरभद्रं समर्चयेत् ॥ स्कन्दविघ्नेशयोर्मध्ये यजेद्देवीं सरस्वतीम् ॥६०॥ ज्येष्ठाकुमारयोर्मध्ये श्रियं शिवपदार्चिकाम् ॥ ज्येष्ठागणाम्बयोर्मध्ये महामोटीं समर्चयेत् ॥६१॥ गणाम्बाचंडयोर्मध्ये देवीं दुर्गां प्रपूजयेत् ॥ अत्रैवावरणे भूयः शिवानुचरसंहतिम् ॥६२॥ रुद्रप्रमथभूताख्यां विविधां च सशक्तिकाम् ॥ शि-

---

पूजा करावी. नंतर या दोघांच्या मध्यभागीं कपालीशाची पूजा करावी. (५६) या आवरणांत पुढच्या भागीं पुनः वृषेंद्राची पूजा करावी. त्याच्या उजवीकडे नंदीची व त्याच्या डावीकडे महाकालाची पूजा करावी. (५७) आग्नेयदिशेकडच्या दळावर शास्त्याची व दक्षिणदिशेच्या दळावर मातृगणाची पूजा करावी, व नैर्ऋत्यदिशेच्या दळावर गणपतीची, व पश्चिमदिशेच्या दळावर पुनः षण्मुखाची पूजा करावी. (५८) वायव्य दळावर ज्येष्ठेची, व उत्तर दळावर गौरीची पूजा करावी. ईशान दळावर चंडाची पूजा करावी. शास्त्र आणि नंदीश या दोघांच्या मध्यभागीं मुनिश्रेष्ठ वृषभाची पूजा करावी. (५९) महाकालाच्या डावीकडे पिंगलाची पूजा करावी, व शास्ता व मातृगण यांच्या मध्यभागीं भृंगीश्वराची पूजा करावी. (६०) नंतर मातृगण व विघ्नेश यांच्या मध्यभागीं वीरभद्राची पूजा करावी, व स्कंद व विघ्नेश यांच्या मध्यभागीं सरस्वती देवीची पूजा करावी. (६१) ज्येष्ठा व कुमार यांच्या मध्यभागीं शिवपदाची सेवा करणाऱ्या लक्ष्मीची पूजा करावी. ज्येष्ठा व गणांबा यांच्या मध्यभागीं महामोटीची पूजा करावी. (६२) गणांबा व चंड यांच्या मध्यभागीं दुर्गादेवीची पूजा करावी, व याच आवरणांत पुनः शिवाच्या अनुचरगणाची पूजा करावी. (६३) रुद्र, प्रमथ, भूत यांच्या याच नांवाच्या ज्या अनेक शक्ति असतील, व पार्वतीचा जो सखीवर्ग असेल,

वायाश्च सखीवर्गं यजेद्ध्यात्वा समाहितः ॥६३॥ एवं तृतीयावरणे वितते पूजिते सति ॥ चतुर्थावरणं ध्यात्वा बहिस्तस्य समर्चयेत् ॥६४॥ भानुः पूर्वदले पूज्यो दक्षिणे चतुराननः ॥ रुद्रो वरुणदिक्पत्रे विष्णुरुत्तरदिग्दले ॥६५॥ चतुर्णामपि देवानां पृथगावरणान्यथ ॥ तस्यांगानि षडेवादौ दीप्ताद्याभिश्च शक्तिभिः ॥६६॥ दीप्ता सूक्ष्मा जया भद्रा विभूतिर्विमला क्रमात् ॥ अमोघा विद्युता चैव पूर्वादिपरितः स्थिताः ॥६७॥ द्वितीयावरणे पूज्याश्चतस्रो मूर्तयः क्रमात् ॥ पूर्वाद्युत्तरपर्यन्ताः शक्तयश्च ततःपरम् ॥६८॥ आदित्यो भास्करो भानूरविश्चेत्यनुपूर्वशः ॥ अर्को ब्रह्मा तथा रुद्रो विष्णुश्चेति विवस्वतः ॥६९॥ विस्तारापूर्वदिग्भागे सुतरा दक्षिणे स्थिता ॥ बोधनी पश्चिमे भागे आप्यायिन्युत्तरे पुनः ॥७०॥ उषां प्रभां तथा प्रज्ञां सन्ध्यामपि ततःपरम् ॥ ऐशानादिषु कोणेषु द्वितीयावरणे यजेत् ॥७१॥ सोममंगारकञ्चैव बुधं बुद्धिमतां वरम् ॥ बृहस्पतिं बृहद्बुद्धिं भार्गवं

---

त्या सर्वांचें ध्यान करून एकचित्तानें त्यांची पूजा करावी. (६४) याप्रमाणें तृतीयावरणांत विस्तृत पूजा झाल्यानंतर चतुर्थावरणाचें ध्यान करून त्याच्या बाहेर देवतांची पूजा करावी. (६५) पूर्वदलांत भानूची पूजा करावी, दक्षिणदळावर ब्रह्मदेवाची पूजा करावी. पश्चिमदळावर रुद्राची पूजा करावी, व उत्तरदळावर विष्णूची पूजा करावी. (६६) चारी देवांचीं निरनिराळीं चार आवरणें आहेत, असें समजावें. प्रथम त्यांचे षडंग व दीप्तादि शक्ति यांची पूजा करावी. (६७) दीप्ता, सूक्ष्मा, जया, भद्रा, विभूति, विमला, अमोघा, विद्युता, या शक्ति पूर्वादिदिशांच्या क्रमानें सभोंवतीं असतात. (६८) द्वितीयावरणांत क्रमानें चार मूर्तींची पूजा करावी, नंतर पूर्वेपासून उत्तरेपर्यंत क्रमानें शक्तींची पूजा करावी, (६९) आदित्य, भास्कर, भानु, रवि असा क्रम जाणावा, व अर्क, ब्रह्मा, रुद्र, विष्णु, विवस्वान वगैरे क्रम समजावा. (७०) पूर्वेला विस्तारा देवी, दक्षिणेला सुतरा, पश्चिमेला बोधिनी, उत्तरेला आप्यायिनी, आहे, असा क्रम समजावा. (७१) उषा, प्रभा, प्रज्ञा, संध्या या चार शक्ति ईशानादि चार कोणांमध्यें राहतात, त्यांची पूजा द्वितीयावरणांत त्याच क्रमानें करावी. (७२) सोम, मंगळ, बुध, बुद्धिमान बृहस्पति, मोठ्या

तेजसां निधम् ॥७२॥ शनैश्चरं तथा राहुं केतुं धूम्रभयङ्करम् ॥ समन्ततो यजेदेतांस्तृतीयावरणे क्रमात् ॥७३॥ अथवा द्वादशादित्यान्द्वितीयावरणे यजेत् ॥ तृतीयावरणे चैव राशीन्द्वादश पूजयेत् ॥७४॥ सप्तसप्तगणांश्चैव वहिस्तस्य समन्ततः ॥ ऋषीन्देवांश्च गन्धर्वान्पन्नगानप्सरोगणान् ॥७५॥ ग्रामण्यश्च तथा यक्षान्यातुधानांस्तथा हयान् ॥ सप्तच्छन्दोमयांश्चैव वालखिल्यांश्च पूजयेत् ॥७६॥ एवं तृतीयावरणे समभ्यर्च्य दिवाकरम् ॥ ब्रह्माणमर्चयेत्पश्चात्त्रिभिरावरणैः सह ॥७७॥ हिरण्यगर्भं पूर्वस्यां विराजं दक्षिणे ततः ॥ कालं पश्चिमदिग्भागे पुरुषं चोत्तरे यजेत् ॥७८॥ हिरण्यगर्भः प्रथमो ब्रह्मा कमलसन्निभः ॥ कालो जात्यञ्जनप्रख्यः पुरुषः स्फटिकोपमः ॥७९॥ त्रिगुणो राजसश्चैव तामसः सात्विक स्तथा ॥ चत्वार एते क्रमशः प्रथमावरणे स्थिताः ॥८०॥ द्वितीयावरणे पूज्याः पूर्वादिपरितः क्रमात् ॥ सनत्कुमारः सनकः सनन्दश्च सनातनाः ॥८१॥ तृतीयावरणे

---

बुद्धीचा तेजस्वी शुक्र, (७३) शनैश्वर, राहु, धुराप्रमाणें भयंकर दिसणारा केतु यांची पूजा सभोंवतीं क्रमानें तृतीयावरणांत करावी. (७४) अथवा द्वादश सूर्यांची पूजा द्वितीयावरणांत करावी, व तृतीयावरणांत बारा राशींची पूजा करावी. (७५) त्याच्या बाहेर सप्तसप्तगणांची पूजा करावी. ऋषि, देव, गंधर्व, पन्नग, अप्सरागण, (७६) ग्रामणी, यक्ष, यातुधान ( राक्षस ), वेदमय सात घोडे, वालखिल्य यांची पूजा करावी. (७७) याप्रमाणें तृतीयावरणांत पूजा करून नंतर तिन्ही आवरणांसह सूर्याची व ब्रह्मदेवाची पूजा करावी. (७८) पूर्वेला हिरण्यगर्भाची पूजा, दक्षिणेला विराजाची पूजा, पश्चिमेला कालाची पूजा, उत्तरेला पुरुषाची पूजा करावी. (७९) पहिला हिरण्यगर्भ होय, दुसरा ब्रह्मा हा कमळाप्रमाणें आहे, काल हा जात्यंजनाप्रमाणें ( काजळाप्रमाणें ) आहे, व पुरुष हा स्फटिकाप्रपाणें आहे. (८०) राजस, तामस, सात्विक असे हे तीन गुण होत, त्रिगुणांसहित मागें सांगितलेले चौघे हे क्रमानें प्रथमावरणांत असतात. (८१) पूर्वादि क्रमानें द्वितीयावरणांत सनत्कुमार, सनक, सनंद, सनातन यांची पूजा करावी. (८२) नंतर तृतीयावरणांत सर्व प्रजापतींची पूजा करावी. प्रथम पूर्वादिदिशांच्या

पश्चादर्चयेच्च प्रजापतीन् ॥ अष्टौ पूर्वांश्च पूर्वादौ त्रीन्प्राक्पश्चादनुक्रमात् ॥८२॥ दक्षो रुचिर्भृगुश्चैव मरीचिश्च तथाङ्गिराः॥ पुलस्त्यः पुलहश्चैव क्रतुरत्रिश्च कश्यपः ॥८३॥ वसिष्ठश्चेति विख्याताः प्रजानां पतयस्त्विमे ॥ तेषां भार्याश्च तैः सार्द्धं पूजनीया यथाक्रमम् ॥८४॥ प्रसूतिश्च तथाऽऽकूतिः ख्यातिः सम्भूतिरेव च ॥ स्मृतिः प्रीतिः क्षमा चैव सन्नतिश्चानुसूयका ॥८५॥ देवमातारुन्धती च सर्वाः खलु पतिव्रताः ॥ शिवार्चनरता नित्यं श्रीमत्यः प्रियदर्शनाः ॥८६॥ प्रथमावरणे वेदांश्चतुरो वा प्रपूजयेत् ॥ इतिहासपुराणानि द्वितीयावरणे पुनः ॥८७॥ तृतीयावरणे पश्चाद्धर्मशास्त्रपुरःसराः ॥ वैदिक्यो निखिला विद्याः पूज्या एव समन्ततः ॥८८॥ पूर्वादि पुरतो वेदास्तदन्ये तु यथारुचि ॥ अष्टधा वा चतुर्द्धा वा कृत्वा पूजां समन्ततः ॥८९॥ एवं ब्रह्माणमभ्यर्च्य त्रिभिरावरणैर्युतम् ॥ दक्षिणे पश्चिमे पश्चाद्रुद्रं सावरणं यजेत् ॥९०॥ तस्य ब्रह्मषडङ्गानि प्रथमावरणं

---

क्रमानें आठ प्रजापतींची पूजा करावी, मग पूर्व पश्चिम या क्रमानें तिघांची पूजा करावी. (८३) दक्ष, रुचि, भृगु, मरीचि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, अत्रि, कश्यप, (८४) वसिष्ठ हेच ऋषि प्रजापति होत. यांची पूजा, व यांच्या स्त्रियांची पूजा क्रमानें करावी. (८५) प्रसूति, आकूति, ख्याति, संभूति, स्मृति, प्रीति, क्षमा, सन्नति, अनुसूया, (८६) देवमाता अदिति, अरुंधती या त्यांच्या स्त्रिया होत. ह्या सर्व पतिव्रता असून शिवपूजेंत रत आहेत, व या सर्व निरंतर श्रीमती असून पहावयास सुंदरी आहेत. (८७) प्रथमावरणांत चार वेदांची पूजा करावी. द्वितीयावरणांत इतिहास पुराणांची पूजा करावी. (८८) तृतीयावरणांत धर्मशास्त्र वगैरेंची पूजा करावी. नंतर सभोंवतीं सर्व वैदिकविद्यांची पूजा करावी. (८९) पूर्वादि क्रमानें वेदांची पूजा करावी, व या व्यत्तिरिक्त शास्त्रादिकांची पूजा करावयाची ती आपल्या इच्छेला येईल त्याप्रमाणें करावी. आठ प्रकारची किंवा चार प्रकारची पूजा सभोंवतीं करावी. (९०) याप्रमाणें तीन आवरणांनीं युक्त असलेल्या ब्रह्मदेवाची पूजा करून नंतर दक्षिणेला व पश्चिमेला आवरणसहित रुद्राची पूजा करावी. (९१) त्याचे जे ब्रह्मषडंग असतील, त्याला प्रथमावरण असें ह्म-

स्मृतम् ॥ द्वितीयावरणश्चैव विघ्नेश्वरमयं तथा ॥९१॥ तृतीयावरणे भेदो विद्यते स तु कथ्यते ॥ चतस्रो मूर्तयस्तस्य पूज्याः पूर्वादितः क्रमात् ॥९२॥ त्रिगुणः सकलो देवः पुरस्ताच्छिवसंज्ञकः॥ राजसो दक्षिणे ब्रह्मा सृष्टिकृत्पूज्यते भवः ॥९३॥ तामसः पश्चिमे चाग्निः पूज्यः संहारको हरः ॥ सात्विकः सुखकृत्सौम्ये विष्णुर्विश्वपतिर्मृडः ॥९४॥ एवं पश्चिमदिग्भागे शम्भोः षड्विंशकं शिवम् ॥ समभ्यर्च्योत्तरे पार्श्वे ततो वैकुण्ठमर्चयेत् ॥९५॥ वासुदेवं पुरस्तस्य प्रथमावरणे यजेत् ॥ अनिरुद्धं दक्षिणतः प्रद्युम्नं पश्चिमे ततः ॥९६॥ सौम्ये सङ्कर्षणं पश्चाद्व्यत्यस्तौ वा यजेदिमौ ॥ प्रथमावरणं प्रोक्तं द्वितीयावरणं शृणु ॥९७॥ मत्स्यः कूर्मो वराहश्च नारसिंहोऽथ वामनः ॥ रामश्चान्यतमःकृष्णो भवानश्वमुखोऽपि च ॥९८॥ तृतीयावरणे चक्रं पूर्वभागे समर्चयेत् ॥ नारायणाख्यं याम्येऽस्त्रं क्वचिदव्याहतं यजे-

---

णतात. द्वितीयावरण विघ्नेश्वरमय आहे, असें जाणावें. (९२) तृतीयावरणांत जो भेद आहे, तो सांगतों. तृतीयावरणाच्या चार मूर्ति पूर्वादि क्रमानें पुजाव्या. (९३) कलासहित त्रिगुणात्मक जो शिवनांवाचा देव असेल, तो पुढच्या भागाला असतो, व राजस, सृष्टिकर्त्ता ब्रह्मा हा भवनांवाचा ह्मणवून घेत असून दक्षिणेकडे राहतो. (९४) तामस, अग्नि, संहार करणारा हर नांवाचा देव पश्चिमेस राहतो. त्याची पूजा तेथें करावी. सुखकर्ता, विश्वपति, सात्विक, विष्णु हा मृड या नांवानें प्रसिद्ध होऊन उत्तरेस राहतो, तेथें त्याची पूजा करावी. (९५) याप्रमाणें पश्चिम दिशेला शंभूच्या सव्वीस प्रकारच्या शिवाकृतींची पूजा करून नंतर उत्तरपार्श्वाला वैकुंठाची पूजा करावी. (९६) त्याच्या पुढच्या भागाला प्रथमावरणांत वासुदेवाची पूजा करावी. दक्षिणेला अनिरुद्धाची पूजा करावी, पश्चिमेला प्रद्युम्नाची पूजा करावी. (९७) उत्तरेकडे संकर्षणाची पूजा करावी. किंवा या दोघांची पूजा विरुद्ध दिशेकडे केली तरी चालते. असें हें प्रथमावरण सांगितलें, आतां द्वितीयावरण सांगतों ऐक. (९८) मत्स्य, कूर्म, वराह, नरहरि, वामन, परशुराम, राम, कृष्ण, हयग्रीव हे द्वितीयावरणांत राहतात, तर यांची पूजा तेथें करावी. (९९) तृतीयावरणांत पूर्वभागाला जें चक्र असेल, त्याची पूजा करावी,

त् ॥९९॥ पश्चिमे पाञ्चजन्यञ्च शार्ङ्गं धनुरथोत्तरे ॥ एवं त्र्यावरणं साक्षाद्विष्णवाख्यं परमं हरिम् ॥१००॥ महाविष्णुं सदा विष्णुं मूर्तीकृत्य समर्चयेत् ॥ इत्थं विष्णोश्चतुर्व्यूहं क्रमान्मूर्तीचतुष्टयम् ॥१०१॥ पूजयित्वाथ तच्छक्तीश्चतस्रः पूजयेत्क्रमात् ॥ प्रभामाग्नेयदिग्भागे नैर्ऋते तु सरस्वतीम् ॥१०२॥ गणाम्बिकां च वायव्ये लक्ष्मीं रौद्रे समर्चयेत् ॥ एवं भान्वादिमूर्तीनां तच्छक्तीनामनन्तरम् ॥१०३॥ पूजां विधाय लोकेशांस्तत्रैवावरणे यजेत् ॥ इन्द्रमग्निं यमञ्चैव निर्ऋतिं वरुणं तथा ॥१०४॥ वायुं सोमं कुबेरं च पश्चादीशानमर्चयेत् ॥ एवं चतुर्थावरणं पूजयित्वा विधानतः ॥१०५॥ आयुधानि महेशस्य पश्चाद्बाह्ये समर्चयेत् ॥ श्रीमत्त्रिशूलमैशाने वज्रं माहेन्द्रदिङ्मुखे ॥१०६॥ परशुं वन्हिदिग्भागे याम्ये सायकमर्चयेत् ॥ नैर्ऋते तु यजेत्खड्गं पा-

---

दक्षिणेला नारायण नांवाचें जें अव्याहत अस्त्र आहे, त्याची पूजा करावी. (१००) पश्चिमेला पांचजन्याची पूजा करावी, उत्तरेला शार्ङ्गधनुष्याची पूजा करावी. याप्रमाणें तीन आवरणांनीं युक्त अशा विष्णु नांवाच्या श्रेष्ठ हरीची पूजा करावी. (१०१) व्याप्त अशा महाविष्णूची मूर्ति करून त्या मूर्तीची पूजा करावी. याप्रमाणें विष्णूची चतुर्व्यूहात्मक चतुष्टय मूर्तीची पूजा क्रमानें करावी. (१०२) ती पूजा झाल्यानंतर क्रमानें त्याच्या चार शक्तींची पूजा करावी. आग्नेयदिशेला प्रभेची पूजा करावी, नैर्ऋत्येला सरस्वतीची पूजा करावी, (१०३) वायव्यदिशेला गणांबिकेची पूजा करावी, ईशान्यदिशेला लक्ष्मीची पूजा करावी. याप्रमाणें भान्वादिमूर्तींची, व त्यांच्या शक्तींची पूजा करावी. (१०४) पूजा करून त्याच आवरणांत लोकेशांची पूजा करावी. इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, (१०५) वायु, सोम, कुबेर यांची पूजा करून नंतर ईशानाची पूजा करावी. याप्रमाणें विधानपूर्वक चतुर्थावरणाची पूजा करून (१०६) नंतर महेशाच्या आयुधांची पूजा बाह्य भागाला करावी. श्रीमान त्रिशूलाची पूजा ईशान्यदिशेला करावी, पूर्वेला वज्रायुधाची पूजा करावी, (१०७) आग्नेयदिशेला परशूची पूजा करून दक्षिणेला बाणांची पूजा करावी. नैर्ऋत्येला खड्गाची पूजा करून पश्चिमेला पाशांची पूजा

शं वारुणगोचरे ॥१०७॥ अंकुशं मारुते भागे पिनाकं चोत्तरे यजेत् ॥ पश्चिमाभिमुखं रौद्रं क्षेत्रपालं समर्चयेत् ॥१०८॥ पंचमावरणश्चैव सम्पूज्यानन्तरं बहिः ॥ सर्वावरणदेवानां बहिर्वा पंचमेऽथवा ॥१०९॥ पंचमे मातृभिः सार्द्धं महोक्षं पुरतो यजेत् ॥ ततः समन्ततः पूज्याः सर्वा वै देवयोनयः ॥११०॥ खेचरा ऋषयः सिद्धा दैत्या यक्षाश्च राक्षसाः ॥ अनन्ताद्याश्च नागेन्द्रा नागैस्तत्तत्कुलोद्भवैः ॥१११॥ डाकिनीभूतवेतालप्रेतभैरवनायकाः ॥ पातालवासिनश्चान्ये नानायोनिषु सम्भवाः ॥११२॥ नद्यः समुद्रा गिरयः काननानि सरांसि च ॥ पशवः पक्षिणो वृक्षाः कीटाद्याः क्षुद्रयोनयः ॥११३॥ नराश्च विविधाकारा मृगाश्च क्षुद्रयोनयः ॥ भुवनान्यन्तरण्डस्य ततो ब्रह्माण्डकोटयः ॥११४॥ बहिरण्डादसंख्यानि भुवनानि सहाधिपैः ॥ ब्रह्माण्डाधारका रुद्रा दशदिक्षु व्यवस्थिताः ॥११५॥ यद्गौणं यच्च मायेयं यद्वा शाक्तं ततःपरम् ॥ यत्किञ्चिदस्ति शब्दस्य वाच्यं चि-

करावी. (१०८) वायव्येला अंकुशाची पूजा करून उत्तरेला धनुष्याची पूजा करावी. नंतर पश्चिमेकडे तोंड करून बसलेल्या भयंकर क्षेत्रपालाची पूजा करावी. (१०९) याप्रमाणें पंचमावरणाची पूजा करून नंतर बाहेर सर्व आवरण देवांची पूजा करावी, किंवा पंचमावरणांत त्यांची पूजा करावी. (११०) पंचमावरणांत मातृगणासह महोक्षाची पूजा पुढें करावी. नंतर चोहोंकडे सर्व देवयोनींची पूजा करावी. (१११) खेचर, ऋषि, सिद्ध, दैत्य, यक्ष, राक्षस, अनंतादि नागेंद्र, त्या त्या कुळांमध्यें उत्पन्न झालेले इतर नाग, (११२) डाकिनी, भूत, वेताल, प्रेत, भैरव, यांचे नायक, पातालवासी प्राणी, इतर अनेक योनींमध्यें उत्पन्न झालेले प्राणी, (११३) नद्या, समुद्र, पर्वत, अरण्य, सरोवर, पशु, पक्षि, वृक्ष, क्षुद्रयोनींतले कीट, (११४) अनेक आकृतींचे मानव, क्षुद्रयोनींत उत्पन्न झालेले मृग, ब्रह्मांडाच्या आंतले लोक, कोट्यावधि ब्रह्मांडें, (११५) ब्रह्मांडाच्या बाहेर असलेले अनेक लोक, त्यांचे स्वामी, ब्रह्मांडाचे आधारभूत दहादिशांमध्यें राहिलेले रुद्रगण, (११६) जें गुणांनीं उत्पन्न झालें असेल तें, मायेनें उत्पन्न झालेलें असेल तें, शक्तीनें उत्पन्न झालेलें असेल तें, आणि जें कांहीं शब्दाचें वाच्यभूत जीवजडात्म-

दचिदात्मकम् ॥११६॥ तत्सर्वं शिवयोः पार्श्वे वुद्ध्वा सामान्यतो यजेत् ॥ कृताञ्जलिपुटाः सर्वे चिन्त्याः स्मितमुखास्तथा ॥११७॥ प्रीत्या सम्प्रेक्षमाणाश्च देवं देवीं च सर्वदा ॥ इत्थमावरणाभ्यर्चां कृत्वा व्याक्षेपशान्तये ॥११८॥ पुनरभ्यर्च्य देवेशं पंचाक्षरमुदीरयेत् ॥ निवेदयेत्ततः पश्चाच्छिवयोरमृतोपमम् ॥११९॥ सुव्यञ्जनसमायुक्तं शुद्धं चारु महाचरुम् ॥ द्वात्रिंशदाढकैर्मुख्यमधमन्त्वाढकावरम् ॥१२०॥ साधयित्वा यथा सम्पच्छ्रद्धया विनिवेदयेत् ॥ ततो निवेद्य पानीयं ताम्बूलं चोपदंशकैः ॥१२१॥ नीराजनादिकं कृत्वा पूजाशेषं समाचरेत् ॥ यागोपयोगद्रव्याणि विशिष्टान्येव साधयेत् ॥१२२॥ वित्तशाठ्यं न कुर्वीत भक्तिमान्विभवे सति ॥ शठस्योपेक्षकस्यापि व्यङ्गश्चैवानुतिष्ठतः ॥१२३॥ न फलन्त्येव कर्माणि काम्यानीति सतां क-

---

क जें असेल तें, (११७) इत्यादि हीं सर्व शिवाच्या पार्श्वभागीं आहेत, असें समजून यांची सामान्यपूजा करावी. हे सर्व हात जोडून उभे असून हास्यमुखाचे आहेत, अशी कल्पना करावी. (११८) प्रीतीनें देवाला ( शिवाला ) व पार्वतीला सर्वदा पाहत राहिलेले असून उभे आहेत, अशी कल्पना करावी. याप्रमाणें आवरणपूजा करून व्याक्षेपाच्या ( चुकीच्या ) शांतीकरितां (११९) पुनः शिवाची पूजा करून पंचाक्षराचा जप करावा. नंतर शिवपार्वतीच्या नैवेद्याकरितां अमृतसदृश पदार्थ ठेवावेत. (१२०) उत्तम उत्तम व्यंजनें केलेलीं असून शुद्ध व चांगलें अन्न केलेलें असावें. तें अन्न बत्तीस आढकांच्या प्रमाणाचें केलेलें असून कमी करूं नये. आढकापेक्षां कमी केलेलें अन्न अधम असें गणिलें जातें. (१२१) आपली संपत्ति जशी असेल, त्यामानानें अन्न तयार करून श्रद्धापूर्वक उपदंशकासह ( चटण्यां वगैरे सह ) नैवेद्य करावा. नंतर पानीय निवेदन करून तांबूल निवेदन करावें. (१२२) नंतर नीराजन वगैरे करून राहिलेली पूजा समाप्त करावी. यागाला उपयोगीं जितकीं द्रव्यें मिळतील तितकीं सर्व मिळवावींत. (१२३) ऐश्वर्य असून भक्तिमानानें द्रव्यशाठ्य करूं नये. शठाला, उपेक्षा करणाऱ्याला, व्यंगकर्म करणाऱ्याला (१२४) काम्यकर्म फल देत नाहीं, असें सज्जन सांगतात. याकरितां शाठ्य व उपेक्षा यांचा सर्व तऱ्हेनें त्याग

था ॥ तस्माच्छाठ्यमुपेक्षां च त्यक्त्वा सर्वांगयोगतः ॥१२४॥ कु-
र्यात्काम्यानि कर्माणि फलसिध्दिं यदीच्छति ॥ इत्थं पूजां समाप्या-
थ देवं देवीं प्रणम्य च ॥१२५॥ भक्त्या मनः समाधाय पश्चात्स्तो-
त्रमुदीरयेत् ॥ ततः स्तोत्रजपस्यान्ते त्वष्टोत्तरशतावराम् ॥१२६॥
जपेत्पंचाक्षरीं विद्यां सहस्रोत्तरमुत्सुकः ॥ विद्यापूजां गुरोः पूजां कृ-
त्वा पश्चाद्यथाक्रमम् ॥१२७॥ यथोदयं यथाश्रद्धं सदस्यानपि पूज-
येत् ॥ तत उद्वास्य देवेशं सर्वैरावरणैः सह ॥१२८॥ मण्डलं गुरवे
दद्याद्यागोपकरणैः सह ॥ शिवाश्रितेभ्यो वा दद्यात्सर्वमेवानुपूर्वशः
॥१२९॥ अथवा तच्छिवायैव शिवक्षेत्रे समर्पयेत् ॥ शिवाग्नौ वा य-
जेद्देवं होमद्रव्यैश्च सक्तुभिः ॥१३०॥ समभ्यर्च्य यथान्यायं सर्वाव-
रणदेवताः ॥ एष योगेश्वरो नाम त्रिषुलोकेषु विश्रुतः ॥१३१॥ न
तस्मादधिकः कश्चिद्योगोऽस्ति भुवने क्वचित् ॥ न तदस्ति जगत्य-
स्मिन्न साध्यं यदनेन तु ॥१३२॥ ऐहिकं वा फलं किञ्चिदामुष्मि-

करून (१२५) काम्यकर्में करावीं, ह्मणजे काम्यकर्में फलें देतात. याप्रमाणें पूजा समाप्त करून शिवपार्वतीला नमस्कार करून (१२६) भक्तीनें मन एकाग्र करून नंतर स्तोत्रपाठ ह्मणावा. स्तोत्र व इतर जप झाल्यानंतर अष्टोत्तरशत (१२७) पंचाक्षरीविद्येचा जप करावा, किंवा उत्सुक मानव असेल तर त्यानें हजार जप करावेत. नंतर क्रमानें विद्यापूजा व गुरुपूजा करावी. (१२८) आपल्या उदयानुसार श्रद्धेनुसार सभासदांची पूजा करावी. नंतर सर्व आवरणांसह शिवाचें उद्वासन करावें. (१२९) नंतर यागाच्या उपकरणांसह मंडलाचें दान आपल्या गुरूस करावें. किंवा शिवाश्रित ब्राह्मण जे असतील, त्यांना आनुपूर्वीक्रमानें सर्व देऊन टाकावें. (१३०) अथवा शिवक्षेत्रांत जाऊन शिवालाच सर्व अर्पण करावें. शिवाग्नीच्या ठिकाणीं शिवाकरितां होमद्रव्यांसह सक्तूचा होम करावा. (१३१) विधिपूर्वक सर्व आवरण देवतांची पूजा करून जो शिवावर भक्ति करतो, तोच त्रैलोक्यामध्यें योगेश्वर असा प्रसिद्ध होतो. (१३२) याकरितां यापेक्षां श्रेष्ठ योग लोकांत कोठेंही नाहीं. असा हा योग साधला असतां त्याला जगामध्यें असाध्य अशी वस्तु कोणतीही नाहीं. (१३३) ऐहिकफल असो, आमुष्मिकफल असो, प-

कफलन्तु वा ॥ इदमस्य फलं नेदमिति नैव नियम्यते ॥१३३॥ श्रेयोरूपस्य कृत्स्नस्य तदिदं श्रेष्ठसाधनम् ॥ इदन्तु शक्यते वक्तुं पुरुषेण यदर्थ्यते ॥१३४॥ चिन्तामणेरिवैतस्मात्तत्तेन प्राप्यते फलम् ॥ तथापि क्षुद्रमुद्दिश्य फलं नैतत्प्रयोजयेत् ॥१३५॥ लघ्वर्थी महतो यस्मात्स्वयं लघुतरो भवेत् ॥ महद्वा फलमल्पं वा कृतं चेत्कर्म सिध्यति ॥१३६॥ महादेवं समुद्दिश्य कृतं कर्म प्रयुज्यताम् ॥ तस्मादनन्यलभ्येषु शत्रुमृत्युजयादिषु ॥१३७॥ फलेषु दृष्टादृष्टेषु कुर्यादेतद्विचक्षणः ॥ महत्स्वापि च पातेषु महारोगभयादिषु ॥१३८॥ दुर्भिक्षादिषु चात्यर्थं शान्तिं कुर्यादनेन तु ॥ बहुना किं प्रलापेन महाव्यापन्निवारकम् ॥१३९॥ आत्मीयमस्त्रं शैवानामिदमाह महेश्वरः ॥ त-

---

रंतु या योगाचें फल हेंच आहे, आणि हें नाहीं, असा प्रतिबंध मात्र नाहीं. तात्पर्य हें कीं, सर्व फलें मिळतात. (१३४) जगामध्यें जीं कांहीं सर्व कल्याणाचीं साधनें असतील, त्यांमध्यें हें साधन श्रेष्ठ होय. हें साधन करून पुरुषाची जी कांहीं मागणी होईल, (१३५) ती सर्व मागणी चिंतामणीपुढें मागितलेल्या मागणीप्रमाणें फलप्रद होते, असें आहे; ह्मणून मागणारानें क्षुद्रफलांकडे मात्र लक्ष्य देऊं नये. (१३६) कारण अल्पफल मागणारा या मोठ्या साधनापेक्षां स्वतः हलका होतो. मोठें असो, लहान असो, जें कर्म करील, त्याचें फल त्याला मिळतें. (१३७) महादेवाच्या उद्देशानें जें कर्म केलें जातें, तें त्याला फलदायक होतें. याकरितां अन्य साधनांनीं न मिळणाऱ्या शत्रु मृत्यूच्या जयादि फलांसारख्या (१३८) फलांचे ठिकाणीं व दृष्टादृष्ट फलांचे ठिकाणीं बुद्धिमानानें या साधनांचा उपयोग करावा. किंवा मोठ्या उत्पाताच्या वेळेस, व महारोगांची भीति आली असेल तेव्हां, (१३९) दुष्काळ पडेल तेव्हां या साधनाच्या योगानें शांति करावी. कृष्णा, फार बोलण्यांत काय मतलब आहे! हें साधन ह्मणजे मोठ्या आपत्तीचें निवारक आहे, असें समज. (१४०) शिवाचीं अस्त्रें जितकीं असतील, त्यांमध्यें हें माझें अस्त्र आहे, असें शिवानें बोलून दाखविलें आहे. याकरितां आपल्या शरीराचें रक्षण करणारें यापेक्षां दुसरें कोणतेंही साधन साध्य

स्मादितः परं नास्ति परित्राणमिहात्मनः ॥१४०॥ इति मत्वा प्रयुंजानः कर्मेदं शुभमश्नुते ॥ स्तोत्रमात्रं शुचिर्भूत्वा यः पठेत्सुसमाहितः ॥१४१॥ सोऽप्यभीष्टतमादर्थादष्टांशफलमाप्नुयात् ॥ अर्थं तस्यानुसन्धाय जपेद्यदि समाहितः ॥१४२॥ अर्द्धार्द्धं फलमाप्नोति नात्र कार्या विचारणा ॥ अथार्थमनुसन्धाय पर्वण्यनशनः पठेत् ॥१४३॥ अष्टम्यां वा चतुर्दश्यां फलमर्द्धं समाप्नुयात् ॥ यस्त्वर्थमनुसन्धाय पर्वादिषु तथा व्रती ॥१४४॥ मासमेकं जपेत्स्तोत्रं स कृत्स्नं फलमाप्नुयात् ॥१४५॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे पूजाव्रतविधिकथनं नाम त्रयोविंशोऽध्यायः ॥२३॥

---

नाहीं. (१४१) असें आपल्या मनांत समजून जो हें कर्म करतो, त्याला शुभफल मिळतें. केवल स्तोत्र जो शुद्ध होऊन करतो, व समाधानमनानें पाठ करतो, (१४२) त्यालासुद्धां अभीष्ट फलाच्या अष्टमांशानें फल मिळतें. अर्थानुसंधान करून समाधानचित्तानें जो जप करितो, (१४३) त्याला अर्धें फल मिळतें, यांत विचार करावयास नको. आतां अर्थानुसंधान करून पर्वणीच्या दिवशीं उपोषण करून जो याचा पाठ करील, (१४४) व अष्टमी, चतुर्दशी, यादिवशीं जो पाठ करील, त्याला अर्धें फल मिळतें. जो व्रतस्थ राहून अर्थानुसंधान करून ( अर्थ समजून घेऊन ) पर्वादि पुण्यतिथींच्या दिवशीं (१४५) एक महिन्यापर्यंत पाठ करील, व जप करील, त्याला संपूर्ण फल मिळतें.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील पूजाव्रतविधिकथन नांवाचा तेविसावा अध्याय संपला.

## अथ चतुर्विंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ स्तोत्रं वक्ष्यामि ते कृष्ण पंचावरणमार्गतः ॥ योगेश्वरमिदं पुण्यं कर्म येन समाप्यते ॥१॥ जय जय जगदेकनाथ शम्भो प्रकृतिमनोहर नित्य चित्स्वभाव ॥ अतिगतकलुषप्रपंच वाचामपि मनसां पदवीमतीततत्व ॥२॥ स्वभावनिर्मलाभोग जय सुन्दरचेष्टित ॥ स्वात्मतुल्यमहाशक्ते जय शुध्दगुणार्णव ॥३॥ अनन्तकान्तिसम्पन्न जयासदृशविग्रह ॥ अतर्क्यमहिमाधार जयानाकुलमंगल ॥४॥ निरंजन निराधार जय निष्कारणोदय ॥ निरन्तरपरानन्द जय निर्वृतिकारण ॥५॥ जयातिपरमैश्वर्य जयातिकरुणास्पद ॥ जय स्वतन्त्रसर्वस्व जयासदृशवैभव ॥६॥ जयावृतमहाविश्व जयाना-

---

उपमन्यु बोलला— (१) हे कृष्णा, पंचावरणाच्या मार्गानें स्तोत्र तुला सांगतों, ऐक. जो स्तोत्रपाठ केला असतां योगेश्वर असें पुण्यकर्म समाप्त होतें. (२) जगताचा जो मुख्य स्वामी ह्मणवितो, व ज्याला शंभु ह्मणतात, जो स्वभावानें सुंदर आहे, जो निरंतर चित्स्वभावाचा ह्मणवितो, अत्यंत कल्मषांनीं मिश्र झालेल्या प्रपंचांतल्या वाणींच्या व मनांच्या पदवीला ( मार्गाला ) सोडून जो दूर राहिला आहे, अशा हे शिवा, तुझा जयजयकार असो. (३) स्वतः स्वभावानें ज्याचे भोग निर्मल आहेत, व ज्याच्या चेष्टा सुंदर आहेत, ज्याच्या बरोबरीची महाशक्ति ज्याच्याजवळ आहे, जो शुद्ध गुणांचा समुद्र आहे, अशा हे शंभो, तुझा जयजयकार असो. (४) अनंत तेजांनीं जो युक्त आहे, ज्याच्या शरीरासारखें दुसरें शरीर नाहीं, ज्याचा महिमा अतर्क्य असून त्या महिम्याचा जो आधार आहे, ज्याच्या मंगलामध्यें कधींही व्याकुलता नाहीं, अशा शिवा, तुझा जय असो. (५) निरंजना, निराधारा, हे निष्कारणोदया ( कारण नसतां उदय पावणारा ), निरंतर श्रेष्ठ आनंद भोगणाऱ्या शंभो, सुखकारणा, तुझा जय असो. (६) ज्याचें अत्यंत श्रेष्ठ ऐश्वर्य आहे, जो करुणेचा आश्रय आहे, जो स्वतंत्र आहे, जो सर्वस्व आहे, ज्याच्या वैभवाला दुसरी उपमा नाहीं, अशा शंभो, तुझा जय असो. (७) ज्यानें जग व्यापिलें आहे, ज्याला कशाचें वेष्टन नाहीं, ज्याच्या-

वृत केनचित् ॥ जयोत्तरसमस्तस्य जयात्यन्तनिरुत्तर ॥७॥ जयाद्भुत जयाक्षुद्र जयाक्षत जयाव्यय ॥ जयामेय जयामाय जयाभय जयामल ॥८॥ महाभुज महासार महागुण महाकथ ॥ महाबल महामाय महारस महारथ ॥९॥ नमः परमदेवाय नमः परमहेतवे ॥ नमः शिवाय शान्ताय नमः शिवतराय ते ॥१०॥ त्वदधीनमिदं कृत्स्नं जगध्दि ससुरासुरम् ॥ अतस्त्वद्विहितामाज्ञां क्षमते कोऽतिवर्तितुम् ॥११॥ अयं पुनर्जनो नित्यं भवदेकसमाश्रयः ॥ भवानतोऽनुगृह्यास्मै प्रार्थितं सम्प्रयच्छतु ॥१२॥ जयाम्बिके जगन्मातर्जय सर्वजगन्मयि ॥ जयानवधिकैश्वर्ये जयानुपमविग्रहे ॥१३॥ जय वाङ्मनसातीते जयाचिद्धान्तभंजिके ॥ जय जन्मजराहीने जय कालोत्तरोत्तरे ॥१४॥ जयानेकविधानस्थे जयानेकसुखात्मिके ॥ जयानेकमहासत्वे जयानेकगुणोर्जिते ॥१५॥ जयानेकगुणात्मस्थे जय लोकम-

---

जवळ समउत्तर आहे, ज्याच्याविषयीं उत्तर सांपडत नाहीं, अशा शिवा, तुझा जय असो. (८) हे अद्भुता, अक्षुद्रा, अक्षता, अव्यया, अमेया, अमाया, अभया, अमला, तुझा जय असो. (९) हे महाभुजा, हे बलिष्ठा, महागुणा, महाकथ, महाबल, महामाय, महारस, महारथ, तुझा जय असो. (१०) हे श्रेष्ठ देवा, श्रेष्ठ कारणा, शिवा, शांता, शिवतरा, तुझा जय असो, तुला नमस्कार असो. (११) देवदैत्यांसह सर्व हें जग तुझ्या ताब्यांत आहे, याकरितां तुझी आज्ञा मोडावयास कोण समर्थ आहे ? (१२) हा जन ( मी ) केवल तुझ्या एकट्याचा आश्रय करणारा आहे, याकरितां तूं अनुग्रह करून याची इच्छा पूर्ण कर. ह्मणजे मागितलेली वस्तु दे. (१३) अंबिके, जगन्माते, सर्व जग व्यापून राहिलेल्या हे देवि, श्रेष्ठ ऐश्वर्ययुक्ते देवि, सुंदर शरीरिणि, तुझा जय असो. (१४) वाणीला मनाला अगोचर राहणाऱ्या हे देवि, अज्ञानरूपी तमाचा नाश करणारे अंबे, जन्मजरारहिते, कालोत्तरोत्तरे, तुझा जय असो. (१५) अनेक विधानांत राहणारे देवि, सुखस्वरूपिणि, अनेक महासत्वे ( बलवति ), अनेक गुणांनीं युक्त असणारे देवि, तुझा जय असो. (१६) अनेक गुणस्वरूपिणि, लोकेश्वरि, जगांत अधिक शरीरानें

हेश्वरि ॥ जय विश्वाधिकात्मस्थे जय विश्वेश्वरप्रिये ॥१६॥ जय विश्वसुराराध्ये जय विश्वविजृम्भिणि ॥ जय मंगलदिव्यांगि जय मंगलदीपिके ॥१७॥ जय मंगलचारित्रे जय मंगलदायिनि ॥ नमः परमकल्याणि गुणसंचयमूर्तये ॥१८॥ नमः शिवायै विश्वस्मात्परस्यै शिवशक्तये ॥ त्वत्तः खलु समुत्पन्नं जगत्वय्येव लीयते ॥१९॥ त्वद्विनातः फलं दातुमीश्वरोऽपि न शक्नुयात् ॥ जन्मप्रभृति देवेशि जनोऽयं त्वदुपाश्रितः ॥२०॥ अतोऽस्य तव भक्तस्य निर्वर्तय मनोरथम् ॥ पंचवक्त्रो दशभुजः शुध्दस्फटिकसन्निभः ॥२१॥ वर्णब्रह्मकलादेहो देवः सकलनिष्कलः ॥ शिवमूर्तिसमारूढः शान्त्यतीतः सदाशिवः ॥२२॥ भक्त्या मयार्चितो मह्यं प्रार्थितं सम्प्रयच्छतु ॥ सदाशिवाङ्कमारूढा शक्तिरिच्छा शिवाह्वया ॥२३॥ जननी सर्वलोकानां प्रयच्छतु मनोरथम् ॥ शिवयोर्दयितौ पुत्रौ देवौ हेरम्बषण्मुखौ

---

राहणारे देवि, शिवप्रिये, तुझा जय असो. (१७) जगांतल्या देवांकडून आराधना करून घेणारे हे देवि, विश्वविजृंभिणि (जग उत्पन्न करणारी), मंगलकर सुंदर अवयवांनीं युक्त असलेलें हे देवि, मंगलदीपिके, तुझा जय असो. (१८) मंगलचरित्रे, मंगलदायिनि, परमकल्याणि, गुणांनीं संचित झालेल्या मूर्तींनीं युक्त असलेले देवि, तुला नमन असो. (१९) शिवे, परे, शिवशक्ति, तुला नमन असो. तुझ्यापासून हें जग झालें आहे, व तुझ्याच ठिकाणीं लीन होतें. (२०) तुझ्याशिवाय फल देण्यास ईश्वरसुद्धां समर्थ होत नाहीं. हे देवि, जन्मापासून या जनानें (मीं) तुझा आश्रय केला आहे. (२१) याकरितां तुझ्या भक्ताचे मनोरथ पूर्ण कर. पांच मुखें ज्याला असून दहा हात ज्याला आहेत, व ज्याचा वर्ण शुद्ध स्फटिकाप्रमाणें आहे, (२२) व वर्ण, ब्रह्म, कला यांनीं ज्याचें शरीर बनून राहिलें आहे, व जो देव सकल आणि निष्कल ह्मणवून घेतो, व जो शिवमूर्तीवर आरूढ आहे, असा शांत्यतीत सदाशिव (२३) भक्तीनें माझ्याकडून पूजिला गेला. याकरितां तो माझे मनोरथ पूर्ण करूंदे, व सदाशिवाच्या मांडीवर बसलेली शिवानांवाची इच्छाशक्ति (२४) सर्व लोकांची जी मातोश्री, ती माझे मनोरथ पूर्ण करूंदे.

॥२४॥ शिवानुभावौ च शिवौ शिवज्ञानामृताशिनौ ॥ तृप्तौ परस्परं स्निग्धौ शिवाभ्यां नित्यसत्कृतौ ॥२५॥ आराधितौ सदा देवौ ब्रह्माद्यैस्त्रिदशैरपि ॥ सर्वलोकपरित्राणं कर्तुमभ्युदितौ सदा ॥२६॥ स्वेच्छावतारं कुर्वन्तौ स्वांशभेदैरनेकशः ॥ ताविमौ शिवयोः पार्श्वे नित्यमित्थं मयार्चितौ ॥२७॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य प्रार्थितं मे प्रयच्छताम् ॥ शुध्दस्फटिकसंकाशमीशानाख्यं सदाशिवम् ॥२८॥ मूर्ध्दाभिमानिनी मूर्तिः शिवस्य परमात्मनः ॥ शिवार्चनरतं शान्तं शान्त्यतीतं खमास्थितम् ॥२९॥ पञ्चाक्षरान्तिमं बीजं कलाभिःपञ्चभिर्युतम् ॥ प्रथमावरणे पूर्वं शक्त्या सह समर्चितम् ॥३०॥ पवित्रं परमं ब्रह्म प्रार्थितं मे प्रयच्छतु ॥ बालसूर्यप्रतीकाशं पुरुषाख्यं पुरातनम् ॥३१॥ पूर्ववक्त्राभिमानं च शिवस्य परमेष्ठिनः ॥ शान्त्यात्मकं मरु-

---

शिवपार्वतीचे पुत्र गणपति व स्कंद (२५) जे शिवाचा अनुभव घेणारे व शिवज्ञानरूपी अमृताचा आस्वाद घेणारे, व जे नित्यतृप्त आहेत, व ज्यांमध्यें परस्पर स्नेह आहे, ज्यांचा सत्कार नेहमीं शिवपार्वती करीत असतात, (२६) ज्यांची आराधना ब्रह्मादि देव करतात, व सर्व लोकांचें रक्षण करावयास जे सर्वदा उदयाला येतात, (२७) अंशभेदांनीं अनेक अवतार स्वेच्छेनें करतात, ते दोघे हे शिवपार्वतीच्या पार्श्वभागीं नेहमीं असतात, यांची पूजा निरंतर मी केली आहे. (२८) याकरितां शिवपार्वतीची आज्ञा घेऊन माझी इच्छा ते दोघे पूर्ण करूंदे. शुद्ध स्फटिकाप्रमाणें ज्याची कांति आहे, असा ईशान नांवाचा जो सदाशिव आहे, (२९) तो परमात्मा शिवाच्या मस्तकाचा अभिमानी देव आहे. जो शिवपूजेंत रत असून शांत आहे, व जो शांत्यतीत असून आकाशाचा आश्रय ज्यानें केला आहे, (३०) जो पंचाक्षराचा शेवटचा बीजमंत्र आहे, जो पांच कलांनीं युक्त आहे, अशा देवाची शक्तिसहित पूजा प्रथमावरणांत मी केली आहे. (३१) असें पवित्र परब्रह्म माझे मनोरथ पूर्ण करूंदे. जो बालसूर्याप्रमाणें शोभतो, जो पुरुष या नांवानें प्रख्यात असून पुरातन आहे, (३२) व जो परमेष्ठि शिवाच्या पूर्वमुखाचा अभिमानी आहे, जो शांतिस्वरूप असून वायूच्या स्थानांत राहतो,

त्संस्थं शम्भोः पादार्चने रतम् ॥३२॥ तुरीयं शिवबीजेषु कलासु च चतुष्कलम् ॥ पूर्वभागे मया भक्त्या शक्त्या सह समन्वितम् ॥३३॥ पवित्रं परमं ब्रह्म प्रार्थितं मे प्रयच्छतु ॥ अञ्जनाद्रिप्रतीकाशमघोरं घोरविग्रहम् ॥३४॥ देवस्य दक्षिणं वक्त्रं देवदेवपदार्चकम् ॥ विद्यापदं समारूढं वन्हिमण्डलमध्यगम् ॥३५॥ तृतीयं शिवबीजेषु कलास्वष्टकलान्वितम् ॥ शम्भोर्दक्षिणदिग्भागे शक्त्या सह समर्चितम् ॥३६॥ पवित्रं परमं ब्रह्म प्रार्थितं मे प्रयच्छतु ॥ कुंकुमक्षोदसङ्काशं वामाख्यं वरवेषधृक् ॥३७॥ वक्त्रमुत्तरमीशस्य प्रतिष्ठायां प्रतिष्ठितम् ॥ वारिमण्डलमध्यस्थं महादेवार्चने रतम् ॥३८॥ द्वितीयं शिवबीजेषु त्रयोदशकलान्वितम् ॥ देवेशोत्तरदिग्भागे शक्त्या सह समर्चितम् ॥३९॥ पवित्रं परमं ब्रह्म प्रार्थितं मे प्रयच्छतु ॥ शंखकुन्देन्दुधवलं

---

जो शिवचरणाच्या सेवेंत रत आहे, (३२) जो शिवबीजमंत्रांमध्यें तुरीय ह्मणवितो, जो कलांमध्यें चतुष्कल ह्मणवितो, अशा देवाची पूजा भक्तीनें पूर्वभागीं शक्तिसहित केली आहे, (३४) तर असें पवित्र परब्रह्म माझे मनोरथ पूर्ण करूंदे. जो अंजनपर्वताप्रमाणें शोभतो, जो अघोर असून ज्याचें शरीर मोठें आहे, (३५) जो देवाचें दक्षिणमुख असून देवाधिदेवाच्या पायांची सेवा करतो, जो विद्यापदावर आरूढ आहे, जो अग्निमंडलाच्या मध्यभागीं राहतो, (३६) शिवबीजांमध्यें जो तिसरा बीजमंत्र ह्मणवितो, कलांमध्यें जो अष्टकलांनीं युक्त आहे, अशा देवाची शंभूच्या दक्षिणदिशेकडे शक्तींसह पूजा केली आहे. (३७) तर असें तें परब्रह्म माझे मनोरथ पूर्ण करूंदे. ज्याचा वर्ण कुंकुमाप्रमाणें असून ज्याला वाम ह्मणतात, ज्यानें श्रेष्ठ वेष धारण केलेला आहे, (३८) जो ईशाचें डावीकडचें मुख ह्मणवितो, जो प्रतिष्ठाकलेंत राहतो, व उदकमंडलामध्यें राहतो, व महादेवाची पूजा करतो, (३९) शिवबीजमंत्रांमध्यें जो दुसरा ह्मणवितो, जो तेरा कलांनीं युक्त आहे, त्या देवाची पूजा शिवाच्या उत्तरेकडे शक्तीसहित केली आहे. (४०) तें परब्रह्म माझे मनोरथ पूर्ण करूंदे. शंखाप्रमाणें किंवा कुंदपुष्पाप्रमाणें व चंद्राप्रमाणें जो शुभ्र आहे, ज्याला 'सद्य' असें ह्मणत असून ज्याचीं लक्षणें

सद्याख्यं सौम्यलक्षणम् ॥४०॥ शिवस्य पश्चिमं वक्त्रं शिवपादार्चनेरतम् ॥ निवृत्तिपदनिष्ठश्च पृथिव्यां समवस्थितम् ॥४१॥ प्रथमं शिवबीजेषु कलाभिश्चाष्टभिर्युतम् ॥ देवस्य पश्चिमे भागे शक्त्या सह समर्चितम् ॥४२॥ पवित्रं परमं ब्रह्म प्रार्थितं मे प्रयच्छतु ॥ शिवस्य च शिवायाश्च हृन्मूर्ती शिवभाविते ॥४३॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य ते मे कामं प्रयच्छताम् ॥ शिवस्य च शिवायाश्च शिरोमूर्ती शिवाश्रिते ॥४४॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य ते मे कामं प्रयच्छताम् ॥ शिवस्य च शिवायाश्च शिखामूर्ती शिवाश्रिते ॥४५॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां ते मे कामं प्रयच्छताम् ॥ शिवस्य च शिवायाश्च नेत्रमूर्ती शिवाश्रिते ॥४६॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां ते मे कामं प्रयच्छताम् ॥ शिवस्य च शिवायाश्च वर्मणी शिवभाविते ॥४७॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां ते मे कामं प्रयच्छताम् ॥ अस्त्रमूर्ती च शिवयोर्नित्यमर्चनतत्परे ॥४८॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां ते मे कामं प्रयच्छताम् ॥ वामो ज्येष्ठस्तथा रुद्रः

---

सौम्य आहेत, (४१) जो शिवाचें पश्चिममुख ह्मणवितो, जो शिवचरणाची सेवा करतो, जो निवृत्तिपदावर राहतो, व पृथिवीतत्वांत राहतो, (४२) बीजमंत्रांमध्यें जो पहिला आहे, व आठ कलांनीं जो युक्त आहे, जो देवाच्या पश्चिमभागाला राहतो, अशा देवाची मी शक्तीसहित पूजा केली आहे. (४३) तें पवित्र परब्रह्म माझे मनोरथ पूर्ण करूंदे. शिवाच्या व पार्वतीच्या हृदयांत राहणाऱ्या शिवाश्रित दोन मूर्ति (४४) त्यांची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करूंदे. शिवपार्वतीच्या डोक्यावर राहणाऱ्या शिवाश्रित मूर्ति (४५) त्यांची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करूंदे. शिवपार्वतीच्या शिखेमध्यें राहणाऱ्या शिवाश्रित मूर्ति (४६) त्यांची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करूंदे. शिवपार्वतीच्या डोळ्यांवर राहणाऱ्या शिवाश्रित मूर्ति (४७) त्यांची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करूंदे. शिवपार्वतीच्या कवचावर राहणाऱ्या शिवाश्रित मूर्ति (४८) त्या दोघांची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करूंदे. शिवाच्या पूजेंत निरंतर जी मूर्ति तत्पर आहे, ती अस्त्र मूर्ति (४९) त्या दोघांची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करूंदे. वाम, ज्येष्ठ, रुद्र, काल,

कालो विकरणस्तथा ॥४९॥ बलो विकरणश्चैव बलप्रमथनः परः॥ सर्वभूतस्य दमनस्तादृशश्चाष्टशक्तयः ॥५०॥ प्रार्थितं मे प्रयच्छन्तु परमेशस्य शासनात् ॥ अथानन्तश्च सूक्ष्मश्च शिवश्चाप्येकनेत्रकः॥५१॥ एकरुद्रस्त्रिमूर्तिश्च श्रीकण्ठश्च शिखण्डकः॥ तथाष्टौ शक्तयस्तेषां द्वितीयावरणेऽर्चिताः ॥५२॥ ते मे कामं प्रयच्छन्तु शिवयोरेव शासनात् ॥ भवाद्या मूर्तयश्चाष्टौ तेषामपि च शक्तयः ॥५३॥ महादेवादयश्चान्ये तथैकादशमूर्तयः ॥ शक्तिभिः सहिताः सर्वे तृतीयावरणे स्थिताः ॥५४॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां दिशन्तु फलमीप्सितम् ॥ वृषराजो महातेजा महामेघसमस्वनः ॥५५॥ मेरुमन्दरकैलासहिमाद्रिशिखरोपमः ॥ सिताभ्रशिखराकारः ककुदा परिशोभितः ॥५६॥ महाभोगीन्द्रकल्पेन वालेन च विराजितः॥ रक्तास्यशृङ्गचरणो रक्तप्रायविलोचनः ॥५७॥ पीवरोन्नतसर्वांगः सुचारुगमनोज्वलः ॥ प्रशस्तलक्षणः श्रीमान्प्रज्वलन्मणिभूषणः ॥५८॥ शिवप्रियः शिवास-

---

विकरण, (५०) बल, विकरण, बलप्रमथन, श्रेष्ठ असा सर्वभूतदमन व यांच्याप्रमाणें असणाऱ्या आठ शक्ति (५१) शिवाच्या आज्ञेनें माझे मनोरथ पूर्ण करूंदेत. आतां अनंत, सूक्ष्म, शिव, एकनेत्र, (५२) एकरुद्र, त्रिमूर्ति, श्रीकंठ, शिखंडक व यांच्या अष्टशक्ति यांची पूजा द्वितीयावरणांत केली आहे, (५३) तर ते सर्व शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझे मनोरथ पूर्ण करूंदेत. भवादि अष्टमूर्ति त्यांच्या शक्ति, (५४) व महादेवादि अकरा मूर्ति शक्तींसहित सर्व तृतीयावरणांत राहतात, (५५) तर ते सर्व शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें इच्छित फल देवोत. महातेजस्वी, व मेघाप्रमाणें ज्याचा नाद आहे, असा वृषेश्वर (५६) मेरु, मंदर, कैलास, हिमालय यांच्या शिखराप्रमाणें शरीर असणारा, पांढऱ्या अभ्राच्या शिखराप्रमाणें आकार असणारा, ककुदेनें शोभणारा, (५७) मोठ्या शेषाप्रमाणें असणाऱ्या शेपटीनें शोभणारा, तांबडीं शिंगें व तांबडे पाय असणारा, तांबडें मुख असणारा, प्रायशः तांबडे डोळे असणारा, (५८) पुष्ट आणि उंच शरीर असणारा, सुंदर गमनानें शोभणारा, प्रशस्त लक्षणें असणारा, श्रीमान् असून प्रकाशमान् रत्नांनीं शोभणारा, (५९) शिवाचा प्रिय असून शिवाचे ठिकाणीं आसक्ति ठेवणारा,

क्तः शिवयोर्ध्वजवाहनः ॥ तथा तच्चरणन्यासभावितापरविग्रहः ॥५९॥ गोराजपुरुषः श्रीमाञ्छ्रीमच्छूलवरायुधः ॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य स मे कामं प्रयच्छतु ॥६०॥ नन्दीश्वरो महातेजा नगेन्द्रतनयात्मजः ॥ सनारायणकैर्देवैर्नित्यमभ्यर्च्य वन्दितः ॥६१॥ शर्वस्यान्तःपुरद्वारि सार्द्धं परिजनैः स्थितः ॥ सर्वेश्वरसमप्रख्यः सर्वासुरविमर्दनः ॥६२॥ सर्वेषां शिवधर्माणामध्यक्षत्वेऽभिषेचितः ॥ शिवप्रियः शिवासक्तः श्रीमच्छूलवरायुधः ॥६३॥ शिवाश्रितेषु संसक्तस्त्वनुरक्तश्च तैरपि ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे कामं प्रयच्छतु ॥६४॥ महाकालो महाबाहुर्महादेव इवापरः ॥ महादेवाश्रितानान्तु नित्यमेवाभिरक्षिता ॥६५॥ शिवप्रियः शिवासक्तः शिवयोरर्चकः सदा ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥६६॥ सर्वशास्त्रार्थतत्वज्ञः शास्ता विष्णोः परा तनुः ॥ महामोहात्मतनयो मधुमां-

---

शिवाचा ध्वज असून शिवाचें वाहन होऊन राहणारा, तसेंच शिवाच्या पावलांच्या योगानें पवित्र शरीर झालेला, (६०) बैलांमध्यें राजपुरुष ह्मणविणारा, व उत्तम शूलनांवाचें आयुध धरणारा, वृषेश्वर शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें इच्छित फल देवो. (६१) पार्वतीचा मुलगा ह्मणविणारा महातेजस्वी नंदीश्वर हा नारायण नांवाच्या देवांसहित पूजिला गेला, व त्याला मीं नमस्कार केला. (६२) श्रीशिवाच्या अंत:पुरांतल्या दारांत परिजनांसह राहिला आहे. सर्वेश्वराप्रमाणें ज्याची ख्याति आहे, व जो सर्व असुरांना मारणारा आहे. (६३) सर्व शिवधर्मावर हा अध्यक्ष ह्मणून शिवानें अभिषेक केला आहे. शिवाचा प्रिय असून शिवाचे ठिकाणीं आसक्ति ठेवणारा उत्तम श्रेष्ठ शूल आयुध धरणारा, (६४) शिवाश्रित लोकांचे ठिकाणीं संसक्त झालेला, व त्यांचा अनुराग मिळविलेला असा नंदी शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझे इच्छित पूर्ण करो. (६५) महाबाहु, दुसरा, महादेवच असा शोभणारा, ज्यांनीं महादेवाचा आश्रय केला आहे त्यांचें रक्षण निरंतर करणारा, (६६) शिवाचा प्रिय असून शिवाचे ठिकाणीं आसक्ति ठेवणारा, शिवपार्वतीची पूजा करणारा असा महाकाल शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. (६७) सर्व शास्त्रार्थाच्या तत्वाला जाणणारा, शासन करणारा, विष्णू-

सासवप्रियः ॥ ॥६७॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य स मे कामं प्रयच्छतु ॥ ब्रह्माणी चैव माहेशी कौमारी वैष्णवी परा ॥६८॥ वाराही चैव माहेन्द्री चामुंडा चंडविक्रमा ॥ एता वै मातरः सप्त सर्वलोकस्य मातरः ॥६९॥ प्रार्थितं मे प्रयच्छन्तु परमेश्वरशासनात् ॥ मत्तमातङ्गवदनो गङ्गोमाशङ्करात्मजः ॥७०॥ आकाशदेहो दिग्बाहुः सोमसूर्याग्निलोचनः ॥ ऐरावतादिभिर्दिव्यैर्दिग्गजैर्नित्यमर्चितः ॥७१॥ शिवज्ञानमदोद्भिन्नस्त्रिदशानामविघ्नकृत् ॥ विघ्नकृच्चासुरादीनां विघ्नेशः शिवभावितः ॥७२॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥ षण्मुखः शिवसम्भूतः शक्तिवज्रधरः प्रभुः ॥७३॥ अग्नेश्च तनयो देवो ह्यपर्णातनयः प्रभुः ॥ गंगायाश्च गणाम्बायाः कृत्तिकायास्तथैव च ॥७४॥ विशाखेन च शाखेन नैगमेयेन चावृतः ॥ इन्द्रजिच्चेन्द्रसेनानीस्तारकासुरजित्तथा ॥७५॥ शैलानां मेरुमुख्यानां वेधकश्च स्वते-

---

चें श्रेष्ठ शरीर ह्मणविणारा, महामोहात्म्याचा मुलगा ह्मणविणारा, मद्य, मांस, आसव यांवर प्रीति करणारा, (६८) असा तो शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें इच्छित पूर्ण करो. ब्रह्माणी, माहेशी, कौमारी, श्रेष्ठ वैष्णवी, (६९) वाराही, माहेंद्री, चंडविक्रमा चामुंडा या सात सर्व लोकांच्या आया आहेत, हा (७०) मातृगण शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. मदोन्मत्त हत्तीप्रमाणें ज्याचें तोंड आहे, जो गंगेचा, उमेचा, शंकराचा मुलगा ह्मणवितो, (७१) व ज्याचा देह आकाशाप्रमाणें आहे, दिशा ज्याचे बाहु आहेत, सोम, सूर्य, अग्नि हे ज्याचे डोळे आहेत, ऐरावतादि दिव्य दिग्गजांनीं जो निरंतर पूजित झाला आहे, (७२) शिवज्ञानाच्या मदानें जे धुंद झाले आहेत, अशा देवांना विघ्न न करणारा, दैत्यांना विघ्न करणारा असा शिवाश्रित विघ्नेश, (७३) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. शिवापासून उत्पन्न झालेला असून ज्यानें शक्ति व वज्र धरलेलें आहे व जो प्रभु ह्मणवितो, (७४) जो देव अग्नीचा व अपर्णेचा मुलगा ह्मणवितो, तसें गंगा, गणांबा, कृत्तिका यांचा मुलगा ह्मणवितो, (७५) विशाख, शाख, नैगमेय यांनीं जो युक्त आहे, व इंद्राचा जेता असून इंद्राचा सेनापति झाला आहे, व ज्यानें तारकासुराला मारिलें आहे, (७६) व आपल्या तेजानें मेरु आदि पर्वतांना विदा-

जसा ॥ तप्तचामीकरप्रख्यः शतपत्रदलेक्षणः ॥७६॥ कुमारः सुकुमाराणां रूपोदाहरणं महत् ॥ शिवप्रियः शिवासक्तः शिवपादार्चकः सदा ॥७७॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥ ज्येष्ठा वरिष्ठा वरदा शिवयोः पूजने रता ॥७८॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य सा मे दिशतु कांक्षितम् ॥ त्रैलोक्यवन्दिता साक्षादुल्काकारा गणाम्बिका ॥ ७९॥ जगत्सृष्टिविवृद्ध्यर्थं ब्रह्मणाभ्यर्थिता शिवात् ॥ शिवायाः प्रविभक्ताया भ्रुवोरन्तरनिःसृता ॥८०॥ दाक्षायणी सती मेना तथा हैमवती ह्युमा ॥ कौशिकायाश्च जननी भद्रकाल्यास्तथैव च ॥८१॥ अपर्णायाश्च जननी पाटलायास्तथैव च ॥ शिवार्चनरता नित्यं रुद्राणी रुद्रवल्लभा ॥८२॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां सा मे दिशतु कांक्षितम् ॥ चण्डः सर्वगणेशानः शम्भोर्वदनसम्भवः ॥८३॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥ वृषभो नाम गणपो वृ-

---

रिलें आहे, जो तावलेल्या सोन्याप्रमाणें शोभत असून शतपत्र दलाप्रमाणें ज्याचे डोळे आहेत, (७७) जो कुमार असून सुकुमार रूपांचें उदाहरण जो झाला आहे, जो शिवप्रिय असून शिवासक्त आहे, जो शिवचरणांची सेवा करितो, (७८) असा तो षण्मुख शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. श्रेष्ठ, व वर देणारी, शिवपार्वतीच्या पूजेंत रत असलेली ज्येष्ठा देवी (७९) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. त्रैलोक्य जिला नमन करितें, जिचा आकार उल्केप्रमाणें आहे, अशी गणांबा (८०) जगाची सृष्टि वाढविण्याकरितां ब्रह्मदेवाकडून प्रार्थित झाली, व निराळी राहिलेल्या शिवेच्या भिवयांच्या मधून जी निघाली, (८१) जिला दाक्षायणी, सती, मेना, उमा, हैमवती ह्मणतात, व जी कौशिकेची जननी व भद्रकाली ह्मणवीत आहे, (८२) अपर्णेची व पाटलेची जननी ह्मणवून घेत आहे, जी शिवपूजेंत रत असून रुद्राची प्रिया जी आहे, अशी ती रुद्राणी (८३) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. सर्व बाणांचा जो स्वामी असून शंभूच्या मुखापासून जो उत्पन्न झाला आहे, असा तो चंड (८४) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें इच्छित पूर्ण करो. शिवचरणांची सेवा करणारा वृ-

षवाहपदार्चकः ॥८४॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥ पिंगलो गणपः श्रीमाञ्छिवासक्तः शिवप्रियः ॥८५॥ आज्ञया शिवयोरेव स मे कामं प्रयच्छतु ॥ भृंगीशो नाम गणपः शिवाराधनतत्परः ॥८६॥ प्रयच्छतु स मे कामं पत्युराज्ञापुरःसरम् ॥ वीरभद्रो महातेजा हिमकुन्देन्दुसन्निभः ॥८७॥ भद्रकालीप्रियो नित्यं मातृणाश्चाभिरक्षिता ॥ यज्ञस्य च शिरोहर्ता दक्षस्य च दुरात्मनः ॥८८॥ उपेन्द्रेन्द्रयमादीनां देवानामंगतक्षकः ॥ शिवस्यानुचरः श्रीमाञ्छिवशासनपालकः ॥८९॥ शिवयोः शासनादेव स मे दिशतु कांक्षितम् ॥ सरस्वती महेशस्य वाक्सरोजसमुद्भवा ॥९०॥ शिवयोः पूजने नित्यं सा मे दिशतु कांक्षितम् ॥ विष्णोर्वक्षःस्थिता लक्ष्मीः शिवयोः पूजने रता ॥९१॥ शिवयोः शासनादेव सा मे दिशतु कांक्षितम् ॥ महामोटी महादेव्याः पादपूजापरायणा ॥९२॥ तस्य एव नियोगेन सा मे दिशतु कांक्षितम् ॥ कौशिकी सिंहमारूढा पार्वत्याः

---

षभ नांवाचा गणेश (८५) शिवपार्वतीची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करो. शिवाच्या ठिकाणीं आसक्त झालेला, शिवप्रिय, श्रीमान्, पिंगल नांवाचा गणेश (८६) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. शिवाराधनेंत तत्पर असा भृंगीश नांवाचा गणेश (८७) शिवाच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. हिम ( दहिंवर ), कुंदपुष्प, चंद्र याप्रमाणें शोभणारा, महातेजस्वी, वीरभद्र ह्मणविणारा, (८८) भद्रकालीचा जो पति, मातृगणाचें रक्षण करणारा, यज्ञाचें व दुरात्मा दक्षाचें डोकें उडविणारा, (८९) उपेंद्र, इंद्र, यम, या देवांना तक्षकाप्रमाणें भासणारा, जो शिवाचा अनुचर असून शिवशासनाला पाळणारा, श्रीमान्, असा वीरभद्र (९०) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. महेशाच्या वाणीपासून उत्पन्न झालेली सरस्वती (९१) शिवपार्वतीच्या पूजनाविषयीं निरंतर मला बुद्धि देवो. शिवपार्वतीच्या पूजनांत रत असलेली, विष्णूच्या वक्षस्थलावर राहणारी लक्ष्मी (९२) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. महादेवीच्या पादपूजेंत रत असलेली महामोटी देवी (९३) शिवाच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. सिंहावर बसलेली पार्वतीची मुलगी, कौशिकी नांवानें प्रसिद्ध अस

जसा ॥ तप्तचामीकरप्रख्यः शतपत्रदलेक्षणः ॥७६॥ कुमारः सुकुमाराणां रूपोदाहरणं महत् ॥ शिवप्रियः शिवासक्तः शिवपादार्चकः सदा ॥७७॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥ ज्येष्ठा वरिष्ठा वरदा शिवयोः पूजने रता ॥७८॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य सा मे दिशतु कांक्षितम् ॥ त्रैलोक्यवन्दिता साक्षादुल्काकारा गणाम्बिका ॥ ७९॥ जगत्सृष्टिविवृद्ध्यर्थं ब्रह्मणाभ्यर्थिता शिवात् ॥ शिवायाः प्रविभक्ताया भ्रुवोरन्तरनिःसृता ॥८०॥ दाक्षायणी सती मेना तथा हैमवती ह्युमा ॥ कौशिकायाश्च जननी भद्रकाल्यास्तथैव च ॥८१॥ अपर्णायाश्च जननी पाटलायास्तथैव च ॥ शिवार्चनरता नित्यं रुद्राणी रुद्रवल्लभा ॥८२॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां सा मे दिशतु कांक्षितम् ॥ चण्डः सर्वगणेशानः शम्भोर्वदनसम्भवः ॥८३॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥ वृषभो नाम गणपो वृ-

---

रिलें आहे, जो तावलेल्या सोन्याप्रमाणें शोभत असून शतपत्र दलाप्रमाणें ज्याचे डोळे आहेत, (७७) जो कुमार असून सुकुमार रूपांचें उदाहरण जो झाला आहे, जो शिवप्रिय असून शिवासक्त आहे, जो शिवचरणांची सेवा करितो, (७८) असा तो षण्मुख शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. श्रेष्ठ, व वर देणारी, शिवपार्वतीच्या पूजेंत रत असलेली ज्येष्ठा देवी (७९) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. त्रैलोक्य जिला नमन करितें, जिचा आकार उल्केप्रमाणें आहे, अशी गणांबा (८०) जगाची सृष्टि वाढविण्याकरितां ब्रह्मदेवाकडून प्रार्थित झाली, व निराळी राहिलेल्या शिवेच्या भिवयांच्या मधून जी निघाली, (८१) जिला दाक्षायणी, सती, मेना, उमा, हैमवती ह्मणतात, व जी कौशिकेची जननी व भद्रकाली ह्मणवीत आहे, (८२) अपर्णेची व पाटलेची जननी ह्मणवून घेत आहे, जी शिवपूजेंत रत असून रुद्राची प्रिया जी आहे, अशी ती रुद्राणी (८३) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. सर्व बाणांचा जो स्वामी असून शंभूच्या मुखापासून जो उत्पन्न झाला आहे, असा तो चंड (८४) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें इच्छित पूर्ण करो. शिवचरणांची सेवा करणारा वृ-

षवाहपदार्चकः ॥८४॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु कांक्षितम् ॥ पिंगलो गणपः श्रीमाञ्छिवासक्तः शिवप्रियः ॥८५॥ आज्ञया शिवयोरेव स मे कामं प्रयच्छतु ॥ भृंगीशो नाम गणपः शिवाराधनतत्परः ॥८६॥ प्रयच्छतु स मे कामं पत्युराज्ञापुरःसरम् ॥ वीरभद्रो महातेजा हिमकुन्देन्दुसन्निभः ॥८७॥ भद्रकालीप्रियो नित्यं मातृणाश्चाभिरक्षिता ॥ यज्ञस्य च शिरोहर्ता दक्षस्य च दुरात्मनः ॥८८॥ उपेन्द्रेन्द्रयमादीनां देवानामंगतक्षकः ॥ शिवस्यानुचरः श्रीमाञ्छिवशासनपालकः ॥८९॥ शिवयोः शासनादेव स मे दिशतु कांक्षितम् ॥ सरस्वती महेशस्य वाक्सरोजसमुद्भवा ॥९०॥ शिवयोः पूजने नित्यं सा मे दिशतु कांक्षितम् ॥ विष्णोर्वक्षःस्थिता लक्ष्मीः शिवयोः पूजने रता ॥९१॥ शिवयोः शासनादेव सा मे दिशतु कांक्षितम् ॥ महामोटी महादेव्याः पादपूजापरायणा ॥९२॥ तस्य एव नियोगेन सा मे दिशतु कांक्षितम् ॥ कौशिकी सिंहमारूढा पार्वत्याः

---

षभ नांवाचा गणेश (८५) शिवपार्वतीची आज्ञा घेऊन माझे मनोरथ पूर्ण करो. शिवाच्या ठिकाणीं आसक्त झालेला, शिवप्रिय, श्रीमान्, पिंगल नांवाचा गणेश (८६) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. शिवाराधनेंत तत्पर असा भृंगीश नांवाचा गणेश (८७) शिवाच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. हिम ( दहिवर ), कुंदपुष्प, चंद्र याप्रमाणें शोभणारा, महातेजस्वी, वीरभद्र ह्मणविणारा, (८८) भद्रकालीचा जो पति, मातृगणाचें रक्षण करणारा, यज्ञाचें व दुरात्मा दक्षाचें डोकें उडविणारा, (८९) उपेंद्र, इंद्र, यम, या देवांना तक्षकाप्रमाणें भासणारा, जो शिवाचा अनुचर असून शिवशासनाला पाळणारा, श्रीमान्, असा वीरभद्र (९०) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. महेशाच्या वाणीपासून उत्पन्न झालेली सरस्वती (९१) शिवपार्वतीच्या पूजनाविषयीं निरंतर मला बुद्धि देवो. शिवपार्वतीच्या पूजनांत रत असलेली, विष्णूच्या वक्षस्थलावर राहणारी लक्ष्मी (९२) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. महादेवीच्या पादपूजेंत रत असलेली महामोटी देवी (९३) शिवाच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करो. सिंहावर बसलेली पार्वतीची मुलगी, कौशिकी नांवानें प्रसिद्ध अस

परमा सुता ॥९३॥ विष्णोर्निद्रा महामाया महामहिषमर्दिनी ॥ निशुम्भशुम्भसंहर्त्री मधुमांसासवप्रिया ॥९४॥ सत्कृत्य शासनं मातुः सा मे कामं प्रयच्छतु ॥ रुद्रा रुद्रसमप्रख्याः प्रमथाः प्रथितौजसः ॥९५॥ भूताख्याश्च महावीर्या महादेवसमप्रभाः ॥ नित्यमुक्ता निरुपमा निर्द्वन्द्वा निरुपप्लवाः ॥९६॥ सशक्तयः सानुचराः सर्वलोकनमस्कृताः ॥ सर्वेषामेव लोकानां सृष्टिसंहरणक्षमाः ॥९७॥ परस्परानुरक्ताश्च परस्परमनुव्रताः ॥ परस्परमतिस्निग्धाः परस्परनमस्कृताः ॥९८॥ शिवप्रियतमा नित्यं शिवलक्षणलक्षिताः ॥ सौम्या घोरास्तथामिश्राश्चान्तरालद्वयात्मकाः ॥९९॥ विरूपाश्च सुरूपाश्च नानारूपधरास्तथा ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां ते मे कामं दिशन्तु वै ॥१००॥ देव्याः प्रियसखीवर्गो देवीलक्षणलक्षितः ॥ सहितो रुद्रकन्याभिः

---

लेली, (९४) विष्णूची निद्रा, महामाया या नांवानें प्रसिद्ध झालेली, मोठ्या महिषासुराला मारणारी शुंभनिशुंभांचा संहार करणारी, मद्य, मांस, आसव यांवर प्रेम करणारी, ती कौशिकी (९९) माझी मातोश्री पार्वतीच्या आज्ञेनें माझें मनोरथ पूर्ण करो. रुद्रासमान ख्याति असलेले रुद्रगण, प्रख्यात तेजस्वी प्रमथगण, (९६) महादेवाप्रमाणें भासणारे, महापराक्रमी, भूतगण या नांवाचे, नित्य मुक्त झालेले, उपमा नसलेले, द्वंद्वरहित असे, उपद्रव न करणारे, (९७) शक्तिसहित असलेले, अनुचरसहित असलेले, सर्व लोक ज्यांना नमस्कार करीत आहेत, अशा योग्यतेचे, सर्व लोकांची सृष्टि व संहार करण्यांत समर्थ असलेले, (९८) परस्परांवर प्रेम करणारे, परस्परांना परस्पर अनुकूल असणारे, परस्परांशीं स्नेहभावानें वागणारे, परस्परांना परस्पर नमस्कार करणारे (९९) निरंतर शिवावर प्रीति करणारे, निरंतर शिवाच्या चिन्हांनीं युक्त असलेले, अशा त्या लोकांमध्यें कांहीं लोक सौम्य असून कांहीं लोक घोर होते, व कांहीं लोक मिश्र होते, कांहीं लोक अंतराल द्वयात्मक ( सौम्य व घोर यांनीं युक्त ) होते. (१००) कांहीं लोक विरूप असून कांहीं लोक सुरूप होते, व कांहीं लोक अनेक रूपें धारण करणारे होते. असे ते लोक शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझी इच्छा पूर्ण करोत. (१०१) देवीच्या ( पार्वतीच्या ) लक्षणांनीं युक्त असलेला पार्वतीचा सखीवर्ग रुद्रक-

शक्तिभिश्चाप्यनेकशः ॥१०१॥ तृतीयावरणे शम्भोर्भक्त्या नित्यं समर्चितः ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु मंगलम् ॥१०२॥ दिवाकरो महेशस्य मूर्तिर्दीप्तसुमण्डलः ॥ निर्गुणो गुणसङ्कीर्णस्तथैव गुणकेवलः ॥१०३॥ अविकारात्मकश्चाद्यस्ततः सामान्यविक्रियः ॥ असाधारणकर्मा च सृष्टिस्थितिलयक्रमात् ॥१०४॥ एवं त्रिधा चतुर्द्धा च विभक्तः पञ्चधा पुनः ॥ चतुर्थावरणे शम्भोः पूजितश्चानुगैः सह ॥१०५॥ शिवप्रियः शिवासक्तः शिवपादार्चने रतः ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु मंगलम् ॥१०६॥ दिवाकरषडंगानि आदित्याद्याश्च मूर्तयः ॥ आदित्यो भास्करो भानू रविश्चेत्यनुपूर्वशः ॥१०७॥ अर्को ब्रह्मा तथा रुद्रो विष्णुश्चादित्यमूर्तयः ॥ विस्तारा सुतरा बोधिन्याप्यायिन्यपरा पुनः ॥१०८॥ ऊषा प्रभा तथा प्राज्ञा सन्ध्या चेत्यपि शक्तयः ॥ सोमादिकेतुपर्यन्ता ग्रहाश्च शिवभाविताः

---

न्या व अनेक शक्ति यांसहित असलेला (१०२) शंभूच्या तृतीयावरणांत भक्तीनें माझ्या कडून पूजिला गेला. असा तो वर्ग शिवपार्वतीच्या आज्ञेनें मला मंगल देवो. (१०३) जिला महेशाची मूर्ति ह्मणत असून जिचें मंडल अति प्रज्वलित आहे, व जिला दिवाकर असें ह्मणतात, जी मूर्ति निर्गुण असून गुणमिश्र आहे, असें ह्मणतात, व जिला गुणकेवल ह्मणतात, (१०४) जी मूर्ति अविकारस्वरूपी असून आद्य आहे, व सामान्य विक्रियाची असून सृष्टि, स्थिति, लय या क्रमानें अघटित कर्म करणारी आहे, (१०५) याप्रमाणें तीन, चार, पांच प्रकारांनीं विभक्त होणारी आहे, अशा मूर्तींची पूजा, शंभूच्या चतुर्थावरणांत केली आहे, व तिच्या अनुचरांची पूजा केली आहे. (१०६) असा तो दिवाकर शिवाचा प्रिय असून शिवभक्त आहे, व शिवचरणांचा दास आहे, तो सूर्य शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें कल्याण करो. (१०७) सूर्याच्या षडंगाची व आदित्यादि मूर्तींची पूजा केली, आदित्यादि मूर्ति पुढें दिल्याप्रमाणें समजाव्या. आदित्य, भास्कर, भानु, रवि, (१०८) अर्क, ब्रह्मा, रुद्र, विष्णु वगैरे आदित्यादि मूर्ति होत. विस्तारा, सुतरा, बोधिनी, आप्यायिनी, अपरा, (१०९) उषा, प्रभा, प्राज्ञा, संध्या वगैरे या शक्ति होत. सोमापासून केतूपर्यंत शिवाश्रित ग्रह होत. (११०)

॥१०९॥ शिवयोराज्ञया नुन्ना मंगलं प्रदिशन्तु मे ॥ अथवा द्वादशादित्यास्तथा द्वादश राशयः ॥११०॥ ऋषयो देवगन्धर्वाः पन्नगाप्सरसां गणाः ॥ ग्रामण्यश्च तथा यक्षा राक्षसाश्चासुरास्तथा ॥१११॥ सप्तसप्तगणाश्चैते सप्तच्छन्दोमया हयाः ॥ वालखिल्यगणाश्चैव सर्वे शिवपदार्चकाः ॥११२॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां मंगलं प्रदिशन्तु मे ॥ ब्रह्माथ देवदेवस्य मूर्तिर्भूमण्डलाधिपः ॥११३॥ चतुःषष्टिगुणैश्वर्यो बुद्धितत्वे प्रतिष्ठितः ॥ निर्गुणो गुणसंकीर्णस्तथैवंगुणकेवलः ॥११४॥ अविकारात्मको देवस्ततः साधारणः परः ॥ असाधारणकर्मा च सृष्टिस्थितिलयक्रमात् ॥११५॥ एवं त्रिधा चतुर्द्धा च विभक्तः पञ्चधा पुनः ॥ चतुर्थावरणे शम्भोः पूजितश्च सहानुगैः ॥११६॥ शिवप्रियः शिवासक्तः शिवपादार्चने रतः ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु मंगलम् ॥११७॥ हिरण्यगर्भो लोकेशो विराट् कालश्च पूरुषः ॥ सनत्कुमारः सनकः सनन्दश्च सनातनः ॥११८॥ प्रजानां प-

---

हे सर्व शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें कल्याण करोत. आतां द्वादश आदित्य, तशाच बारा राशि. (१११) ऋषि, देव, गंधर्व, पन्नग, अप्सरागण, ग्रामणि यक्ष, राक्षस, असुर, (११२) सप्तसप्तगण, सप्त, वेदोमय अश्व, शिवचरण सेवा करणारा वालखिल्यगण (११३) हे सर्व शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें कल्याण करोत. जो भूमंडलाचा स्वामी असून देवाधिदेवाची मूर्ति ज्याला ह्मणतात, असा ब्रह्मा (११४) चौसष्ट गुणरूपी ऐश्वर्यानें युक्त असून बुद्धितत्वामध्यें प्रतिष्ठित झाला आहे, व निर्गुण असून गुणमिश्र आहे, व केवळ गुणात्मक आहे, (११५) व तो देव अविकारस्वरूपी असून साधारण ह्मणवितो, श्रेष्ठ ह्मणवितो, व अघटित कर्म करणारा असून सृष्टि, स्थिति, लय या क्रमानें (११६) तीन, चार, पांच प्रकारांनीं विभक्त होतो. अशा देवाची पूजा अनुचरांसह शंभूच्या चतुर्थावरणांत केली. (११७) असा तो देव शिवाचा प्रिय असून शिवावर आसक्ति ठेवणारा आहे, व शिवचरणसेवा करणारा आहे, तो हा देव शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें कल्याण करो. (११८) लोकाधिपति हिरण्यगर्भ, कालपुरुष असा विराट्, सनत्कुमार, सनक, सनंद, सनातन, (११९) ब्रह्मदेवाचीं मुलें जीं दक्षादि प्रजापति अ-

तयश्चैव दक्षाद्या ब्रह्मसूनवः ॥ एकादश सपत्नीका धर्मः संकल्प एव च ॥११९॥ शिवार्चनरताश्चैते शिवभक्तिपरायणाः ॥ शिवाज्ञावशगाः सर्वे दिशन्तु मम मंगलम् ॥१२०॥ चत्वारश्च तथा वेदाः सेतिहासपुराणकाः ॥ धर्मशास्त्रादिविद्याभिर्वैदिकीभिः समन्विताः ॥१२१॥ परस्पराविरुद्धार्थाः शिवैकप्रतिपादकाः ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां मंगलं प्रदिशन्त्विमे ॥१२२॥ अथ रुद्रो महादेवः शम्भोर्मूर्तिर्गरीयसी ॥ वान्हेयमण्डलाधीशः पौरुषैश्वर्यवान्प्रभुः ॥१२३॥ शिवाभिमानसम्पन्नो निर्गुणस्त्रिगुणात्मकः ॥ केवलं सात्विकश्चापि राजसश्चैव तामसः ॥१२४॥ अविकाररतः शर्वे ततस्तु समविक्रियः ॥ असाधारणकर्मा च सृष्ट्यादिकरणात्पृथक् ॥१२५॥ ब्रह्मणोऽपि शिरच्छेत्ता जनकस्तस्य तत्सुतः ॥ जनकस्तनयश्चापि विष्णोरपि नियामकः ॥१२६॥ बोधकश्च तयोर्नित्यमनुग्रहकरः प्रभुः ॥ अण्डस्यान्तर्बहिर्वर्ती रुद्रलोकद्वयाधिपः ॥१२७॥ शिवप्रियः शिवासक्तः शि-

---

करा, व त्यांच्या पत्नी, संकल्प, धर्म, (१२०) हे सर्व शिवार्चनामध्यें रत असून शिवभक्ति करण्यांत रत आहेत, व शिवाज्ञेच्या ताब्यांत आहेत, हे सर्व माझें कल्याण करोत. (१२१) चार वेद, इतिहास, पुराणें, धर्मशास्त्रादि विद्या, वैदिकविद्या, (१२२) व परस्पर विरुद्ध अर्थ ज्यांचे आहेत, असे शिवप्रतिपादक ग्रंथ हे सर्व शिवाच्या आज्ञेला मान देऊन माझें कल्याण करोत. (१२३) आतां रुद्र, महादेव, शंभूची श्रेष्ठ मूर्ति, अग्निमंडलाचा स्वामी, पौरुष ऐश्वर्याचा प्रभु, (१२४) शिवाच्या अभिमानानें युक्त, निर्गुण, त्रिगुणस्वरूपी, केवल सात्विक, राजस, (१२५) तामस, शिवाच्या ठिकाणीं अविकारानें रत असलेला, समान व्यापार ( विकार ) असणारा, सृष्टि वगैरे निरनिराळीं असाधारण कर्में करणारा, (१२६) ब्रह्मदेवाचें डोकें उडविणारा, त्याचा पिता झालेला, त्याचा पुत्र झालेला, जनक असो, पुत्र असो, त्या दोन्ही स्वरूपानें विष्णूचें नियमन करणारा, (१२७) त्या दोघांना बोध करणारा, निरंतर अनुग्रह करणारा, प्रभु, ब्रह्मांडाच्या आंत बाहेर असणारा रुद्राच्या दोन लोकांचा स्वामी, (१२८) शिवाला प्रिय असलेला, शिवाचे ठि-

वपादार्चने रतः ॥ शिवस्याज्ञां पुरस्कृत्य स मे दिशतु मंगलम् ॥१२८॥ तस्य ब्रह्मषडंगानि विद्येशानां तथाष्टकम् ॥ चत्वारो मूर्तिभेदाश्च शिवपूर्वाः शिवार्चकाः ॥१२९॥ शिवो भवो हरश्चैव मृडश्चैव तथापरः ॥ शिवस्याज्ञां पुरस्कृत्य मंगलं प्रदिशन्तु मे ॥१३०॥ अथ विष्णुर्महेशस्य शिवस्यैव परा तनुः ॥ वारितत्वाधिपः साक्षादव्यक्तपदसंस्थितः ॥१३१॥ निर्गुणः सत्वबहुलस्तथैव गुणकेवलः ॥ अविकाराभिमानी च त्रिसाधारणविक्रयः ॥१३२॥ असाधारणकर्मा च सृष्ट्यादिकरणात्पृथक् ॥ दक्षिणाङ्गभवेनापि स्पर्द्धमानः स्वयम्भुवा ॥१३३॥ आद्येन ब्रह्मणा साक्षात्सृष्टः स्रष्टा च तस्य तु ॥ अण्डस्यान्तर्बहिर्वर्ती विष्णुर्लोकद्वयाधिपः ॥१३४॥ असुरान्तकरश्चक्री शक्रस्यापि तथानुजः ॥ प्रादुर्भूतश्च दशधा भृगुशापच्छलादिह ॥१३५॥ भूभारनिग्रहार्थाय स्वेच्छयावातरत्क्षितौ ॥ अप्रमेयबलो

---

काणीं आसक्ति ठेवणारा, शिवचरणांची सेवा करणारा तो देव शिवाची आज्ञा घेऊन माझें कल्याण करो. (१२९) त्याचे ब्रह्मषडंग, विद्येशांचें अष्टक, शिवपूजा करणारे शिवपूर्वक चार मूर्तींचे भेद (१२०) शिव, भव, हर, मृड असे होत, हे सर्व शिवाची आज्ञा घेऊन माझें कल्याण करोत. (१३१) महेश शिवाचें शरीर ह्मणविणारा विष्णु, साक्षात् अव्यक्त पदावर बसलेला उदकतत्वाचा स्वामी, (१३२) निर्गुण असून जो सत्वबहुल ( पुष्कळ सत्वगुणाचा ) आहे, व गुणकेवल आहे, अविकाराचा अभिमानी असून साधारण विक्रियाचा ( विकाराचा ) आहे, (१३३) सृष्टि वगैरे निरनिराळें कर्म करीत असल्यामुळें ज्याला अघटित कर्म करणारा ह्मणतात, शिवाच्या उजव्या अंगापासून उत्पन्न झालेला असून जो स्वयंभूशीं स्पर्द्धा करतो, (१३४) आद्यब्रम्ह्यानें ज्याची सृष्टि केली असून त्याची सृष्टि पुनः यानें केली, अशा सामर्थ्याचा, ब्रह्मांडाच्या आंत बाहेर असणारा, लोकद्वयाचा स्वामी असा ‘ विष्णु ’ (१३५) या नांवाचा, असुरांचा संहार करणारा, चक्र धरलेला, इंद्राचा बंधु ह्मणविणारा, भृगुऋषीच्या शापामुळें दशावतार घेतलेला, (१३६) भूभार उतरविण्यासाठीं स्वेच्छेनें भूमीवर अवतार घेणारा, अपरिमित सामर्थ्य असणारा, मायेनें युक्त असलेला, मायेनें जगाला मोहून

मायी मायया मोहयञ्जगत् ॥१३६॥ मूर्तीकृत्य महाविष्णुं सदा विष्णुमथापि वा ॥ वैष्णवैः पूजितो नित्यं मूर्तित्रयमयासने ॥१३७॥ शिवप्रियः शिवासक्तः शिवपादार्चने रतः ॥ शिवस्याज्ञां पुरस्कृत्य स मे दिशतु मङ्गलम् ॥१३८॥ वासुदेवोऽनिरुद्धश्च प्रद्युम्नश्च ततःपरः ॥ सङ्कर्षणः समाख्यातश्चतस्रो मूर्तयो हरेः ॥१३९॥ मत्स्यः कूर्मो वराहश्च नारसिंहश्च वामनः ॥ रामत्रयं तथा कृष्णो विष्णुस्तुरगवक्रकः ॥१४०॥ चक्रं नारायणस्यास्त्रं पाञ्चजन्यश्च शार्ङ्कम् ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां मंगलं प्रदिशन्तु मे ॥१४१॥ प्रभा सरस्वती गौरी लक्ष्मीश्च शिवभाविता ॥ शिवयोः शासनादेता मंगलं प्रदिशन्तु मे ॥१४२॥ इन्द्रोऽग्निश्च यमश्चैव निर्ऋतिर्वरुणस्तथा ॥ वायुः सोमः कुबेरश्च तथेशानस्त्रिशूलधृक् ॥१४३॥ सर्वे शिवार्चनरताः शिवसद्भावभाविताः ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां मंगलं प्रदिशन्तु मे ॥१४४॥ त्रिशूलमथ वज्रश्च तथा परशुसायकौ ॥ खड्गपाशांकुशाश्चैव पिनाकश्चायुधोत्तमः ॥१४५॥ दिव्यायुधानि देवस्य देव्याश्चैतानि नित्यशः ॥

---

टाकणारा, (१३७) शरीर घेऊन महाविष्णु व विष्णु ह्मणवून घेणारा, त्रिमूर्तिस्वरूपी आसनावर वैष्णवांनीं निरंतर पूजित झालेला, (१३८) शिवाचा प्रिय असून शिवावर आसक्ति ठेवणारा, शिवचरणसेवा करणारा असा विष्णु शिवाची आज्ञा घेऊन माझें कल्याण करो. (१३९) वासुदेव, अनिरुद्ध, प्रद्युम्न, संकर्षण या चार मूर्ति श्रीहरीच्या आहेत, (१४०) मत्स्य, कूर्म, वराह, नारसिंह, वामन, परशुराम, राम, बलराम कृष्ण, विष्णु, हयग्रीव, (१४१) सुदर्शनचक्र, नारायणास्त्र, पांचजन्य, शार्ङ्गधनुष्य, हे सर्व शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें कल्याण करोत. (१४२) प्रभा, सरस्वती, गौरी, शिवाश्रित लक्ष्मी, वगैरे सर्व शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें कल्याण करोत. (१४३) इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम, कुबेर, त्रिशूलधारी ईशान (१४४) हे सर्व शिवपूजेंत रत असून शिवाच्या ठिकाणीं उत्तम भाव ठेवल्यामुळें पवित्र झालेले हे लोक शिवाच्या आज्ञेनें माझें कल्याण करोत. (१४५) त्रिशूल, वज्र, परशु, बाण, खड्ग, पाश, अंकुश, आयुधांमध्यें श्रेष्ठ पिनाक धनुष्य वगैरे (१४६) शिवाचीं दिव्य आयुधें व पार्वतीचीं दिव्य

सत्कृत्य शिवयोराज्ञां रक्षां कुर्वन्तु मे सदा ॥१४६॥ वृषरूपधरो धर्मः सौरभेयो महाबलः ॥ वाडवाख्यानलस्पर्द्धी पंचगो मातृभिर्वृतः ॥१४७॥ वाहनत्वमनुप्राप्तस्तपसा परमेशयोः ॥ तयोराज्ञां पुरस्कृत्य स मे कामं प्रयच्छतु ॥१४८॥ नन्दा सुभद्रा सुरभिः सुशीला सुमनास्तथा ॥ पञ्चगोमातरस्त्वेताः शिवलोके व्यवस्थिताः ॥१४९॥ शिवभक्तिपरा नित्यं शिवार्चनपरायणाः ॥ शिवयोः शासनादेव दिशन्तु मम वाञ्छितम् ॥१५०॥ क्षेत्रपालो महातेजा नीलजीमूतसन्निभः ॥ दंष्ट्राकरालवदनः स्फुरद्रक्ताधरोज्वलः ॥१५१॥ रक्तोर्द्धमूर्द्धजः श्रीमान्भ्रुकुटीकुटिलेक्षणः ॥ रक्तवृत्तत्रिनयनः शशिपन्नगभूषणः ॥१५२॥ नग्नस्त्रिशूलपाशासिकपालोद्यतपाणिकः ॥ भैरवो भैर-

---

आयुधें निरंतर शिवपार्वतीची आज्ञा घेऊन माझें रक्षण करोत. (१४७) वृषरूपधारी धर्म सुरभीचा मुलगा असून जो बलिष्ठ आहे, व वडवानलाशीं स्पर्द्धा करीत असून पांच गोमातरांनीं जो युक्त आहे, (१४८) व जो शिवपार्वतीचें वाहन झाला आहे, असा तो धर्म शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें मनोरथ पूर्ण करो. (१४९) नंदा, सुभद्रा, सुरभि, सुशीला, सुमना वगैरे पांच या गोमाता शिवलोकामध्यें राहिल्या आहेत, व (१५०) शिवभक्ति करण्यांत तत्पर असून नित्य शिवपूजा करण्यांत रत असतात. तर शिवपार्वतीच्या आज्ञेनें या सर्व माझें मंगल करोत. व माझी इच्छा पूर्ण करोत. (१५१) महातेजस्वी असा जो क्षेत्रपाल नीलमेघाप्रमाणें ज्याची कांति आहे, भयंकर दाढा असल्यामुळें ज्याचें मुख भयंकर दिसत आहे, ज्याचे अधर ( ओंठ ) नेहमीं स्फुरण पावत असून प्रकाशमान् आहेत, (१५२) ज्याचे केश तांबडे तांबडे आणि ताठ आहेत, ज्याच्या भिंवया मूळच्या वांकड्या असल्यामुळें ज्याचें पाहणें चमत्कारिक दिसतें, व जो श्रीमान् आहे, ज्याचे डोळे वाटोळे व तांबडे असून संख्येनें तीन आहेत, चंद्र व सर्प ज्याचीं भूषणें ( दागिने ) झाले आहेत, (१५३) जो नग्न ( नागवा ) असून ज्याच्या हातांत त्रिशूल, पाश, खड्ग, कपाल हीं आहेत, व स्वतः भैरव असून सिद्ध, भैरव यांनीं युक्त आहे, व ज्याच्या भोंवतीं योगिनी आहेत,

वैः सिद्धैर्योगिनीभिश्च संवृतः ॥१५३॥ क्षेत्रे क्षेत्रे समासीनः स्थितो यो रक्षकः सताम् ॥ शिवप्रणामपरमः शिवसद्भावभावितः॥१५४॥ शिवाश्रितान्विशेषेण रक्षन्पुत्रानिवौरसान् ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां स मे दिशतु मंगलम् ॥१५५॥ तालजंघादयस्तस्य प्रथमावरणेऽर्चिताः ॥ सत्कृत्य शिवयोराज्ञां चत्वारः समवन्तु माम् ॥१५६॥ भैरवाद्याश्च ये चान्ये समन्तात्तस्य वेष्टिताः ॥ तेऽपि मामनुगृह्णन्तु शिवशासनगौरवात् ॥१५७॥ नारदाद्याश्च मुनयो दिव्या देवैश्च पूजिताः ॥ साध्याश्चैव तु ये देवा जनलोकनिवासिनः ॥१५८॥ विनिवृत्ताधिकाराश्च महर्लोकनिवासिनः ॥ महर्षयस्तथान्ये च वैमानिकगणैः सह ॥१५९॥ सर्वे शिवार्चनरताः शिवाज्ञावशवर्तिनः ॥ शिवयोराज्ञया मह्यं दिशन्तु मम कांक्षितम् ॥१६०॥ गन्धर्वाद्याः पिशाचान्ताश्चतस्रो देवयोनयः ॥ सिद्धा विद्याधराद्याश्च येऽपि चान्ये नभश्चराः ॥१६१॥ असुरा राक्षसाश्चैव पातालतलवासिनः ॥ अ-

---

(१९४) जो प्रत्येक क्षेत्राच्या ठिकाणीं जागृतपणानें राहून सज्जनांचें रक्षण करतो, जो शिवाच्या प्रणामामध्यें आसक्त असून जो शिवाश्रित आहे, शिवाच्या ठिकाणीं उत्तम भाव ठेवून पवित्र झाला आहे, (१९५) जो शिवाश्रित लोकांचें रक्षण औरसपुत्राप्रमाणें करतो, असा तो देव शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें कल्याण करो. (१९६) शिवाच्या प्रथमावरणामध्यें तालजंघादिकांची पूजा केली, असे ते चौघे शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझें रक्षण करोत. (१९७) भैरवादि जे जे ज्याच्या सभोंवतीं वेष्टन घालून राहिले असतील त्यांचा सुद्धां, शिवाज्ञेच्या गौरवानें माझ्यावर अनुग्रह होवो. (१९८) देवादिकांनीं पूजित झालेले नारदादि सर्व ऋषि, जनलोकामध्यें राहणारे जे साध्यादि देव असतील ते, (१९९) ज्यांचा अधिकार केव्हांही जात नाहीं, असे महर्लोकवासी लोक, वैमानिक गणांसहित असलेले इतर ऋषि, (१६०) जे शिवपूजेंत रत असून शिवाच्या आज्ञेंत तत्पर आहेत, ते लोक शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझे मनोरथ पूर्ण करोत. (१६१) गंधर्वांपासून पिशाचापर्यंत चार देवयोनि, सिद्ध, विद्याधर वगैरे इतर आकाशसंचारी लोक, (१६२) असुर, राक्षस, पातालवासी लोक, अनंतादि सर्पजाति, गरुडादि

नन्ताद्याश्च नागेन्द्रा वैनतेयादयो द्विजाः ॥१६२॥ कूष्माण्डाः प्रेतवेताला ग्रहा भूतगणाः परे ॥ डाकिन्यश्चापि योगिन्यः शाकिन्यश्चापि तादृशः ॥१६३॥ क्षेत्रारामगृहादीनि तीर्थान्यायतनानि च ॥ द्वीपाः समुद्रा नद्यश्च नदाश्चान्ये सरांसि च ॥१६४॥ गिरयश्च सुमेर्वाद्याः काननानि समन्ततः ॥ पशवः पक्षिणो वृक्षाः क्रिमिकीटादयो मृगाः ॥१६५॥ भुवनान्यपि सर्वाणि भुवनानामधीश्वराः ॥ अण्डाद्यावरणैः सार्द्धमाशाश्च दश दिग्गजाः ॥१६६॥ वर्णाः पदानि मन्त्राश्च तत्वान्यपि सहाधिपैः ॥ ब्रह्माण्डधारका रुद्रा रुद्राश्चान्ये सशक्तिकाः ॥१६७॥ यच्च किञ्चिज्जगत्यस्मिन्दृष्टश्चानुमितं श्रुतम् ॥ सर्वे कामं प्रयच्छन्तु शिवयोरेव शासनात् ॥१६८॥ अथ विद्या परा शैवी पशुपाशविमोचनी ॥ पञ्चार्थसंज्ञिता दिव्या पशुविद्याबहिष्कृता ॥१६९॥ शास्त्रं च शिवधर्माख्यं धर्माख्यं च तदुत्तरम् ॥ शैवाख्यं शिवधर्माख्यं पुराणं श्रुतिसम्मितम् ॥१७०॥ शैवागमाश्च ये चान्ये कामिकाद्याश्चतुर्विधाः ॥ शिवाभ्यामविशेषेण सत्कृत्येह समर्चि-

---

पक्षी, (१६३) कूष्मांड, प्रेत, वेताल, ग्रह, भूतगण, इतर डाकिनी, योगिनी, शाकिनी, (१६४) क्षेत्र पुण्याराम, ( बगीचे ) पुण्यकर मंदिर, तीर्थ, आयतन, ( देवालय ) द्वीप, समुद्र, नदी, नद, इतर सरोवर, (१६५) मेरु वगैरे पर्वत, चोंहोकडचें अरण्य, पशु, पक्षी, वृक्ष, कृमि, कीट, मृग, (१६६) सर्व लोक, सर्व लोकांचे अधिपति, ब्रह्मांडादि आवरणांसहित सर्व दिशा, दहा दिग्गज, (१६७) वर्ण, पद, मंत्र, अधिपतींसह सर्व तत्वें, ब्रह्मांडाचें आधारभूत रुद्रगण, शक्तिसहित इतर रुद्र, (१६८) जे कांहीं या जगांत पाहिलेलें, व अनुमामानें सिद्ध झालेलें, ऐकिलेलें असेल, तें सर्व शिवपार्वतीच्या आज्ञेवरून माझे मनोरथ पूर्ण करो. (१६९) पशुत्वापासून पाशापासून सोडविणारी जी उत्कृष्ट शैवीविद्या, ती पंचार्थसंज्ञित ( पंचार्थ या नांवाची ) असून दिव्य आहे, व पशुविद्येपासून बहिष्कृत आहे, ती विद्या, (१७०) शिवधर्मनांवाचें शास्त्र, धर्मनांवाचें त्याचें उत्तर, ( तें एक शास्त्र ) शैवनांवाचे व शिवधर्मनांवाचे वेदांसमान असलेलें पुराण, (१७१) शैवागम, कामिकादि चारप्रकारचे आगम, विशेषेंकरून शिवपार्वतींनीं ज्यां-

ताः ॥१७१॥ ताभ्यामेव समाज्ञाता ममाभिप्रेतसिद्धये ॥ कर्मेदमनु-
मन्यन्तां सफलं साध्वनुष्ठितम् ॥१७२॥ शैवा माहेश्वराश्चैव ज्ञानक-
र्मपरायणाः ॥ कर्मेदमनुमन्यन्तां सफलं साध्वनुष्ठितम्॥१७३॥ लौ-
किका ब्राह्मणाः सर्वे क्षत्रियाश्च विशः क्रमात् ॥ वेदवेदांगतत्वज्ञाः
सर्वशास्त्रविशारदाः ॥१७४॥ सांख्या वैशेषिकाश्चैव यौगा नैय्यायि-
का नराः ॥ सौरा ब्राह्मास्तथा रौद्रा वैष्णवाश्चापरे नराः॥१७५॥
शिष्टाः सर्वे विशिष्टाश्च शिवशासनयंत्रिताः ॥ कर्मेदमनुमन्यन्तां म-
माभिप्रेतसाधकम् ॥१७६॥ शैवाः सिद्धान्तमार्गस्थाः शैवाः पाशुप-
तास्तथा ॥ शैवा महाव्रतधराः शैवाः कापालिकाः परे ॥१७७॥ शि-
वाज्ञापालकाः पूज्या ममापि शिवशासनात् ॥ सर्वे मामनुगृह्णन्तु शं-
सन्तु सफलक्रियाम् ॥१७८॥ दक्षिणज्ञाननिष्ठाश्च दक्षिणोत्तरमार्ग-
गाः ॥ अविरोधेन वर्तन्तां मन्त्रश्रेयोऽर्थिनो मम ॥१७९॥ नास्ति-

---

ची श्लाघा केली आहे, ज्यांचा सत्कार केला आहे, ते आगम, वगैरे (१७२) शिवपार्वतीच्या आज्ञेनें माझ्या मनांतले अभिप्राय पूर्ण करोत, व केलेल्या या माझ्या कर्माला मान देवोत, व माझें कर्म सफल करोत. (१७३) ज्ञान, व कर्म यांमध्यें आसक्त असलेले शैव, व माहेश्वर हे सर्व माझ्या कर्माला मान देवोत, व सफल करोत. (१७४) लौकिक लोक, ब्राह्मण, सर्व क्षत्रिय, वैश्य, वेदवेदांगांच्या तत्वांमध्यें निष्णात असलेले, सर्व शास्त्रांमध्यें कुशल असलेले, (१७५) सांख्य, वैशेषिक, यौगिक, नैय्यायिक, सौर, ब्राह्म, रौद्र, वैष्णव, इतर मानव, (१७६) सर्व शिष्ट ( राहिले सवरलेले ) हे सर्व लोक शिवाच्या आज्ञेनें नियंत्रित ( प्रेरित ) होऊन माझ्या कर्माला मान देवोत, व माझे मनोरथ पूर्ण करोत. (१७७) शैवसिद्धांत मार्गात असलेले शैव, पाशुपत शैव, महाव्रत धारण करणारे शैव, कापालिक शैव, (१७८) हे सर्व शिवाच्या आज्ञेला पाळणारे असून मलाही पूज्य आहेत, तर शिवाच्या शासनानें या सर्वांचा अनुग्रह माझ्यावर होवो, व माझें कर्म यांच्या अनुग्रहानें सफल होवो. (१७९) दक्षिणा व ज्ञान यांमध्यें निष्ठा ठेवणारे जे असतील ते, दक्षिण व उत्तर या मार्गामध्यें राहिलेले, हे सर्व मंत्राच्या श्रेयाची इच्छा करणाऱ्या माझ्याशीं सरळपणानें वागोत. (१८०) नास्तिक, शठ, कृतघ्न, ता-

काश्च शठाश्चैव कृतघ्नाश्चैव तामसाः ॥ पाषण्डाश्चातिपापाश्च वर्तंतां दूरतो मम ॥१८०॥ बहुभिः किं स्तुतैरत्र येऽपि केऽपि चिदास्तिकाः ॥ सर्वे मामनुगृह्णन्तु सन्तः शंसन्तु मङ्गलम् ॥१८१॥ नमः शिवाय साम्बाय ससुतायादिहेतवे ॥ पञ्चावरणरूपेण प्रपंचेनावृताय ते ॥१८२॥ इत्युक्त्वा दण्डवद्भूमौ प्रणिपत्य शिवं शिवाम् ॥ जपेत्पंचाक्षरीं विद्यामष्टोत्तरशतावराम् ॥१८३॥ तथैव शक्तिविद्यां च जपित्वा तत्समर्पणम् ॥ कृत्वा क्षमापयित्वेशं पूजाशेषं समापयेत् ॥१८४॥ एतत्पुण्यतमं स्तोत्रं शिवयोर्हृदयंगमम् ॥ सर्वाभीष्टप्रदं साक्षाद्भुक्तिमुक्त्यैकसाधनम् ॥१८५॥ य इदं कीर्तयेन्नित्यं शृणुयाद्वा समाहितः ॥ स विधूयाशु पापानि शिवसायुज्यमाप्नुयात् ॥१८६॥ गोघ्नश्चैव कृतघ्नश्च वीरहा भ्रूणहापि वा ॥ शरणागतघाती च मित्रविश्रम्भघातकः ॥१८७॥ दुष्टः पापसमाचारो मातृहा पितृहापि वा ॥ स्तवेनायुतज-

---

मस, पाषंड, पातकी हे सर्व लोक माझ्यापासून दूर राहोत. (१८१) पुष्कळ स्तोत्र करण्यांत काय मतलब आहे ? जे कोणी आस्तिक असतील, त्यांचा अनुग्रह माझ्यावर होवो, व ते सर्व सज्जन माझे कल्याण करोत. (१८२) शिवाला, पुत्रसहित सांबाला नमस्कार असो. पंचावरणरूप प्रपंचानें आवृत (वेष्टित) झालेल्या सांबा, तुला नमन असो. (१८३) याप्रमाणें बोलून दंडाकारानें शिवपार्वतीला नमस्कार करावा. नंतर अष्टोत्तरशत संख्येनें (एकशे आठ) पंचाक्षरी मंत्राचा जप करावा. (१८४) तसेंच शक्तिविद्येचा जप करून सर्व कर्म शिवाला समर्पण करून ईशाला क्षमा मागून राहिलेली पूजा समाप्त करावी. (१८५) हृदयाला आनंद देणारें शिवपार्वतीचें हें पुण्यकर स्तोत्र सर्व मनोरथ देणारें असून प्रत्यक्ष भुक्ति मुक्ति या दोहोंचें मुख्य साधन आहे. (१८६) जो प्राणी याचें कीर्तन करतो, व समाधान चित्तानें ऐकतो, त्याचीं सर्व पापें जळून तो शिवसायुज्याला पावतो. (१८७) गोहत्या करणारा, कृतघ्न, वीरहत्या करणारा, भ्रूणहत्या करणारा (गर्भहत्या करणारा), शरण आलेल्या प्राण्याला मारणारा, मित्रहत्या करणारा, विश्वासघात करणारा, (१८८) दुष्ट, पापकृत्य करणारा, मातृहत्या करणारा, पितृहत्या करणारा, या सर्वांनीं या स्तोत्राचे दहा हजार जप केले, तर ते सर्व लोक त्या

सेन तत्तत्पापात्प्रमुच्यते ॥१८८॥ दुःस्वप्नादिमहानर्थसूचकेषु भयेषु च ॥ यदि सङ्कीर्तयेदेतन्न ततोऽनर्थभाग्भवेत् ॥१८९॥ आयुरारोग्यमैश्वर्यं यच्चान्यदपि वाञ्छितम् ॥ स्तोत्रस्यास्य जपे निष्ठां तत्सर्वं लभेत नरः ॥१९०॥ असम्पूज्य शिवं स्तोत्रजपात्फलमुदाहृतम् ॥ सम्पूज्य च जपेत्तस्य फलं वक्तुं न शक्यते ॥१९१॥ आस्तामियं फलावाप्तिरेतस्मिन्कीर्तिते सति ॥ सार्द्धमम्बिकया देवः श्रुत्वेदं दिवि तिष्ठति ॥१९२॥ तस्मान्नभसि सम्पूज्य देवदेवं सहोमया ॥ कृताञ्जलिपुटस्तिष्ठन्स्तोत्रमेतदुदीरयेत् ॥१९३॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे चतुर्विंशोऽध्यायः ॥२४॥

---

त्या पापांपासून मुक्त होतात. (१८९) दुष्ट स्वप्न पडलें असतां, मोठे अनर्थ आले असतां, व येणारे असतां या स्तोत्राचें कीर्तन करील, तर त्याला कोणताही अनर्थ येत नाहीं. (१९०) आयुष्य, आरोग्य, ऐश्वर्य, इतर इच्छित वस्तु या स्तोत्राच्या योगानें मिळून जपावर निष्ठा उत्पन्न होते, व सर्व कांहीं मिळतें. (१९१) शिवपूजा न करितां स्तोत्र जप केले तर काय फल मिळतें, तें सांगितलें. शिवपूजा करून स्तोत्र जप जो करतो, त्याला काय फल मिळेल, तें सांगावयास मी समर्थ होत नाहीं. (१९२) अमुक एक फल मिळतें, असें हें सांगणें तूर्त असो. हा स्तोत्र पाठ केला असतां तात्काळ अंबिकेसह ( पार्वतीसह ) शिव आकाशांत येऊन उभा राहतो. (१९३) तेव्हां आकाशांत उमेसहित शिवाची पूजा करून हात जोडून हा स्तोत्र पाठ करावा ( ह्मणावा. )

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तर भागांतील चोविसावा अध्याय संपला.

## अथ पंचविंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ एतत्ते कथितं कृष्णकर्मेहामुत्र सिद्धिदम् ॥ क्रियातपोजपध्यानसमुच्चयमयं परम् ॥१॥ अथ वक्ष्यामि शैवानामिहैव फलदं नृणाम् ॥ पूजाहोमजपध्यानतपोदानमयं महत् ॥२॥ तत्र संसाधयेत्पूर्वं मन्त्रं मन्त्रार्थवित्तमः ॥ दृष्टसिद्धिकरं कर्म नान्यथा फलदं यतः ॥३॥ सिद्धमन्त्रोऽप्यदृष्टेन प्रबलेन तु केनचित् ॥ प्रतिबध्दफलं कर्म न कुर्यात्सहसा बुधः ॥४॥ तस्य तु प्रतिबन्धस्य कर्तुं शक्येह निष्कृतिः ॥ परीक्ष्य शकुनाद्यैस्तु तदा निष्कृतिमाचरेत् ॥५॥ योऽन्यथा कुरुते मोहात्कर्मैहिकफलं नरः ॥ न ते नफलभाक् स स्यात्प्रामुयाच्चोपहास्यताम् ॥६॥ अविस्रब्धो न कुर्वीत कर्म दृष्टफलं क्वचित् ॥ स खल्वश्रद्दधानः स्यान्नाश्रध्दःफलमृच्छति ॥७॥ नापरा-

---

उपमन्यु बोलला– (१) हे कृष्णा, ऐहिक आमुत्रिक फलसिद्धि देणारें हें कर्म सांगितलें. क्रिया, तप, जप, ध्यान, वगैरे कर्मांनीं युक्त असलेलें श्रेष्ठ कर्म सांगितलें. (२) आतां पूजा, जप, ध्यान, तप, दान इत्यादि क्रियामय कर्म शैव मानवांना येथेंच फल देणारें आहे, असें तें कर्म सांगतों. (३) त्यांत मंत्रार्थ जाणणाऱ्या प्राण्यानें प्रथम मंत्र साध्य करावा. एक मंत्र सिद्ध झाला, ह्मणजे इष्टसिद्धि ( पाहण्यांत आलेल्या सिद्धि ) काय असतील, त्या मिळतील. या कर्मानें इतर फल मिळणार नाहीं. (४) मंत्र सिद्ध झाला असतां प्रबल, अदृष्ट अशा कोणत्या तरी फलानें प्रतिबध्द झालेलें कर्म एकाएकी ज्ञानानें करूं नये. ( मंत्र सिध्द झाला ह्मणून अदृष्ट फलाची आशा धरून कर्म करूं नये. ) (५) कोणत्याही फलाला प्रतिबंध झाला असतां त्या प्रतिबंधाला दूर करण्यासाठीं उपाय करावयास येतो. तथापि शकुन वगैरेची परीक्षा करून उपायांची योजना करावी. (६) जो प्राणी मोहानें अन्यथा कर्म ( विपरीत कर्म ) करतो, त्याला ऐहिक फल मिळत नाहीं, शिवाय जगांत त्याचा उपहास मात्र होतो. (७) दृष्ट फलाचें कर्म करणें झाल्यास केव्हांही अविश्वासानें करूं नये. तो अविश्वासी ठरून त्या अविश्वास्याला फल मिळत नाहीं. (८) कर्माचें फल जर मिळालें नाहीं, तर त्यांत देवाचा अपराध

**धोऽस्ति देवस्य कर्मण्यपि तु निष्फले ॥ यथोक्तकारिणां पुंसामिहैव फलदर्शनात् ॥८॥ साधकः सिध्दमन्त्रश्च निरस्तप्रतिबन्धकः ॥ विश्वस्तः श्रद्दधानश्च कुर्वन्नाप्नोति तत्फलम् ॥९॥ अथवा तत्फलावाप्त्यै ब्रह्मचर्यरतो भवेत् ॥ रात्रौ हविष्यमश्नीयात्पायसं वा फलानि वा ॥१०॥ हिंसादि यन्निषिध्दं स्यान्न कुर्यान्मनसापि तत् ॥ सदा भस्मानुलिप्तांगसुवेषश्च शुचिर्भवेत् ॥११॥ इत्थमाचारवान्भूत्वा स्वानुकूले शुभेऽहनि ॥ पूर्वोक्तलक्षणे देशे पुष्पदामाद्यलंकृते ॥१२॥ आलिप्य शकृता भूमिं हस्तमानावरां तथा ॥ विलिखेत्कमलं भद्रं दीप्यमानं स्वतेजसा ॥१३॥ तप्तजाम्बूनदमयमष्टपत्रं सकेशरम् ॥ मध्ये कर्णिकया युक्तं सर्वरत्नैरलंकृतम् ॥१४॥ स्वाकारसदृशेनैव नालेन च समन्वितम् ॥ तादृशे स्वर्णनिर्माणे कन्दे सम्यक्प्रतिष्ठितम् ॥१५॥**

---

कांहीं नाहीं. कारण ज्या कर्माचें विधान जसें सांगितलें असेल, तसेंच फल मिळावयाचें. असा अनुभव या लोकांत क्षणशः येतो. (९) जो मंत्रसाधक असेल, त्यानें मंत्राची सिद्धि करून ज्याचा निरास केला आहे, त्याला प्रतिबंध करून कर्मावर विशेष श्रद्धा ठेवून कर्म केलें असतां त्या कर्माचें फल त्याला मिळतें. (१०) अथवा त्या कर्माचें फल मिळावयास कर्त्यानें ब्रह्मचर्यानें रहावें. रात्रीच्या वेळेस हविष्यान्न, पायस, फल वगैरे भक्षण करावें. (११) हिंसा वगैरे जें निषिद्ध कर्म असेल, तें कर्म मनसा सुद्धां करूं नये. सर्वदा भस्म अंगाला लावून उत्तम वेषाचा होऊन शुद्धपणानें वागावें. (१२) याप्रमाणें सदाचारसंपन्न होऊन उत्तम अनुकूल अशा शुभ दिवशीं पूर्वीं सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या उत्तम स्थलाला फुलांच्या माळांनीं वगैरे श्रृंगारून, (१३) गोमयानें हस्तप्रमाण जागा ( एका हाताच्या प्रमाणाची जागा ) सारवून त्यावर कमळ लिहावें. तें कमळ आपल्या तेजानें प्रकाशित असावें, व मंगलकर असावें, (१४) व तें तापलेल्या सोन्याप्रमाणें भासमान ( प्रकाशणारें ) असून त्याला आठ पानें काढलेलीं असावीं, त्यांत केसर केलेलें असावें, मध्यें करंडा केलेला असावा, सभोंवती रत्नांनीं अलंकृत केलेलें असावें. (१५) कमलाचा आकार जसा असेल, त्याप्र-

तत्राणिमादिकं सर्वं सङ्कल्प्य मनसा पुनः ॥ रत्नजं वाथ सौवर्णं स्फाटिकं वा सलक्षणम् ॥१६॥ लिंगं सवेदिकं तत्र स्थापयित्वा विधानतः ॥ तत्रावाह्य यजेद्देवं साम्बं सगणमव्ययम् ॥१७॥ तत्र माहेश्वरी कल्प्या मूर्तिर्मूर्तिमतः प्रभोः ॥ चतुर्भुजा चतुर्वक्त्रा सर्वाभरणभूषिता ॥१८॥ शार्दूलचर्मवसना किञ्चिद्विहसितानना ॥ वरदाभयहस्ता च मृगटंकधरा तथा ॥१९॥ अथवाष्टभुजाचिन्त्या चिन्तकस्य यथारुचि ॥ तदा त्रिशूलपरशुखड्गवज्राणि दक्षिणे ॥२०॥ वामे पाशांकुशे तद्वत्खेटं नागं च बिभ्रती ॥ बालार्कसदृशप्रख्या प्रतिवक्त्रं त्रिलोचना ॥२१॥ तस्याः पूर्वमुखं सौम्यं स्वाकारसदृशप्रभम् ॥ दक्षिणं नीलजीमूतसदृशं घोरदर्शनम् ॥२२॥ उत्तरं विद्रुमप्रख्यं

---

माणें नाल करावा, तसलाच सोन्याचा कंद करावा, त्याठिकाणीं (१६) अणिमादि अष्टसिद्धींचा मनसा संकल्प करून रत्नाचें, सोन्याचें, स्फटिकाचें सलक्षण (१७) वेदिसहित लिंग करून त्या कमळासनावर लिंगाची स्थापना करावी. त्या ठिकाणीं शिवाचें आवाहन करून अंबेसहित गणांसहित अव्यय शिवाची पूजा करावी. (१८) त्यावर मूर्तिमान् प्रभूची माहेश्वरी नांवाची मूर्ति करावी. ती मूर्ति अशी असावी कीं, जिला चार हात असून चार मुखें असावींत, जिच्या आंगावर सर्व अलंकार घातलेले असावेत, (१९) जिनें वाघाचें कातडें नेसलेलें असून किंचित् हास्य मुख केलेलें असावें. जिच्या हातांत मृगचिन्ह, टंक ( टाकी ) असून एक हात वरद असावा, व एक अभय दाखविणारा असावा. (२०) किंवा जिला आठ भुजा आहेत, अशा मूर्तीची कल्पना केली तरी चिंता नाहीं. कारण चिंतकाला जसें रुचेल, तसें करावयास सांगितलें आहे. तेव्हां मात्र त्रिशूल, परशु, खड्ग, वज्र, हीं आयुधें उजव्या हातांत असून (२१) पाश, अंकुश, खेट, नाग हीं आयुधें डाव्या हातांत असावीं, व बालसूर्याप्रमाणें जिची कांति असून प्रत्येक मुखाला डोळे तीन असावेत. (२२) तिचें पूर्वेकडचें मुख सौम्य असून त्या आकाराच्या मानानें मुखाची कांति असावी, दक्षिणेकडचें मुख नीलमेघाप्रमाणें असून पहावयास भयंकर असावें, (२३) उत्तरेकडचें मुख

नीलालकविभूषितम् ॥ पश्चिमं पूर्णचन्द्राभं सौम्यमिन्दुकलाधरम् ॥२३॥ तस्यांकमण्डलारूढा शक्तिर्माहेश्वरी परा ॥ महालक्ष्मीरिति ख्याता श्यामा सर्वमनोहरा ॥२४॥ मूर्तिं कृत्वैवमाकारां सकलीकृत्य च क्रमात् ॥ मूर्तिमन्तमथावाह्य यजेत्परमकारणम् ॥२५॥ स्नानार्थे कल्पयेत्तत्र पञ्चगव्यन्तु कापिलम् ॥ पंचामृतं च पूर्णानि वीजानि च विशेषतः ॥२६॥ पुरस्तान्मण्डलं कृत्वा रत्नचूर्णाद्यलंकृतम् ॥ कर्णिकायां प्रविन्यस्य ईशानकलशं पुनः ॥२७॥ सद्यादिकलशान्पश्चात्परितस्तस्य कल्पयेत् ॥ ततो विद्येशकलशानष्टौ पूर्वादिदिक्क्रमात् ॥२८॥ तीर्थाम्बुपूरितान्कृत्वा सूत्रेणावेष्ट्य पूर्ववत् ॥ पुण्यद्रव्याणि निक्षिप्य समन्त्रं सविधानकम् ॥२९॥ दुकूलाद्येन वस्त्रेण समाच्छाद्य समन्ततः ॥ सर्वत्र मन्त्रं विन्यस्य तत्तन्मन्त्रपुरःसरम् ॥३०॥ स्नान-

पोंवळ्याप्रमाणें असून नील व कुरळ केंस यांनीं भूषित झालेलें असावें, पश्चिमेकडचें मुख पूर्णचंद्राप्रमाणें असून सौम्य असावें, व या मुखावर ( डोकीवर ) अर्धचंद्राची कला असावी, (२४) त्याच्या अंकमंडलावर ( मांडीवर ) बसलेली माहेश्वरी नांवाची पराशक्ति महालक्ष्मी या नांवानें जगांत जी प्रसिद्ध आहे, जी सावळी असून फार संदर आहे, (२५) अशी साकार मूर्ति करून क्रमानें तिच्या ठिकाणीं कलान्यास करून परमकारण मूर्तिमान ( मूर्तिसहित ) प्रभूचें आवाहन करून त्याची पूजा करावी. (२६) देवाच्या स्नानाकरितां ( अभिषेकाकरितां ) काळ्या गायीचें पंचगव्य ( दूध, दहि वगैरे पांच द्रव्यें ) करून ठेवावें. पंचामृत व पूर्ण बीजें विशेषेंकरून ठेवावींत. (२७) त्यापुढें मंडल करून रत्नचूर्णानें ( रांगोळीनें ) मंडल शृंगारून कर्णिकेमध्यें ईशान कलशाची स्थापना करावी. (२८) पुनः त्याच्या सभोंवतीं सद्यादि कलशांची स्थापना करावी. नंतर क्रमानें पूर्वादि आठ दिशांमध्यें आठ विद्याधिपतींचे कलश ठेवावेत. (२९) त्यांमध्यें तीर्थोदक घालून सभोंवतीं सूत्राचें वेष्टन करून त्यांमध्यें मंत्रसहित विधानसहित पुण्यकर द्रव्यें टाकावींत. (३०) सभोंवतीं दुकूलादि वस्त्राचें आच्छादन घालून त्या त्या मंत्रांनीं सर्वत्र मंत्रांचा न्यास करावा. (३१) स्नानाची वेळ आल्या

काले तु सम्प्राप्ते सर्वमंगलनिस्वनैः ॥ पंचगव्यादिभिश्चैव स्नापये-त्परमेश्वरम् ॥३१॥ ततः कुशोदकाद्यानि स्वर्णरत्नोदकान्यपि ॥ गन्धपुष्पादिसिद्धानि मंत्र सिद्धानि च क्रमात् ॥३२॥ उध्दृत्योध्दृत्य-मन्त्रेण तैस्तैः स्नाप्य महेश्वरम् ॥ गन्धपुष्पादिदीपांश्च पूजाकर्म समाचरेत् ॥३३॥ पलावरः स्यादालेप एकादशपलोत्तरः ॥ सुवर्णरत्नपुष्पाणि शुभ्राणि सुरभीणि च ॥३४॥ नीलोत्पलाद्युत्पलानि बिल्वपत्राण्यनेकशः ॥ कमलानि च रक्तानि श्वेतान्यपि च सम्भवे ॥३५॥ कृष्णागुरूद्भवो धूपः सकर्पूराज्यगुग्गुलः ॥ कपिलाघृतसंसिद्धा दीपाः कर्पूरवर्तिजाः ॥३६॥ पञ्चब्रह्म षडंगानि पूज्यान्यावरणानि च ॥ निवेद्यः पयसा सिद्धः सगुडाज्यो महाचरुः ॥३७॥ पाटलोत्पलपत्राद्यैः पानीयं च सुगन्धितम् ॥ पञ्चसौगंधिकोपेतं ता-

---

बरोबर मंगलवाद्यांच्या वैभवांत पंचगव्यादिकांनीं परमेश्वराला अभिषेक घालावा. (३२) नंतर कुशोदकाचा अभिषेक घालावा. नंतर सुवर्णरत्नमिश्रित उदकाचें स्नान घालावें, नंतर गंध, पुष्प, यांनीं तयार केलेल्या पाण्याची आंघोळ घालावी, नंतर मंत्रोदक घालावें. (३३) ते ते मंत्र ह्मणत वरचेवर पाणी उचलून महेश्वराला स्नान घालून मग गंध, पुष्प, धूप, दीप वगैरे समर्पण करून शिवाची पूजा करावी. (३४) एका पलापासून अकरा पलांपर्यंत वजनाचा लेप ( चार तोळ्यांपासून ४४ चवेचाळीस तोळ्यांपर्यंतं गंध उघाळून ) पूजेच्या वेळेस शिवास अर्पण करावें, नंतर सुवर्ण, रत्न, व शुभ्र सुगंध फुलें अर्पण करावींत. (३५) नील कमल वगैरे कमलें, अनेक बिल्वपत्रें, तांबडें कमल, सांपडत असतील तर पांढरीं कमळें वगैरे अर्पण करावींत. (३६) कापूर, तूप, गुग्गुळ यांसहित कृष्णागरूचा धूप, काळ्या गायीच्या तुपांत भिजविलेल्या वातींचे दीप, कापराचे दीप वगैरे समर्पण करावेत. (३७) नंतर पंचब्रह्मांची, षडंगाची, आवरणांची पूजा करावी. नंतर दूध, गूळ, तूप इत्यादि पदार्थ घालून तयार केलेल्या चरूचा नैवेद्य दाखवावा. (३८) पाटली पुष्प कमळ वगैरे फुलांनीं सुगंधित असें पाणी ( पानीय ) देवाला समर्पण करावें. पांच सौगंधिकांनीं ( सुगंध द्रव्यांनीं ) युक्त, व सुसंस्कृत ( चांगला बनविलेला ) तांबूल

म्बूलश्च सुसंस्कृतम् ॥३८॥ सुवर्णरत्नसिद्धानि भूषणानि विशेषतः॥ वासांसि च विचित्राणि सूक्ष्माणि च नवानि च ॥३९॥ दर्शनीयानि देयानि गानवाद्यादिभिः सह ॥ जपश्च मूलमन्त्रस्य लक्षः परमसंख्यया ॥४०॥ एकावरात्र्युत्तरा च पूजाफलवशादिह ॥ दशसंख्यावरो होमः प्रतिद्रव्यं शतोत्तरः ॥४१॥ घोररूपः शिवश्चिन्त्यो मारणोच्चाटनादिषु ॥ शिवलिंगे शिवाग्नौ च शान्तः शान्तिकपौष्टिके ॥४२॥ आयसौ स्रुक्स्रुवौ कार्यौ मारणादिषु कर्मसु ॥ तदन्यत्र तु सौवर्णौ शान्तिकाद्येषु कृत्स्नशः ॥४३॥ दूर्वया घृतगोक्षीरमिश्रया मधुना तथा ॥ चरुणा सघृतेनैव केवलं पयसापि वा ॥४४॥ जुहुयान्मृत्युविजये तिलै रोगोपशान्तये ॥ घृतेन पयसा चैव कमलैर्वाथ केवलैः ॥४५॥ समृद्धिकामो जुहुयान्महादारिद्र्यशान्तये ॥ जा-

---

द्यावा. (३९) सोन्याचे, व रत्नाचे दागिने, चित्रविचित्र वस्त्रें नवीन असून सूक्ष्म असावींत, असे पदार्थ शिवाकरितां द्यावेत. (४०) तीं वस्त्रें पाहण्यालायक असलेलीं द्यावींत. तेव्हां देवापुढें गायन करवावें, वाद्यें वाजवावींत. श्रेष्ठ संख्या ह्मणजे एक लक्ष, तितके मूलमंत्राचे जप करावेत. (४१) एक वेळची पूजा असो, तीन वेळची पूजा असो, फलाच्या तारतम्यानें ( फलाच्या मानानें ) कमींत कमी दहा होम प्रत्येक पूजेला करावेत. परंतु त्या होमांत जितकीं द्रव्यें असतील, तितकीं तीं प्रत्येकीं शंभर आहुतीकरितां घ्यावींत. (४२) नंतर मारण, उच्चाटन वगैरे जीं कर्में मनांत योजिलीं असतील, त्या कर्मांच्या मानानें घोररूप शिवाचें चिंतन करावें. शिवलिंगपूजेच्या वेळेस, शिवाग्नींत होम करावयाच्या वेळेस, शांतिक पौष्टिक कर्म करावयाच्या वेळेस शांत स्वरूप शिवाचें चिंतन करावें. (४३) मारणादि कर्मांच्या होमाच्या वेळेस लोखंडाचे स्रुक्स्रुव करावे; सर्व शांतिक ( मंगल ) कर्मांमध्यें सोन्याचे स्रुक्स्रुव करावेत. (४४) गायीचें दूध व तूप यांत दूर्वा घालून होम करावा, व मधु ( मध ), घृतसहित चरु, केवल पय ( दूध ) (४५) यांनीं होम करावा. ह्मणजे मृत्यूला जिंकितो. तिळांनीं होम केला असतां सर्व रोग निघून जातात. तूप, दूध, केवळ कमळ यांनीं (४६) होम केला असतां मोठें दारिद्र्य असलें तरी तें जाऊन समृद्धि मिळते. घृतसहित जाईच्या फु-

तिपुष्पेण वश्यार्थी जुहुयात्सघृतेन तु ॥४६॥ घृतेन करवीरैश्च कुर्यादाकर्षणंद्विजः ॥ तैलेनोच्चाटनं कुर्यात्स्तम्भनं मधुना पुनः ॥४७॥ स्तम्भनं सर्षपेणापि लशुनेन तु पातनम् ॥ ताडनं रुधिरेण स्यात्खरस्योष्ट्रस्य चोभयोः ॥४८॥ मारणोच्चाटने कुर्याद्रोहिबीजैस्तिलान्वितैः ॥ विद्वेषणंच तैलेन कुर्याल्लांगलकस्य तु ॥४९॥ बन्धनं रोहिवीजेन सेनास्तम्भनमेव च ॥ रक्तसर्षपसंमिश्रैर्होमद्रव्यैरशेषतः ॥५०॥ हस्तयन्त्रोद्भवैस्तैलैर्जुहुयादाभिचारिके ॥ कद्रूषतुषसंयुक्तैः कार्पासास्थिभिरेव च ॥५१॥ सर्षपैस्तैलसंमिश्रैर्जुहुयादाभिचारिके ॥ ज्वरोपशान्तिदं क्षीरं सौभाग्यफलदं तथा ॥५२॥ सर्वसिद्धिकरो होमः क्षौद्राज्यदधिभिर्युतैः ॥ क्षीरेण तण्डुलैश्चैव चरुणा केवलेन वा ॥५३॥ शान्तिकं पौष्टिकं वापि सप्तभिः समिदादिभिः ॥ द्रव्यैर्विशेषतो होमे

---

लांनीं होम केला तर जग वश्य होतें. (४७) ब्राह्मणानें तूप आणि करवीरपुष्प यांनीं होम केला तर त्याला आकर्षणसिद्धि प्राप्त होते. तेलाचा होम केला तर उच्चाटनसिद्धि होते. मधाचा होम केला तर स्तंभनसिद्धि मिळते. (४८) मोहऱ्यांचा होम केला तरी स्तंभनसिद्धि प्राप्त होते. लसुणानें होम केला तर पातनसिद्धि मिळते. गर्दभाच्या किंवा उंटाच्या किंवा दोहोंच्या रक्ताचा होम केला तर ताडनसिद्धि मिळते. (४९) तीळ मिश्र करून रोहिबीजांनीं होम केला तर मारण उच्चाटन यांची सिद्धि मिळते. लांगलकाच्या ( नारळाच्या ) तेलानें होम केला तर द्वेषाची सिध्दि मिळते. (५०) रोहिबीजानें ( पळसाच्या बियांनीं ) होम केला तर बंधनाची व लष्कर थांबविण्याची सिध्दि मिळते. तांबड्या मोहऱ्यांनीं मिश्र झालेलें सर्व होम द्रव्य घेऊन (५१) हाताच्या घाण्यांत तयार केलेल्या तेलानें होम केला असतां आभिचारिकसिध्दि मिळते. कद्रूषाच्या तुषानें मिश्र केलेल्या कापसानें किंवा अस्थींनीं होम केला तर अभिचारसिध्दि मिळते. (५२) तीळ मिश्र करून मोहऱ्यांनीं होम केला तर अभिचारफलप्राप्ति होते. दुधानें होम केला तर ज्वराची शांति होते, व सौभाग्य मिळतें. (५३) मध, तूप, दहिं यांनीं होम केला तर सर्व सिद्धि मिळतात. दूध, तांदूळ, चरु किंवा नुसता चरु घेऊन होम केला असतां (५४) शांति, पुष्टि मिळतात. सात तऱ्हेच्या समिधा

वश्यमाकर्षणंतथा ॥५४॥ वश्यमाकर्षणं चैव श्रीपदं च विशेषतः ॥ विल्वपत्रैस्तु हवनं शत्रोर्विजयदं तथा ॥५५॥ समिधः शान्तिकार्येषु पालाशखदिरादिकाः ॥ करवीरार्कजाः क्रूराः कण्टकिन्यस्तु निग्रहे ॥५६॥ प्रशान्तः शान्तिकं कुर्यात्पौष्टिकं च विशेषतः ॥ निर्घृणः क्रुद्धचित्तस्तु प्रकुर्यादाभिचारिकम् ॥५७॥ अतीव दुरवस्थायां प्रतीकारान्तरं न चेत् ॥ आततायिनमुद्दिश्य प्रकुर्यादाभिचारिकम् ॥ ॥५८॥ स्वराष्ट्रपतिमुद्दिश्य न कुर्यादाभिचारिकम् ॥ यद्यास्तिकः सुधर्मिष्ठो मान्यो वा योऽपि कोऽपि वा ॥५९॥ तमुद्दिश्यापि नो कुर्यादाततायिनमप्युत ॥ मनसा कर्मणा वाचा योऽपि कोऽपि शिवाश्रितः ॥६०॥ स्वराष्ट्रपतिमुद्दिश्य शिवाश्रितमथापि वा ॥ कृत्वाभिचारिकं कर्म सद्यो विनिपतेन्नरः ॥६१॥ स्वराष्ट्रपालकं तस्माच्छिव-

---

आणून होम केला तर ( पळसाच्या बियांनीं होम केला तर ) विशेषतः या द्रव्यांनीं होम केला असतां वश्यसिद्धि आकर्षणसिद्धि मिळतात. (५५) वश्य आकर्षण यांची सिद्धि मिळून विशेषेंकरून लक्ष्मीची प्राप्ति होते. बिल्वपत्रांनीं होम केला तर शत्रूला जिंकण्याची सिद्धि मिळते. (५६) शांतिकार्यमध्यें सामिधांचा होम करावा. पळस, खैर, करवीर, रुई, इतर कांटेरी झाडें यांच्या बियांनीं किंवा लांकडांनीं होम केला तर निग्रहाची सिद्धि मिळते. (५७) शांत मनुष्यानें शांतिक कर्म करावें, विशेषेंकरून पौष्टिककर्म करावें. ज्याला दया नाहीं, जो संतापी आहे, अशा मनुष्यानें आभिचारिक कर्म करावें. (५८) आपण मोठ्या संकटामध्यें पडलों अहोंत, त्याला दुसरा उपाय करावयास येतच नाहीं, अशा वेळेस शत्रूला उद्देशून अभिचारकर्म करावें. (५९) आपल्या राष्ट्राच्या स्वामीला उद्देशून ( राजाकरितां ) अभिचारकर्म करूं नये. जर आस्तिक, धार्मिक वगैरे असेल, किंवा दुसरा कोणी असेल, (६०) त्याला उद्देशून अभिचारकर्म करूं नये. जरी शत्रु आहे, तरी करूं नये. मनानें कर्मानें वाणीनें सुद्धां करूं नये. जो कोणी शिवभक्त असून (६१) राजाला किंवा शिवभक्ताला उद्देशून अभिचारकर्म करील, तर तात्काळ तो मानव अधःपाताला जाईल. (६२) आपल्याला सुख व्हावें अशा

भक्तश्च कश्चन ॥ न हिंस्यादभिचाराद्यैर्यदीच्छेत्सुखमात्मनः॥६२॥ अन्यं कमपि चोद्दिश्य कृत्वा वै मारणादिकम् ॥ पश्चात्तापेन संयुक्तः प्रायश्चित्तं समाचरेत् ॥६३॥ बाणलिंगेऽपि वा कुर्यानिर्द्धनो धनवानपि ॥ स्वयम्भूतेऽथ वा लिंगे आर्षके वैदिकेऽपि वा ॥६४॥ अभावे हेमरत्नानामशक्तौ च तदर्जने ॥ मनसैवाचरेदेतद्द्रव्यैर्वा प्रतिरूपकैः ॥६५॥ क्वचिदंशे तु यः शक्तस्त्वशक्तः क्वचिदंशके ॥ सोऽपि शक्त्यनुसारेण कुर्वंश्चेत्फलमृच्छति ॥६६॥ कर्मण्यनुष्ठितेऽप्यस्मिन्फलं यत्र न दृश्यते ॥ द्विस्त्रिर्वा वर्तयेत्तत्र सर्वथा दृश्यते फलम् ॥६७॥ पूजोपयुक्तं यद्द्रव्यं हेमरत्नाद्यनुत्तमम् ॥ तत्सर्वं गुरवे दद्याद्दक्षिणां च ततः पृथक् ॥६८॥ स चेन्नेच्छति तत्सर्वं शिवाय विनिवेदयेत् ॥ अथवा शिवभक्तेभ्यो नान्येभ्यस्तु प्रदीयते ॥६९॥ यः स्वयं साध-

---

ज्याची इच्छा आहे, त्यानें आपल्या राजाला व शिवभक्ताला उद्देशून आभिचारिक कर्म करून त्यांची हिंसा करूं नये. (६३) दुसऱ्या कोणाला उद्देशून मारणादिक कर्म करून पश्चात्ताप झाला असतां तात्काळ प्रायश्चित्त घ्यावें. (६४) निर्धन असो, श्रीमान असो, त्यानें बाणलिंगाची पूजा करावी. किंवा स्वयंभूतलिंग, ऋषीनें स्थापितलिंग, वैदिकलिंग असें पाहून कर्माच्या सिद्धीकरतां यांचीच पूजा करावी. (६५) सोनें किंवा रत्न हें नसेल, अथवा मिळविण्यास अशक्त असेल, तर मनामध्यें त्याच मासल्याच्या प्रतिरूपकाची ( प्रतिमेची ) कल्पना करून पूजा करावी. (६६) कांहीं अंशामध्यें समर्थ असेल, आणि कांहीं अंशामध्यें असमर्थ असेल ( कांहीं द्रव्य आपल्याजवळ असून कांहीं द्रव्य आपल्याला मिळतच नाहीं, असें असलें तर ) त्यानेंसुद्धां आपल्या शक्तीला अनुसरून शिवपूजा केली, तरी पूजेचें फल त्याला मिळतें. (६७) कर्म केलें तरी कर्माचें फल जर दिसलें नाहीं, तर पुनः दोन तीन वेळ तेंच तेंच कर्म करावें, ह्मणजे सर्वथैव फलसिद्धि प्राप्त होते. (६८) सोनें रत्नें वगैरे जें श्रेष्ठ पूजेला उपयुक्त द्रव्य असेल, तें सर्व आपल्या गुरूला देऊन टाकावें. शिवाय निराळी दक्षिणा द्यावी. (६९) त्याची जर घेण्याची इच्छा नसली, तर तें सर्व शिवाला अर्पण करावें. अथवा शिवभक्तांना देऊन टाकावें, दुसऱ्याला देऊं नये (७०) ज्यानें

येच्छक्त्या गुर्वादिनिरपेक्षया ॥ सोऽप्येवमाचरेदत्र न गृह्णीयात्स्वयं पुनः ॥७०॥ स्वयं गृण्हाति यो लोभात्पूजांगं द्रव्यमुत्तमम् ॥ कांक्षितं न लभेन्मूढो नात्र कार्याविचारणा ॥७१॥ अर्चितं यत्तु तल्लिङ्गं गृण्हीयाद्वा न वा स्वयम् ॥ गृण्हीयाद्यदि तन्नित्यं स्वयं वान्योऽपि वार्चयेत् ॥७२॥ यथोक्तमेव कर्मैतदाचरेद्योऽनपायतः ॥फलं व्यभिचरेन्नैव मित्यतः किं प्ररोचकम् ॥७३॥ तथाप्युद्देशतो वक्ष्ये कर्मणः सिद्धिमुत्तमाम् ॥ अपि शत्रुभिराक्रान्तो व्याधिभिर्वाप्यनेकशः ॥७४॥ मृत्योरास्यगतश्चापि मुच्यते निरपायतः ॥ राजायतेऽतिकृपणो रिक्तो वैश्रवणायते ॥७५॥ कामायते विरूपोऽपि वृद्धोऽपि तरुणायते ॥ शत्रुर्मित्रायते सद्यो विरोधी किंकरायते ॥७६॥ विषायते यदमृतं विषमप्यमृतायते ॥ स्थलायते समुद्रोऽपि स्थलम-

---

गुरु वगैरेंच्या मदतीशिवाय स्वतः शक्त्यनुसार पूजा केली असेल, त्यानें सुद्धां असेंच करावें, स्वतः पुनः आपण तें कांहीं घेऊं नये. (७१) पूजेला जें द्रव्य घेतलें असेल, तें लोभामुळें दुसऱ्याला न देतां आपणच जो ठेवून घेतो, त्याला त्याच्या मनांत इच्छिलेलें फल मिळत नाहीं, यांत विचार करावयासच नको. (७२) पूजा केलेलें जें लिंग असेल, तें स्वतः घेवो, किंवा परका घेवो, परंतु स्वतः घेतलें असेल, तर स्वतः पूजा करावी, दुसऱ्यानें घेतलें असेल तर दुसऱ्यानें पूजा करावी. (७३) शास्त्रांत जसें सांगितलें असेल, तसेंच जो कर्म करितो, त्यांत अपाय कांहीं घडला नाहीं तर फल मिळाल्याशिवाय रहावयाचेंच नाहीं. आतां यापेक्षां रुचिकर काय सांगावयाचें आहे ? (७४) तरी उद्देशानें कर्माची उत्तम सिद्धि सांगतों. शत्रूंनीं ज्याला घेरलें असेल, किंवा अनेक रोगांनीं ज्याला घेरलें असेल, (७५) किंवा मृत्यूच्या जबड्यांत जरी गेला आहे, तरी अपाय न होतां मुक्त होतो. अति कृपण असेल तो राजाप्रमाणें होईल, आणि रिक्त असेल तो कुबेरासारखा होईल. (७६) विरूपी असेल तर कामाप्रमाणें सुंदर होतो, वृद्ध असेल तर तरुणाप्रमाणें होतो. शत्रु असेल तर मित्राप्रमाणें होतो. विरोध करणारा असेल तर किंकराप्रमाणें ( दासाप्रमाणें ) होतो. (७७) अमृत विषाप्रमाणें होईल, विष अमृताप्रमाणें होईल. समुद्र स्थलाप्रमाणें होईल,

प्यर्णवायते ॥७७॥ महीधरायते श्वभ्रं स च श्वभ्रायतेगिरिः ॥ पद्माकरायते वन्हिः सरो वैश्वानरायते ॥७८॥ वनायते यदुद्यानं तदुद्यानायते वनम् ॥ सिंहायते मृगः क्षुद्रः सिंहः क्रीडामृगायते ॥७९॥ स्त्रियोऽभिसारिकायन्ते लक्ष्मीः सुचरितायते ॥ स्वैरप्रेष्यायते वाणी कीर्तिस्तु गणिकायते ॥८०॥ स्वैराचारायते मेधा वज्रसूचीयते मनः ॥ महावातायते शक्तिर्बलं मत्तगजायते ॥८१॥ स्तम्भायते महोद्योगैः शत्रुपक्षे स्थिता क्रिया ॥ शत्रुपक्षायतेऽरीणां सर्व एव सुहृज्जनः ॥८२॥ शत्रवः कुणपायन्ते जीवन्तोऽपि सबान्धवाः ॥ आपन्नोऽपि गतारिष्टः स्वयं खल्वमृतायते ॥८३॥ रसायनायते नित्यमपथ्यमपिसेवितम् ॥ अनिशं क्रियमाणापि रतिस्त्वभिनवायते ॥८४॥ अनागतादिकं सर्वं करस्थामलकायते ॥ यादृच्छिकफलाय-

---

स्थल समुद्राप्रमाणें होईल. (७८) छिद्र असेल तर पर्वताप्रमाणें होईल, पर्वत असेल तर छिद्राप्रमाणें होईल. सरोवर अग्नीप्रमाणें होईल, अग्नि सरोवराप्रमाणें होईल. (७९) उद्यान ( मळा, बाग ) वनाप्रमाणें होईल, वन उद्यानाप्रमाणें होईल, क्षुद्र मृग सिंहाप्रमाणें होईल, सिंह हा क्रीडामृगाप्रमाणें ( खेळांतल्या मृगाप्रमाणें ) होईल. (८०) स्त्रिया अभिसारिकेप्रमाणें होतील, लक्ष्मी सुचरितेप्रमाणें ( पतिव्रतेप्रमाणें ) स्थिर राहील. वाणी स्वेच्छानुसारिणी होईल, कीर्ति वेश्यांगनेप्रमाणें पसरत जाईल. (८१) बुद्धि स्वैर आचरण करणाऱ्या स्त्रियेप्रमाणें होईल, मन वज्रसूचीप्रमाणें होईल. शक्ति महावाताप्रमाणें होईल, बल ( सामर्थ्य ) मस्तहत्तीप्रमाणें होईल. (८२) मोठमोठे उद्योग करून वाटेल ती क्रिया शत्रूंनीं केली, तरी त्या सर्व क्रिया खांबाप्रमाणें जिकडे तिकडे स्तब्ध होतात. शिवाय शत्रूचे वाटेल तसले स्नेही असले तरी त्यांना ते स्नेही शत्रूप्रमाणें होतात. (८३) भाऊबंद वगैरे शत्रु असून जीवंत जरी असले तरी ते प्रेताप्रमाणें होतात. स्वतः आपण मोठ्या आपदेंत जरी आहे, तरी तो अमृताप्रमाणें ( सुखी मनुष्याप्रमाणें ) होतो. (८४) अपथ्य असून तें जरी नित्य खाल्लें, तरी रसायनाप्रमाणें तें वाटतें. अहोरात्र रतिसुख घेतलें तरी पुनः नित्य तें नवीनच वाटतें. (८५) जें आपल्या हाताला येणें अशक्य असेल, तें हातांतल्या आवळ्याप्रमाणें सुलभ

न्ते सिद्धयोऽप्यणिमादयः ॥८५॥ बहुनात्र किमुक्तेन सर्वकामार्थसि-
द्धिषु ॥ अस्मिन्कर्मणि निर्वृत्ते त्वनवाप्यं न विद्यते ॥८६॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे काम्यपूजादिकथनं नाम पञ्चविंशोऽध्यायः ॥२५॥

---

होईल, आणि अणिमादि सिध्दी यदृच्छेनें प्राप्त होतात. (८६) फार काय ? हें कर्म विधिपूर्वक समाप्त झालें, तर सर्व कामसिध्दि व अर्थसिध्दि मिळतात. यांमध्यें दुर्लभ कोणतेंही होत नाहीं.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तर भागांतील काम्यपूजादिकथन नांवाचा पंचविसावा अध्याय संपला.

---

## अथ षड्विंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ॥ अतःपरं प्रवक्ष्यामि केवलामुष्मिकं विधिम् ॥ नैतेन सदृशं किंचित्कर्मास्ति भुवनत्रये ॥१॥ पुण्यातिशयसंयुक्तः सर्वैदेवैरनुष्ठितः ॥ ब्रह्मणा विष्णुना चैव रुद्रेण च विशेषतः ॥२॥ इन्द्रादिलोकपालैश्च सूर्याद्यैर्नवभिर्ग्रहैः ॥ विश्वामित्रवसिष्ठाद्यैर्ब्रह्मविद्भिर्महर्षिभिः ॥३॥ श्वेतागस्त्यदधीचाद्यैरस्माभिश्च शिवाश्रितैः ॥ नन्दीश्वरमहाकालचण्डीशाद्यैर्गणेश्वरैः ॥४॥ पातालवासिभिर्दैत्यैःशेषाद्यैश्च महोरगैः ॥ सिद्धैर्यक्षैश्च गन्धर्वैरक्षोभूतपिशाचकैः ॥५॥ स्वं स्वं पदमनुप्राप्तुं सर्वैरयमनुष्ठितः ॥ अनेन विधिना सर्वे देवा देवत्वमागताः ॥६॥ ब्रह्मा ब्रह्मत्वमापन्नो विष्णुर्विष्णुत्वमागतः ॥ रुद्रो रुद्रत्वमापन्न इन्द्रश्चेन्द्रत्वमागतः ॥७॥ गणेशश्च गणेशत्वमनेन विधिना गतः ॥ सितचन्दनतोयेन लिंगं स्नाप्य शिवं शिवाम् ॥८॥ श्वेतैर्विकसितैः पद्मैः सम्पूज्य प्रणिपत्य च ॥ तत्र पद्मासनं रम्यं कृत्वा लक्षणसंयुतम् ॥९॥ विभवे सति हेमाद्यैरत्नाद्यैर्वा स्वशक्तितः ॥ मध्ये

---

उपमन्यु बोलला— (१) आतां यानंतर केवल आमुष्मिकविधि सांगतों. याच्या बरोबरीचें दुसरें कर्म त्रैलोक्यांत सांपडावयाचें नाहीं. (२) हें केल्यानें अतिशय पुण्य मिळतें, हें कर्म सर्व देवांनीं केलें आहे. विशेषेंकरून ब्रह्मदेवानें, विष्णूनें, रुद्रानें केलें आहे. (३) इंद्रादि लोकपाल, सूर्यादि नवग्रह, ब्रह्मवेत्ते वसिष्ठ विश्वामित्रादि ऋषि यांनींही केलें आहे. (४) श्वेत, अगस्त्य, दधीचादि ऋषि, शिवाश्रित ( शिवभक्त ) आह्मी, नंदीश्वर, महाकाल, चंडीश वगैरे गणेश्वर यांनींही हें कर्म केलें आहे. (५) पातालांत वास करणारे दैत्य, शेष वगैरे महामहा शेष, सिद्ध, यक्ष, गंधर्व, राक्षस, भूत, पिशाच यांनीं (६) आपआपल्या पदवीच्या प्राप्तीकरितां हें कर्म केलें. याच कर्मामुळें देवांना देवत्व मिळालें. (७) ब्रह्मदेवाला ब्रह्मत्व, विष्णूला विष्णुत्व, रुद्राला रुद्रत्व, इंद्राला इंद्रत्व, याच कर्मानें मिळालें. (८) गणपतीला गणपतित्व याच विधानानें मिळालें. शुभ्रचंदन पाण्यांत मिसळून लिंगांत वास करणाऱ्या शिवाला व पार्वतीला अभिषेक घालून, (९) फुललेल्या पांढऱ्या कमळांनीं पूजा करून नमस्कार करावा. तेथें सुलक्षण, सुंदर पद्मासन करून (१०) किंवा

केशरजालस्य स्थाप्य लिंगं कनीयसम् ॥१०॥ अङ्गुष्ठप्रतिमं रम्यं सर्वगन्धमयं शुभम् ॥ दक्षिणे स्थापयित्वा तु बिल्वपत्रैः समर्चयेत् ॥११॥ अगुरुं दक्षिणे पार्श्वे पश्चिमे तु मनःशिलाम् ॥ उत्तरे चन्दनं दद्याद्धरितालन्तु पूर्वतः ॥१२॥ सुगन्धैः कुसुमैरम्यैर्विचित्रैश्चापि पूजयेत् ॥ धूपं कृष्णागुरुं दद्यात्सघृतञ्च सगुग्गुलम् ॥१३॥ वासांसि यानि सूक्ष्माणि विकाशानि निवेदयेत् ॥ पायसं घृतसंमिश्रं घृतदीपांश्च दापयेत् ॥१४॥ सर्वं निवेद्य मन्त्रेण ततो गच्छेत्प्रदक्षिणम् ॥ प्रणम्य भक्त्या देवेशं स्तुत्वा वान्ते क्षमापयेत् ॥१५॥ सर्वोपहारसंमिश्रं तल्लिङ्गंच निवेदयेत् ॥ शिवाय शिवमन्त्रेण दक्षिणां मूर्तिमाश्रितः ॥१६॥ एवं योऽर्चयते नित्यं पंचगन्धमयं शुभम् ॥ सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥१७॥ एतद्व्रतोत्तमं गुह्यं शिवलिंगं म-

---

वैभव असेल तर सोन्यानें रत्नांनीं, आसन मढवून किंवा शक्त्यनुसार करून त्याच्या केसरांच्या मधोमध लहान लिंगाची स्थापना करावी, (११) तें लिंग आंगठ्या एवढें असून सुंदर असावें, आणि चोहोंकडून त्याला गंधलेपन केलेलें असावें. अशा लिंगाची स्थापना दक्षिणेस करून बिल्वपत्रांनीं त्याची पूजा करावी. (१२) लिंगाच्या दक्षिण बाजूला कृष्णागरु, व पश्चिम बाजूला मनशीळ, उत्तर बाजूला चंदन, पूर्व बाजूला हरिताल याप्रमाणें चोहोंबाजूंनीं त्या त्या पदार्थांचा लेप द्यावा. (१३) सुगंध सुंदर विचित्र फुलांनीं पूजा करावी, मग कृष्णागरु, तूप, गुग्गुल असे तीन पदार्थ मिसळून धूप द्यावा, (१४) सूक्ष्म रेशमी वस्त्रें जीं असतील, तीं देवाला अर्पण करावींत, घृतमिश्र पायस ( खीर ) नैवेद्याला ठेवून तुपाचे दिवे देवापुढें लावावेत. (१५) इतर राहिलेलें सवरलेलें मंत्रानें समर्पण करून नंतर प्रदक्षिणा घालाव्या, मग भक्तीनें देवाला नमस्कार करून स्तोत्र करून पूजेच्याअंतीं क्षमा मागावी. (१६) त्या लिंगाला सर्व उपहारांचा नैवेद्य दाखवावा, शिवमंत्रानें शिवाच्या दक्षिणामूर्तीची कल्पना करून (१७) नित्य पंचगंधांनीं जो शुभ पूजा करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (१८) हें व्रतांमध्यें उत्तम व्रत असून फार गुह्य आहे, असें तें शिवलिंग महाव्रत

हाव्रतम् ॥ भक्तस्य ते समाख्यातं न देयं यस्य कस्यचित् ॥ देयं-च शिवभक्तेभ्यः शिवेन कथितं पुरा ॥१८॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे पूजादिकथनं नाम षड्विंशोऽध्यायः ॥२६॥

---

भक्त अशा तुला सांगितलें, परंतु दुसऱ्या कोणाला देवूं नको. हें व्रत पूर्वी साक्षात् शिवानें सांगितलें आहे, अतएव शिवभक्त जे असतील त्यांना मात्र दे.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तर भागांतील पूजादिकथन नांवाचा सव्विसावा अध्याय संपला.

## अथ सप्तविंशोऽध्यायः

उपमन्युरुवाच ।। नित्यान्नैमित्तिकात्काम्याद्या सिद्धिरिह कीर्तिता ।। सा सर्वा लभ्यते सद्यो लिंगबेरप्रतिष्ठया ।।१।। सर्वो लिंगमयो लोकः सर्वं लिंगे प्रतिष्ठितम् ।। तस्मात्प्रतिष्ठिते लिंगे भवेत्सर्वं प्रतिष्ठितम् ।।२।। ब्रह्मणा विष्णुना वापि रुद्रेणान्येन केन वा ।। लिंगप्रतिष्ठामुत्सृज्य क्रियते स्वपदस्थितिः ।।३।। किमन्यदिह वक्तव्यं प्रतिष्ठां प्रति कारणम् ।। प्रतिष्ठितं शिवेनापि लिंगं वैश्वेश्वरं यतः ।।४।। तस्मात्सर्वप्रयत्नेन परत्रेह च शर्मणे ।। स्थापयेत्परमेशस्य लिंगं बेरमथापि वा ।।५।।

श्रीकृष्ण उवाच ।। किमिदं लिंगमाख्यातं कथं लिंगी महेश्वरः ।। कथश्च लिंगभावोऽस्य कस्मादस्मिञ्छिवोऽर्च्यते ।।६।।

उपमन्युरुवाच ।। अव्यक्तं लिंगमाख्यातं त्रिगुणप्रभवाप्ययम् ।।

---

उपमन्यु बोलला—(१) नित्य, नैमित्तिक, काम्य अशा या तीन कर्मांपासून जी फलसिध्दि मिळते, ती सर्व सिध्दि लिंगबेराची प्रतिष्ठा केली असतां तात्काळ मिळते. (२) हें सर्व जग लिंगमय असून तें लिंगामध्यें अंतर्भूत होऊन राहिलें आहे. याकरितां त्या लिंगाची प्रतिष्ठा केली असतां सर्व कांहीं प्रतिष्ठित केल्याचें श्रेय मिळतें. (३) ब्रह्मा, विष्णु, रुद्र, दुसरे कोणी देव या सर्वांनीं लिंगप्रतिष्ठा केली, ह्मणूनच यांची ती ती पदवी राहिली. (४) प्रतिष्ठेला दुसरें कारण काय सांगावयाचें आहे ? प्रत्यक्ष शिवानें देखील विश्वेश्वर लिंगाची प्रतिष्ठापना केली. (५) याकरितां हरतऱ्हेचे प्रयत्न करून लिंगाची स्थापना करावी, ह्मणजे आपलें नांव राहतें. साक्षात् श्रीशिवाच्या लिंगाची किंवा बेराची ( या नांवाच्या लिंगाची ) स्थापना करावी.

कृष्ण बोलतो—(६) लिंग ह्मणजे काय ? महेश्वर लिंगी कसा ? या शिवाच्या ठिकाणीं लिंगत्व ( लिंगाचा भाव ) आलें कसें ? आणि लिंगाच्या ठिकाणीं शिवाची पूजा कां करावी ? हे सर्व सांग ?

उपमन्यु बोलतो–(७) हे कृष्णा, लिंग हें त्रिगुणाच्या (सत्व, रज, तमाच्या)

अनाद्यन्तश्च विश्वस्य यदुपादानकारणम् ॥७॥ तदेव मूलप्रकृतिर्माया च गगनात्मिका ॥ तत एव समुत्पन्नं जगदेतच्चराचरम् ॥८॥ अशुध्दं चैव शुध्दं यच्छुध्दाशुध्दश्च तत्रिधा ॥ ततः शिवो महेशश्च रुद्रो विष्णुः पितामहः ॥९॥ भूतानि चेन्द्रियैर्जाता लीयन्तेऽत्र शिवाज्ञया ॥ अत एव शिवो लिंगी लिंगमाज्ञापयेद्यतः ॥१०॥ यतो न तदनाज्ञातं कार्याय प्रभवेत्स्वतः ॥ ततो जातस्य विश्वस्य तत्रैव विलयो यतः ॥११॥ अनेन लिंगता तस्य भवेन्नान्येन केनचित् ॥ लिंगश्च शिवयोर्देहस्ताभ्यां यस्मादधिष्ठितम् ॥१२॥ अतस्तत्र शिवः साम्बो नित्यमेव समर्च्यते ॥ लिंगवेदी महादेवी लिंगं साक्षान्महेश्वरः ॥१३॥ तयोः सम्पूजनादेव स च सा च समर्चितौ ॥ न तयो-

---

उत्पत्तीला आणि नाशाला कारण असून याला ( लिंगाला ) अव्यक्त असें म्हणतात, व त्या लिंगाला आदि व अंत नसून जगाच्या उत्पत्तीला उपादान कारण हें लिंगच आहे. (८) आणि त्या लिंगालाच मूलप्रकृति आकाशरूपिणी माया अशी संज्ञा आहे. त्या लिंगापासूनच जीवजडात्मक जग हें उत्पन्न झालें. (९) तेंच लिंग शुद्ध, अशुद्ध, शुद्धाशुद्ध याप्रमाणें तीन प्रकारचें होतें, नंतर त्यापासून शिव, महेश, रुद्र, विष्णु, पितामह हे उत्पन्न झाले. (१०) इंद्रियांसहित सर्व भूतें याच्यापासूनच उत्पन्न झालीं, व यांतच ( लिंगांतच ) शिवाच्या आज्ञेनें सर्व लीन होतात. ह्मणूनच शिव हा लिंगी ह्मणवितो. अर्थात् लिंगाला शिव आज्ञा करतो. (११) शिवाची आज्ञा जर झाली नसती, तर स्वतः लिंगाकडून सृष्टिरूप कार्य कधींही झालें नसतें, लिंगापासून उत्पन्न झालेलें जग लिंगामध्यें च लीन होतें. (१२) अशा कारणामुळें त्याला लिंगत्व आलें, याला दुसरें कांहींएक कारण नाहीं. लिंग ह्मणजे शिवपार्वतीचा देह होय. कारण त्यांच्यापासून लिंगाचें अधिष्ठान झालें आहे. (१३) याकरितां तेथें सांब ( पार्वतीसहित ) शिव हा नित्य पूजित होतो. लिंगाची जी वेदि असेल, ती पार्वती असून लिंग साक्षात् महेश्वर होय. (१४) लिंगाची व वेदीची पूजा केली असतां शिवपार्वतीच्या पूजेचें श्रेय येतें. वास्तविक विचार केला असतां शिवाला व पार्वतीला लिं-

लिंगदेहत्वं विद्यते परमार्थतः ॥१४॥ यतः स्वतो विशुद्धौ तौ देहस्तदुपचारतः ॥ तदेव परमा शक्तिः शिवस्य परमात्मनः ॥१५॥ शक्तिराज्ञा यदा ज्ञातं प्रसूते तच्चराचरम् ॥ न तस्य महिमा शक्यो वक्तुं वर्षशतैरपि ॥१६॥ येनादौ मोहितौ स्यातां ब्रह्मनारायणावपि ॥ पुरा त्रिभुवनस्यास्य प्रलये समुपस्थिते ॥१७॥ वारिशय्यागतो विष्णुः सुष्वापानाकुलः सुखम् ॥ यदृच्छया गतस्तत्र ब्रह्मा लोकपितामहः ॥१८॥ ददर्श पुण्डरीकाक्षं स्वपन्तं तमनाकुलम् ॥ मायया मोहितः शम्भोर्विष्णुमाह पितामहः ॥१९॥ कस्त्वं वदेत्यमर्षेण प्रहृत्योत्थाप्य माधवम् ॥ स तु हस्तप्रहारेण त्रिकेणाऽभिहतःक्षणात् ॥२०॥ प्रबुध्योत्थाय शयनाद्ददर्श परमेष्ठिनम् ॥ तमाह चान्तः संक्रुद्धः स्वयं न क्रुद्धवद्धरिः ॥२१॥ कुतस्त्वमागतो वत्स कस्मात्त्वं व्याकुलो वद ॥

---

गदेहत्व नाहींच. (१९) ज्याअर्थी तीं दोघे स्वतः शुद्ध जर आहेत, तर देह आहे, असें ह्मणणें केवळ औपचारिक आहे. परमात्मा शिवाची श्रेष्ठ शक्ति तें लिंग होय. (१३) शक्ति ह्मणजे आज्ञा, याच आज्ञेमुळें लिंग हे चराचर जगाला प्रसवतें. अशा लिंगाचें माहात्म्य सांगावयास शेंकडो वर्षे जरी झालीं, तरी पुरावयाचीं नाहींत. (१७) ज्यामुळेंच पूर्वी ब्रह्मा नारायण दोघे मोहित झाले होते. पूर्वी या त्रैलोक्याचा लय जेव्हां चालला होता, (१८) तेव्हां उदकाच्या शय्येवर सुखानें विष्णु झोंप घेत पडला होता, त्यावेळेस स्वेच्छेनें लोकपितामह ब्रह्मा हा तेथें आला. (१९) नंतर शांतपणें निजलेल्या त्या पुंडरीकाक्षाला ( विष्णूला ) त्यानें पाहिलें. मग शंभूच्या मायेनें मोहित झालेला ब्रह्मा विष्णूला बोलला. (२०) असूयेनें विष्णूच्या उरावर मारून त्याला उठविलें, आणिं तूं कोण आहेस ? सांग, असें त्यानें ह्मटलें. नंतर तो विष्णु ब्रह्मदेवाच्या हाताचा तीन वेळ मार खावून एका क्षणांत, (२१) खडबडून जागा झाला, आणि शय्येवरून उठून समोर असलेल्या ब्रह्मदेवाला त्यानें पाहिलें, मग विष्णूला मोठा संताप चढला, तथापि वर संताप न दाखवितां त्याला विष्णु बोलला. (२२) हे वत्सा, कां आलास ? आणि इतका व्याकुळ कां झालास ? सांग, याप्रमाणें अधिका-

इति विष्णुवचः श्रुत्वा प्रभुत्वगुणसूचकम् ॥२२॥ रजसाबद्धवैरस्तं ब्रह्मा पुनरभाषत ॥ वत्सेति मां कुतो ब्रूषे गुरुः शिष्यमिवात्मनः ॥२३॥ मां न जानासि किं नाथं प्रपञ्चो यस्य मे कृतिः ॥ त्रिधात्मानं विभज्येदं सृष्ट्वाथ परिपाल्यते ॥२४॥ संहारामि न मे कश्चित्स्रष्टा जगति विद्यते ॥ इत्युक्ते सति सोऽप्याह ब्रह्माणं विष्णुरव्ययः ॥२५॥ अहमेवादिकर्तास्य हर्ता च परिपालकः ॥ भवानपि ममैवांगादवतीर्णः पुराव्ययात् ॥२६॥ मन्नियोगात्त्वमात्मानं त्रिधा कृत्वा जगत्त्रयम् ॥ सृजस्यवसि चान्ते तत्पुनः प्रतिसृजस्यपि ॥२७॥ विस्मृतोऽसि जगन्नाथं नारायणमनामयम् ॥ तवापि जनकं साक्षान्मामेवमवमन्यसे ॥२८॥ तवापराधो नास्त्यत्र भ्रान्तोऽसि मम मा-

---

राचा झोंक दाखविणारें तें विष्णूचें वाक्य ऐकून (२३) रजोगुणामुळें मनांत मोठा वैर धरून ब्रह्मा विष्णूला पुनः बोलला. अरे, शिष्याला गुरूनें जसें ह्मणावें, तसें मला वत्सा, असें कां ह्मणालास ? (२४) मी जगाचा प्रभु आहे, हें तुला समजत नाहीं, अरे, माझी कृति प्रत्यक्ष हें जग आहे, हें तुला ठाऊक नाहीं ? या माझ्या आत्म्याचे तीन विभाग करून एका भागानें जगाची सृष्टि करतों, दुसऱ्या भागानें जगाचें पालन करतों, (२५) तिसऱ्या भागानें जगाचा संहार करतों. या जगांत माझी सृष्टि करणार कोणी नाहीं. असें त्याचें बोलणें ऐकून अव्यय विष्णु हा ब्रह्मदेवाला बोलला. (२६) अरे, तूं कोठला आला आहेस, जा. मी जगाचा आदिकर्ता असून संहारक, आणि पालक मी आहें, आणि तूं देखील पूर्वी माझ्या अव्यय ( नाश न होणाऱ्या ) शरीरापासून उत्पन्न झाला आहेस, (२७) माझ्या आज्ञेनें तूं आपल्या आत्म्याचे तीन विभाग करून जगत्त्रयाची पुनः सृष्टि करतोस, व संहार आणि पालन करतोस. (२८) अरे, अनामय, ( निरोगी ) जगाचा स्वामी असा जो नारायण, तो मीच असून तूं हें विसरलास कसा ? तुझा जो प्रत्यक्ष जनक ( बाप ), तो मी असून माझा असा अपमान करतोस ? (२९) यांत तुझा अपराध नाहीं, माझ्या मायेनें तूं मोहित झालास. आतां माझ्या प्रसादानें ही तुझी भ्रांति लौकरच जा-

यया ॥ मत्प्रसादादियं भ्रान्तिरप्येष्यति तवाचिरात् ॥२९॥ शृणु स त्वं चतुर्वक्त्र सर्वदेवेश्वरोह्यहम् ॥ कर्ता भर्ता च हर्ता च न मयास्ति समो विभुः ॥३०॥ एवमेव विवादोऽभूद्ब्रह्मविष्णवोः परस्परम् ॥ अभवच्च महायुध्दं भैरवं रोमहर्षणम् ॥३१॥ मुष्टिभिर्निघ्नतोस्तीव्रं रजसा बध्दवैरयोः ॥ तयोर्दर्पापहाराय प्रबोधाय च देवयोः ॥३२॥ मध्ये समाविरभवल्लिङ्गमैश्वरमद्भुतम् ॥ ज्वालामालासहस्राढ्यमप्रमेयमनौपमम् ॥३३॥ क्षयवृद्धिविनिर्मुक्तमादिमध्यान्तवर्जितम् ॥ तस्य ज्वालासहस्रेण ब्रह्मविष्णू विमोहितौ ॥३४॥ विसृज्य युध्दं किन्त्वेतदित्यचिन्तयतां तदा ॥ न तयोस्तस्य याथात्म्यं प्रबुध्दमभवद्यदा ॥३५॥ तदा समुद्यतौ स्यातां तस्याद्यन्तं परीक्षितुम् ॥ तत्र हंसाकृतिर्ब्रह्मा विश्वतः पक्षसंयुतः ॥३६॥ मनोऽनिलजवो भूत्वा गतस्तूर्ध्वं

---

ईल. (३०) हे चतुर्मुखा, तूं माझें ऐक. सर्वांमध्यें श्रेष्ठ मी असून सर्व देवांचा स्वामी मी आहे. सर्वांचा कर्ता, सर्वांचा हर्ता, सर्वांचा पालक मीच आहें, माझ्या बरोबरीचा दुसरा कोणी नाहीं. (३१) याप्रमाणें ब्रह्माविष्णूंचा परस्पर वाद झाला. याकरितांच त्या दोघांमध्यें मोठें युद्ध झालें, तें युद्ध ऐकिल्याबरोबर शरीरावर रोमांच उभे राहत असत. (३२) रजोगुणामुळें परस्पर मोठे वैरी होऊन परस्पर मुष्टिप्रहार करूं लागले, इतक्यांत त्यांचा गर्व नाश करण्याकरितां व त्यांना जागे करण्याकरितां त्यांच्या ( त्या दोघांच्या ) मध्यभागीं, (३३) ईश्वराचें अद्भुत लिंग एकदम प्रकट झालें. ज्याच्या भोंवतीं हजारो तऱ्हेच्या ज्वाळा भडकत होत्या, ज्याला प्रमाण नाहीं, ज्याला उपमा नाहीं, (३४) ज्याला क्षय व वृध्दि नाहीं, ( वाढ नाहीं, मरण नाहीं ) आदि, मध्य, अंत ज्याला नाहीं, असें तें लिंग उद्भवलें, नंतर त्याच्या हजारो ज्वाळा पाहून ब्रह्मा विष्णु हे दोघे घाबरले. ( मोहित झाले. ) (३५) मग युध्द सोडून हें काय आहे ? असा परस्परांमध्यें विचार करूं लागले. त्या दोघांना त्याचें खरें तत्व जेव्हां कळलें नाहीं, (३६) तेव्हां त्या लिंगाच्या आद्यंताची परीक्षा करूं लागले. इतक्यांत सभोंवतीं ज्याला पंख आहेत, असा हंसाकृतीचा ब्रह्मा तेथें (३७) उद्भवला. ज्याचा वेग मन आणि वायु यांच्यापेक्षां जास्त होता, अशा

प्रयत्नतः ॥ नारायणोऽपि विश्वात्मा नीलाञ्जनचयोपमम् ॥३७॥ वाराहममितं रूपमास्थाय गतवानधः ॥ एवं वर्षसहस्रन्तु त्वरन्विष्णुरधोगतः ॥३८॥ नापश्यदल्पमप्यस्य मूलं लिंगस्यशूकरः ॥ तावत्कालं ततश्चोर्द्ध्वं तस्यान्तं ज्ञातुमिच्छया ॥३९॥ श्रान्तोऽत्यन्तमदृष्ट्वान्तं पपाताधः पितामहः ॥ तथैव भगवान्विष्णुः श्रान्तः संविग्नलोचनः ॥४०॥ क्लेशेन महता तूर्णमधस्तादुत्थितोऽभवत् ॥ समागतावथान्योऽन्यं विस्मयंस्मेरवीक्षणौ ॥४१॥ मायया मोहितौ शम्भोः कृत्याकृत्यं न जग्मतुः ॥ पृष्ठतः पार्श्वतस्तस्य चाग्रतश्च स्थितावुभौ ॥४२॥ प्रणिपत्य किमात्मेदमित्यचिन्तयतां तदा ॥ अथाविरभवत्तत्र सनादं शब्दलक्षणम् ॥४३॥ ओमित्येकाक्षरं ब्रह्म ब्रह्मणः प्रति-

---

वेगानें तेथूनच प्रयत्नानें वर उडून गेला. इतक्यांत नील किंवा काजळ याचा पर्वतच कीं काय ? असा भासणारा जो हंस, त्याला विश्वात्मा नारायणानें पाहून (३८) आपण ( नारायणानें ) वराहाचें रूप घेतलें. मग वराहरूपी होऊन तो विष्णु खालीं ( पाताळांत ) गेला. याप्रमाणें हजार वर्षेपर्यंत विष्णु खालीं राहिला. (३९) इतके दिवस जरी झाले, तरी त्या लिंगाचें मूळ कोठें आहे ? हें कांहीं त्या वराहाला पत्ता लागला नाहीं. त्याप्रमाणें तितकाच काळ वरतीं शोधण्यामध्यें ब्रह्मदेवानें घालविला, तरी त्याला त्याचा अंत लागला नाहीं. (४०) मग अति श्रांत होऊन त्याचा अंत न लागून तो ब्रह्मा खालीं पडला. तसेंच भगवान् विष्णु अतिशय श्रांत झाला, व त्याचे डोळे अंधुक ( संविग्न ) झाले. (४१) नंतर मोठ्या प्रयासानें लौकर तेथून उठला, मग ब्रह्मा विष्णु हे दोघे एकाठिकाणीं जुळले पण परस्पर आश्चर्यानें एकमेकांकडे हळू हळू पाहावयास लागले. (४२) तेव्हां श्रीशंभूच्या मायेनें मोहित होऊन काय करावें ? काय न करावें ? हें न समजून बुचकळ्यांत पडले. नंतर त्या लिंगाच्या पाठीमागें, बाजूला, पुढें पाहात पाहत ते दोघे उभे राहिले. (४३) नंतर त्याला नमस्कार करून हें काय आहे ? असा विचार करूं लागले. मग त्या लिंगांतून नादसहित (अवाजासह) कांहीं शब्द निघाले. (४४) ब्रह्मस्वरूपाला प्रतिपादन करणारें ' ॐकार ' एकाक्षर ब्रह्म

पादकम् ॥ तदप्यविदितं तावद्ब्रह्मणा विष्णुना तथा ॥४४॥ रजसा तमसा चित्तं तयोर्यस्मात्तिरस्कृतम् ॥ तदा विभक्तमभवच्चतुर्द्धैकं तदक्षरम् ॥४५॥ अ उ मेति त्रिमात्राभिः परस्ताच्चार्ध्दमात्रया ॥ तत्राकारः श्रितो भागे तदा लिंगस्य दक्षिणे ॥४६॥ उकारश्चोत्तरे तद्वन्मकारस्तस्य मध्यतः ॥ अर्ध्दमात्रात्मको नादः श्रूयते लिंगमूर्ध्दनि ॥४७॥ विभक्तेऽपि तथा तस्मिन्प्रणवे परमाक्षरे ॥ विभागार्थश्च तौ देवौ न किञ्चिदवजग्मतुः ॥४८॥ वेदात्मना तदाव्यक्तः प्रणवो विकृतिं गतः ॥ तत्राकारो ऋगभवदुकारो यजुरव्ययः ॥४९॥ मकारः सामसञ्ज्ञातो नादस्त्वाथर्वणी श्रुतिः ॥ ऋगुपस्थापयामास समासात्वर्थमात्मनः ॥५०॥ रजोगुणेषु ब्रह्माणं मूर्तिष्वाद्यं क्रियास्वपि ॥ सृष्टिं लोकेषु पृथिवीं तत्वेष्वात्मानमव्ययम् ॥५१॥ कलाध्वनि निवृ-

---

आहे, असा ध्वनि निघाला, तरी त्या ब्रह्मदेवाला व विष्णूला तें समजलें नाहीं. (४५) ज्याअर्थी रजानें तमानें त्यांचें मन दूषित झालें होतें, तेव्हां त्यांना हें समजावें कसें ? त्यावेळेस तें एक अक्षर (ॐ) चार प्रकारें निरनिराळें झालें (४६) ते भाग असे कीं, 'अ उ म' हे तीन भाग होत, आणि त्यापुढें अर्धी मात्रा राहिली. त्यामध्यें अकार हा लिंगाच्या उजव्या बाजूला आश्रय करून राहिला. (४७) उकार डाव्या बाजूला राहिला, मकार मध्यभागीं राहिला, आणि अर्धमात्रात्मक नाद हा लिंगाच्या मध्यें ऐकूं येऊं लागला. (४८) अक्षरांमध्यें श्रेष्ठ अक्षर प्रणव हा (ॐ) चार प्रकारानें विभक्त जरी झाला, तरी त्या विभागाचा अर्थ काय आहे ? हें कांहीं त्या दोघां देवांना समजलें नाहीं. (४९) नंतर तेंच ॐ काराक्षर वेदाच्या रूपानें व्यक्त होऊन विकाराला पावलें. त्यांत अकार ऋग्वेदाच्या रूपानें बाहेर आला, उकार अव्यय असा यजुर्वेद होऊन बाहेर आला, (५०) आणि मकार सामाच्या रूपानें बाहेर आला, व नाद हा अथर्वणाच्या रूपानें प्रकट झाला. त्यांत ऋग्वेदानें संक्षेपपूर्वक अर्थसहित आत्म्याची स्तुति करावयास आरंभ केला. (५१) रजोगुणात्मक जितक्या मूर्ति आहेत, त्यांमध्यें ब्रह्मा हा मुख्य आहे, व क्रियेमध्यें राजस क्रियारूप सृष्टीचें, सर्व लोकांमध्यें भूलोकाचें, तत्वांमध्यें अव्यय आत्मतत्वाचें वर्णन केलें. (५२) कलाध्वाच्या ठिकाणीं निवृत्तिकलेचें

त्तिश्च सद्यं ब्रह्मसु पंचसु ॥ लिंगभागेष्वधोभागं बीजाख्यं कारणत्रये ॥५२॥ चतुःषष्टिगुणैश्वर्यं बौध्दं यदणिमादिषु ॥ तदित्थमर्थैर्दशभिर्व्याप्तं विश्वमृचा जगत् ॥५३॥ अथोपस्थापयामास स्वार्थं दशविधं यजुः ॥ सत्वं गुणेषु विष्णुंच मूर्तिष्वाद्यं क्रियास्वपि ॥५४॥ स्थितिं लोकेष्वन्तरिक्षं विद्यां तत्वेषु च त्रिषु ॥ कलाध्वसु प्रतिष्ठां च वामं ब्रह्मसु पंचसु ॥५५॥ मध्यन्तु लिंगभागेषु योनिंच त्रिषु हेतुषु ॥ प्राकृतंच तथैश्वर्यं तस्माद्विश्वं यजुर्मयम् ॥५६॥ ततोपस्थापयामास सामार्थं दशधात्मनः ॥ तमोगुणेष्वथो रुद्रं मूर्तिमाद्यं क्रियासु च ॥५७॥ संहृतिं त्रिषु लोकेषु तत्वेषु शिवमुत्तमम् ॥ विद्याकलास्वघोरं च ब्रह्म ब्रह्मसु पंचसु ॥५८॥ लिंगभागेषु पीठोर्ध्वं बीजिनं कारणत्रये ॥ पौरुषं च तथैश्वर्यमित्थं साम्ना ततं जगत् ॥५९॥ अथा-

---

व पंचब्रह्मांमध्यें सद्योजात ब्रह्मस्वरूपाचें वर्णन केलें, व लिंगाच्या भागांमध्यें खालीं असणाऱ्या भागाचें व तीन कारणांमध्यें बीजकारणाचें वर्णन केलें. (९३) अणिमादि ऐश्वर्यांमध्यें चौसष्ट गुणांनीं युक्त बुद्धिस्थ ऐश्वर्याचें ( गुणाचें ) वर्णन केलें. याप्रमाणें दहा अर्थांनीं हें जग व्यापिलें गेलें आहे, असें वर्णन ऋग्वेदानें केलें. (९४) नंतर यजुर्वेदानें दशविध स्वार्थाचें ( दहा प्रकारच्या आपल्या अर्थाचें ) वर्णन केलें. गुणांमध्यें सत्वगुणाचें, मूर्तीमध्यें विष्णूचें, व क्रियेमध्यें पालनरूप सात्विक क्रियेचें वर्णन केलें. (९५) लोकांमध्यें अंतरिक्ष लोकाचें, तीन तत्वांमध्यें विद्यातत्वाचें, कलाध्वांमध्यें प्रतिष्ठा कलेचें, पंचब्रह्मांमध्यें वामदेवाचें वर्णन केलें. (९६) लिंगाच्या भागांमध्यें मध्यभागाचें, तीन हेतूंमध्यें योनीचें व प्राकृत ऐश्वर्याचें वर्णन केलें, अर्थात जग हें यजुमय आहे, असें त्या वेदांत सांगितलें आहे. (९७) नंतर सामवेदानें आपले दहा अर्थ सांगितले आहेत, ते असे. तमोगुण गुणांमध्यें, मूर्तीमध्यें आद्य रुद्र, क्रियेमध्यें तामसी क्रिया, (९८) ( ती संहाररूपी क्रिया होय. ) त्रैलोक्यांतल्या तत्वांमध्यें उत्तम शिवतत्वाचें, कलांमध्यें विद्याकलेचें, पंचब्रह्मांमध्यें अघोर ब्रह्मस्वरूपाचें वर्णन केलें. (९९) लिंगाच्या भागांमध्यें ऊर्ध्वपीठाचें, कारणत्रयांत बीजीचें, ऐश्वर्यांत पौरुष ऐश्वर्याचें वर्णन केलें. अशा दहा अर्थांनीं हें जग व्यापिलें आहे, असें सामवेदानें सांगितलें. (६०) नं-

थर्वाहनैर्गुण्यमर्थं प्रथममात्मनः ॥ ततो महेश्वरं साक्षान्मूर्तिष्वपि सदाशिवम् ॥६०॥ क्रियासु निष्क्रियस्यापि शिवस्य परमात्मनः॥ भूतानुग्रहणंचैव मुच्यन्ते येन जन्तवः ॥६१॥ लोकेष्वपि यतो वाचो निवृत्ता मनसा सह ॥ तदूर्द्ध्वमुन्मना लोकात्सोमलोकमलौकिकम् ॥६२॥ सोमः सहोमया यत्र नित्यं निवसतीश्वरः ॥ तदूर्द्ध्वं मुन्मना लोकाद्यं प्राप्तो न निवर्तते ॥६३॥ शान्तिच शान्त्यतीतां च व्यापिकां वै कलास्वपि ॥ तत्पुरुषं तथेशानं ब्रह्म ब्रह्मसु पंचसु ॥६४॥ मूर्द्धानमपि लिंगस्य नादभागेष्वनुत्तमम् ॥ यत्रावाह्य समाराध्यः केवलो निष्कलः शिवः ॥६५॥ तत्वेष्वपि तदा बिन्दोर्नादाच्छक्तेस्ततःपरात् ॥ तत्वादपि परं तत्वमतत्वं परमार्थतः ॥६६॥ करणेषु त्रयातीतान्मायाविक्षोभकारणात् ॥ अनन्ताच्छुद्धविद्यायाः परस्ताच्च

---

तर अथर्वण वेदानें प्रथम आपल्या नैर्गुण्याचें वर्णन केलें ( ईश्वर निर्गुण आहे, असें सांगितलें. ) नंतर महेश्वराचें वर्णन केलें, मूर्तींमध्यें सदाशिव मूर्तीचें वर्णन केलें. (६१) क्रियेमध्यें परमात्मा क्रियारहित शिवाच्या भूतानुग्रहरूप क्रियेचें वर्णन केलें. ज्या अनुग्रहानें प्राणी मुक्त होतात, ती क्रिया होय. (६२) लोकांमध्यें शिवापर्यंत वाणी जाऊन मनासह परत फिरते, ( वाणीनें मनानें शिवाचें वर्णन करणें कठिण आहे, असें तात्पर्य ) त्याच्यापुढें उन्मनाचें वर्णन केलें, लोकांमध्यें अलौकिक सोमलोकाचें वर्णन केलें. (६३) पार्वतीसहित सोम नांवाचा ईश्वर जेथें नित्य वास करीत आहे. त्यापुढें उन्मना लोकाला जो जातो, तो पुनः परत फिरत नाहीं. (६४) कलांमध्यें व्याप्त अशा शांतिकलेचें व शांत्यतीत कलेचें, पंचब्रह्मांमध्यें तत्पुरुषाचें व ईशानाचें वर्णन केलें. (६५) लिंगाच्या नाद भागांमध्यें असणाऱ्या श्रेष्ठ शिरोभागाचें वर्णन केलें. ज्या ठिकाणीं केवल निष्कल शिवाचें आवाहन करून पूजा करतात, तोच शिरोभाग होय. (६६) नादापासून शक्तीपासून बिंदूपासून पुढें असलेल्या तत्वापलीकडे परतत्व आहे. असें वर्णन केलें. तथापि वास्तविक विचार केला असतां तें परतत्व देखील अतत्वच होय. (६७) कारणांमध्यें, कारणत्रयांपलीकडे असून मायेच्या विक्षोभाला कारण जो आहे, व

महेश्वरात् ॥६७॥ सर्वविद्येश्वराधीशान्न पराच्च सदाशिवात् ॥ सर्वमन्त्रतनोर्देवाच्छक्तित्रयसमन्वितात् ॥६८॥ पञ्चवक्त्राद्दशभुजात्साक्षात्सकलनिष्कलात् ॥ तस्मादपि पराद्बिन्दोरर्द्धेन्दोश्च ततःपरात् ॥६९॥ ततः परान्निशाधीशान्नादाख्याच्च ततःपरात् ॥ ततःपरात्सुषुम्नेशाद्ब्रह्मरन्ध्रेश्वरादपि ॥७०॥ ततःपरस्याःशक्तेश्च परस्ताच्छिवतत्वतः ॥ परमं कारणं साक्षात्स्वयं निष्कारणं शिवम् ॥७१॥ कारणानाञ्च धातारं ध्यातारं ध्येयमव्ययम् ॥ परमाकाशमध्यस्थं परमात्मोपरि स्थितम् ॥७२॥ सर्वैश्वर्येण सम्पन्नं सर्वेश्वरमनीश्वरम् ॥ ऐश्वर्याच्चापि मायेयादशुद्धान्मानुषादिकात् ॥७३॥ अपराच्च परात्त्याज्यादविशुध्दाध्वगोचरात् ॥ तत्पराच्छुध्दविद्याद्यादुन्मनान्तात्परात्परात् ॥७४॥ परमं परमैश्वर्यमुन्मनाद्यमनादि च ॥ अपारमपराधी-

---

ज्याचा अंत केव्हांही लागत नसून शुद्धविद्येच्या पुढें जो महेश्वर आहे, (६८) त्या महेश्वरापुढें सर्व विद्यांचा स्वामी जो श्रेष्ठ सदाशिव आहे, त्या सदाशिवापुढें सर्व मंत्रमय ज्याचें शरीर आहे, असा तो देव राहत असून तो तीन शक्तींनीं युक्त आहे, (६९) त्याला पांच मुखें असून दहा हात आहेत, आणि जो सकल ( कलांसहित ) असून निष्कल ( कलारहित ) आहे, अशा देवापासूनही पुढें बिंदु आहे, त्यापुढें अर्द्धेंदु (अर्धचंद्र) आहे, त्यापुढें. (७०) रात्रीचा स्वामी नाद नांवाचा देव तो आहे, त्याच्यापुढें सुषुम्नानाडीचा स्वामी राहत आहे, त्यापुढें ब्रह्मरंध्राचा स्वामी राहत आहे. (७१) त्यापुढें शक्ति राहते, शक्तीपुढें परतत्व आहे, शिवतत्वापुढें परमकारण स्वयंनिष्कारण शिव आहे. असा तो शिव, (७२) सर्व कारणांचा पोषक असून अव्यय ध्येय वस्तूचें ध्यान करणारा आहे, आणि श्रेष्ठ असून आकाशाच्या मध्यभागीं राहत आहे, व परमात्म्याच्या ऊर्ध्वभागावर राहत आहे, (७३) आणि सर्व ऐश्वर्यानें संपन्न असून तो सर्वांचा ईश्वर आहे, व त्याचा स्वामी कोणी नाहीं, असा तो शिव आहे, आणि मायासंबंधीं अशुद्ध मानवादिकांच्या ऐश्वर्यापलीकडे ज्याचें ऐश्वर्य आहे, (७४) असें तें मानवादिकांचें ऐश्वर्य त्याज्य असून अविशुद्ध अध्वाला गोचर (दिसणारें) आहे, अशा त्या ऐश्वर्यापलीकडे शुद्ध विद्यादिपासून उन्मनापर्यंत असलेल्या परात्परापासून पुढें (७५) श्रेष्ठ उन्मना

नं निःसाम्यातिशयं स्थिरम् ॥७५॥ इत्थमर्थैर्दशविधैरियमाथर्वणी श्रुतिः ॥ यस्माद्गरीयसी तस्माद्विश्वं व्याप्तमथर्वणा ॥७६॥ ऋग्वेदः पुनराहेदं जाग्रद्रूपं मयोच्यते॥ येनाहमात्मतत्वस्य नित्यमस्म्यभिधायकः ॥७७॥ यजुर्वेदोऽवदत्तद्वत्स्वप्नावस्था मयोच्यते ॥ भोग्यात्मना परिणता विद्या वेद्या यतो मयि ॥७८॥ साम चाह सुषुप्त्याख्यमेवं सर्वं मयोच्यते ॥ ममार्थेन शिवेनेदं तामसेनाभिधीयते ॥७९॥ अथर्वाह तुरीयाख्यं तुरीयातीतमेव च ॥ मयाभिधीयते तस्मादध्वातीतपदोऽस्म्यहम् ॥८०॥ अध्वात्मकन्तु त्रिमलं शिवविद्यात्मसंज्ञितम् ॥ तत्त्रैगुण्यं त्रयी साध्यं संशोध्यं च पदैषिणाम् ॥८१॥ अध्वातीतं तुरीयाख्यं निर्वाणं परमं पदम् ॥ तदतीतं च नैर्गुण्यादध्वनोऽस्य वि-

---

वगैरे अनादि ऐश्वर्य आहे, तें ऐश्वर्य अपार असून स्वतंत्र आहे, आणि त्या ऐश्वर्याला दुसरें साम्य नसून स्थिर आहे. (७६) याप्रमाणें दहा प्रकारच्या अर्थांनीं अथर्वणी श्रुतीनें श्रीशिवाचें वर्णन केलें. ज्याअर्थी ही अथर्वणी श्रुति श्रेष्ठ आहे, त्याअर्थी अथर्वण श्रुतीनें हें जग व्याप्त झालें आहे. (७७) पुनः ऋग्वेदानें ह्मटलें कीं, मी आतां जाग्रद्रूप सांगतों. ( जागें असलेलें रूप सांगतों. ) ज्याअर्थी मी आत्मतत्वाचा निरंतर अभिधायक आहे, तेव्हां तें रूप सांगितलें पाहिजे. (ऋग्वेद निरंतर आत्मतत्वाचें प्रतिपादन करीत आहे, असें हें तात्पर्य आहे.) (७८) यजुर्वेद ह्मणतो, कीं त्याप्रमाणें मी स्वप्नावस्था सांगतों. सांगावयास कारण असें आहे, कीं वेद्य ( जाणावयास योग्य ) अशी विद्या भोग्य स्वरूपानें माझ्या ठिकाणीं परिणामाला पावलेली आहे. (७९) सामवेद ह्मणतो, कीं याप्रमाणें सुषुप्तीची अवस्था सर्व मी सांगतों. माझा जो अर्थ शिव आहे, त्यानें तामसरूप घेऊन असेंच सांगितलें आहे. (८०) अथर्वण वेद ह्मणतो, कीं तुरीयापलीकडे (चौथ्या वस्तूच्या पलीकडे) तुरीय नांवाच्या वस्तूला सांगतों. त्या अध्वांपलीकडे जें स्थान आहे, तें मी आहे. (८१) जें अध्वस्वरूपी असून तीन मलांनीं युक्त आहे, व जें "शिवविद्या" या नांवानें प्रसिद्ध असून त्रिगुणस्वरूप आहे; व जें त्रयीला साध्य असून पदाभिलाषी प्राण्यांना शोधन करावयास योग्य आहे. (८२) दुसरें असें कीं, जें अध्वापलीकडे असून ज्याला तुरीय ह्मणतात, आणि त्यालाच

शोधकम् ॥८२॥ द्वयोः प्रमापको नादो नादान्तश्च मदात्मकः ॥ तस्मान्ममार्थः स्वातन्त्र्यात्प्रधानः परमेश्वरः ॥८३॥ यदस्ति वस्तु तत्सर्वं गुणप्राधान्ययोगतः ॥ समस्तं व्यस्तमपि च प्रणवार्थं प्रचक्षते ॥८४॥ सर्वार्थवाचकं तस्मादेकं ब्रह्मैतदक्षरम् ॥ तेनोमिति जगत्कृत्स्नं कुरुते प्रथमं शिवः ॥८५॥ शिवो वा प्रणवो ह्येष प्रणवो वा शिवः स्मृतः ॥ वाच्यवाचकयोर्भेदो नात्यन्ते विद्यते यतः ॥८६॥ चिन्तया रहितो रुद्रो वाचोऽयं मनसा सह ॥ अप्राप्य च निवर्त्तते वाच्यस्त्वेकाक्षरेण सः ॥८७॥ एकाक्षरादकाराख्यादात्मा ब्रह्माभिधीयते ॥ एकाक्षरादुकाराख्याद्विद्या विष्णुरुदीर्यते ॥८८॥ एकाक्षरा-

---

श्रेष्ठ निर्वाण (मोक्ष) पद ह्मणतात, त्याच्यापलीकडे जें स्थान आहे, तें निर्गुण अध्वाला शोधन करणारें आहे. (८३) या दोनी पदांचा प्रमापक (माप करणारा) नाद आहे, असा नादांत ( नाद शेवटीं ज्याला आहे असा ) जो अर्थ असेल, तो मदात्मक आहे. (तो अर्थ मीच सांगणारा आहे, असें यांतलें तात्पर्य ) याकरितां स्वतंत्रपणानें माझा अर्थ ह्मणजे मुख्य परमेश्वर होय. (८४) गौणपणानें किंवा मुख्यतेनें जी कांहीं एकूणएक ( सर्व ) वस्तु असेल, ती वस्तु समस्तपणानें (सरळपणानें) असो, किंव व्यस्तपणानें (विरुध्दपणानें) असो, प्रणवाच्या अर्थाला सांगत असते. (८५) हें जें एक अक्षर " ॐ " आहे, तें सर्व अर्थाला सांगणारें असून ब्रह्मस्वरूप आहे. अर्थात् शिव हा " ॐ " या एकाक्षरानें प्रथम सर्व जगाची सृष्टि करतो. (८६) शिव असो, प्रणव असो, तर ' शिव ' या अर्थाचा वाचक प्रणव असून प्रणवाचा अर्थ शिव आहे. ज्याअर्थीं वाच्यवाचकांमध्यें भेद लोकांत कांहीं दिसत नाहीं, तेव्हां प्रणव शिवामध्यें अर्थात् भेद नाहीं, असें सिध्द झालें. (८७) चिंतेनें रहित जो रुद्र आहे, तो हाच होय. ( ज्याचा विचार करितां येत नाहीं तो हाच. ) अर्थात् ज्याच्यापर्यंत मनासह वाणी ( वेद ) जाऊन परत फिरते. तेव्हां एकाक्षराचा (ॐकाराचा) अर्थ शिव हाच होय. (८८) एक अक्षराच्या रूपानें असलेल्या अकाराचा अर्थ ब्रह्मा आहे, व एक अक्षराच्या रूपानें असलेल्या उकार विद्येचा अर्थ विष्णु होतो. (८९) एकाक्षर मकार नांवाच्या विद्येचा अर्थ रुद्र आहे. महेशाच्या उजव्या अवय-

न्मकाराख्याच्छिवो रुद्र उदाहृतः ॥ दक्षिणांगान्महेशस्य जातो ब्रह्मात्मसंज्ञकः ॥८९॥ वामांगादभवद्विष्णुस्ततो विद्येति संज्ञितः ॥ हृदयान्नीलरुद्रोऽभूच्छिवस्य शिवसंज्ञितः ॥९०॥ सृष्टेः प्रवर्त्तको ब्रह्मा स्थितेर्विष्णुर्विमोहकः ॥ संहारस्य तथा रुद्रस्तयोर्नित्यं नियामकः ॥९१॥ तस्मात्त्रयस्ते कथ्यन्ते जगतः कारणत्रयम् ॥ कारणत्रयहेतुश्च शिवः परमकारणम् ॥९२॥ अर्थमेतमविज्ञाय रजसा बद्धवैरयोः ॥ युवयोः प्रतिबोधाय मध्ये लिंगमुपस्थितम् ॥९३॥ एवमोमिति मां प्राहुर्यदिहोक्तमथर्वणा ॥ ऋचो यजूंषि सामानि शाखाश्चान्याः सहस्रशः ॥९४॥ वेदेष्वेवं स्वयं वक्त्रैर्व्यक्तमित्थं वदत्स्वपि ॥ स्वप्नानुभूतमिव तत्ताभ्यां नाध्यवसीयते ॥९५॥ तयोस्तत्र प्रबोधाय तमोऽपनयनाय च ॥ लिंगेऽपि मुद्रितं सर्वं यथा वेदैरुदाहृतम् ॥९६॥

---

वापासून ब्रह्मा उत्पन्न झाला. (९०) महेशाच्या डाव्या अवयवापासून विष्णु उत्पन्न होऊन विद्या या नांवानें प्रसिध्द झाला. शिवाच्या हृदयापासून नीलरुद्र उत्पन्न होऊन ‘ शिव ’ या नांवानें प्रसिद्ध झाला. (९१) ब्रह्मा सृष्टी करण्याच्या कामावर नेमला गेला असून विष्णूची नेमणूक पालनाच्या कामावर झाली आहे. व तो जगाला मोहून टाकतो. रुद्र हा संहार करीत असून त्या दोघांवर नियामक ( नियमन करणारा ) झाला आहे. (९२) अर्थात् जगाला हे तिघे तीन कारण झाले आहेत. अशा कारणत्रयाला हेतु (कारण) परमकारण शिव हाच होय. (९३) रजोगुणाच्या प्राचुर्यामुळें परस्परांमध्यें वैर विनाकारण वाढवून हा अर्थ न जाणून कलह करूं लागला, त्याकरितां तुह्मां दोघांमध्यें ( ब्रह्मविष्णूमध्यें ) हें लिंग तुह्माला उपदेश करावयास प्रादुर्भूत झालें. (९४) अशा अर्थानें अथर्वण वेदानें ॐ असें ह्मटलें. अर्थात् ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे व यांच्या हजारो शाखा आहेत. असें समजावें. (९५) याप्रमाणें वेदांनीं आपल्या तोंडांनीं स्पष्ट सांगितलें, तरी त्या ब्रह्मदेवाला व विष्णूला तें सर्व स्वप्नामध्यें अनुभव घेतल्याप्रमाणें झालें. अर्थात् त्यांच्या मनांत कोणताही अर्थ निश्चित झाला नाहीं. (९६) तेव्हां त्यांच्या अज्ञानाच्या शांतीकरितां व त्यांना ज्ञान होण्याकरितां वेदांनीं जसें सांगितलें. त्याप्रमाणेंच लिंगाच्या ठिकाणीं तो सर्व अर्थ उमटला आहे.

तद्दृष्ट्वा मुद्रितं लिंगे प्रसादाल्लिंगिनस्तदा ॥ प्रशान्ततमसौ देवौ प्रबुद्धौ सम्बभूवतुः ॥९७॥ ततो लिङ्गस्य लिंगत्वं लिंगिनोऽपि च लिंगिताम् ॥ लिंगे विश्वस्य जगतो विशेषात्स्वात्मनोरपि ॥९८॥ उत्पत्तिं विलयश्चैव याथात्म्यश्च षडध्वनाम् ॥ ततः परतरं धाम धामवन्तं च पूरुषम् ॥९९॥ निरुत्तरतरं ब्रह्म निष्कलं शिवमीश्वरम् ॥ पशुपाशमयस्यास्य प्रपञ्चस्य सदापतिम् ॥१००॥ अकुतोभयमत्यन्तमवृद्धिक्षयमव्ययम् ॥ बाह्यमाभ्यन्तरं व्याप्तं बाह्याभ्यन्तरवर्जितम् ॥१०१॥ निरस्तातिशयं शश्वद्विश्वलोकविलक्षणम् ॥ अलक्षणमनिर्देश्यमवाङ्मनसगोचरम् ॥१०२॥ प्रकाशैकरसं शान्तं प्रसन्नं सततोदितम् ॥ सर्वकल्याणनिलयं शक्त्या तादृशयान्वितम् ॥१०३॥ ज्ञात्वा देवं विरूपाक्षं ब्रह्मनारायणौ तदा ॥ रचयित्वाञ्जलिं मूर्ध्नि भीतौ तौ वाचमूचतुः ॥१०४॥

---

(९७) लिंगावर उमटलेलें तें तत्व पाहून लिंगीच्या प्रसादानें (शिवाच्या अनुग्रहानें) त्या दोघांचें अज्ञान जाऊन दोघेही जागे झाले. ( ज्ञानी झाले ). (९८) नंतर लिंगाच्या ठिकाणीं लिंगत्व, लिंगीच्या ठिकाणीं लिंगित्व, व लिंगाच्या ठिकाणीं सर्व जगाची व विशेषेंकरून आपणा दोघांची स्थिति, (९९) आणि जगाची उत्पत्ति, लय षडध्वांचें याथात्म्य, ( यथास्थितपणा ) त्यानंतर अत्यंत श्रेष्ठस्थान, स्थानविशिष्ट पुरुष,(१००)निरुत्तरतर(उत्तरच ज्याला नाहीं असें)ब्रह्म, निष्कल(कलारहित)ईश्वर असा शिव, पशुपाशमय जगाचा स्वामी, (१०१) ज्याला कोणापासूनही भय नाहीं असा, ज्याला कधींही वाढक्षय नाहींत, असा, जो अव्यय असून आंत बाहेर व्याप्त होऊन राहिला आहे, ज्याला बाह्यांतरभाव नाहीं, (१०२) ज्याच्यापुढें अतिशय वस्तु नाहीं, जो जगापेक्षां विलक्षण आहे, ज्याला मुळीं लक्षणें नाहींत, ज्याचें रूप नाम तोंडानें सांगतां येत नाहीं, जो वाणीला मनाला अगोचर आहे, (१०३) प्रकाशाचा जो मुख्य रस आहे, जो शांत असून प्रसन्न आहे, व जो सतत उत्कृष्ट आहे, सर्व कल्याणाचें घर जो आहे, तशा शक्तीनें जो युक्त आहे, (१०४) अशा विरूपाक्ष देवाला समजून ते दोघे ब्रह्म नारायण हात जोडते झाले. ( देवाला दोघांनीं नमस्कार केले. ) भीतीनें ते दोघे बोलले.

ब्रह्मोवाच ॥ अज्ञो वाहमभिज्ञो वा त्वयादौ देव निर्मितः ॥ ईदृशीं भ्रान्तिमापन्न इति कोऽत्रापराध्यति ॥१०५॥ आस्तां ममेदमज्ञानं त्वयि सन्निहिते प्रभो ॥ निर्भयः कोऽभिभाषेत कृत्यं स्वस्य परस्य वा ॥१०६॥ आवयोर्देवदेवेश विवादोऽपि हि शोभनः ॥ पादप्रणामफलदो नाथस्य भवतो यतः ॥१०७॥

विष्णुरुवाच ॥ स्तोतुं देव न वागस्ति महिम्नः सदृशी तव ॥ प्रभोरग्रे विधेयानां तूष्णीम्भावो व्यतिक्रमः ॥१०८॥ किमत्र संघटेत्कृत्यमित्येवावसरोचितम् ॥ अजानन्नपि यत्किंचित्प्रलप्य त्वां नतोऽस्म्यहम् ॥१०९॥ कारणत्वं त्वया दत्तं विस्मृतं तव मायया ॥ मोहितोऽहंकृतश्चाहं पुनरेवास्मि शासितः ॥११०॥ विज्ञापितैः किं बहुभिर्भीतोऽस्मि भृशमीश्वर ॥ यतोऽहमपरिच्छेद्यं त्वां परिच्छेत्तुमु-

---

ब्रह्मा बोलला--(१०५) हे देवा, मी अज्ञानी असो, किंवा ज्ञानी असो, देवापासून ( शिवापासून ) उत्पन्न झालों, परंतु अशी भ्रांति मला उत्पन्न झाली, तर यांत अपराध कोणाचा आहे, बरें ? (१०६) हे प्रभो हें माझें अज्ञान असो, तूं माझ्याजवळ असतां कोण निर्भीत होऊन आपलें किंवा परक्याचें कृत्य सांगूं शकेल बरें ? (१०७) हे देवाधिदेवा, आह्मां दोघांचा हा विवाद चांगलाच ह्मणून समजावयाचा. कारण या नादामुळेंच प्रभु अशा तुझ्या पायांचें दर्शन मिळालें. (तुला नमस्कार करावयास सांपडलें.)

विष्णु बोलला--(१०८) हे देवा, तुझ्या महिमेची स्तुति करण्यासारखी माझी वाणी नाहीं, आतां प्रभूपुढें विधेयांनीं ( नोकरांनीं ) उगीच रहावें, ह्मणजे तोही मोठा अपराध होतो. (१०९) अशा ठिकाणीं काय आमच्या हातून इतिकृत्य घडून येणार आहे ? तरी समयाला योग्य जें पाहिजे तें जरी मला समजत नाहीं, तथापि कांहीं तरी तोंडानें बडबडून तुला मी नमन करितों. (११०) देवा, हें कारणत्व त्वां मला दिलें असून तुझ्या मायेमुळें मोहित होऊन मी तें विसरलों, अर्थात् अहंकार माझ्या शरीरांत शिरला, ह्मणूनच यावेळेस शासन मला मिळालें. (१११) देवा, विशेष विज्ञापना करण्यांत काय अर्थ आहे बरें ? ईश्वरा, मी सध्यां फार भ्यालों आहें. कारण ज्याचा परिच्छेद ( माप ) करणें कधीं व्हावयाचें नसून मी परिच्छेद करा-

द्यतः ॥१११॥ त्वामुशन्ति महादेवं भीतानामार्तिनाशनम् ॥ अतो व्यतिक्रमं मेऽद्य क्षन्तुमर्हसि शङ्कर ॥११२॥ इति विज्ञापितस्ताभ्यामीश्वराभ्यां महेश्वरः॥ प्रीतोऽनुगृह्य तौ देवौ स्मितपूर्वमभाषत ॥११३॥

ईश्वर उवाच ॥ वत्स वत्स विधे विष्णो मायया मम मोहितौ ॥ युवां प्रभुत्वेऽहंकृत्य बद्धवैरौ परस्परम् ॥११४॥ विवादं युद्धपर्यन्तं कृत्वा नोपरतौ किल ॥ तेनोच्छिन्ना प्रजासृष्टिर्जगत्कारणभूतयोः ॥११५॥ अज्ञानमानप्रभवाद्वैमत्याद्युवयोरपि ॥ तन्निवर्तयितुं युष्मद्दर्पमोहौ मयैव तु ॥११६॥ एवं निवारितावद्य लिंगाविर्भावलीलया ॥ तस्माद्वयं विषादश्च व्रीडां चोत्सृज्य कृत्स्नशः ॥११७॥ यथा स्वं कर्म कुर्यातां भवन्तौ वीतमत्सरौ ॥ पुरा ममाज्ञया सार्द्धं समस्ता ज्ञानसंहिताः ॥११८॥ युवाभ्यां हि मया दत्ताः कारणत्वप्रसिद्धये ॥ मन्त्ररत्नश्च सूत्राख्यं पंचाक्षरमयं परम् ॥११९॥ मयोपदिष्टं सर्वं तद्यु-

---

वयास उद्युक्त झालों. (११२) घाबरलेल्या लोकांच्या व्यथेला दूर करणाऱ्या तुझी स्तुति सर्व वेद करतात, अर्थात् हे शंकरा, माझ्या अपराधांची क्षमा कर. (११३) समर्थ अशा ब्रह्मविष्णूंनीं प्रार्थना केल्याबरोबर त्या दोघांवर प्रसन्न होऊन मंदहास्य करीत ईश्वर त्यांना ह्मणाला.

ईश्वर बोलला-- (११४) वत्स ब्रह्मन्, वत्स विष्णो, तुह्मी दोघे माझ्या मायेनें मोहित झालां होतां, प्रभुपणाच्या अहंकारानें युक्त होऊन निष्कारण आपसांमध्यें तुह्मीं दोघे भांडलांत, (११५) हा वाद लढाईपर्यंत परिणामाला आला, तरी तुह्मीं स्वस्थ झाला नाहीं. (एकानेंही मागें घेतलें नाहीं) ह्मणूनच जरी तुह्मीं जगाचें कारण अहांत, तथापि ही प्रजासृष्टि अशी विच्छिन्न (अपुरी) राहिली. (११६) तुह्मांमध्यें अज्ञान व अहंकार फार माजल्यामुळें तुमच्यांत दुही माजली, तें घालविण्याकरितां व तुमचा गर्व मोह दूर करण्याकरितां मीच (११७) लिंगामध्यें प्रकट होऊन तुमचा कलह शमविला. आतां तुम्ही मनांतला विषाद सर्व सोडून लाज सर्व सोडून (११८) तुमच्या योग्यतेंतलें काम करा, जा. मत्सर सोडा, पूर्वीं माझ्या आज्ञेसहित सर्व ज्ञानसंहिता (११९) तुमच्या कारणत्वाच्या सिद्धीकरितां मीं तुम्हाला दिल्या, व पंचाक्षरमय, व सूत्र नांवाचें श्रेष्ठ मंत्ररत्नही तुम्हांला दिलें. (१२०) मंत्राचा

वयोरद्य विस्मृतम् ॥ ददामि च पुनः सर्वं यथा पूर्वं ममाज्ञया ॥१२०॥ यतो युवां विना तेन न क्षमौ सृष्टिरक्षणे ॥ एवमुक्त्वा महादेवो नारायणपितामहौ ॥१२१॥ मन्त्रेणाज्ञां ददौ ताभ्यां ज्ञानसंहितया सह ॥ तौ लब्ध्वा महतीं दिव्यामाज्ञां माहेश्वरीं पराम् ॥१२२॥ महार्थं मन्त्ररत्नञ्च तथैव सकलाः कलाः ॥ दण्डवत्प्रणतिं कृत्वा देवदेवस्य पादयोः ॥१२३॥ अतिष्ठतां वीतभयावानन्दस्तिमितौ तदा ॥ एतस्मिन्नन्तरे चित्रमिन्द्रजालवदैश्वरम् ॥१२४॥ लिंगं क्वापि तिरोभूतं न ताभ्यामुपलभ्यते ॥ ततो विलप्य हाहेति सद्यः प्रणयभंगतः ॥१२५॥ किमिदं किमिदं वृत्तमिति चोक्त्वा परस्परम् ॥ अचिन्त्यवैभवं शम्भोर्विचिन्त्य च गतव्यथौ ॥१२६॥ अभ्युपेत्य परां मैत्रीमालिंग्य च परस्परम् ॥ जगद्व्यापारमुद्दिश्य जग्मतुर्देवपुं

---

उपदेश माझ्याकडून घेऊन आज तुम्ही विसरलांत. याकरितां पुनः पूर्वी जसा उपदेश केला होता, तद्वत् माझ्या आज्ञांसहित सर्व तुम्हांला आतां मी देतों. (१२१) कारण तुमच्यावांचून जगाची सृष्टि आणि पालन करण्यास दुसरे कोणी समर्थ होत नाहींत, असें बोलून महादेवानें नारायणाला व ब्रम्हदेवाला (१२२) ज्ञानसंहितेसह व मंत्रांसह आज्ञा दिली. महेश्वराची ती दिव्य श्रेष्ठ मोठी आज्ञा पावून व (१२३) मोठ्या अर्थाच्या मंत्ररत्नाला पावून तसेंच सर्व कला पावून दोघांनीं (ब्रह्मविष्णूंनीं) देवाधिदेवाच्या (शिवाच्या) पायांवर दंडाकार पडून आपलें डोकें ठेविलें. (१२४) नंतर निर्भीत होऊन ते दोघेही आनंदानें स्तब्ध उभे राहिले. इतक्यांत इंद्रजालाप्रमाणें (त्या नांवाच्या विद्येप्रमाणें) ईश्वराचें (१२५) तें लिंग नाहीसें झालें, तेव्हां तें कोठेंही ब्रह्मदेवाला व विष्णूला सांपडलें नाहीं. नंतर लिंगावर दोघांचें प्रेम जें बसलें होतें, त्याचा भंग झाला, ( अदृश्य झाल्यामुळें ) ह्मणून तात्काळ त्या दोघांनीं हाहाःकार करून मोठा विलाप केला. (१२६) काय हें झालें? काय हें झालें ? असें परस्परांत बोलून शंभूचें माहात्म्य विचार करावयास अशक्य आहे, अशी अपसांत समजूत करून घेऊन दोघेही स्वस्थ झाले. (१२७) नंतर वैरभाव सोडून दोघांनीं मैत्रीची वृद्धि केली, परस्परानें परस्परांला आलिंगन देऊन जगाचा व्यापार चालविण्याकरितां ते दोघे देव-

गवौ ॥१२७॥ ततःप्रभृति शक्राद्याः सर्वे एव सुरासुराः ॥ ऋषयश्च नरा नागा नार्यश्चापि विधानतः ॥ लिंगप्रतिष्ठां कुर्वन्ति लिंगं तत्पूजयन्ति च ॥१२८॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे लिङ्गाविर्भावकथनं नाम सप्तविंशोऽध्यायः ॥२७॥

---

श्रेष्ठ ( ब्रह्मा, विष्णु ) तेथून निघून गेले. (१२८) त्या दिवसापासून इंद्रादि देव, व सर्व दैत्य, ऋषि, नर, नारी, नाग हे सर्व विधानपूर्वक लिंगाची प्रतिष्ठा करून लिंगाची पूजा करते झाले.

याप्रमाणें श्रीशैवमहापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तर भागांतील लिंगाविर्भावकथन नांवाचा सत्ताविसावा अध्याय संपला.



## अथाष्टाविंशोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ भगवञ्छ्रोतुमिच्छामि प्रतिष्ठाविधिमुत्तमम् ॥ लिंगस्यापि च बेरस्य शिवेन विहितं तथा ॥१॥

उपमन्युरुवाच ॥ अनात्मप्रतिकूले तु दिवसे शुक्लपक्षके ॥ शिवशास्त्रोक्तमार्गेण कुर्याल्लिंगं प्रमाणवत् ॥२॥ स्वीकृत्याथ शुभं स्थानं भूपरीक्षां विधाय च ॥ दशोपचारान्कुर्वीत लक्षणोध्दारपूर्वकान् ॥३॥ तेषां दशोपचाराणां पूर्वं पूज्य विनायकम् ॥ स्थानशुध्द्यादिकं कृत्वा लिंगं स्नानालयं नयेत् ॥४॥ शलाकया कांचनया कुंकुमादिरसाक्तया ॥ लाञ्छितं लक्षणं शिल्पशास्त्रेण विलिखेत्ततः ॥५॥ अष्टमृत्सलिलैर्वाथ पंचामृतजलैस्तथा ॥ लिंगं पिण्डिकया सार्ध्दं पंचगव्यैश्च शोधयेत् ॥६॥ सवेदिकं समभ्यर्च्य दिव्याद्यन्तु जलाशयम् ॥ नीत्वाधिवासयेत्तत्र लिंगं पिण्डिकया सह ॥७॥ अधिवासालये शुध्दे

---

श्रीकृष्ण बोलला--(१) हे भगवन् उपमन्यो, आतां उत्तम प्रतिष्ठाविधि ऐकावयाची इच्छा करतों, लिंगाची व बेराची प्रतिष्ठा शिवानें जशी सांगितली आहे, तें सांग.

उपमन्यु बोलला—(२) आपल्यास अनुकूल असा दिवस शुक्लपक्षांत पाहून शिवशास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें प्रमाणविशिष्ट लिंग करावें. (३) प्रथम चांगली जागा घेऊन तेथें जमिनीची परीक्षा करून ( भूशोधन करून ) लक्षणसहित उध्दारपूर्वक दहा उपचार करावेत. (४) त्या दशोपचारांमध्यें प्रथम विनायकाची पूजा करावी, नंतर स्थानशुध्दि वगैरे करून स्नानालयांत ( न्हाणींत ) लिंगाला आणावें. (५) मग कुंकुम वगैरे पदार्थांनीं माखलेली सोन्याची शलाका ( सळई ) घेऊन शिल्पशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें लांछन ( चिन्ह ) लक्षण वगैरे सळईनें करावें. ( लिहावें. ) (६) आठ तऱ्हेची माती मिसळलेलें पाणी घेऊन लिंगाला अभिषेक घालून मग पंचामृताचा व शुध्द पाण्याचा अभिषेक घालावा, नंतर पिंडिकेसह लिंगाचें शोधन पंचगव्यानें करावें ( शुध्द करावें ). (७) वेदिसहित लिंगाची पूजा करून उत्कृष्ट जलाशयाला ( नदीला वगैरे ) लिंग नेऊन तेथें पिंडिकेसह लिंगाचा जलाधिवास करावा. (८) तें अधिवासरूपी मंदिर शुद्ध केलेलें अ-

सर्वशोभासमन्विते ॥ सतोरणे सावरणे दर्भमालासमावृते ॥८॥ दिग्गजाष्टकसम्पन्ने दिक्पालाष्टघटान्विते ॥ अष्टमंगलकैर्युक्ते कृतदिक्पालकार्चिते ॥९॥ तैजसं दारवं वापि कृत्वा पद्मासनाङ्कितम् ॥ विन्यसेन्मध्यतस्तत्र विपुलं पीठिकालयम् ॥१०॥ द्वारपालान्समभ्यर्च्य भद्रादींश्चतुरः क्रमात् ॥ सुभद्रश्च विभद्रश्च सुनन्दश्च विनन्दकः ॥११॥ स्नापयित्वा समभ्यर्च्य लिंगं वेदिकया सह ॥ सकूर्चाभ्यान्तु वस्त्राभ्यां समाविष्टय समन्ततः ॥१२॥ प्रापय्य शनकैस्तोयं पीठिकोपरि शाययेत् ॥ प्राक्छिरस्कमधःसूत्रं पिण्डिकांचास्य पश्चिमे ॥१३॥ सर्वमंगलसंयुक्तं लिंगं तत्राधिवासयेत् ॥ पंचरात्रं त्रिरात्रं वाप्येकरात्रमथापि वा ॥१४॥ विसृज्य पूजितांस्तत्र लिंगंचोध्दृत्य पूर्ववत् ॥ सम्पूज्योत्सवमार्गेण शयनालयमानयेत् ॥१५॥ तत्रापि शयनस्थानं कु-

---

सून सर्वतोपरी सुशोभित केलेलें असावें, व त्याला तोरण बांधून आवरणें केलेलीं असावींत, सभोंवतीं दर्भाची माळ बांधलेली असावी. (९) चारी बाजूंस दिग्गजांची स्थापना केलेली असून अष्टदिक्पालांची व आठ घटांची ( कलशांची ) स्थापना केलेली असावी, व आठ मंगल पदार्थांनीं युक्त तें मंदिर दिक्पालांनीं पूजित झालेलें असावें. (१०) तैजस ( सोन्याचें ) किंवा लांकडाचें पद्मासन करून त्याच्या मध्यभागीं विस्तृत पीठिकारूपी मंदिर (पीठ) ठेवावें. (११) नंतर क्रमानें भद्रादि चार द्वारपाळांची पूजा करावी. सुभद्र, विभद्र, सुनंद, विनंदक हे चार द्वारपाळ होत. (१२) नंतर वेदिकेसह लिंगाला स्नान घालून पूजा करून त्याच्यासभोंवतीं कूर्चसहित वस्त्राचें वेष्टन करावें. (१३) नंतर हळूच पाण्यापर्यंत आणून पीठावर निजवावें. निजवितांना डोकें वर केलेलें असून खालीं सूत्र करावें, व पश्चिम बाजूस पिंडिका करावी. (१४) सर्व मंगलांनीं युक्त असें तें लिंग घेऊन त्याठिकाणीं त्याचें ( लिंगाचें ) अधिवासन करावें, तें अधिवासन पांच रात्र किंवा तीन रात्र किंवा निदान एक रात्र तरी करावें. (१५) मग पूजित झालेल्या देवतांचें विसर्जन त्याच ठिकाणीं करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें लिंगाचा उद्धार करून ( लिंग उचलून ) लिंगाची पूजा करून उत्सव करीत करीत शयन मंदिरापर्यंत लिंग आणावें. (१६) त्या ठिकाणींही मंडलाच्या मध्यभागीं श-

र्यान्मण्डलमध्यतः ॥ शुद्धैर्जलैस्स्नापयित्वा लिंगमभ्यर्चयेत्क्रमात् ॥१६॥ ऐशान्यां पद्ममालिख्य शुद्धलिप्ते महीतले ॥ शिवकुम्भं साधयित्वा तत्रावाह्य शिवं यजेत् ॥१७॥ वेदिमध्ये सितं पद्मं परिकल्प्य विधानतः ॥ तस्य पश्चिमतश्चापि पिण्डिकापद्ममालिखेत् ॥१८॥ क्षौमाद्यैर्वाहतैर्वस्त्रैःपुष्पैर्दर्भैरथापि वा ॥ प्रकल्प्य शयनं तस्मिन्हेमपुष्पं विनिक्षिपेत् ॥१९॥ तत्र लिंगं समानीय सर्वमंगलनिस्वनैः ॥ रक्तेन वस्त्रयुग्मेन सकूर्चेन संमततः ॥२०॥ सहपिंडिकया वेष्ट्य शाययेच्च यथा पुरा ॥ पुरस्तात्पद्म मालिख्य तद्दलेषु यथा क्रमम् ॥२१॥ विद्येशकलशान्न्यस्येन्मध्ये शैवीञ्च वर्द्धनीम् ॥ परीत्य पद्मत्रितयं जुहुयुर्द्विजसत्तमाः ॥२२॥ ते चाष्टमूर्तयः कल्प्याः पूर्वादिपरितः स्थिताः॥ चत्वारश्चाथ वा दिक्षु स्वध्येतारः सजापकाः॥२३॥ जुहुयुस्ते विरंच्याद्याश्चतस्रो मूर्तयः स्मृताः ॥ देशिकः प्रथमं तेषामैशान्यां पश्चिमेऽथवा ॥२४॥ प्रधानहोमं कुर्वीत सप्तद्रव्यैर्यथाक्रमम् ॥

---

यनस्थान करावें, शुद्धोदकानें लिंगाला स्नान घालून क्रमानें लिंगाची पूजा करावी. (१७) ईशान्य दिशेला स्वच्छ जमीन सारवून त्या ठिकाणीं कमल काढावें, नंतर शिवकलशाची स्थापना तेथें करून त्यावर शिवाचें आवाहन करून पूजा करावी. (१८) वेदीच्या मध्यें विधानपूर्वक शुभ्र कमल लिहून त्याच्या पश्चिमभागीं पिंडिका पद्म लिहावें. (१९) नंतर रेशमी वस्त्रांनीं, उंची वस्त्रांनीं किंवा फुलांनीं, दर्भांनीं शय्या करून त्यावर सोन्याचें फूल ठेवावें. (२०) त्या ठिकाणीं मंगलवाद्य वाजवीत लिंग आणून तांबड्या दोन वस्त्रांनीं व कूर्चानें (२१) पिंडिकेच्या सभोंवतीं वेष्टन करून पूर्वोक्त विधानानें शयन करवावें. पुढें पद्मलेखन करून त्याच्या दळावर क्रमानें (२२) विद्याधिपतींचे कलश ठेवून मध्यें शैवी वर्धनी ठेवून तीन पद्माच्या सभोंवतीं ब्राह्मणांनीं होम करावा. (२३) पूर्वादि दिशांच्या क्रमानें आठ मूर्ति आहेत, अशी कल्पना करावी, दिशांमध्यें जपसहित अध्ययन करणाऱ्या चार मूर्ति आहेत अशी कल्पना करावी. (२४) त्या चार मूर्ति विरिंचि वगैरे होत, त्यांच्याकरतां होम करावा, देशिकानें प्रथम ईशान्येला किंवा पश्चिमेला (२५) प्रधान होम करावा, त्या होमांत क्रमानें सात द्रव्यें असावींत, आचार्याच्या

आचार्योत्पादमर्द्धं वा जुहुयुश्चापरे द्विजाः ॥२५॥ प्रधानमेकमेवात्र जुहुयादथवा गुरुः ॥ पूर्वं पूर्णाहुतेर्हुत्वा घृतेनाष्टोत्तरं शतम् ॥२६॥ मूर्ध्नि मूलेन लिंगस्य शिवहस्तं प्रविन्यसेत् ॥ शतमर्द्धं तदर्ध्दं वा क्रमाद्द्रव्यैश्च सप्तभिः ॥२७॥ हुत्वा हुत्वा स्पृशेल्लिंगं वेदिकां च पुनः पुनः ॥ पूर्णाहुतिं ततो हुत्वा क्रमाद्द्याच्च दक्षिणाम् ॥२८॥ आचार्योत्पादमर्ध्दं वा होतॄणां स्थपतेरपि ॥ तदर्ध्दं देयमन्येभ्यः सदस्येभ्यश्च शक्तितः ॥२९॥ ततः श्वभ्रे वृषं हैमं कूर्चं वापि निवेश्य च ॥ मृदंभसा पञ्चगव्यैः पुनः शुध्दजलेन च ॥३०॥ शोधितां चन्दनालिप्तां श्वभ्रे ब्रह्मशिलां क्षिपेत् ॥ करन्यासं ततः कृत्वा नवभिः शक्तिनामभिः ॥३१॥ हरितालादिधातूंश्च बीजगन्धौषधैरपि ॥ शिवशास्त्रोक्तविधिना क्षिपेद्ब्रह्मशिलोपरि ॥३२॥ प्रतिलिंगन्तु संस्थाप्य क्षीरवृक्षसमुद्भवम् ॥ स्थितं बुद्ध्वा तमुत्सृज्य लिंगं ब्रह्मशिला-

---

एक चतुर्थांशानें इतर ब्राह्मणांनीं होम करावा, किंवा निम्यानें होम करावा. (२६) नंतर गुरूनें एक तरी प्रधान होम त्याठिकाणीं करावा, पूर्णाहुतीच्या आधीं तुपाचे अष्टोत्तरशत होम करून (२७) मूलमंत्रानें लिंगाच्या मस्तकावर शिवहस्त ठेवावा, नंतर शंभर किंवा पन्नास, किंवा २५ पंचवीस होम क्रमानें सात द्रव्यांनीं (२८) करून लिंगाचा स्पर्श करावा, व पुनः पुनः वेदीचा स्पर्श करावा, नंतर पूर्णाहुति घालून क्रमानें दक्षिणा द्यावी. (२९) आचार्याच्या एक चतुर्थांशानें किंवा निम्यानें होम करणाऱ्या ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. तसेंच स्थपतीला दक्षिणा द्यावी, नंतर त्यांच्या निम्यानें इतर सभासदांना दक्षिणा द्यावी, (३०) नंतर श्वभ्रामध्यें (रंध्रामध्यें) वृषाचा व सोन्याच्या कूर्चाचा न्यास करावा (ठेवावें) मृत्तिकेनें व पाण्यानें पंचगव्यानें, पुनः शुध्दोदकानें, (३१) शोध करून ( शुद्ध करून ) चंदन लावून रंध्रांत ब्रह्मशिला ठेवावी. नंतर नऊ शक्तींच्या नाममंत्रांनीं करन्यास करून (३२) हरितालादि धातु, बीजांचा गंध, औषधि वगैरे शिवशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ब्रह्मशिळेवर ठेवावेत. (३३) प्रत्येक लिंगाला क्षीरवृक्षाचा डिंक लावून स्थापना केल्यानंतर तें मजबूत बसलें असें समजल्यानंतर लिं-

मपि॥३३॥प्रागुदक्प्रवणं किंचित्स्थापयेन्मूलविद्यया॥ पिण्डिकां चाथ संयोज्य शाक्तं मूलमनुस्मरन्॥३४॥ वन्धनं वन्धकद्रव्यैः कृत्वा स्थानं विशोध्य च॥ दत्वा चार्घ्यश्च पुष्पाणि कुर्युर्यवनिकां पुनः॥३५॥ यथायोग्यं निषेकादि लिंगस्य पुरतस्तदा॥ आनीय शयनस्थानात्कलशान्विन्यसेत्क्रमात्॥३६॥ महापूजामथारभ्य सम्पूज्य कलशान्दश॥ शिवमन्त्रमनुस्मृत्य शिवकुम्भजलान्तरे॥३७॥ अंगुष्ठानामिकायोगादादाय तमुदीरयेत्॥ न्यसेदीशानभागस्य मध्ये लिंगस्य मन्त्रवित्॥३८॥ शक्तिं न्यसेत्तथा विद्यां विद्येशांश्च यथाक्रमम्॥ लिंगमूले शिवजलैस्तथा लिंगं निषेचयेत्॥३९॥ वर्द्धन्या पिण्डिकां लिंगं विद्येशकलशैः पुनः॥ अभिषिच्यासनं पश्चादाधाराद्यं प्रकल्पयेत्॥४०॥ कृत्वा पञ्चकलान्यासं दीप्तं लिंगमनुस्मरन्॥ आवाहयेच्छिवौ साक्षात्प्रांजलिः प्रागुदङ्मुखः॥४१॥ वृषाधिराजमारुह्य विमानं

---

गाला सोडावें. (३४) नंतर ब्रह्मशिला पूर्वोत्तर दिशांच्या मध्यभागीं किंचित् नम्र अशी करून मूलविद्येनें तिची स्थापना करावी. नंतर शाक्तमूलमंत्र ह्मणत पिंडिकेची योजना करावी. (३५) बंधक द्रव्यांनीं अष्टबंध करून स्थान शोधन करावें. नंतर अर्घ्य फुलें समर्पण करून पुनः यवनिका करावी ( पडदा बांधावा ). (३६) लिंगापुढें यथायोग्य निषेक वगैरे करून शयनस्थानापासून आणवून क्रमानें कलशांचा न्यास करावा. (३७) नंतर महापूजेला आरंभ करून दहा कलशांची पूजा करावी. मग शिवकुंभाच्या मध्यभागीं शिवमंत्राचें स्मरण करावें. (३८) अंगुष्ठ व अनामिका या दोन बोटांनीं आणून तोंडानें मंत्र ह्मणावा. मंत्रवेत्त्या ब्राह्मणानें ईशान्य दिशेला मध्यभागीं लिंगाचा न्यास करावा. (३९) नंतर लिंगाच्या शक्तीचा, विद्येचा, विद्याधिपतींचा वगैरे क्रमानें न्यास करावा. लिंगाच्या मूलभागांत व लिंगावर पाणी शिंपडावें. (४०) वर्धनीनें पिंडिकेस व लिंगास अभिषेक करून विद्याधिपतींच्या कलशांनीं पुनः अभिषेक करावा, मग आधारादि आसनांची कल्पना करावी. (४१) मग पंचकलांचा न्यास करून लिंग प्रदीप्त ( प्रकाशमान ) आहे, असें स्मरावें. नंतर उत्तरेकडे किंवा पूर्वेकडे तोंड करून हात जोडून शिवपार्वतीचें आवाहन करावें. (४२) नंदिकेश्वरावर बसू-

वा नभःस्थलात् ॥ अलंकृतं समायान्तं देव्या देवमनुस्मरन् ॥४२॥ सर्वाभरणशोभाढ्यं सर्वमंगलनिस्वनैः ॥ ब्रह्मविष्णुमहेशार्कशक्राद्यैर्देवदानवैः ॥४३॥ आनन्दक्लिन्नसर्वांगैर्विन्यस्ताञ्जलिमस्तकैः ॥ स्तुवद्भिरेव नृत्यद्भिर्नमद्भिरभितो वृतम् ॥४४॥ ततः पञ्चोपचाराणां कृत्वा पूजां समापयेत् ॥ नातः परतरः कश्चिद्विधिः पञ्चोपचारकात् ॥४५॥ प्रतिष्ठां लिङ्गवत्कुर्यात्प्रतिमास्वपि सर्वतः ॥ लक्षणोद्धारसमये कार्यं नयनमोचनम् ॥४६॥ जलाधिवासे शयने शाययेत्तान्त्वधोमुखीम् ॥ कुम्भोदरगतं मन्त्रं हृदि तासां नियोजयेत् ॥४७॥ कृतालयां परामाहुः प्रतिष्ठामकृतालयात् ॥ शक्तः कृतालयं पश्चात्प्रतिष्ठाविधिमाचरेत् ॥४८॥ अशक्तश्चेत्प्रतिष्ठाप्य लिंगं बेरमथापि वा ॥ शक्तेरनुगुणं पश्चात्प्रकुर्वीत शिवालयम् ॥४९॥ गृहार्चायां पुनर्वक्ष्ये प्र-

---

न किंवा विमानांत बसून आकाशमार्गानें देवीसहित ( पार्वतीसह ) शिव अलंकृत होऊन येत आहे, असें स्मरण करावें. (४३) सर्व आभरणें घातल्यामुळें जो फार शोभत असून ज्याच्यापुढें मंगल वाद्यें वाजताहेत, व ज्याच्यापुढें ब्रह्मा, विष्णु, महेश, अर्क, इंद्र, दैत्य वगैरे (४४) आनंदानें शरीर क्लिन ( भिजलेलें ) करून हात जोडून ज्याचें स्तोत्र करीत आहेत, नमस्कार, नर्तन वगैरे सभोंवतीं करीत आहेत, असा तो शिव येत आहे, असें स्मरण करून (४५) पंचोपचार पूजा शिवाची करून पूजा समाप्त करावी. या पंचोपचार विधीपेक्षां दुसरा श्रेष्ठ विधि कोणताही नाहीं. (४६) सर्वत्र प्रतिमांच्या ठिकाणीं लिंगाप्रमाणेंच प्रतिष्ठा करावी, लक्षणसहित उद्धाराच्या वेळेस नयनमोचन करावें ( डोळ्यांत पाणी आणावें ). (४७) जलाधिवासांतल्या शयनावर ती प्रतिमा अधोमुखी ( खालीं तोंड असलेली ) करून तिला निजवावें. कलशाच्या मध्यभागीं असलेल्या मंत्राचा न्यास त्यांच्या ( प्रतिमांच्या ) हृदयांत करावा. (४८) देवालयापेक्षां मंदिराची कल्पना करून त्यांत केलेली प्रतिष्ठा श्रेष्ठ आहे असें ह्मणतात. सामर्थ्य असेल तर मंदिर बांधवून नंतर प्रतिष्ठाविधि करावा. (४९) अशक्त असेल तर लिंगाची बेराची प्रतिष्ठा करून शक्तीच्या मानानें मागून शिवालय बांधावें. (५०) गृहपूजेमध्यें पुनः उत्तम प्रतिष्ठाविधि सांगतों. लहान बेर करून किंवा सलक्ष-

तिष्ठाविधिमुत्तमम् ॥ कृत्वा कनीयसं बेरं लिङ्गं वा लक्षणान्वितम् ॥५०॥ अयने चोत्तरे प्राप्ते शुक्लपक्षे शुभे दिने ॥ वेदिं कृत्वा शुभे देशे तत्राब्जं पूर्ववल्लिखेत् ॥५१॥ विकीर्य पत्रपुष्पादि मध्ये कुम्भं निधाय च ॥ परितस्तस्य चतुरः कलशान्दिक्षु विन्यसेत् ॥५२॥ पञ्चब्रह्माणि तद्बीजैस्तेषु पञ्चसु पंचभिः ॥ न्यस्य सम्पूज्य मुद्रादि दर्शयित्वाभिरक्ष्य च ॥५३॥ विशोध्य लिंगं बेरं वा मृत्तोयाद्यैर्यथा पुरा ॥ स्थापयेत्पुष्पसञ्छन्नमुत्तरस्थे वरासने ॥५४॥ निधाय पुष्पं शिरसि प्रोक्षयेत्प्रोक्षणीजलैः ॥ समभ्यर्च्य पुनः पुष्पैर्जयशब्दादिपूर्वकम् ॥५५॥ कुम्भैरीशानविद्यान्तैः स्नापयेन्मूलविद्यया ॥ ततः पंचकलान्यासं कृत्वा पूजांच पूर्ववत् ॥५६॥ नित्यमाराधयेत्तत्र देव्या देवं त्रिलोचनम् ॥ एकमेवाथवा कुम्भं मूर्तिमन्त्रसमन्वितम् ॥५७॥ न्यस्य पद्मान्तरे सर्वं शेषं पूर्ववदाचरेत् ॥ अत्यन्तोपहतं लिंगं विशो-

---

ण लिंग करून (९१) उत्तरायणांत शुभदिवशीं शुभप्रदेशामध्यें वेदि करून पूर्ववत् कमल लिहावें. (९२) त्या ठिकाणीं फुलें वगैरे उधळून मध्यभागीं कलशस्थापना करून सभोंवतीं चारी दिशेला चार कलशांचा न्यास करावा. (९३) त्यांच्या बीजमंत्रांनीं पंचब्रह्मांचा न्यास त्या पंचकलशांमध्यें करावा. नंतर मुद्रा दाखवून त्या मुद्रांनीं रक्षा करावी. मग पूजा करावी. (९४) नंतर पूर्वोक्तविधीनें मृत्तिका उदक वगैरे द्रव्यांनीं लिंगाचें व बेराचें शोधन करून उत्तरेकडे असलेल्या श्रेष्ठ आसनावर लिंगाची स्थापना करून फुलांनीं आच्छन्न करून ( झांकून ) टाकावें. (९५) नंतर डोक्यावर एक फूल ठेवून प्रोक्षणोदकानें प्रोक्षण करावें ( पाणी डोक्यावर शिंपडावें ). पुनः फुलांनीं पूजा करून लिंगाचा जयजयकार करावा. (९६) ईशानविद्या ज्याच्या शेवटीं आहे, अशा पांचही कलशांनीं मूलमंत्र तोंडानें ह्मणत अभिषेक घालावा, नंतर पंचकलान्यास करून पूर्ववत् पूजा करावी. (९७) त्याठिकाणीं निरंतर पार्वतीसह शिवाची पूजा करावी. नंतर मूर्तीच्या मंत्रासह युक्त असलेला एक कुंभ घेऊन (९८) पद्माच्या मध्यभागीं त्याचा न्यास करावा, मग बाकी राहिलेलें सर्व पूर्वोक्त विधानानें करावें. अत्यंत मलिन झा-

ध्य स्थापयेत्पुनः ॥५८॥ सम्प्रोक्षयेदुपहतं मनागुपहतं यजेत् ॥ लिंगानि बाणसंज्ञानि स्थापनीयानि वा न वा ॥५९॥ तानि पूर्वं शिवेनैव संस्कृतानि यतस्ततः ॥ लौहानि स्थापनीयानि यानि दृष्टानि बाणवत् ॥६०॥ स्वयमुद्भूतलिंगे च दिव्ये चार्षे तथैव च ॥ अपीठे पीठमावेश्य कृत्वा सम्प्रोक्षणे विधिम् ॥६१॥ यजेत्तत्र शिवं तेषां प्रतिष्ठा न विधीयते ॥ दग्धं श्लथं क्षतांगं च क्षिपेल्लिंगं जलाशये ॥६२॥ सन्धानयोग्यं सन्धाय प्रतिष्ठाविधिमाचरेत् ॥ बेराद्वा विकलाल्लिंगाद्देवपूजापुरःसरम् ॥६३॥ उद्वास्य हृदि सन्धानं त्यागं वा युक्तमाचरेत् ॥ एकाहपूजाविहतौ कुर्याद्द्विगुणमर्चनम् ॥६४॥ द्विरात्रे च महापूजां सम्प्रोक्षणमतःपरम् ॥ मासादूर्द्ध्वमनेकाहं पूजा यदि विहन्यते ॥६५॥ प्रतिष्ठा चोच्यते कैश्चित्कैश्चित्सम्प्रोक्षणक्रमः ॥ सम्प्रोक्षणे

---

लेल्या लिंगाचें शोधन करून पुनः त्याची स्थापना करावी. (५९) उपहत लिंगाला प्रोक्षण करून स्वल्प उपहत लिंगाची पूजा करावी. बाण वगैरे नांवाच्या लिंगांची स्थापना केली तरी चालते, न केली तरी चालते असें सांगितलें आहे. (६०) कारण बाणादि लिंगांचे संस्कार पूर्वी शिवानें केलेलेच असतात. आतां बाणाप्रमाणें दिसणारीं जीं लोहाचीं वगैरे लिंगें असतील त्यांची स्थापना केली पाहिजे. (६१) स्वयंभुलिंग, दिव्यलिंग, आर्षलिंग, पीठरहितलिंग या लिंगांना पीठ करून पीठांमध्यें स्थापना करून विधिपूर्वक संप्रोक्षण वगैरे करावें. (६२) त्या ठिकाणीं शिवाची पूजा करावी, प्रतिष्ठा वगैरे करावयास नको आहे. जळलेलें, शिथिल झालेलें, भिन्न झालेलें ( फुटलेलें ), असें लिंग असेल तर जलाशयांत (नदी, तळें वगैरेंत) टाकून द्यावें. (६३) जुळविण्यास योग्य लिंग असेल तर जुळवून प्रतिष्ठाविधि करावा. लिंगशक्तीपासून लिंगाचा वियोग झाला असेल तर देवपूजा करून (६४) त्या लिंगापासून शिवाचें उद्वासन करून हृदयांत संधान करावें, किंवा त्याग करावा. जसें योग्य दिसेल तसें करावें. एक दिवस जर पूजा चुकली, तर पुनः द्विगुण पूजा करावी. (६५) दोन रात्र महापूजा करून नंतर संप्रोक्षण करावें. एक महिन्यानंतर अनेक दिवस लिंगाची पूजा चुकली, तर (६६) पुनः प्रतिष्ठाविधान करावें असें कांहीं लोकांचें ह्मणणें आहे, व नुसतें सं-

तु लिंगादेर्देवमुद्वास्य पूर्ववत् ॥६६॥ अष्टपंचक्रमेणैव स्नापयित्वा मृदम्भसा ॥ गवां रसैश्च संस्नाप्य दर्भतोयैर्विशोध्य च ॥६७॥ प्रोक्षयेत्प्रोक्षणीतोयैर्मूलेनाष्टोत्तरं शतम् ॥ सपुष्पं सकुशं पाणिं न्यस्य लिंगस्य मस्तके ॥६८॥ पंचावरं जपेन्मूलमष्टोत्तरशतोत्तरम् ॥ ततो मूलेन मूर्द्धादिपीठान्तं संस्पृशेदपि ॥६९॥ पूजाञ्च महतीं कुर्याद्देवमावाह्य पूर्ववत् ॥ अलब्धे स्थापिते लिंगे शिवस्थाने जलेऽथवा ॥ वन्हौ रवौ तथा व्योम्नि भगवन्तं शिवं यजेत् ॥७०॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे लिंगवेरप्रतिष्ठासम्प्रोक्षणादिविधिकथनं नामाष्टाविंशोऽध्यायः ॥२८॥

---

प्रोक्षण करावें असें कांहीं लोकांचें ह्मणणें आहे. लिंगादिकांचें संप्रोक्षण करावयाचें असेल तर पूर्वोक्त विधानानें शिवाचें उद्वासन करून (६७) आठ वेळ किंवा पांच वेळ क्रमानें मृत्तिका उदक यांचा अभिषेक लिंगास घालावा, नंतर पंचगव्यांनीं अभिषेक घालून दर्भोदकानें शुद्ध करावें. (६८) नंतर मूलमंत्र ह्मणत प्रोक्षणीय उदकानें एकशें आठ वेळ प्रोक्षण करावें, मग पुष्प, कुश, हातांत घेऊन तो हात लिंगाच्या मस्तकावर ठेवावा. (६९) मग पांच कमी एकशें आठ अधिक जशी शक्ति असेल, त्यामानानें मूलमंत्राचा जप करावा. नंतर मस्तकापासून पीठापर्यंत मूलमंत्रानें स्पर्श करावा. (७०) नंतर महापूजा करून पूर्वोक्त विधानानें शिवाचें आवाहन करावें, स्थापन केलेलें लिंग जर मिळालें नाहीं, तर शिवस्थानांत, पाण्यांत, अग्नीच्या ठिकाणीं, सूर्याच्या ठिकाणीं भगवान् शिवाची पूजा करावी.

याप्रमाणें श्रीशैव महापुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील लिंगबेर प्रतिष्ठासंप्रोक्षणविधिनांवाचा अठ्ठाविसावा अध्याय संपला.

---

## अथ एकोनत्रिंशोऽध्यायः

श्रीकृष्ण उवाच ॥ ज्ञाने क्रियायां चर्यायां सारमुध्दृत्य संग्रहात् ॥ उक्तं भगवता सर्वं श्रुतं श्रुतिसमं मया ॥१॥ इदानीं श्रोतुमिच्छामि- योगं परमदुर्लभम् ॥ साधिकारं च सांगंच सविधिं सप्रयोजनम् ॥२॥ यद्यस्ति मरणं वैधं रोगाद्यनुपमर्दतः ॥ सद्यः साधयितुं शक्यं येन स्यान्नात्महा नरः ॥३॥ तच्च तत्कारणं चैव तत्कालकरणानि च ॥ तद्भेदतारतम्यंच वक्तुमर्हसि तत्वतः ॥४॥

उपमन्युरुवाच ॥ स्थाने पृष्टं त्वया कृष्ण सर्वप्रश्नार्थवेदिना ॥ ततः क्रमेण तत्सर्वं वक्ष्ये शृणु समाहितः ॥५॥ निरुद्धवृत्यन्तरस्य शिवे चित्तस्य निश्चला॥या वृत्तिः सा समासेन योगः स खलु पंचधा ॥६॥ मंत्रयोगः स्पर्शयोगो भावयोगस्तथापरः ॥ अभावयोगः सर्वे-

---

श्रीकृष्ण बोलला—(१) ज्ञान, क्रिया, चर्या यांतलें सार संक्षेपानें काढून त्वां सांगितलें, मीं हें वेदासमान असलेलें सर्व ऐकिलें. (२) परंतु सांप्रत परमदुर्लभ असा जो योग आहे, तो योग कसा करावा, योगाला अधिकारी कोण, त्याचें अंग कोणतें, त्याचें विधान काय, योग केल्यापासून फल कोणतें हें सर्व ऐकण्याची माझी इच्छा आहे. (३) रोगादिकांचा उपद्रव न होतां सहज मरण ज्यानें येतें, असा योग तात्काळ साधावयास योग्यच आहे ह्मणावयाचा, कारण त्यायोगानें मानव आत्मघातकी होत नाहीं. (४) तें, त्याचें कारण, तात्कालिक त्याचीं साधनें, त्याचे भेद, त्याचें तारतम्य वगैरे सर्व यथास्थित सांगा.

उपमन्यु बोलला—(५) हे कृष्णा, प्रश्नाचे सर्व अर्थ जाणणारा तूं आहेस, अर्थात योग्य प्रश्न त्वां केलास. तर क्रमानें सर्व सांगतों शांत मनानें ऐक. (६) इतर ठिकाणीं चालत असलेले मनाचे सर्व व्यापार बंद ठेवून शिवाच्या ठिकाणीं निश्चल ( स्थिर ) मन ठेवणें याला “ योग ” असें ह्मणतात. तो योग पांच प्रकारचा आहे. (७) मंत्रयोग, स्पर्शयोग, भावयोग, चौथा अभावयोग, सर्वांत श्रेष्ठ पांचवा महायोग असे हे पांच योग जाणावे.

भ्यो महायोगः परो मतः ॥७॥ मन्त्राभ्यासवशेनैव मन्त्रवाच्यार्थगोचरः ॥ अव्याक्षेपा मनोवृत्तिर्मन्त्रयोग उदाहृतः ॥८॥ प्राणायामसखा सैव स्पर्शयोगोऽभिधीयते ॥ समन्त्रः स्पर्शनिर्म्मुक्तो भावयोगः प्रकीर्तितः ॥९॥ विलीनावयवं विश्वं रूपं सम्भाव्यते यतः ॥ अभावयोगः सम्प्रोक्तोऽनाभासाद्वस्तुनः सतः ॥१०॥ शिवस्वभाव एवैकश्चिन्त्यते निरुपाधिकः ॥ यथा सैव मनोवृत्तिर्महायोग इहोच्यते ॥११॥ दृष्टे तथानुश्रविके विरक्तं विषये मनः ॥ यस्य तस्याधिकारोऽस्ति योगे नान्यस्य कस्यचित् ॥१२॥ विषयद्वयदोषाणां गुणानामीश्वरस्य च ॥ विमर्शादेव सततं विरक्तं जायते मनः॥१३॥ अष्टांगो वा षडंगो वा सर्वयोगः समासतः ॥ यमश्च नियमश्चैव स्वस्तिकाद्यं तथासनम् ॥१४॥ प्राणायामः प्रत्याहारो धारणा ध्यानमेव

(८) मंत्राच्या अभ्यासानें मंत्राच्या अर्थांत मन गढून गेलें असून इतर ठिकाणीं मन जात नाहीं, अशा योगाला मंत्रयोग ह्मणतात. (९) तोच योग प्राणायामसहित जर झाला, तर त्याला स्पर्शयोग ह्मणतात, समंत्र योग असून स्पर्शरहित असला तर त्याला भावयोग ह्मणतात, (१०) ज्या जगाचे अवयव लीन असून त्या जगाला रूपाची कल्पना ज्या योगामध्यें होते, अर्थात् त्याला अभावयोग ह्मणतात, कारण यामध्यें सद्वस्तूचा ( शिवाचा ) भास होत नाहीं. (११) उपाधिरहित असा शिवाचा स्वभाव एकच ज्यामध्यें चिंतिला जातो, व त्या शिवस्वभावामध्यें तन्मयवृत्ति झाली असेल, तर त्याला महायोग ह्मणतात. (१२) जगांत जितके पदार्थ दृष्ट ( पाहिलेले ) असतील, व ऐकिलेले असतील तितक्या सर्व पदार्थांवरून ज्याचें मन फिरलें असेल, त्याला योग करावयास अधिकार आहे, दुसऱ्या कोणासही नाहीं. (१३) दृष्ट आणि श्रुत अशा दोन विषयांमध्यें जे दोष आहेत, याचा विचार करणें, व ईश्वराच्या ठिकाणीं गुण काय आहेत, याचा विचार करणें या दोन विचारांपासून मनुष्याचें मन विषयांपासून फिरतें (१४) अष्टांगयोग असो, षडंगयोग असो तो सर्वयोग संक्षेपानें सांगतों. यम, नियम, स्वस्तिकादि आसन, (१५) प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, स-

च ॥ समाधिरिति योगांगान्यष्टौ चेति प्रकीर्तिताः ॥१५॥ आसनं प्राणसंरोधः प्रत्याहारोऽथ धारणा ॥ ध्यानं समाधिर्योगस्य षडंगानि समासतः ॥१६॥ पृथग्लक्षणमेतेषां शिवशास्त्रे समीरितम् ॥ शिवागमेषु चान्येषु विशेषात्कामिकादिषु ॥१७॥ योगशास्त्रेष्वपि तथा पुराणेष्वपि केषु चित् ॥ तस्मात्समासात्सामान्याद्वक्ष्ये योगांगलक्षणम् ॥१८॥ अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यपरिग्रहौ ॥ यम इत्युच्यते सद्भिः पञ्चावयवयोगतः ॥१९॥ शौचं तुष्टिस्तपश्चैव जपः प्रणिधिरेव च ॥ इति पञ्चप्रभेदः स्यान्नियमः स्वांशभेदतः ॥२०॥ स्वस्तिकं पद्ममर्द्धेन्दु वीरं योगं प्रसाधितम् ॥ पर्यङ्कश्च यथेष्टश्च प्रोक्तमासनमष्टधा ॥२१॥ प्राणः स्वदेहजो वायुस्तस्यायामो निरोधनम् ॥ तद्रेचकं पूरकंच कुम्भकंच त्रिधोच्यते ॥२२॥ नासिकापुटमंगुल्या पीड्यैकमपरेण तु ॥ औदरं रेचयेद्वायुं तथायंऽरेचकः स्मृतः ॥२३॥ वा-

---

माधि हीं आठ योगाचीं अंगें ( अवयव ) होत. (१६) आसन, प्राणनियमन, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधि हीं सहा संक्षेपानें योगाचीं अंगें होत. (१७) या प्रत्येकाचीं लक्षणें शिवशास्त्रांत सांगितलीं आहेत, व इतर शिवागमांमध्यें विशेषेंकरून कामिकादि आगमांमध्यें सांगितलीं आहेत. (१८) योगशास्त्रांमध्यें कांहीं कांहीं पुराणांमध्यें सांगितलीं आहेत, याकरितां येथें मी संक्षेपानें योगांचीं लक्षणें सांगतों. (१९) अहिंसा ( हिंसा न करणें ) खरें बोलणें, चोरी न करणें, ब्रह्मचर्यानें राहणें, परिग्रह करणें असे हे पांच अवयव ज्याला आहेत, त्याला यम असें सज्जन ह्मणतात. (२०) शुध्दता ठेवणें, संतोषानें राहणें, तप करणें, (विचार करणें) जप करणें, मन स्वस्थ ठेवणें असे हे पांच अवयव ज्याला असतील, त्याला नियम असें सज्जन ह्मणतात. (२१) स्वस्तिक, पद्म, अर्ध्देंदु, वीर, योग, प्रसाधित, पर्यंक, यथेष्ट अशीं हीं आठ आसनें होत. (२२) प्राण याचा अर्थ आपल्या शरीरांतील वायु असा होतो, व त्याचा आयाम ह्मणजे निर्बंध करणें याला प्राणायाम अशी संज्ञा आहे. यामध्यें रेचक, पूरक, कुंभक असे तीन भेद आहेत. (२३) बोटानें नाकपुडी दाबून वर श्वास घेऊन दुसऱ्या बोटानें उदरस्थ वायूला सोडणें याला रेचक प्राणायाम ह्मणतात. (२४) बाहेरचा वा-

ह्येन मरुता देहं दृतिवत्परिपूरयेत् ॥ नासापुटेनापरेण पूरणात्पूरकं मतम् ॥२४॥ न मुंचति न गृह्णाति वायुमन्तर्बहिःस्थितम् ॥ सम्पूर्णकुम्भवत्तिष्ठेदचलः स तु कुम्भकः ॥२५॥ रेचकाद्यं त्रयमिदं न द्रुतं न विलम्बितम् ॥ उद्यतः क्रमयोगेन त्वभ्यस्येद्योगसाधकः ॥२६॥ रेचकादित्रयाभ्यासो नाडीशोधनपूर्वकः ॥ स्वेच्छोत्क्रमणपर्यन्तःप्रोक्तो योगानुशासने ॥२७॥ कनीयादिक्रमवशात्प्राणायामनिरोधनम् ॥ तच्चतुर्द्धोपदिष्टं स्यान्मात्रागुणविभागतः ॥२८॥ कनीयः सकृदुद्धातः स च द्वादशमात्रकः ॥ मध्यमस्तु द्विरुद्धातश्चतुर्विंशतिमात्रकः ॥२९॥ उत्तमस्तु त्रिरुद्धातः षट्त्रिंशन्मात्रकःपरः ॥ स्वेदकम्पादिजनकः प्राणायामस्तदुत्तरः ॥३०॥ आनन्दोद्भवरोमांचनेत्राश्रूणां वि-

---

यु शरीरांत एका नाकपुडीनें भात्याप्रमाणें साठवून ( भरून ) दुसऱ्या नाकपुडीनें वर नेऊन पूर्ण करून ठेवणें याला पूरक असें ह्मणतात. (२५) आंतला व बाहेरला वायु घेत नाहीं, व सोडीत नाहीं ( बाहेरचा वायु घेत नाहीं आंतचा सोडीत नाहीं ), अशा रीतीनें भरलेल्या घागरीप्रमाणें जो निश्चल राहतो, त्याला कुंभक असें ह्मणतात. (२६) या रेचकादि तीन प्राणायामांचा अभ्यास फार लौकर नव्हे फार सावकाश नव्हे, अशा रीतीनें क्रमानें योग साधणाऱ्यानें करावा. (२७) रेचकादि त्रिविध प्राणायामांचा अभ्यास नाडीशोधनपूर्वक ( नाडी शुध्द करीत करीत ) स्वेच्छेनें उत्क्रमण ( बिन आयासानें सोडतां येईल असा ) होईपर्यंत करावा, असें योगानुशासनामध्यें ( योगशास्त्रामध्यें ) सांगितलें आहे. (२८) उत्तम मध्यम कनिष्ट श्रेष्ठ या क्रमानें प्राणायाम हा मात्रा गुणांच्या चार प्रकारचा आहे, असें सांगतात. (२९) एकवार उद्घात ज्याचा होत असून, ज्याच्या मात्रा बारा आहेत, असा प्राणायाम कनिष्ठ होय. ज्याचे दोन वेळ उद्घात होत असून ज्याच्या मात्रा २४ चोवीस आहेत, तो प्राणायाम मध्यम होय. (३०) ज्याचे उद्घात तीन वेळ होत असून ज्याच्या मात्रा तीस होतील, असा प्राणायाम उत्तम होय, व ज्या प्राणायामानें घाम कंप वगैरे होतात तो प्राणायाम त्यापेक्षांही श्रेष्ठ होय. (३१) आनंदाचा उद्रेक, अंगावर शाहरे येणें, डोळ्यां-

मोचनम् ॥ जल्पभ्रमणमूर्छाद्यं जायते योगिनः परम् ॥३१॥ जानुं प्रदक्षिणीकृत्य न द्रुतं न विलम्बितम् ॥ अंगुलीस्फोटनं कुर्यात्सा मात्रेति प्रकीर्तिता ॥३२॥ मात्राक्रमेण विज्ञेया चोद्घातक्रमयोगतः ॥ नाडीविशुद्धिपूर्वन्तु प्राणायामं समाचरेत् ॥३३॥ अगर्भश्च सगर्भश्च प्राणायामो द्विधा स्मृतः ॥ जपध्यानं विना गर्भः सगर्भस्तत्समन्वयात् ॥३४॥ अगर्भाद्गर्भसंयुक्तः प्राणायामः शताधिकः ॥ तस्मात्सगर्भं कुर्वन्ति योगिनः प्राणसंयमम् ॥३५॥ प्राणस्य विजयादेव जीयन्ते दश वायवः ॥ प्राणोऽपानः समानश्च उदानो व्यान एव च ॥३६॥ नागः कूर्मश्च कृकलो देवदत्तो धनञ्जयः ॥ प्रयाणं कुरुते यस्मात्तस्मात्प्राणोऽभिधीयते ॥३७॥ अवानयत्यपानाख्यो यदाहारादि भुज्यते ॥ व्यानो व्यानशयत्यङ्गान्यशेषाणि विवर्द्धयन् ॥३८॥ उद्वेजयति मर्माणीत्युदानो वायुरीरितः ॥ समं नयति सर्वाङ्गं समा-

---

तून पाणी येणें, बडबडणें, भ्रमण होणें, मूर्छा येणें, वगैरे विकार योग्याला होतात. (३२) फार लौकर नव्हे, व फार सावकाश नव्हे अशा रीतीनें गुडघ्याला प्रदक्षिणा घालून बोटानें चुटकी वाजविण्यामध्यें जो वेळ जातो, त्याला मात्रा असें ह्मणतात. (३३) उद्घाताच्या क्रमानें मात्राक्रम जाणावेत आंतल्या नाड्या शुध्द होईपर्यंत प्राणायाम करावा. (३४) यांत पुनः अगर्भ व सगर्भ असे दोन भेद प्राणायामामध्यें आहेत. ज्यामध्यें जप व ध्यान नाहीं, तो अगर्भ होय, व ज्यामध्यें जप व ध्यान आहे, तो प्राणायाम सगर्भ होय. (३५) अगर्भ प्राणायामापेक्षां सगर्भ प्राणायाम शंभरपटीनें श्रेष्ठ आहे असें जाणावें. याकरितां योगी लोक सगर्भ प्राणायाम करीत असतात. (३६) एकदां प्राणायाम साधून प्राण जिंकिले, ह्मणजे मग दहा वायु आपोआप जिंकिले जातात. प्राण, अपान, समान, उदान, व्यान, (३७) नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय, हे दहा वायु होत. शरीरांतून ज्याअर्थी प्रयाण करितो, त्याअर्थी त्या वायूला प्राण अशी संज्ञा मिळाली. (३८) तो आहार खाऊन अधोभागाला नेतो, ह्मणून त्याला अपान असें ह्मणतात. अशेष अवयवांना वाढवून नाश करीत आहे, ह्मणून त्याला व्यान असें ह्मणतात. (३९) शरीरांतल्या मर्माला भय दाखवितो, ह्मणून त्याला उदान असें

नस्तेन गीयते ॥३९॥ उद्गारे नाग आख्यातः कूर्म उन्मीलने स्थितः ॥ कृकलः क्षवथौ ज्ञेयो देवदत्तो विजृम्भणे ॥४०॥ न जहाति मृतश्चापि सर्वव्यापी धनञ्जयः ॥क्रमेणाभ्यस्य मानोऽयं प्राणायामः प्रमाणवान् ॥४१॥ निर्दहत्यखिलं दोषं कर्तुर्देहञ्च रक्षति ॥ प्राणे तु विजिते सम्यक्तच्चिह्नान्युपलक्षयेत् ॥४२॥ विण्मूत्रश्लेष्मणां तावदल्पभावः प्रजायते ॥ बहुभोजनसामर्थ्यं चिरादुच्छ्वसनं तथा ॥४३॥ लघुत्वं शीघ्रगामित्वमुत्साहः स्वरसौष्ठवम् ॥ सर्वरोगक्षयश्चैव बलं तेजः सुरूपता ॥४४॥ धृतिर्मेधायुवत्वञ्च स्थिरता च प्रसन्नता ॥ तपांसि पापक्षयता यज्ञदानव्रतादयः ॥४५॥ प्राणायामस्य तस्यैते कलां नार्हन्ति षोडशीम् ॥ इंद्रियाणि प्रसक्तानि यथास्वं विषयेष्वि-

---

ह्मणतात. सर्व अवयवांला सरळ करितो, ह्मणून त्याला समान असें ह्मणतात. (४०) वमन करवितो ह्मणून त्याला नाग ह्मणतात, डोळे मिटवितो, ह्मणून कूर्म असें त्याला ह्मणतात. शिंका देतो, ह्मणून त्या वायूला कृकल असें ह्मणतात. जांभया देतो, ह्मणून त्या वायूला देवदत्त असें ह्मणतात. (४१) प्राण गेले तरी सर्व शरीरांत व्याप्त होऊन राहतो, लौकर शरीराला सोडीत नाहीं, ह्मणून त्या वायूला धनंजय असें ह्मणतात. याप्रमाणें सर्व वायूंचें ज्ञान करून घेऊन प्रमाण जाणणाऱ्यानें प्राणायामांचा अभ्यास क्रमानें करावा. (४२) तो प्राणायाम शरीरांतले सर्व दोष काढून कर्त्याच्या देहाचें रक्षण करीत असतो. प्राण जिंकल्यानंतर चांगल्या तऱ्हेनें जिंकल्याचीं चिन्हें पाहावींत. (४३) या प्राणायामाच्या योगानें विष्ठा, मूत्र, श्लेष्म हे अल्प प्रमाणावर शरीरांत राहतात. पुष्कळ जेवण्याचें सामर्थ्य येतें, व पुष्कळ वेळानें श्वास सोडण्याचें सामर्थ्य येतें. (४४) शरीरांत लघुपणा येतो, व लौकर चालण्याचें सामर्थ्य येतें, उत्साह येतो, स्वर चांगला होतो, सर्व रोग नष्ट होतात, सामर्थ्य वाढतें, तेज येतें, सुरूपता येते, (४५) धैर्य वाढतें, बुध्दि तीक्ष्ण होते, आयुष्य वाढतें, स्थिरत्व येऊन प्रसन्नता येते, तपश्चर्या वाढते, पापें नष्ट होतात, याकरितां यज्ञ, दान, व्रत वगैरे हे (४६) प्राणायामाच्या षोडशांश कलेच्या योग्यतेला येत नाहींत. असो, आपआपल्या यो-

ह ॥४६॥ आहृत्य यन्निगृह्णाति स प्रत्याहार उच्यते ॥ मनःपूर्वाणीन्द्रियाणि स्वर्गं नरकमेव च ॥४७॥ निगृहीतविसृष्टानि स्वर्गाय नरकाय च ॥ तस्मात्सुखार्थी मतिमाञ्ज्ञानवैराग्यमास्थितः ॥४८॥ इन्द्रियाश्वान्निगृह्याशु स्वात्मनात्मानमुद्धरेत् ॥ धारणा नाम चित्तस्य स्थानबन्धः समासतः ॥४९॥ स्थानञ्च शिव एवैको नान्यद्दोषाश्रयं यतः ॥ कालं कं चावधीकृत्य स्थानेऽवस्थापितं मनः ॥५०॥ न तु प्रच्यवते लक्ष्याध्दारणा स्यान्न चान्यथा ॥ मनसः प्रथमं स्थैर्यं धारणातः प्रजायते ॥५१॥ तस्माध्दीरं मनः कुर्याध्दारणाभ्यासयोगतः ॥ ध्यै चिन्तायां स्मृतो धातुः शिवचिन्ता मुहुर्मुहुः ॥५२॥ अव्याक्षिप्तेन मनसा ध्यानं नाम तदुच्यते ॥ ध्येयावस्थितचित्तस्य स-

---

ग्यतेनुरूप विषयांमध्यें जीं इंद्रियें आसक्त झालीं असतील, (४७) त्या इंद्रियांना ताब्यांत घेऊन जो निग्रह केला जातो, त्या निग्रहाला प्रत्याहार असें ह्मणतात. मन वगैरे इंद्रियें हींच स्वर्गनरकाचें साधन आहेत, असें जाणावें. (४८) इंद्रियांचा निग्रह केला तर स्वर्गसुख मिळतें, इंद्रियें भकूं दिलीं तर नरक यातना मिळतात, याकरितां बुध्दिमानानें सुखाची इच्छा धरणें असेल तर ज्ञान वैराग्याचा आश्रय करावा. (४९) इंद्रियरूपी घोड्याला भकूं न देतां ताब्यांत जो ठेवतो, तो आपल्या आत्म्याचा उध्दार करितो. असो. चित्ताला अमुक एक स्थान देऊन तेथें त्याला बांधून ठेवणें याला धारणा असें ह्मणतात. (५०) स्थान ह्मणजे शिव एकच होय. कारण दुसरें दोषांचें विधान असल्यामुळें त्याला स्थान असें ह्मणूं नये. अशा शिवस्थानावर कोणत्याही एका कालाचा अवधि करून मन ठेविलें असतां (५१) त्या लक्ष्यापासून ( स्थानापासून ) मन भ्रष्ट होऊं देऊं नये. याला धारणा अशी संज्ञा येते, नाहीं तर धारणा असें ह्मणूं नये. अशा धारणेनें मनाला प्रथम स्थिरता प्राप्त होते. (५२) याकरितां धारणा व अभ्यास या दोहोंच्या योगानें मन धीर करावें, ध्यान ह्मणजे " ध्यै " या धातूचा अर्थ चिंता असा होतो, असें ध्यान ह्मणजे वारंवार शिवचिंता करावी, असा अर्थ होतो. (५३) असें तें ध्यान एकाग्र मनानें केलें असतां त्याला ध्यान असें ह्मणावें, व ज्याचें मन ध्यानावस्थेमध्यें असून ध्यानाच्या बरोबरीचा प्रत्यय त्या ध्यानामुळेंच

दृशप्रत्ययस्य यः ॥५३॥ प्रत्ययान्तरनिर्मुक्तप्रवाहो ध्यानमुच्यते ॥ सर्वमन्यत्परित्यज्य शिव एव शिवङ्करः ॥५४॥ परो ध्येयोऽथ वेशोति समाप्ताथर्वणी श्रुतिः ॥ सर्वप्रभू शिवौ तस्मात्सर्वगौ सर्वदोदितौ ॥५५॥ सर्वज्ञौ सततं ध्येयौ नानारूपविभेदतः ॥ विमुक्तिप्रत्ययः पूर्वः प्रत्ययश्चाणिमादिकम् ॥५६॥ इत्येतद्विविधं ज्ञेयं ध्यानस्यास्य प्रयोजनम् ॥ ध्याता ध्यानं तथा ध्येयं यच्च ध्यानप्रयोजनम् ॥५७॥ एतच्चतुष्टयं ज्ञात्वा योगं युञ्जीत योगवित् ॥ ज्ञानवैराग्यसम्पन्नः श्रद्दधानः क्षमान्वितः ॥५८॥ निर्ममश्च सदोत्साही ध्यातेत्थं पुरुषः स्मृतः ॥ जपाच्छ्रान्तः पुनर्ध्यायेद्ध्यानाच्छ्रान्तः पुनर्जपेत् ॥५९॥ जपध्यानाभियुक्तस्य क्षिप्रं योगः प्रसिद्ध्यति ॥ धार-

---

ज्याच्या मनाला येतो, (५४) अशा त्या प्राण्याच्या मनाच्या अन्य प्रत्ययापासून निसटलेला जो मनाचा प्रवाह असेल, त्याला ध्यान असें ह्मणावें. सर्व सोडून शिवाचेंच ध्यान करावें. कारण जगामध्यें शिव एकच शुभकर आहे. (५५) ईशपरवस्तूचेंच ध्यान करावें, असें बोलून अथर्वण श्रुति समाप्त झाली, अर्थात् शिवध्यानावांचून दुसऱ्याचें ध्यान करूं नये, असें सिध्द झालें. सर्वांचे प्रभू शिवपार्वती असून सर्वत्र व्याप्त होऊन राहिले आहेत, व सर्वदां उत्कृष्ट स्वरूपानें राहिले आहेत. (५६) अशा त्या सर्वज्ञांचें (शिवपार्वतीचें) ध्यान अनेक रूपाच्या प्रकारानें सतत करावें. या ध्यानानें प्रथम मुक्तीचा प्रत्यय येऊन मागाहून अणिमादि ऐश्वर्यांचा प्रत्यय येतो. (५७) अशीं या ध्यानाचीं दोन प्रयोजनें आहेत, असें जाणावें. ध्याता, ( ध्यान करणारा ), ध्येय ( ध्यान करावयास योग्य शिववस्तु ), ध्यान ( चिंतन ), ध्यानाचें प्रयोजन ( मुक्ति व ऐश्वर्यप्राप्ति ), (५८) असे हे चार लक्ष्यांत आणून योग जाणणाऱ्यानें योगाभ्यास करावा, ज्ञान वैराग्यानें युक्त होऊन विश्वास व क्षमागुणानें युक्त होऊन, (५९) ममता सोडून सर्वदां उत्साह ठेवून जो ध्यान करतो, तोच पुरुष असा ह्मणविला जातो. जप करकरून श्रम झाले तर पुनः ध्यान करावें, व ध्यान करून श्रम झाले तर पुनः जप करावा. (६०) जप व ध्यान यांनीं जो युक्त असेल, त्याला शीघ्र योग साधतो. बारा प्राणायामांची धारणा साधून बारा धारणांचें ध्यान सा-

णा द्वादशायामा ध्यानं द्वादशधारणम् ॥६०॥ ध्यानद्वादशकं याव-त्समाधिरभिधीयते ॥समाधिर्नाम योगांगमन्तिमं परिकीर्तितम् ॥६१॥ समाधिना च सर्वत्र प्रज्ञालोकः प्रवर्तते ॥ यदर्थमात्रनिर्भासं स्तिमि-तोदधिवत्स्थितम् ॥६२॥ स्वरूपशून्यवद्भानं समाधिरभिधीयते ॥ ध्येये मनः समावेश्य तिष्ठेदपि च सुस्थिरम् ॥६३॥ निर्वाणानलव-द्योगी समाधिस्थः प्रगीयते ॥ न शृणोति न चाघ्राति न रस्यति न पश्यति ॥६४॥ न च स्पर्शं विजानाति न संकल्पयते मनः ॥ न चाभिमन्यते किंचिन्न च बुध्यति काष्ठवत् ॥६५॥ एवं शिवे विली-नात्मा समाधिस्थ इहोच्यते ॥ यथा दीपो निवातस्थः स्पन्दते न कदाचन ॥६६॥ तथा समाधिनिष्ठोऽपि तस्मान्न विचलेत्सुधीः ॥ एवमभ्यस्यतश्चाब्दं योगिनो योगमुत्तमम् ॥६७॥ तदन्तराया न-

---

धावें, (६१) तसलीं बारा ध्यानें साधलीं असतां त्याला समाधि असें नांव येतें. समाधि, योगाचें शेवटचें अंग आहे, असें सांगितलें आहे. (६२) अ-शा समाधीच्या योगानें सर्व ठिकाणीं प्रज्ञाचक्षु चालतो ( ज्ञानदृष्टीनें वाटेल तें पहावयास मिळतें ); ज्यामध्यें केवळ अर्थाचा भास होत असून स्तिमित ( स्तब्ध ) समुद्राप्रमाणें ज्यामध्यें रहावें लागतें, (६३) व ज्यामध्यें शून्य-स्वरूपाचा भास होतो, त्याला समाधि असें ह्मणतात. ध्येय वस्तूच्या ठि-काणीं मन ठेवून स्थिरपणानें रहावें. (६४) निर्वाणकालच्या अनलाप्रमाणें (अग्नीप्रमाणें) योगी समाधींत असतांना दिसतो, असें सांगतात. ऐकत नाहीं, वास घेत नाहीं, रस ओळखीत नाहीं, पाहत नाहीं, (६५) स्पर्श जाणीत नाहीं, त्याच्या मनांत संकल्प येत नाहीं, अभिमान बाळगीत नाहीं, त्याला कांहीं समजत नाहीं, केवळ लांकडाप्रमाणें स्तब्ध राहतो. (६६) याप्रमाणें शिवाच्या ठिकाणीं ज्याचें मन लीन होतें, त्याला समाधिस्थ ( समाधींत रा-हणारा ) असें ह्मणतात. निवाऱ्याच्या जागेंत असलेला दिवा जसा केव्हांही हालत नाहीं, (६७) तसा समाधींत असलेला बुद्धिमान प्राणी समाधीपासून ढळत नाहीं. याप्रमाणें एक वर्षपर्यंत उत्तम योगाचा अभ्यास केला तर (६८) त्या योग्याच्या योगामध्यें येणारीं विघ्नें हळू हळू नष्ट होत जातात.

श्यन्ति विघ्नाः सर्वे शनैः शनैः ॥ आलस्यं व्याधयस्तीव्राः प्रमाद-स्थानसंशयः॥६८॥ अनवस्थितचित्तत्त्वमश्रद्धा भ्रान्तिदर्शनम् ॥ दुःखानि दौर्मनस्यश्च विषयेषु च लोलता ॥६९॥ दशैते युंजतां पुंसामन्तरायाः प्रकीर्तिताः ॥ आलस्यमलसत्वन्तु योगिनां देहचेतसोः ॥७०॥ धातुवैषम्यजा दोषा व्याधयः कर्मदोषजाः ॥ प्रमादो नाम योगस्य साधनानामभावना ॥७१॥ इदं वेत्युभयालम्बि ज्ञानं तत्स्थानसंशयः ॥ अप्रतिष्ठा हि मनसस्त्वनवस्थितिरुच्यते ॥७२॥ अश्रद्धाभावरचिता वृत्तिर्वै योगवर्त्मनि ॥ विपर्यस्ता मतिर्या सा भ्रान्तिरित्यभिधीयते ॥७३॥ दुःखमज्ञानजं पुंसां चेतस्याध्यात्मिकं विदुः ॥ आधिभौतिकमंगोत्थं यच्च दुःखं पुरा कृतैः ॥७४॥ आधिदैविकमाख्यातमशन्यस्त्रविषादिजम् ॥ इच्छाविघातजं क्षोभं दौर्मनस्यं प्रचक्षते ॥७५॥ विषयेषु विचित्रेषु विभ्रमस्तत्र लोलता ॥ शा-

---

आळस, रोग, इतर प्रमादांतलीं कांहीं तीव्र विघ्नें निःसंशयानें नष्ट होतात. (६९) चित्ताची अनवस्था होणें, श्रद्धा उत्पन्न न होणें, भ्रांतिज्ञान होणें, दुःखें उत्पन्न होणें, मन विमुख होणें, विषयांवर मन जाणें, (७०) हीं दहा योग करणाऱ्याच्या योगाचीं विघ्नें होत. आळस व आळशीपणा हे दोन्ही शरीर व मन यांमध्यें असतात. (७१) धातूच्या वैषम्यापासून दोष उत्पन्न होतात, व कर्माच्या दोषानें रोग उत्पन्न होतात, योगाचीं साधनें मिळालीं नाहींत ह्मणजे त्याला प्रमाद अशी संज्ञा येते. (७२) हें आहे, किंवा हें आहे, असें दोहोंच्या ठिकाणीं जें ज्ञान होतें, त्याला स्थानसंशय असें ह्मणतात. मन अव्यवस्थित रीतीनें चाललें ह्मणजे त्याला अप्रतिष्ठा असें ह्मणतात. (७३) योगमार्गामध्यें भाव ज्याचा बसत नाहीं, त्याला अश्रद्धा असें ह्मणतात. ज्याची मति विपरीत होते, त्याला भ्रांति असें ह्मणतात. (७४) पुरुषाच्या मनामध्यें अज्ञानापासून जें दुःख होतें, त्याला आध्यात्मिक असें ह्मणतात, प्राचीन कर्मामुळें शरीरापासून (रोग वगैरे) दुःख जें होतें, त्याला आधिभौतिक असें ह्मणतात, आणि (७५) वीज पडून, शस्त्राघात होऊन विषापासून जें दुःख होतें, त्याला आधिदैविक असें ह्मणतात. मनाच्या इच्छेविरुद्ध जो क्षोभ होतो, त्याला दौर्मनस्य असें म्हणतात. (७६) चित्रवि-

न्तेष्वेतेषु विघ्नेषु योगासक्तस्य योगिनः ॥७६॥ उपसर्गाः प्रवर्तन्ते दिव्यास्ते सिद्धिसूचकाः ॥ प्रतिभा श्रवणं वार्ता दर्शनास्वादवेदनाः ॥७७॥ उपसर्गाः षडित्येते व्यये योगस्य सिद्धयः ॥ सूक्ष्मे व्यवहितेऽतीते विप्रकृष्टे त्वनागते ॥७८॥ प्रतिभा कथ्यते योऽर्थे प्रतिभासो यथातथम् ॥ श्रवणं सर्वशब्दानां श्रवणन्त्वप्रयत्नतः ॥७९॥ वार्ता वार्तासु विज्ञानं सर्वेषामेव देहिनाम् ॥ दर्शनं नाम दिव्यानां दर्शनञ्चाप्रयत्नतः ॥८०॥ तथा स्वादश्च दिव्येषु रसेष्वास्वाद उच्यते ॥ स्पर्शनाधिगमस्तद्वद्वेदना नाम विश्रुता ॥८१॥ गन्धादीनां च दिव्यानामाब्रह्मभुवनाधिपाः ॥ सन्तिष्ठन्ते च रत्नानि प्रयच्छन्ति बहूनि च ॥८२॥ स्वच्छन्दमधुरा वाणी विविधास्यात्प्रवर्तते ॥ रसायनानि सर्वाणि द्विव्याश्चौषधयस्तथा ॥८३॥ सिध्यन्ति प्रणिप-

---

चित्र विषयांमध्यें भ्रम जो होतो, त्याला लोलता म्हणतात. अशीं हीं दहा विघ्नें नष्ट झालीं म्हणजे योगांत आसक्त असलेल्या योग्याला (७७) सिद्धिसूचन करणारे दिव्य उपसर्ग येऊं लागतात. प्रतिभा, श्रवण, वार्ता, दर्शन, आस्वाद, वेदन (७८) हे सहा योगाचे सिध्दिदायक उपसर्ग होत. एखादा सूक्ष्म पदार्थ व्यवहित ( व्यवधानानें युक्त ) असो पलीकडे असो, किंवा तो दूर असो, जवळ असो, (७९) त्या अर्थाच्या ठिकाणीं यथार्थ ज्ञान जें होतें, त्याला प्रतिभा असें ह्मणतात. सर्व शब्द ऐकावयास येत असून प्रयत्न न करितां जें ऐकावयास येतें, त्याला श्रवण असें ह्मणतात. (८०) सकल प्राण्यांचें वर्तमान बसल्या ठिकाणीं जाणणें याला वार्ता असें ह्मणतात, व दिव्य पदार्थांचें दर्शन बसल्या ठिकाणीं प्रयत्न केल्यावांचून जें होतें, त्याला दर्शन असें ह्मणतात. (८१) देवांना योग्य असे रसविशिष्ट पदार्थ जे असतील, त्यांतली गोडी घेणें याला आस्वाद ह्मणतात. स्पर्शज्ञान जें होतें त्याला वेदना अशी संज्ञा आहे. (८२) ब्रह्मलोकापर्यंत लोकाधिपति जे आहेत, ते दिव्य गंधादि रत्नांचे स्वामी असून ते पुष्कळ रत्नें या योग्यांना देतात. (८३) वाणी स्वच्छंदपणें वागणारी होऊन मधुर व अनेक प्रकारची होते. सर्व रसायन व दिव्य औषधि (८४) सर्व सिद्ध होतात, व देवांगना या यो-

त्यैनं दिशन्ति सुरयोषितः ।। योगसिद्ध्यैकदेशेऽपि दृष्टे मोक्षे भवेन्मतिः ।।८४।। दृष्टमेतन्मया यद्वत्तद्वन्मोक्षो भवेदिति ।। कृशता स्थूलता बाल्यं वार्धक्यं चैव यौवनम् ।।८५।। नानाजातिस्वरूपत्वं चतुर्णां देहधारणम् ।। पार्थिवांशं विना नित्यं सुरभिर्गन्धसंग्रहः।।८६।। एवमष्टगुणं प्राहुः पैशाचं पार्थिवं पदम् ।। जले निवसनञ्चैव भूम्यामेव विनिर्गमः ।।८७।। इच्छेच्छक्तः स्वयं पातुं समुद्रमपि चातुरः ।। यत्रेच्छति जगत्यस्मिंस्तत्रैव जलदर्शनम् ।।८८।। विनाकुम्भादिकं पाणौ जलसञ्चयधारणम् ।। यद्वस्तु विरसञ्चापि भोक्तुमिच्छति तत्क्षणात् ।।८९।। रसादिकं भवेच्चान्यत्त्रयाणां देहधारणम् ।। निर्व्रणत्वं शरीरस्य पार्थिवैश्च समन्वितम् ।।९०।। तदिदं षोडशगुणमाप्यमैश्व-

---

त्यांना नमस्कार करून देतात. योगांच्या सिध्दींपैकीं कांहीं भाग जरी याला मिळाला, तथापि या योग्याची बुध्दि सिध्दीकडे न वळतां मोक्षाकडे वळते. (८५) मीं जसा तो मोक्ष पाहिला आहे, त्याप्रमाणें मोक्ष त्यांना मिळतो. कार्श्य, स्थौल्य, बाल्य, वार्धक्य, यौवन (८६) नानाजातींमध्यें नानास्वरूपांची प्राप्ति चारी वर्णांमध्यें देह धारण करण्याचें सामर्थ्य ( राजशरीर सोडून ) निरंतर सुरभीचा ह्मणजे गंधाचा संग्रह (८७) हे आठ गुण आहेत असें सांगतात, व पैशाच पद ( पिशाचयोनीमध्यें जाण्याचें सामर्थ्य ) पार्थिव पद ( राजाचे पदामध्यें जाण्याचें सामर्थ्य ) जलांत वास करण्याचें सामर्थ्य, जमिनींतून प्रकट होण्याचें सामर्थ्य, (८८) स्वतः समुद्र पिण्याची इच्छा केली तरी पान करण्याचें सामर्थ्य येणें, आतुर होऊन जगामध्यें कोणत्याही ठिकाणीं पाण्याची इच्छा केली तर तेथेंच जलदर्शन होणें, (८९) घागर वगैरे पाणी भरण्याचीं साधनें नसलीं तरी हातांत पाणी धरण्याचें सामर्थ्य येणें, जी वस्तु विरस असेल, ती वस्तु तत्क्षणीं खाऊन टाकण्याचें सामर्थ्य येणें, (९०) दुसरे रसादि पदार्थ जे असतील ते खाण्याचें सामर्थ्य येणें, त्रय पदार्थांच्या शरीरांत जाण्याचें सामर्थ्य येणें, शरीराला निर्व्रणत्व येणें, पार्थिवगुणांनीं युक्त होणें, (९१) वगैरे हे सोळा गुण होत. तर वर सांगितलेल्या आठ गुणांचें ऐश्वर्य व सोळा गुणांचें अद्भुत ऐश्वर्य

र्यमद्भुतम् ॥ शरीरादग्निनिर्माणं तत्तापभयवर्जनम् ॥९१॥ शक्तिर्जगदिदं दग्धुं यदीच्छेदप्रयत्नतः ॥ स्थापनं वानलस्याप्सु पाणौ पावकधारणम् ॥९२॥ दग्धे सर्गो यथा पूर्वं मुखे चान्नादिपाचनम् ॥ द्वाभ्यां देहविनिर्माणमाप्यैश्वर्यसमन्वितम् ॥९३॥ एतच्चतुर्विंशतिधा तैजसं परिचक्षते ॥ मनोजवत्वं भूतानां क्षणादन्तःप्रवेशनम् ॥९४॥ पर्वतादिमहाभारधारणञ्चाप्रयत्नतः ॥ गुरुत्वञ्च लघुत्वञ्च पाणावनिलधारणम् ॥९५॥ अंगुल्यग्रनिपाताद्यैर्भूमेरपि च कम्पनम् ॥ एकेन देहनिष्पत्तिर्युक्तं भोगैश्च तैजसैः ॥९६॥ द्वात्रिंशद्गुणमैश्वर्यं मारुतं कवयो विदुः ॥ छायाहीनविनिष्पत्तिरिन्द्रियाणामदर्शनम् ॥९७॥ खेचरत्वं यथाकाममिन्द्रियार्थैः समन्वयः ॥ आकाशे लंघनं चैव स्वदेशे तन्निवेशनम् ॥९८॥ आकाशपिण्डीकरणमशरीरत्वमेव च ॥

---

योग्याला मिळतें. व आपल्या शरीरापासून अग्नि उत्पन्न करण्याची शक्ति येते. त्या अग्नीपासून याला ताप न होण्याची शक्ति येते. (९२) इच्छा आली तर प्रयत्न न करितां हें जग जाळण्याचें सामर्थ्य येतें. पाण्यांत अग्नि ठेवण्याचें सामर्थ्य येतें. हातांत अग्नि धरण्याची शक्ति येते. (९३) कोणताही पदार्थ जळला असेल तर पूर्ववत् करण्याची शक्ति येते तोंडांत अन्नपचन करण्याची शक्ति येते. दोन पदार्थांपासून देह उत्पन्न करण्याची शक्ति येते. असें ऐश्वर्य याला मिळतें. (९४) हे चोवीस गुण तेजाचे आहेत, असें सांगतात. मनापेक्षां जास्त धांवणें, प्राणिमात्रांच्या शरीरांत एका क्षणांत प्रवेश करणें, (९५) पर्वत वगैरे सारख्या मोठ्या भाराचें सहन करण्याची शक्ति प्रयत्नावांचून येणें, गुरुत्व येणें, लघुत्व येणें, हातांत वायु धरणें, (९६) बोटांच्या अग्रांनीं जमिनीला कंप आणणें, एका पदार्थांनें देहाची उत्पत्ति करणें, तैजस भोगांनीं युक्त असणें (९७) वगैरे बत्तीस गुणांचें ऐश्वर्य मारुताचें आहे, असें कवि सांगतात. छायाहीनाची निष्पत्ति, इंद्रियांचा लोप करणें, (९८) स्वेच्छेनें आकाशांत संचार करणें, विषयाशी एकरूपता पावणें, आकाश लंघन करण्याची शक्ति येणें, स्वदेशांत उतरावयास येणें, (९९) आकाशाचें पिंडीकरण करण्याची शक्ति येणें, शरीरा-

अनिलैश्वर्यसंयुक्तं चत्वारिंशद्गुणं महत् ॥९९॥ ऐन्द्रमैश्वर्यमाख्यातमाम्बरं तत्प्रचक्षते॥यथाकामोपलब्धिश्च यथाकामविनिर्गमः॥१००॥ सर्वस्याभिभवश्चैव सर्वगुह्यार्थदर्शनम् ॥ कर्मानुरूपनिर्माणं वशित्वं प्रियदर्शनम् ॥१०१॥ संसारदर्शनश्चैव भोगैरैन्द्रैः समन्वितम् ॥ एतच्चान्द्रमसैश्वर्यं मानसं गुणतोऽधिकम् ॥१०२॥ छेदनं ताडनं चैव बन्धनं मोचनं तथा॥ ग्रहणं सर्वभूतानां संसारवशवर्तिनाम् ॥१०३॥ प्रसादश्चापि सर्वेषां मृत्युकालजयस्तथा ॥ आभिमानिकमैश्वर्यं प्राजापत्यं प्रचक्षते ॥१०४॥ एतच्चान्द्रमसैर्भोगैः षट्पञ्चाशद्गुणं महत् ॥ सर्गः सङ्कल्पमात्रेण त्राणं संहरणं तथा ॥१०५॥ स्वाधिकारश्च सर्वेषां भूतचित्तप्रवर्तनम् ॥ असादृश्यं च सर्वस्य निर्माणं जगतः पृथक् ॥१०६॥ शुभाशुभस्य करणं प्राजापत्यैश्च संयुतम् ॥ चतुःषष्टिगुणं

---

वांचून राहतां येणें, वायूच्या ऐश्वर्यानें युक्त असणें वगैरे या चाळीस गुणांचें मोठें (१००) ऐश्वर्य इंद्राचें व आकाशाचें आहे, असें सांगतात. इच्छेला येईल त्याचा लाभ करून घेणें, इच्छेला येईल तसें बाहेर जाणें, (१०१) सर्वांचा पराभव करणें, सर्व गुप्त वस्तु पाहणें, कर्माला अनुसरून निर्माण करणें, जग वश करून घेणें, प्रियदर्शन प्राप्त करून घेणें,(१०२) संसारांत राहणें, इंद्राच्या ऐश्वर्यानें युक्त असणें वगैरे हें मनाचें ऐश्वर्य असून चंद्राचें ऐश्वर्य आहे असेंही ह्मणतात. हें सर्व गुणांपेक्षां अधिक आहे, असें सांगतात. (१०३) छेदन, ताडन, बंधन, मोचन, संसारांतल्या सर्व भूतांचा निग्रह करणें (१०४) सर्वांवर अनुग्रह करणें, मृत्यूला व कालाला जिंकणें, वगैरे या अभिमानाच्या ऐश्वर्याला प्राजापत्य ऐश्वर्य ह्मणतात. (१०५) या चांद्रमस (चंद्राच्या संबंधीच्या) भोगांनीं मोठें छपन्न गुणांचें ऐश्वर्य मिळतें. मनांत संकल्प केल्याबरोबर सृष्टि करण्याचें सामर्थ्य येणें, संरक्षण व संहार करण्याचें सामर्थ्य येणें, (१०६) सर्वांवर आपला अधिकार चालविणें, प्राणिमात्रांचें मन फिरविणें, सर्व जगांतल्या पदार्थांपेक्षां श्रेष्ठ वस्तूचें निर्माण करणें, (१०७) शुभाशुभाचें आचरण करणें, प्राजापत्य ऐश्वर्यानें युक्त असणें वगैरे हें ऐश्वर्य ब्रह्मदेवाचें असून चौसष्ट गुणांनीं युक्त

ब्राह्ममैश्वर्यं तत्प्रचक्षते ॥१०७॥ बौद्धादस्मात्परं गौणमैश्वर्यंप्राकृतं विदुः ॥ वैष्णवं तत्समाख्यातं तस्यैव भुवने स्थितम् ॥१०८॥ ब्रह्मणैतद्गुणं सर्वं वेत्तुमन्यैर्न शक्यते ॥ तत्पौरुषं च गौणं च गाणेशं पदमैश्वरम् ॥१०९॥ विष्णुना तत्पदं किंचिज्ज्ञातुमन्यैर्न शक्यते ॥ विज्ञानसिद्धयश्चैव सर्वा एवौपसर्गिकाः ॥११०॥ निरोद्धव्याः प्रयत्नेन वैराग्येण परेण तु ॥ प्रतिभादिष्वशुध्देषु गुणेष्वासक्तचेतसः ॥१११॥ न सिध्येत्परमैश्वर्यमव्ययं सार्वकामिकम् ॥ तस्माद्गुणांश्च भोगांश्च देवासुरमहीभृताम्॥११२॥ तृणवद्यस्त्यजेत्तस्य योगसिध्दिः परा भवेत् ॥ अथवानुग्रहेच्छायां जगतो विचरेन्मुनिः ॥११३॥ यथाकामं गुणान्भोगान्भुक्त्वा मुक्तिं प्रयास्यति ॥ अथ प्रयोगं योगस्य वक्ष्ये शृणु समाहितः ॥११४॥ शुभे काले शुभे देशे शिवक्षेत्रा-

---

आहे, असें सांगतात. (१०८) या बौध्द ऐश्वर्यापेक्षां हें ऐश्वर्य गौण असून प्राकृत आहे, असें सांगतात. तें ऐश्वर्य विष्णूचें असून विष्णुलोकामध्यें राहतें, असें सांगतात (१०९) ब्रह्मदेव मात्र हे सर्व गुण जाणतो, परंतु दुसरे कोणी जाणूं शकत नाहीं. तें पौरुष ऐश्वर्यही गौण असून गणेशाचें ऐश्वर्य ज्याला म्हणतात, (११०) त्या ऐश्वर्याचें ज्ञान विष्णूला मात्र थोडें आहे, परंतु दुसरे जाणूं शकत नाहींत. विज्ञानाच्या या सर्व सिध्दि उपसर्गापासून झाल्या आहेत, असें सांगतात. (१११) याकरितां उत्तम वैराग्याला धारण करून या सिध्दि जवळ बाळगूं नयेत. प्रतिभादि अशुध्द गुणांमध्यें मन आसक्त करून वागला तर (११२) सर्व मनोरथ पूर्ण करणारें नाशरहित असें श्रेष्ठ ऐश्वर्य त्याला मिळत नाहीं. याकरितां देव, दैत्य, राजे यांच्या गुणांचा व भोगांचा त्याग (११३) तृणवत् जो करतो, त्याला श्रेष्ठ योगसिध्दि मिळते. अथवा जगावर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें त्या मुनीनें जगांत संचार करावा. (११४) इच्छेला अनुसरून गुणांचा व भोगांचा उपभोग घेऊन मुक्तीला जातो. आतां योगाच्या प्रयोगाला सांगतों, सावधान मनानें ऐक. (११५) शुभ काल, शुभ देश शिव क्षेत्र वगैरे पाहून योग करावा. त्या देशांत जनांचा संपर्क नसून प्राणी देखील नसावेत,

दिके पुनः ॥ विजने जन्तुरहिते निःशब्दे बाधवर्जिते ॥११५॥ सुप्रलिप्ते स्थले सौम्ये गन्धधूपादिवासिते ॥ मुक्तपुष्पसमाकीर्णे वितानादिविचित्रिते ॥११६॥ कुशपुष्पसमित्तोयफलमूलसमन्विते ॥ नाग्न्यभ्याशे जलाभ्याशे शुष्कपर्णमयेऽपि वा ॥११७॥ न दंशमशकाकीर्णे सर्पश्वापदसंकुले ॥ न च दुष्टमृगाकीर्णे सभये दुर्ज्जनावृते ॥११८॥ श्मशाने चैत्यवल्मीके जीर्णागारे चतुष्पथे ॥ नदीनदसमुद्राणां तीरे रथ्यान्तरेऽपि वा ॥११९॥ न जीर्णोद्यानगोष्ठादौ नानिष्टे न च निन्दिते ॥ नाजीर्णाम्लरसोद्गारे न च विण्मूत्रदूषिते ॥१२०॥ न च्छर्द्यां नातिसारे च नातिभुक्तः श्रमान्वितः ॥ न चातिचिन्ताकुलितो न चातिक्षुत्पिपासितः ॥१२१॥ नापि स्वगुरुकर्मादौ प्रसक्तो योगमाचरेत् ॥ युक्ताहारविहारश्च युक्तचेष्टश्च कर्मसु ॥१२२॥ युक्तनिद्राववोधश्च सर्वायासविवर्जितः ॥ आसनं मृदुलं

---

व शब्द ऐकावयाला येऊं नये, उपद्रव कोणतेही असूं नयेत, (११६) असें तें स्थल चांगलें सारवून गंध धूपादिकांनीं सुवासित करून फुलें वगैरे आंथरून चित्रविचित्र छतानें युक्त झालेलें असावें. (११७) त्या स्थलांत दर्भ, फुलें, समिधा, उदक, फलें, मूलें हीं मिळत असावींत. तें स्थल अग्नीजवळ, पाण्याजवळ, वाळलेलीं पानें जेथें पडत असतील तेथें करूं नये. (११८) डांस, चिलटें, माशी, सर्प, श्वापदें जेथें असतील, तेथें तें स्थल करूं नये. दुष्ट मृग जेथें असतील व भीति जेथें असेल, व दुर्जन जेथें असतील तेथें असें तें स्थल करूं नये. (११९) स्मशानाची जागा, बौध्दालय, वारुळाची जागा, पडकें घर, चोहोंकडे रस्ते असतील ती जागा, नदी, नद, समुद्राचा कांठ इतर रस्त्याची जागा वगैरे स्थलें सोडून द्यावीं. (१२०) जुना बाग, जुना गोठा, अनिष्ट स्थल, निंद्य स्थल, आम्लरसानें युक्त असलेलें स्थल, विष्ठा व मूत्र यानें दूषित झालेलें स्थल वगैरे सोडून द्यावीं. (१२१) वांतीच्या वेळेस, अतिसाराच्या वेळेस, आणि भोजनाच्या वेळेस, श्रम झाले असतील तर, काळजींत असेल तर, अति भुकेच्या वेळेस, तहानेच्या वेळेस (१२२) गुरूच्या कामांत गढलेला असला तर योग करूं नये. योग्य आहारविहार करून कर्मामध्यें योग्य चेष्टा करीत असून, व (१२३) झोंप

रम्यं विपुलं सुसमं शुचि ॥१२३॥ मृदुचर्मपरीधानं मध्वाद्यक्तं शुभं सुखम्॥ कल्पयित्वा समारुह्य समं स्थिरसुखं यथा॥१२४॥ पद्मकस्वस्तिकादीनामभ्यसेदासनेषु च॥ अभिवन्द्य स्वगुर्वन्तानभिवाद्याननुक्रमात् ॥१२५॥ ऋजुग्रीवशिरोवक्षा नातिश्लिष्टोष्ठलोचनः॥ किञ्चिदुन्नामितशिरा दन्तैर्दन्तान्न संस्पृशेत्॥१२६॥ दन्ताग्रसंस्थितां जिह्वामचलां सन्निवेश्य च॥ पार्ष्णिभ्यां वृषणौ रक्षंस्तथा प्रजननं पुनः ॥१२७॥ ऊर्व्वोरुपरि संस्थाप्य बाहू तिर्यगयत्नतः॥ दक्षिणं करपृष्ठन्तु न्यस्य वामतलोपरि ॥१२८॥ उन्नाम्य शनकैः पृष्ठमुरोऽवष्टभ्य चाग्रतः॥ सम्प्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥१२९॥ संभृतप्राणसंचारः पाषाण इव निश्चलः॥ स्वदेहायतनस्यान्तर्विचिन्त्य शिवमम्बया ॥१३०॥ हृत्पद्मपीठिकामध्ये ध्यानयज्ञेन पूजयेत्॥

---

घेत असून योग्य जाग्रण करीत असणारा, आयासाचीं कामें सोडणारा, अशा प्राण्यानें मृदु ( मऊ ) आसन घालावें, तें आसन सुंदर असून विस्तृत असावें, व सरळ असून शुद्ध असावें. (१२४) वर मऊ कातडें (हरिणाचें वगैरे) घातलेलें असून मधानें माखलेलें असावें, शुभ असून सुखकर असावें. असें आसन करून त्यावर सरळ व स्थिरसुखानें बसून (१२५) पद्मक स्वस्तिक वगैरे आसनांचा अभ्यास करावा. नंतर इष्टदेवतेपासून आपल्या गुरूपर्यंत अनुक्रमानें सर्वांना नमस्कार करून (१२६) गळा, डोकें, हृदय हे सरळ करून ओंठ डोळे साधारण उघडे ठेवून किंचित डोकें वर करून बसावें परंतु दांतांनीं दातांचा स्पर्श होऊं देऊं नये. (१२७) दातांच्या अग्रभागीं जीभ न हलवितां ठेवावी. दोन्ही पिंढऱ्यांनीं वृषणाचें व गुह्येंद्रियाचें रक्षण करून वसावें. (१२८) बिन प्रयत्नानें दोन्ही मांड्यावर दोन्ही बाहु उलट बाजूनें ठेवावेत, उजवा तळहात डाव्या तळहातावर ठेवून (१२९) हळूच पृष्ठभाग उचलून अग्रभागीं उराचें अवष्टंभन करावें. नंतर दिशा न पाहतां आपल्या नाकाच्या शेंड्यावर नजर ठेवून (१३०) प्राणाचा संचार बंद ठेवून दगडाप्रमाणें निश्चल बसावें. आपल्या शरीररूपी घराच्या आंत पार्वतीसह शिवाचा शोध चालवावा. (१३१) हृदयरूपी पीठि-

मूले नासाग्रतो नाभौ कण्ठे वा तालुरन्ध्रयोः ॥१३१॥ भ्रूमध्ये द्वादशान्ते वा ललाटे मूर्ध्नि वा स्मरेत् ॥ परिकल्प्य यथान्यायं शिवयोः परमासनम् ॥१३२॥ तत्र सावरणं वाऽपि निरावरणमेव वा॥ द्विदले षोडशारे वा द्वादशारे यथाविधि ॥१३३॥ दशारे वा षडस्रे वा चतुरस्रे शिवं स्मरेत् ॥ भ्रुवोरन्तरतः पद्मं द्विदलं तडिदुज्ज्वलम् ॥१३४॥ भ्रूमध्यस्थारविन्दस्य क्रमाद्वै दक्षिणोत्तरे ॥ विद्युत्समानवर्णे च पर्णे वर्णावसानके ॥१३५॥ षोडशारस्य पत्राणि स्वराः षोडश तानि वै ॥ पूर्वादीनि क्रमादेतत्पद्मकन्दस्य मूलतः ॥१३६॥ ककारादिठकारान्ता वर्णाः पर्णान्यनुक्रमात् ॥ भानुवर्णस्य पद्मस्य ध्येयं तद्धृदयान्तरे ॥१३७॥ वर्णाः पर्णानि पद्मस्य नाभेरुपरि पृष्ठतः ॥ गोक्षीरधवलस्योक्ता डादिफान्ता यथाक्रमम् ॥१३८॥ अधो

---

केच्या मध्यभागीं ध्यानयज्ञानें पूजा करावी. (हृदयांत शिवाचें ध्यान करावें.) मूलभागीं, नाकाच्या अग्रभागावर, नाभींत, कंठांत, तालूच्या रंध्राच्या ठिकाणीं, (१३२) भिवयांच्या मध्यभागीं, द्वादशचक्राच्या शेवटच्या प्रदेशावर, कपाळावर, मस्तकांत शिवाचें स्मरण करावें. नंतर शिवपार्वतीकरितां विधिपूर्वक श्रेष्ठ आसनाची कल्पना करावी. (१३३) त्या आसनावर सावरण ( आवरणसहित ) किंवा आवरणरहित शिवाचें स्मरण करावें. द्विदल, किंवा षोडशदल, किंवा द्वादशदल कमलावर (१३४) दशदल, षडदल, चतुर्दल यांपैकीं कशांततरी शिवाचें स्मरण करावें. भिवयांच्या मध्यभागीं विजेप्रमाणें प्रकाशमान द्विदल कमल आहे. (१३५) भ्रूमध्यांत असणाऱ्या कमलाला दक्षिणोत्तर बाजूला विजेप्रमाणें रंग असलेलीं दोन पानें आहेत. (१३६) षोडशदल कमलाचीं पानें षोडश स्वर होत. तीं पानें पूर्वादिक्रमानें आहेत, असें समजावें. पद्मकंदाच्या मुळांत (१३७) ककारापासून ठकारापर्यंत वर्ण ( अक्षरें ) हीं अनुक्रमानें पर्णें जाणावींत. हृदयाच्या मध्यभागीं असलेल्या सूर्यासारखें शोभणाऱ्या कमलांत शिवाचें ध्यान करावें. (१३८) नाभीच्यावर सर्व वर्ण पद्माचीं पानें होऊन राहिलीं आहेत. तें पद्म गायीच्या दुधाप्रमाणें शुभ्र आहे, व त्याचीं पानें क्रमानें ‘ ड ’ पासून ‘फ’ पर्यंत जाणावींत. (१३९) ज्या कमलाचीं पानें खालीं आहेत, त्याचीं

दलस्याम्बुजस्य एतस्य च दलानि षट् ॥ विधूमाङ्गारवर्णस्य वर्णा-
बाद्याश्च लान्तिमाः ॥१३९॥ मूलाधारारविन्दस्य हेमाभस्य यथा-
क्रमम् ॥ वकारादिसकारान्ता वर्णाः पर्णमयाः स्थिताः ॥१४०॥
एतेष्वथारविन्देषु यत्रैवाभिरतं मनः ॥ तत्रैव देवं देवीं च चिन्तये-
द्धीरया धिया ॥१४१॥ अंगुष्ठमात्रममलं दीप्यमानं समन्ततः ॥ शु-
द्धदीपशिखाकारं स्वशक्त्या पूर्णमण्डितम् ॥१४२॥ इन्दुरेखासमा-
कारं तारारूपमथापि वा ॥ नीवारशूकसदृशं बिससूत्राभमेव वा
॥१४३॥ कदम्बगोलकाकारं तुषारकणिकोपमम् ॥ क्षित्यादितत्व-
विजयं ध्याता यद्यभिवाञ्छति ॥१४४॥ तत्तत्त्वाधिपामेवं मूर्तिं
स्थूलां विचिन्तयेत् ॥ सदाशिवान्ता ब्रह्माद्या भवाद्याश्चाष्टमूर्तयः

---

दलें सहा आहेत, असें जाणावें. धूर नसलेल्या अग्नीप्रमाणें भासणाऱ्या प-
द्माचीं पानें ' ब ' पासून ' ल ' पर्यंत जाणावींत. (१४०) सोन्याप्रमाणें
भासणाऱ्या मूलाधारांत असणाऱ्या कमलाचीं पानें क्रमानें वकारापासून स-
कारापर्यंत अक्षरें जाणावींत. (१४१) इतकीं जीं कमलें सांगितलीं, त्यांपै-
कीं ज्या कोणत्या कमलांत मन रत होईल, त्याच ठिकाणीं धैर्ययुक्त बुद्धीनें पा-
र्वतीसह शिवाचें ध्यान करावें. (१४२) तो शिव आंगठ्याएवढा असून नि-
र्मल आहे, व चोहोंकडे त्याचा प्रकाश फाकला असून शुद्ध दीपाच्या शि-
खेप्रमाणें त्याचा आकार आहे, असें समजावें, व आपल्या शक्तीनें पूर्णपणें
भूषित आहे, असें समजावें. (१४३) चंद्राच्या रेखेप्रमाणें किंवा नक्षत्रांच्या
स्वरूपाप्रमाणें शोभत असून भाताच्या अग्राप्रमाणें किंवा कांव्याच्या अग्रा-
प्रमाणें शोभतो, असें समजावें, किंवा कमलाच्या तंतूप्रमाणें भासतो असें
जाणावें. (१४४) किंवा कळंबाच्या झाडाप्रमाणें गोल आकाराचा आहे, किं-
वा पाण्याच्या तुषाराच्या कणाप्रमाणें आहे, असें जाणावें. पृथिव्यादि तत्वा-
ला जिंकणारा ( त्या तत्वांपासून अलिप्त ) शिव आहे, असें समजावें. यां-
मध्यें ध्यान करणाऱ्याला जें रूप आवडेल, तें रूप लक्ष्यांत आणावें.
(१४५) त्या त्या तत्वांची स्वामिनी जी शिवाची मूर्ति असेल ती स्थूल
आहे, असें समजून स्मरण करावें. ब्रह्मादि शिवांत मूर्ति व भवादि आठ

॥१४५॥ शिवस्य मूर्तयः स्थूलाः शिवशास्त्रे विनिश्चिताः ॥ घोरा मिश्राः प्रशान्ताश्च मूर्तयस्ता मुनीश्वरैः ॥१४६॥ फलाभिलाषसहितैश्चिन्त्याश्चिन्ताविशारदैः ॥ घोराश्चेच्चिन्तिताः कुर्युः पापरोगपरिक्षयम् ॥१४७॥ सर्वसिद्धिप्रदा मिश्राः प्रशान्ताः शान्तिदायकाः ॥ सिध्यन्ति सिद्धयः शीघ्रं घोरे वपुषि चिन्तिते॥१४८॥ चिरेण मिश्रे सौम्ये तु न सद्यो न चिरादपि ॥ सौम्ये मुक्तिर्विशेषेण शान्तिः प्रज्ञा प्रसिध्यति ॥१४९॥ सिध्यन्ति सिद्धयश्चास्मात्क्रमशो नात्र संशयः ॥ श्रीकण्ठनाथं स्मरतां सद्यः सर्वार्थसिद्धयः ॥१५०॥ प्रसिध्यन्तीति मत्वैके तं वै ध्यायन्ति योगिनः ॥ स्थित्यर्थं मनसः केचित्स्थूलध्यानं प्रकुर्वते ॥१५१॥ स्थूले तु निश्चलं चेतो भवेत्सूक्ष्मे तु सुस्थितम् ॥ शिवे तु चिन्तिते साक्षात्सर्वाः सिध्यंति सिद्धयः ॥१५२॥ मूर्त्यन्तरेषु ध्यातेषु शैवी सिद्धिर्न सिद्ध्यति ॥ मूर्त्यन्तरेषु

---

मूर्ति (१४६) शिवाच्या या मूर्ति स्थूल आहेत, असें शिवशास्त्रांत निश्चित झालें आहे. त्यांत कांहीं घोर असून मिश्र आहेत, व कांहीं शांत आहेत असें ऋषीश्वर सांगतात. (१४७) ध्यान करणाऱ्यांनीं फलाभिलाष धरून या मूर्तींचें ध्यान करावें. घोर मूर्तींचें ध्यान केलें असतां पापांचा व रोगांचा क्षय होतो. (१४८) मिश्रमूर्ति सर्वसिद्धि देतात, प्रशांतमूर्ति शांतिसुख देतात. घोर मूर्तींचें चिंतन केलें तर सिद्धि लौकर मिळतात. (१४९) मिश्र मूर्तींचें ध्यान केलें तर पुष्कळ दिवसांनीं सिध्दि मिळते. सौम्य मूर्तींचें ध्यान केलें तर फार लौकर नव्हे, व फार सावकाश नव्हे, अशा मध्यम कालानें सिद्धि मिळते. सौम्याचें ध्यान केलें तर विशेषेंकरून मुक्ति मिळून शांति प्रज्ञा सिद्ध होतात. (१५०) यापासून क्रमानें सिद्धि प्राप्त होतात, यांत संशय नाहीं. श्रीकंठनाथ शिवाचें स्मरण केलें असतां तात्काळ सर्वार्थसिद्धि मिळतात. (१५१) सर्व सिध्दि मिळतात अशा समजुतीनें कांहीं योगी त्याचेंच ध्यान करतात. कांहीं लोक स्थितीकरतां (रक्षणाकरितां) स्थूल मूर्तींचें ध्यान करतात. (१५२) स्थूल ध्यानांत मन निश्चल होतें, सूक्ष्म ध्यानांत मन सुस्थित होतें. शिवाचें चिंतन केलें तर सर्वसिद्धि सिद्ध होतात. (१५३) अन्य मूर्तींचें ध्यान केलें तर शैवी सिद्धि मिळत नाहीं.

ध्यातेषु शिवरूपं विचिन्तयेत् ॥१५३॥ रुच्यभ्यासादिना यद्यच्छिवरूपं विचिन्तयेत् ॥ लक्षयेन्मनसः स्थैर्यं तत्तध्द्‌यायेत्पुनःपुनः ॥१५४॥ ध्यानमादौ सविषयं ततो निर्विषयं जगुः ॥ तत्र निर्विषयं ध्यानं नास्तीत्येव सतां मतम् ॥१५५॥ बुध्देर्हि सन्ततिः काचिध्द्‌यानमित्यभिधीयते ॥ तेन निर्विषया बुध्दिः केवलेह प्रवर्त्तते ॥१५६॥ तस्मात्सविषयं ध्यानं बालार्ककिरणाश्रयम् ॥ सूक्ष्माश्रयं निर्विषयं नापरं परमार्थतः ॥१५७॥ यद्वा सविषयं ध्यानं तत्साकारसमाश्रयम् ॥ निराकारात्मसंवित्तिर्ध्यानं निर्विषयं मतम् ॥१५८॥ निर्बीजश्च सबीजश्च तदेव ध्यानमुच्यते ॥ निराकाराश्रयत्वेन साकाराश्रयतस्तथा ॥१५९॥ तस्मात्सविषयं ध्यानमादौ कृत्वा सबीजकम् ॥ अन्ते निर्विषयं कुर्यान्निर्बीजं सर्वसिद्धये ॥१६०॥ प्राणा-

---

अन्य मूर्तींचें ध्यान केलें तरी शिवरूपाचें चिंतन करावें. (१९४) आपल्या अभ्यासाला जें जें शिवरूप आवडेल, त्याचें चिंतन करावें. त्याप्रमाणें मनाचें स्थैर्य करावें, व पुनः पुनः त्याचें ध्यान करावें. (१९५) प्रथम सविषय ( विषयसहित ) ध्यान करावें, नंतर निर्विषय ( विषय रहित ) ध्यान करावें. निर्विषय ध्यान नाहींच असें सज्जनांचें मत आहे. (१९६) बुध्दीची कोणीएक ध्यान नांवाची संतति आहे, असें सांगतात. यामुळें निर्विषय केवल बुध्दि या योगांत चालते. (१९७) सविषय ध्यान जें आहे, तें बालसूर्याच्या किरणांचा आश्रय करून राहिलें आहे, असें सांगतात. दुसरें निर्विषय ध्यान सूक्ष्माच्या ( शिवाच्या ) आश्रयानें राहिलें आहे. या दोन ध्यानावांचून दुसरें ध्यान खरोखर नाहीं, असें सज्जनांचें मत आहे. (१९८) किंवा सविषय ध्यान हें साकाराच्या आश्रयानें राहत असून निर्विषय ध्यान हें निराकाराच्या आश्रयानें राहत आहे, असें सांगतात. ( निराकार शिवतत्वाचें चिंतन हेंच निर्विषय ध्यान होय. ) (१९९) त्याच ध्यानामध्यें निर्बीज सबीज असे दोन प्रकार आहेत, व ते दोनी प्रकार साकाराच्या व निराकाराच्या आश्रयानें अनुक्रमानें राहतात. (१६०) याकरितां प्रथम सविषय सबीज ध्यान करून नंतर सर्वसिद्धि साधून घेण्याकरितां शेवटीं निर्विषय निर्बीज ध्यान करावें. (१६१) प्राणायामानें शांत्यादि दिव्य सिध्दि

यामेन सिध्यन्ति दिव्याः शान्त्यादयः क्रमात् ॥ शान्तिः प्रशान्तिर्दीप्तिश्च प्रसादश्च ततः परम् ॥१६१॥ शमः सर्वापदाञ्चैव शान्तिरित्यभिधीयते ॥ तमसोऽन्तर्बहिर्नाशः प्रशान्तिः परिगीयते ॥१६२॥ बहिरन्तःप्रकाशो यो दीप्तिरित्यभिधीयते ॥ स्वस्थता या तु सा बुद्धेः प्रसादः परिकीर्तितः ॥१६३॥ कारणानि च सर्वाणि सबाह्याभ्यन्तराणि च ॥ बुद्धेः प्रसादतः क्षिप्रं प्रसन्नानि भवन्त्युत ॥१६४॥ ध्याता ध्यानं तथा ध्येयं यच्च ध्यानप्रयोजनम् ॥ एतच्चतुष्टयं ज्ञात्वा ध्याता ध्यानं समाचरेत् ॥१६५॥ ज्ञानवैराग्यसम्पन्नो नित्यमुद्युक्तमानसः ॥ श्रद्दधानः प्रसन्नात्मा ध्याता सद्भिरुदाहृतः ॥१६६॥ ध्यै चिन्तायां स्मृतो धातुः शिवचिन्ता मुहुर्मुहुः ॥ अव्याक्षिप्तेन मनसा ध्यानमित्यभिधीयते ॥१६७॥ बुध्दिप्रवाहरूपस्य ध्यानस्यास्यावल-

---

क्रमानें साध्य होतात, शांति, प्रशांति, दीप्ति, प्रसाद वगैरे याच सिध्दि होत. (१६२) सर्व दुःखाच्या उपशमाला शांति असें ह्मणतात. आंतलें व बाहेरलें जें अज्ञान असेल, त्याचा नाश जो होतो, त्याला प्रशांति असें ह्मणतात. (१६३) आंतला व बाहेरला जो प्रकाश आहे ( अंतर्बहिर्ज्ञान ) त्याला दीप्ति असें ह्मणतात. बुद्धीच्या स्वास्थ्याला ( स्वस्थपणाला ) प्रसाद असें ह्मणतात. (१६४) बाहेरचीं व आंतलीं जीं सर्व कारणें असतील, तीं सर्व बुद्धीच्या प्रसादानें लौकर प्रसन्न होतात. (१६५) ध्याता, ध्यान, ध्येय, ध्यानाचें प्रयोजन या चार वस्तूंचें ज्ञान करून घेऊन ध्यानकर्त्यानें ध्यान करावें. (१६६) जो ज्ञानी असून वैराग्यशील आहे, व जो निरंतर सद्धुद्योग करितो, व उद्योग करण्याचें मन ज्याचें आहे, व ज्याची श्रद्धा आहे, व ज्याचा आत्मा नित्य प्रसन्न आहे, तोच खरा ध्याता आहे, असें सज्जन ह्मणतात. (१६७) 'ध्यै चिंतायां' चिंतनार्थी ध्यै धातु असल्यामुळें ध्यान याचा अर्थ चिंतन असा होतो, तर ध्यान ह्मणजे शिवचिंतन वारंवार करावें, असें सिद्ध झालें. मन दुसरीकडे न जाऊं देतां शिवचिंतन जें होतें, त्याला ध्यान असें ह्मणतात. (१६८) बुद्धीचा प्रवाह जो आहे, त्याला ध्यान ह्मणावें, त्या ध्यानाला जी वस्तु विषय झाली आहे, त्यालाच ध्येय असें

म्बनम् ॥ ध्येयमित्युच्यते सद्भिस्तच्च साम्बः स्वयं शिवः ॥१६८॥ विमुक्तिप्रत्ययः पूर्वमैश्वर्यञ्चाणिमादिकम् ॥ शिवध्यानस्य तस्यास्य साक्षाद्धुक्तं प्रयोजनम् ॥१६९॥ यस्मात्सौख्यञ्च मोक्षञ्च ध्यानादुभयमाप्नुयात् ॥ तस्मात्सर्वं परित्यज्य ध्यानयुक्तो भवेन्नरः ॥१७०॥ नास्ति ध्यानं विना ज्ञानं नास्ति ध्यानमयोगिनः ॥ ध्यानं ज्ञानञ्च यस्यास्ति तीर्णस्तेन भवार्णवः ॥१७१॥ ज्ञानं प्रसन्नमेकाग्रमशेषोपाधिवर्जितम् ॥ योगाभ्यासेन युक्तस्य योगिनस्त्वेव सिध्यति ॥१७२॥ प्रक्षीणाशेषपापानां ज्ञाने ध्याने भवेन्मतिः ॥ पापोपहतबुध्दीनां तद्वार्तापि सुदुर्लभा ॥१७३॥ यथा वह्निर्महादीप्तः शुष्कमार्द्रञ्च निर्दहेत् ॥ तथा शुभाशुभं कर्म ज्ञानाग्निर्दहते क्षणात् ॥१७४॥ अत्यल्पोऽपि यथा दीपः सुमहन्नाशयेत्तमः ॥ योगाभ्यासस्तथाल्पोऽपि महा-

---

ह्मणतात, ती ध्येय वस्तु साक्षात स्वतः शिवच होय. (१६९) प्रथम अणिमादि ऐश्वर्यांची सिद्धि प्राप्त होणें मागाहून मुक्तीचा प्रत्यय येणें हेंच शिवध्यानाचें मुख्य प्रयोजन ( फल ) आहे, असें सांगतात. (१७०) ज्याअर्थी ध्यानापासून सौख्य मोक्ष अशीं दोन फलें मिळतात, त्याकरितां सर्व सोडून मनुष्यानें ध्यान करावें. (१७१) ध्यानावांचून ज्ञान मिळत नाहीं, व अयोग्याला ध्यान करितां येत नाहीं. ध्यान आणि ज्ञान हीं दोन्ही ज्यानें साधिलीं आहेत, तो संसारसमुद्र तरला आहे, असें समजावें. (१७२) सर्व उपाधींनीं रहित, एकाच ठिकाणीं असलेलें, प्रसन्न असें ज्ञान योगाभ्यासानें जो युक्त असेल, त्या योग्यालाच साधतें. (१७३) ज्याच्या शरीरांतलीं सर्व पापें जळून गेलीं आहेत, त्यालाच ज्ञान व ध्यान संपादन करण्याची बुद्धि उत्पन्न होईल. ज्याची बुद्धि पापानें नष्ट झाली आहे, त्याला या दोहोंची वार्ता देखील लागावयाची नाहीं. (१७४) मोठ्यानें जळत असलेला अग्नि जसा ओलें व वाळलेलें जें येईल त्याला जाळून टाकतो, त्याप्रमाणें ज्ञानरूपअग्नि शुभाशुभ कर्माला जाळून टाकितो. (१७५) दीप जरी अतिशय लहान आहे, तथापि मोठ्या अंधाराचा देखील जसा नाश करून टाकितो, त्याप्रमाणें योग्याभ्यास जरी अल्प आहे, तरी मोठ्या पापाचा नाश

पापं विनाशयेत् ॥१७५॥ ध्यायतः क्षणमात्रं वा श्रद्धया परमेश्वरम् ॥ यद्भवेत्सुमहच्छ्रेयस्तस्यान्तो नैव विद्यते ॥१७६॥ नास्ति ध्यानसमं तीर्थं नास्ति ध्यानसमं तपः ॥ नास्ति ध्यानसमो यज्ञस्तस्माद्ध्यानं समाचरेत् ॥१७७॥ तीर्थानि तोयपूर्णानि देवान्पाषाणमृण्मयान् ॥ योगिनो न प्रपद्यन्ते स्वात्मप्रत्ययकारणात् ॥१७८॥ योगिनांच वपुः सूक्ष्मं भवेत्प्रत्यक्षमैश्वरम् ॥ यथा स्थूलमयुक्तानां मृत्काष्ठाद्यैः प्रकल्पितम् ॥१७९॥ यथेहान्तश्चरा राज्ञः प्रियास्युर्न वहिश्चराः ॥ तथान्तर्ध्याननिरताः प्रियाः शम्भोर्न कर्मिणः ॥१८०॥ वहिष्करा यथा लोके नातीवफलभागिनः ॥ दृष्टा नरेंद्रभवने तद्वदत्रापि कर्मिणः ॥१८१॥ यद्यन्तरा विपद्येत ज्ञानयोगार्थमुद्यतः॥ यो-

---

करून टाकितो. (१७६) क्षणमात्र कां होईना परंतु श्रद्धा ठेवून परमेश्वराचें ध्यान जो करितो, त्याला जें मोठें श्रेय मिळतें, त्याचा अंत लागत नाहीं. (१७७) ध्यानासमान दुसरें तीर्थ नाहीं, ध्यानासमान दुसरें तप नाहीं. ध्यानासमान दुसरा याग नाहीं, याकरितां मनुष्यानें ध्यान करावें. (१७८) तीर्थ ह्मणजे पाण्यानें भरलेले नदी नद वगैरे हे होय, व देव ह्मणजे दगडाच्या मातीच्या मूर्ति होत. तर अशा तीर्थांना व अशा देवांना योगी लोक शरण जात नाहींत, याला कारण हेंच कीं आत्मप्रत्यय ( शिवात्म्याचा प्रत्यय) यानें होत नाहीं. (१७९) योगी लोकांच्या ध्यानाला विषय ह्मणजे सूक्ष्म असें प्रत्यक्ष ईश्वराचें शरीर होय. काष्ठादिकांनीं तयार केलेलें स्थूलरूप अयोगी लोकांकरितां आहे, असें जाणावें. (१८०) जगांत राजाच्या अंतःपुरांत राजाजवळ नेहमीं असणारे नौकर जसे राजाला प्रिय होतात, बाहेरचे होत नाहींत त्याप्रमाणें अंतर्ध्यानांत रत असलेले लोक शंभूला प्रिय होतात, तसे बाहेरचे कर्म करणारे लोक प्रिय होत नाहींत. (१८१) लौकिकामध्यें बाहेरच्या ( इतर राहणाऱ्या ) नौकरांना राजापासून विशेष फल मिळत नसून आंतल्या ( जवळ राहणाऱ्या ) नौकरांना जशीं बक्षिसें मिळतात, त्याप्रमाणें अंतर्ध्यानांत रत असलेल्या लोकांना जसें फल मिळतें, तसें फल कर्म करणाऱ्या लोकांना मिळत नाहीं. (१८२) योग करावयाकरितां उद्योग करीत असतां व ज्ञानयोगाकरितां झटत असतां

गस्योद्योगमात्रेण रुद्रलोकं गमिष्यति ॥१८२॥ अनुभूय सुखं तत्र सञ्जातो योगिनां कुले ॥ ज्ञानयोगं पुनर्लब्ध्वा संसारमतिवर्तते ॥१८३॥ जिज्ञासुरपि योगस्य यां गतिं लभते नरः ॥ न तां गतिमवाप्नोति सर्वैरपि महामखैः ॥१८४॥ द्विजानां वेदविदुषां कोटिं सम्पूज्य यत्फलम् ॥ भिक्षामात्रप्रदानेन तत्फलं शिवयोगिने ॥१८५॥ यज्ञाग्निहोत्रदानेषु तीर्थहोमेषु यत्फलम् ॥ योगिनामन्नदानेन तत्समस्तं फलं लभेत् ॥१८६॥ ये चापवादं कुर्वन्ति विमूढाः शिवयोगिनाम् ॥ श्रोतृभिस्ते प्रपद्यन्ते नरकेष्वामहीक्षयात् ॥१८७॥ सति श्रोतरि वक्ता स्यादपवादस्य योगिनाम् ॥ तस्माच्छ्रोता च पापीयांस्तद्दण्डः सुमहानतः ॥१८८॥ ये पुनः सततं भक्त्या भजन्ति शिवयोगिनः ॥ विन्दन्ति ते महाभोगानन्ते योगं च शाङ्करम् ॥१८९॥ भोगयोगार्थिभिस्तस्मात्सम्पूज्याः शिवयोगिनः ॥ प्रतिश्रयान्नपानाद्यैः

---

मध्येंच जर तो कालधर्माच्या ( मृत्यूच्या ) ताब्यांत गेला तर तो तात्काळ रुद्रलोकाला जातो. (१८३) तेथें सुखाचा उपभोग घेऊन योग्यांच्या घराण्यांत जन्म घेऊन ज्ञानयोग मिळवून संसार तरून मुक्तीला जातो. (१८४) जो मनुष्य योगाची नुसती गति जाणून घेण्याची इच्छा करितो, त्याला जी गति होते, ती गति मोठमोठाले यज्ञभाग केले तरी मिळत नाहीं. (१८५) वेदविद्वान कोटि ब्राह्मणांची पूजा केली असतां जें फल मिळतें, तें फल शिवयोग्याला नुसती भिक्षा वाढली तर मिळतें. (१८६) यज्ञ, अग्निहोत्र, दान, तीर्थ, होम हे केले असतां जें फल मिळतें, तें सर्व फल योग्यांना अन्नदान केलें तर मिळतें. (१८७) जे मूर्ख लोक शिवयोग्यांची निंदा करतात, व निंदा कानानें जे ऐकतात, ते सर्व पृथ्वीचा लय होईपर्यंत नरकयातना भोगतात. (१८८) निंदा ऐकणारा असेल तर निंदा करणारा त्याच्यापुढें ( श्रोत्यापुढें ) वाटेल तसें बडबडतो; नसेल तर कोणापुढें निंदा करतो! याकरितां निंदा करणाऱ्यापेक्षां निंदा ऐकणाऱ्याला शिक्षा मोठी सांगितली आहे. (१८९) जे लोक शिवयोग्याला नेहमीं भजतात, ते लोक या लोकांत अनेक सुखांचा उपभोग घेऊन शेवटीं शंकराच्या योगांत प्रवीण होतात. ( योगाला पावतात. ) (१९०) याकरितां ज्याला भोगयोगाची

शय्याप्रावरणादिभिः ॥१९०॥ योगधर्मः ससारत्वादभेद्यः पापमुद्ग-
रैः ॥ वज्रं तण्डुलवज्ज्ञेयं तथा पापेन योगिनः ॥१९१॥ न लिप्य-
न्ते च तापाद्यैः पद्मपत्रं यथाम्भसा ॥ यस्मिन्देशे वसेन्नित्यं शिवयो-
गरतो मुनिः ॥१९२॥ सोऽपि देशो भवेत्पूतः स पूत इति किं पुनः॥
तस्मात्सर्वं परित्यज्य कृत्यमन्यद्विचक्षणः ॥१९३॥ सर्वदुःखप्रहाणा-
य शिवयोगं समभ्यसेत् ॥ सिद्धयोगफलो योगी लोकानां हितका-
म्यया ॥१९४॥ भोगान्भुक्त्वा यथाकामं विहरेद्वात्र वर्तताम् ॥ अ-
थवा क्षुद्रमित्येव मत्वा वैषयिकं सुखम् ॥१९५॥ त्यक्त्वा विरागयो-
गेन स्वेच्छया कर्म मुच्यताम् ॥१९६॥ यस्त्वासन्नां मृतिं मर्त्यो दृ-
ष्ट्वारिष्टंच भूयशः ॥ सयोगारम्भनिरतः शिवक्षेत्रं समाश्रयेत् ॥१९७॥

---

कांक्षा असेल, त्यानें शिवयोग्याची सेवा करावी. शिवयोग्याशीं नम्रतेनें वागणें, अन्न देणें, पान देणें, शय्यादान करणें किंवा आंथरूण पसरून देणें, पांघरूण देणें वगैरे हीच शिवयोग्याची सेवा होय. (१९१) योगधर्म हा अति कठिण असल्यामुळें पापरूपी मुद्गरानें हाणलें तरी फुटत नाहीं. तांदुळांनीं वज्राला कितीही मारिलें तरी वज्राला जसा कोणताही विकार होत नाहीं, त्याप्रमाणें पापानें शिवयोग्याला कितीही हाणिलें तरी त्याला कांहीं होत नाहीं. (१९२) कमलाच्या पानावर पाणी कितीही ओतिलें तरी पाण्याचा स्पर्श कमलाला जसा होत नाहीं, त्याप्रमाणें शिवयोग्याला तापांचा स्पर्श होत नाहीं. ज्या देशांत शिवयोगी राहतो, (१९३) तो देश पवित्र होतो. अथवा पवित्र होतो, असें सांगण्यांत काय अर्थ आहे बरें ? याकरितां बुद्धिमानानें इतर सर्व कृत्य सोडून (१९४) शिवयोगाचा अभ्यास करावा, ह्मणजे त्याचीं सर्व दुःखें लयाला जातात. ज्या योग्याला योगाची सिद्धि व योगाचें फल मिळालें आहे, त्यानें जगावर उपकार करण्याकरितां (१९५) इहलोकांत यथेच्छ उपभोग घेत व विहार करीत फिरावें. अथवा विषयसुख हें तुच्छ आहे, असें मानून (१९६) विषयसुखाचा त्याग करून वैराग्याचा स्वीकार करून स्वेच्छेनें तुच्छ कर्म सर्व सोडून द्यावें. (१९७) आपलें मरण जवळ आलें असून तदनुसार वारंवार अरिष्टें आपल्या नजरेस दिसतात, अशा वेळेला योग करावयाच्या आरंभाला लागून त्यानें शि-

स तत्र निवसन्नेव यदि धीरमनातुरः ॥ प्राणान्विनापि रोगाद्यैः स्वयमेव परित्यजेत् ॥१९८॥ कृत्वाप्यनशनं वैधं हुत्वा चाङ्गं शिवानले ॥ क्षिप्त्वा वा शिवतीर्थेषु स्वदेहमवगाहनात् ॥१९९॥ शिवशास्त्रोक्तविधिवत्प्राणान्यस्तु परित्यजेत् ॥ सद्य एव विमुच्येत न चासावात्मघातकः ॥२००॥ रोगाद्यैर्वाथ विवशः शिवक्षेत्रं समाश्रितः॥ म्रियते यदि सोऽप्येवं मुच्यते नात्र संशयः ॥२०१॥ तथा विशिष्टं तत्रापि मरणन्तूत्तरोत्तरम् ॥ निवृत्त्यादिवशाद्देहो भूतेषु च विलीयते ॥२०२॥ स्वेच्छयोत्क्रम्य मरणं शिवक्षेत्रे विशेषतः ॥ उत्तमं सर्वमरणादुन्मनापदयोगदम् ॥२०३॥ शिवनिन्दारतं हत्वा पीडितः स्वयमेव वा ॥ यस्त्यजेद्दुस्त्यजान्प्राणान्न स भूयः प्रजायते॥२०४॥ शिवनिन्दारतं हन्तुमशक्तो यः स्वयं मृतः ॥ सद्य एव विमुच्येत

---

वक्षेत्रांत जाऊन राहावें. (१९८) धैर्य धरून उतावीळपणा न करितां शिवक्षेत्रांतच राहून रोगादिकावांचून आपण होऊन प्राण सोडावे. (१९९) प्राण सोडण्याचा क्रम असा आहे, कीं उपोषित राहून शिवाग्नींत विधिपूर्वक शरीराचा होम करावा, किंवा शिवतीर्थांत अवगाहन स्नानाच्या निमित्तानें आपला देह त्यांत टाकून (शिवतीर्थांत बुडून) प्राण सोडावे. (२००) शिवशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें विधिपूर्वक प्राणत्याग जो करतो, तो तात्काळ मुक्त होतो, परंतु तो आत्मघातकी होणार नाहीं. (२०१) किंवा रोगादिकांनीं परवश होऊन शिवक्षेत्रांत जो प्राण सोडतो, तो देखील याप्रमाणेंच मुक्त होतो, यांत संशय नाहीं. (२०२) या मरणांमध्यें देखील पुढील क्रमानें एकापेक्षां एक मरण श्रेष्ठ आहे, असें मानिलें आहे. निवृत्ति वगैरे उपायांनीं देह हा पंचभूतांमध्यें लीन केला जातो. ( त्या उपायांनीं मरण आणितां येतें.) (२०३) स्वेच्छेनें उत्क्रांति मरण येणें हें चांगलें मानिलें आहे, व त्यांत शिवक्षेत्रांत आलें तर त्याहून उत्तम होय. सर्व मरणांमध्यें उन्मनापद योगानें येणारें मरण उत्तम आहे, असें ह्मणतात. (२०४) शिवनिंदा जो करितो, त्याचे प्राण घेऊन स्वतः दुःखी होऊन दुस्त्यज प्राण जो सोडतो, तो पुनः जन्माला येत नाहीं. (२०५) शिवनिंदा करणाऱ्या प्राण्याचे प्राण घेण्यास जो असमर्थ असेल, त्यानें आपण होऊन प्राण सोडि-

त्रिःसप्तकुलसंयुतः ॥२०५॥ शिवार्थं यस्त्यजेत्प्राणाञ्छिवभक्तार्थमेव वा ॥ शिवाचारार्थमथवा शिवविद्यार्थमेव वा ॥२०६॥ न तेन सदृशः कश्चिन्मुक्तिमार्गस्थितो नरः ॥ तस्माच्छीघ्रतरा मुक्तिस्तस्य संसारमण्डलात् ॥२०७॥ एतेष्वन्यतमोपायं कथमप्यवलम्ब्य वा ॥ षडध्वशुध्दिं विधिवत्प्राप्तो वा म्रियते यदि ॥२०८॥ पशूनामिव तस्येह न कुर्यादौर्ध्वदेहिकम् ॥ नैवाशौचं प्रसज्येत तत्पुत्रादेर्विशेषतः ॥२०९॥ खनेद्वा भुवि तद्देहं दहेद्वा शुचिनाग्निना ॥ क्षिपेद्वाप्सु शिवास्वेव त्यजेद्वा काष्ठलोष्टवत् ॥२१०॥ अथैनमपि चोद्दिश्य कर्म चेत्कर्तुमीप्सितम् ॥ कल्याणमेव कुर्वीत शिवभक्तांश्च तर्पयेत् ॥२११॥ धनं तस्य भजेच्छैवं शैवी चेदस्ति सन्ततिः ॥ नास्ति चेत्तच्छिवे दद्यान्नाद्यात्पशुसन्ततिः ॥२१२॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे साङ्गयोगनिरूपणं नामैकोनत्रिंशोऽध्यायः

---

ले असतां आपल्या एकवीस कुलांसह तात्काळ तो मुक्त होतो. (२०६) शिवाकरितां, शिवभक्ताकरितां, शिवाचाराकरितां, शिवविद्येकरितां जो प्राण सोडतो, (२०७) त्याच्या बरोबरीचा दुसरा मुक्तिमार्गांत राहणारा कोणी नाहीं. ह्मणूनच या संसारापासून लौकर त्याला मुक्ति मिळते. (२०८) यामध्यें कोणता तरी एक उपाय करून षडध्वशुद्धि विधिपूर्वक करून जर मृत होईल, (२०९) तर त्याचें और्ध्वदेहिक कर्म पशूप्रमाणें करूं नये. विशेषेंकरून त्याच्या मुलांनीं व आप्तांनीं मृताशौच बाळगूं नये. (२१०) जमीन खणून त्यांत त्याचा देह पुरावा, किंवा शुद्ध अग्नीनें देह जाळून टाकावा, किंवा चांगल्या पाण्यांत नेऊन टाकावा, अथवा दगडा लांकडाप्रमाणें कोठेंतरी फेंकून द्यावा. (२११) या मृत मनुष्याकरितां कांहीं कर्म करावयाचें असल्यास मंगलकर कर्म करावें, व शिवभक्तांची तृप्ति करावी. (२१२) त्या मृत मनुष्याची धनदौलत काय असेल ती त्याचा मुलगा शिवभक्त असेल तर त्याच्या ताब्यांत द्यावी, नाहीं तर पशूप्रमाणें असणाऱ्या मुलाच्या ताब्यांत न देतां शिवालयांत शिवाकरितां देऊन टाकावी.

याप्रमाणें सांगयोगनिरूपण नांवाचा एकुणतिसावा अध्याय संपला.

## अथ त्रिंशोऽध्यायः

सूत उवाच ॥ इति स विजितमन्योर्यादवेनोपमन्योरधिगतमभिधाय ज्ञानयोगं मुनिभ्यः ॥ प्रणतिमुपगतेभ्यस्तेभ्य उद्भावितात्मा सपदि वियति वायुः सायमन्तर्हितोऽभूत् ॥१॥ ततः प्रभातसमये नैमिषीयास्तपोधनाः ॥ सत्रान्तेऽवभृथं कर्तुं सर्व एव समुद्ययुः ॥२॥ तदा ब्रह्मसमादेशाद्देवी साक्षात्सरस्वती ॥ प्रसन्ना स्वादुसलिला प्रावर्त्तत नदी शुभा ॥३॥ सरस्वतीं नदीं दृष्ट्वा मुनयो त्दृष्टमानसाः ॥ समाप्य सत्रं प्रारब्धं चक्रुस्तत्रावगाहनम् ॥४॥ अथ सन्तर्प्य देवादींस्तदीयैः सलिलैः शिवैः ॥ स्मरन्तः पूर्ववृत्तान्तं ययुर्वाराणसीं प्रति ॥५॥ तदा ते हिमवत्पादात्पतन्तीं दक्षिणामुखीम् ॥ दृष्ट्वा भागीरथीं तत्र स्नात्वा तत्तीरतो ययुः ॥६॥ ततो वाराणसीं प्राप्य मुदिताः सर्व एव ते ॥ तत्रोत्तरप्रवाहायां गंगायामवगाह्य च ॥७॥

---

सूत बोलला— (१) याप्रमाणें क्रोध जिंकलेल्या उपमन्यु ऋषीपासून श्रीकृष्णाला ज्ञान कसें मिळालें ? हें सर्व तेथें ( नैमिषारण्यांत ) बसलेल्या ऋषींना सांगून त्यांना नमस्कार करून त्यामुळें अर्थात पूतदेह ( पवित्र शरीर झालेला ) झालेला वायु तात्काळ संध्याकाळच्या वेळेस आकाशांत एकाएकीं नाहींसा झाला ( अंतर्धान पावला ). (२) दुसऱ्या दिवशीं प्रभातकाळीं नैमिषारण्यांतले सर्व तपस्वी ऋषि सत्राच्या शेवटीं अवभृथ स्नान करावयास उठले. (३) त्यावेळेस ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें साक्षात देवी सरस्वती नदी प्रसन्न व गोड पाण्याची होऊन सरळ वाहावयास लागली. (४) अशा सरस्वती नदीला पाहून सर्व ऋषींच्या मनाला मोठा आनंद झाला, नंतर प्रारंभ केलेला सत्रयाग समाप्त करून नदींत सर्वांनीं अवगाहन स्नान केलें. (५) नंतर त्या नदीच्या स्वच्छ पाण्यानें देवादिकांचें तर्पण करून पूर्वींची गोष्ट बोलत बोलत सर्व काशीक्षेत्रास आले. (६) तेव्हां वाटेंत हिमालयाच्या पायथ्यापासून येणारी दक्षिणेकडे तोंड करून जाणारी जी भागीरथी होती, तिला पाहून त्या नदींत स्नान करून सर्व तेथून निघून वर गेले. (७) नंतर आनंदानें काशीक्षेत्रांत येऊन तेथें उत्तरेकडे जिचा प्रवाह

अविमुक्तेश्वरं लिंगं दृष्ट्वाभ्यर्च्य विधानतः ॥ प्रयातुमुद्यतास्तत्र ददृशुर्दिवि भास्वरम् ॥८॥ सूर्यकोटिप्रतीकाशं तेजोदिव्यं महाद्भुतम् ॥ आत्मप्रभावितानेन व्याप्तसर्वदिगन्तरम् ॥९॥ अथ पाशुपताः सिद्धा भस्मसञ्छन्नविग्रहाः ॥ मुनयोऽभ्येत्य शतशो लीनाः स्युस्तत्र तेजसि ॥१०॥ तथा विलीय मानेषु तपस्विषु महात्मसु ॥ सद्यस्तिरोदधे तेजस्तदद्भुतमिवाभवत् ॥११॥ तदृष्ट्वा महदाश्चर्यं नैमिषीया महर्षयः ॥ किमेतदित्यजानन्तो ययुर्ब्रह्मवनं प्रति ॥१२॥ प्रागेवैषान्तु गमनात्पवनो लोकपावनः ॥ दर्शनं नैमिषीयाणां संवादं तैः सहात्मनः ॥१३॥ शुद्धां बुद्धिं ततस्तेषां साम्बे सानुचरे शिवे ॥ समाप्तिश्चापि सत्रस्य दीर्घपूर्वस्य सत्रिणाम् ॥१४॥ विज्ञाप्य जगतां धात्रे ब्रह्मणे ब्रह्मयोनये ॥ स्वकार्ये तदनुज्ञातो जगाम स्वपुरं प्रति ॥१५॥

---

आहे, अशा भागीरथींत स्नान करून (८) सर्वांनीं अविमुक्तेश्वर लिंगाचें दर्शन घेतलें. व विधानपूर्वक लिंगाची पूजा केली. नंतर तेथून जाण्याकरितां ह्मणून जेव्हां निघाले, तेव्हां आकाशांत सर्वांनीं उत्तम तेज पाहिलें. (९) तें तेज कोटि सूर्यांप्रमाणें भासत असून अतिशय आश्चर्यकर होतें, व दिव्य होतें, व आपल्या प्रकाशानें सर्व दिशा त्या तेजानें व्यापिल्या होत्या. (१०) नंतर सर्वांगावर भस्मचर्चन केलेले सिद्ध व पाशुपत असे हजारो मुनि त्या ठिकाणीं येऊन त्या तेजांत लपले. (११) ते तपस्वी, महात्मे ऋषि त्या तेजांत लपल्यानंतर ( ऐक्य पावल्यानंतर ) तात्काळ तें तेज तेथून नाहींसें झालें, तें एक सर्वांना आश्चर्यच वाटलें. (१२) तें मोठें आश्चर्य नैमिषारण्यांतल्या ऋषींनीं जेव्हां पाहिलें, तेव्हां ते सर्व हें काय झालें ? असें ह्मणत तें न समजून ब्रह्मारण्याला आले. (१३) इकडे हे नैमिषीय ऋषि जाण्याच्या अगोदर लोकांना पवित्र करणारा वायु ब्रह्मलोकाला जाऊन नैमिषारण्यांतल्या मुनींचें झालेलें दर्शन, व त्यांच्याशीं झालेला आपला वाद, (१४) व पार्वतीसहित परमेश्वराच्या ठिकाणीं झालेली त्यांची शुद्ध बुद्धि, सत्राकरितां बसलेल्या ऋषींच्या लांबलेल्या सत्राची समाप्ति, (१५) वगैरे हकिंकत जगाचें पोषण करणाऱ्या ब्रह्मयोनि ब्रह्मदेवाला सांगून आपलें काम करावयास

अथास्थानं गतो ब्रह्मा तुम्बुरोर्नारदस्य च ॥ परस्परं स्पर्द्धितयोर्गाने विवदमानयोः ॥१६॥ तदुद्भावितगानोत्थरसे माध्यस्थ्यमाचरन् ॥ गन्धर्वैरप्सरोभिश्च सुखमास्ते निषेवितः ॥१७॥ तदानवसरादेव द्वाःस्थैर्द्वारि निवारिताः ॥ मुनयो ब्रह्मभवनाद्बहिःपार्श्वमुपाविशन् ॥१८॥ अथ तुम्बुरुणा गाने समतां प्राप्य नारदः ॥ साहचर्येष्वनुज्ञातो ब्रह्मणा परमेष्ठिना ॥१९॥ त्यक्त्वा परस्परस्पर्द्धां मैत्रीश्च परमां गतः ॥ सह तेनाप्सरोभिश्च गन्धर्वैश्च समावृतः ॥२०॥ उपवीणयितुं देवं नकुलीश्वरमीश्वरम् ॥ भवनान्निर्ययौ धातुर्जलदादंशुमानिव ॥२१॥ तं दृष्ट्वा षट्कुलीयास्ते नारदं मुनिगोवृषम् ॥ प्र-

---

ब्रह्मदेवाची आज्ञा घेऊन आपल्या पुराला गेला. (१६) नंतर ब्रह्मदेव हा आस्थान मंडपांत बसला असतां आपसामध्यें मत्सर वाढवून गायनाच्या शहाणपणासाठीं वाद करीत नारद तुंबरु हे दोघे न्याय मागण्याकरितां ब्रह्मदेवापाशीं आले. (१७) तेव्हां त्या दोघांचा तंटा तोडण्याकरितां दोघांना गाण्यास सांगून त्या गायनाचा रस घेत, व त्यांची मध्यस्थी करीत ब्रह्मदेव सुखानें बसला होता, व त्याच्या भोंवती गंधर्व अप्सरा स्त्रिया बसल्या होत्या. (१८) अशा वेळेस हे नैमिषीय ऋषि तेथें आले, इतक्यांत तो आंत जाण्याचा समय नसल्यामुळें दारांत द्वारपाळांनीं ( पहारेकऱ्यांनीं ) त्या ऋषींचा मार्ग अडविला. अर्थात ते सर्व ऋषि ब्रह्मदेवाच्या वाड्याबाहेर आंत जाण्याच्या वेळेची वाट पाहत स्वस्थ बसले. (१९) इतक्यांत ब्रह्मदेवानें नारदास सांगितलें कीं, नारदा, गायनकलेमध्यें तुह्मी दोघे समान अहांत, विनाकारण आपसांत तंटा करूं नका. आजपासून दोघेही बरोबरीनें गा जा, असें ब्रह्मदेवाचें वाक्य ऐकून (२०) आपसांतली स्पर्द्धा सोडून परस्परांचे परस्पर मित्र झाले नंतर तुंबरु, व अप्सरा, गंधर्व यांना बरोबर घेऊन (२१) नकुलीश्वर ईश्वराची स्तुति करावयास ब्रह्मदेवाच्या घरापासून नारद निघून गेला, तेव्हां मेघमंडलांतून बाहेर निघालेल्या चंद्राप्रमाणे नारद दिसला. (२२) तेव्हां षट्कुलीय ऋषिश्रेष्ठांनीं मुनिश्रेष्ठ नारदाला पाहून त्याला नमन करून परमादरानें त्यांनीं शंभूचा समय कसा काय आहे? असा प्र-

णम्यावसरं शम्भोः पप्रच्छुः परमादरात् ॥२२॥ स चावसर एवायमितोऽन्तर्गम्यतामिति ॥ वदन्ययावन्यपरस्त्वरया परया युतः ॥२३॥ ततो द्वारि स्थिता ये वै ब्रह्मणे तान्यवेदयन् ॥ ततस्ते विविशुर्वेश्म पिण्डीभूयाण्डजन्मनः ॥२४॥ प्रविश्य दूरतो देवं प्रणम्य भुवि दण्डवत् ॥ समीपे तदनुज्ञाताः परिवृत्योपतस्थिरे ॥२५॥ तांस्तत्रोपस्थितान्पृष्ट्वा कुशलं कमलासनः ॥ वृत्तान्तं वो मया ज्ञातं वायुरेवाह पूर्वतः ॥२६॥ भवद्भिः किं कृतं पश्चान्मारुतेऽन्तर्हिते सति ॥ इत्युक्तवति देवेशे मुनयोऽवभृथात्परम् ॥२७॥ गङ्गातीर्थस्य गमनं यात्रां वाराणसीं प्रति ॥ दर्शनं तत्र लिंगानां स्थापितानां सुरेश्वरैः ॥२८॥ अविमुक्तेश्वरस्यापि लिंगस्याभ्यर्चनं सकृत् ॥ आकाशे महतस्तस्य तेजोराशेश्च दर्शनम् ॥२९॥ मुनीनां विलयं तत्र निरोधं तेजसस्ततः ॥ याथात्म्यावेदनं तस्य चिन्तितस्यापि चात्मभिः ॥३०॥

---

श्न केला. (२३) तोच समय हा आहे, इकडून आंत जा, असें बोलत बोलत लगबगीनें तो आंत गेला. (२४) इतक्यांत इकडे द्वारपालांनीं ब्रह्मदेवाला ब्राह्मण बाहेर आल्याची वर्दी दिली, नंतर आंतून निरोप आल्याबरोबर ब्रह्मदेवाच्या घरांत ते सर्व एकदम शिरले. (२५) दुरून ब्रह्मदेवाला पाहून जमिनीवर पडून देवाला दंडाकार नमस्कार केला. नंतर जवळ या असें ब्रह्मदेवानें सांगितल्यानंतर ब्रह्मदेवाच्या सभोंवतीं जाऊन ते बसले. (२६) बसलेल्या त्या ऋषींना पाहून ब्रह्मदेवानें त्या सर्वांना कुशल प्रश्न विचारिले. तुमचें वृत्त वायूनें मला पूर्वींच सांगितलें ह्मणून मला समजलें आहे, असेंही त्यानें ह्मटलें. (२७) जेव्हां वायु नाहींसा झाला, तेव्हां तुह्मीं काय केलें ? असें ब्रह्मदेवानें त्यांना विचारिलें. असें तें वाक्य ऐकून मुनींनीं अवभृथ स्नानापासून पुढें जें घडलें तें सर्व सांगितलें. (२८) गंगातीर्थाला गेलेलें, वाराणशीला प्रयाण केलेलें, त्या ठिकाणीं सुरेश्वरांनीं स्थापना केलेल्या लिंगांचें दर्शन झालेलें, (२९) अविमुक्तेश्वर लिंगाचें दर्शन, व एकवार केलेली पूजा, आकाशांत मोठें तेज पाहिलेलें, (३०) त्यांत मुनि लीन पावलेलें, त्या तेजाचा निरोध झालेलें, स्वतः कितीही विचार केला तरी त्याचें यथार्थ ज्ञान

सर्वं सविस्तरं तस्मै प्रणम्याहुर्मुहुर्मुहुः॥ मुनिभिः कथितं श्रुत्वा विश्वकर्मा चतुर्मुखः ॥३१॥ कम्पयित्वा शिरः किञ्चित्प्राह गम्भीरया गिरा ॥ प्रत्यासीदति युष्माकं सिद्धिरामुष्मिकी परा ॥३२॥ भवद्भिर्दीर्घसत्रेण चिरमाराधितः प्रभुः ॥ प्रसादाभिमुखो भूत इति भूतार्थसूचितम् ॥३३॥ वाराणस्यान्तु युष्माभिर्यद्दृष्टं दिवि दीप्तिमत् ॥ तल्लिंगसंज्ञितं साक्षात्तेजो माहेश्वरं परम् ॥३४॥ तत्र लीनाश्च मुनयः श्रौतपाशुपतव्रताः ॥ मुक्ता बभूवुः स्वस्थाश्च नैष्ठिका दग्धकिल्बिषाः ॥३५॥ प्राप्यानेन पथा मुक्तिरचिराद्भवतामपि ॥ सचायमर्थः सूच्येत युष्मदृष्टेन तेजसा ॥३६॥ तत्र वः काल एवैष दैवादुपनतः स्वयम् ॥ प्रयान्तु दक्षिणं मेरोः शिखरं देवसेवितम् ॥३७॥ सनत्कु-

---

न झालेलें, (३१) इत्यादि सर्व वृत्त सविस्तर त्याच्यापुढें सांगून वारंवार ब्रह्मदेवाला त्यांनीं नमस्कार केला. अशी हकिकत मुनींनीं जी सांगितली, ती विश्वकर्मा ब्रह्मदेव ऐकून (३२) किंचित शिरःकंपन करून ( मान डोलावून ) गंभीर वाणीनें तो बोलला. तुह्मांला ऐहिक पारत्रिक दोन्ही सिद्धि मिळतात, जा असें देवानें ह्मटलें. (३३) तुह्मी पुष्कळ वेळ याग करून श्रीशिवाची आराधना केली, ह्मणून श्रीशिवाचा प्रसाद होण्याची वेळ आली आहे, अशा झालेल्या हकिकतीची ही सूचना तुह्मांला मिळाली. (३४) वाराणसी क्षेत्रांत तुह्मी असतांना आकाशांत जें मोठें तेज तुमच्या दृष्टीस पडलें, त्याचें नांव लिंग हें असून तें साक्षात परमेश्वराचें श्रेष्ठ तेज होतें. (३५) त्या तेजांत वेदज्ञ पाशुपत ( पशुपतीचें व्रत करणारे ) मुनि जें लीन झाले, ते मुनि मोठ्या निष्ठेनें शिवाची सेवा केली होती, ह्मणून पाप सर्व धुवून घेऊन मुक्त होऊन शिवाच्या तेजांत जाऊन मिळाले. (३६) याच मार्गानें तुह्माला ही मुक्ति मिळेल, अशी सूचना तुह्मी पाहिलेल्या तेजानें केली, असें समजा. (३७) त्यांत तुह्मांला हा काल सहज दैवयोगानें आपण होऊन आला, असें समजा. याकरितां मेरूच्या शिखरावर जेथें देव वगैरे संचार करतात, त्याठिकाणीं तुह्मीं जा. (३८) ज्याठिकाणीं माझा मुलगा स-

मारो यत्रास्ते मम पुत्रः परो मुनिः ॥ प्रतीक्ष्यागमनं साक्षाद्भूतनाथस्य नन्दिनः ॥३८॥ पुरा सनत्कुमारोऽपि दृष्ट्वापि परमेश्वरम् ॥ अज्ञानात्सर्वयोगीन्द्रमानी विनयदूषितः ॥३९॥ अभ्युत्थानादिकं युक्तमकुर्वन्नास्तनिर्भयः ॥ ततोऽपराधात्क्रुद्धेन महोष्ट्रो नन्दिना कृतः ॥४०॥ अथ कालेन महता तदर्थे शोचता मया ॥ उपास्य देवं देवीञ्च नन्दिनञ्चानुनीय वै ॥४१॥ कथञ्चिदुष्ट्रता तस्य प्रयत्नेन निवर्त्तिता ॥ प्रापिता च यथापूर्वं सनत्पूर्वा कुमारता ॥४२॥ तदा हच महादेवः स्मयन्निव गणाधिपम् ॥ अवज्ञाय हि मामेष तथाहंकृतवान्मुनिः ॥४३॥ अतस्त्वमेव याथात्म्यं ममास्मै कथयानघ ॥ ब्रह्मणः पूर्वजः पुत्रो माभून्मूढ इति स्मरन् ॥४४॥ मयैष शिष्यस्ते दत्तो मम ज्ञानप्रवर्त्तकः ॥ धर्माध्यक्षाभिषेकश्च तव निर्वर्त्तयिष्यति ॥४५॥

---

नत्कुमार ऋषि बसला असेल, तेथें जाऊन त्याची भेट घ्या तेथें भूतांचा स्वामी जो नंदी, त्याची येण्याची मार्गप्रतीक्षा करीत तेथेंच तुह्मी सगळेजण रहा. (३९) पूर्वी सनत्कुमारानें श्रीशिवाचें दर्शन घेतलें, तथापि अज्ञानामुळें त्याला असा अभिमान झाला कीं, सर्व योग्यांमध्यें मीच श्रेष्ठ आहें, अशा दोषानें तो दूषित झाला होता, (४०) अर्थात शिवाला योग्य अभ्युत्थान वगैरे न देतां निर्भीत होऊन तसाच बसून राहिला. त्या अपराधामुळें नंदीला रोष येऊन तूं उंटाच्या योनीला जा असा शाप नंदीनें त्याला दिला. (४१) अशा खालीं पुष्कळ दिवस लोटले, मला त्याविषयीं दुःख फार झालें, ह्मणून पार्वतीसहित शिवाची आराधना करून नंदीचीही सेवा मी केली. (४२) त्या पुण्यानें त्याचें उष्ट्रत्व निघून गेलें (उंटाच्या योनींतून सुटला). पूर्ववत तो सनत्कुमारच झाला. (४३) तेव्हां महादेव हंसत हंसत गणेश्वराला ( नंदीला ) ह्मणाला कीं, माझ्या अपमानामुळें याला त्या अहंकाराचें प्रायश्चित्त ह्मणून उष्ट्र जन्म मिळाला. (४४) याकरितां हे नंदिन् माझें याथार्थ्य ( खरें रूप ) याला सांग. कारण कीं, ब्रह्मदेवाचा वडील मुलगा हा आहे, ह्मणून हा मूर्ख होऊं नये, असें लक्ष्यांत आणून याला उपदेश कर, (४५) माझ्या ज्ञानाचा विस्तार करणारा हा सनत्कुमार मीं तुला शिष्य करून दिला आहे, धर्माध्यक्षाचा अभिषेक कोणाला करावा, ही तुझी काळ-

स एवं व्याहृतो नन्दी सर्वभूतगणाग्रणीः ॥ पत्युराज्ञापनं मूर्ध्नो प्रीतः प्रतिगृहीतवान् ॥४६॥ तथा सनत्कुमारोऽपि मेरौ मदनुशासनात् ॥ प्रसादार्थं गणेशस्य तपश्चरति दुश्चरम् ॥४७॥ द्रष्टव्यश्च स युष्माभिः प्राग्गणेशसमागमात् ॥ तत्प्रसादार्थमचिरान्नन्दी तत्रागमिष्यति ॥४८॥ इति सत्वरमादिश्य प्रेषिता विश्वयोनिना ॥ कुमारं शिखरं मेरोर्दक्षिणं मुनयो ययुः ॥४९॥ तत्रस्कन्दसरो नाम सरः सागरसन्निभम् ॥ अमृतस्वादुशिशिरस्वच्छागाधलघूदकम् ॥५०॥ समन्ततः संघटितं स्फटिकोपलसञ्चयैः ॥ सर्वर्तुकुसुमैःफुल्लैश्छादिताखिलदिङ्मुखम् ॥५१॥ सौवर्णैरुत्पलैःपद्मैःकुमुदैस्तारकोपमैः ॥ तरंगैरभ्रसंकाशैराकाशमिव भूमिगम् ॥५२॥ सुखावतरणारोहैः स्थूलनीलशि-

---

जी दूर होईल, जा याला उपदेश कर. (४६) याप्रमाणें शिवाची आज्ञा झाल्याबरोबर सर्व भूतांमध्यें श्रेष्ठ नंदीनें पतीची आज्ञा मोठ्या प्रेमानें शिरसा मान्य केली. (४७) तसेंच इकडे सनत्कुमाराला मीं सांगितलें कीं मेरु पर्वतावर जाऊन नंदीची वाट पहा. अशी माझी आज्ञा ऐकून नंदीचा प्रसाद मिळविण्याकरितां तेथें तो तप करतो. (४८) तर तुह्मीही नंदी येण्याच्या अगोदर जाऊन सनत्कुमाराला भेटा. त्याच्यावर अनुग्रह करावयास नंदी लौकरच येणार आहे. (४९) असें सांगून त्या सर्व ऋषींना तिकडे ब्रह्मदेवानें पाठविलें. तेही सनत्कुमाराच्या भेटीसाठीं मेरूच्या दक्षिण शिखराकडे निघून गेले. (५०) तेथें स्कंदसर नांवाचें समुद्रासारखें एक तळें होतें, त्यांतलें पाणी गोड असून शिशिर ऋतूंतल्या पाण्याप्रमाणें स्वच्छ होतें, व पाणी विपुल असून हलकें होतें. (५१) तळ्याभोंवतीं स्फटिकांनीं व इतर दगडांनीं घोंटीव काम केलें होतें. त्या तळ्याभोंवतालचा जो बाग होता, त्या बागेंत सर्व ऋतूंत ( बारा महिन्यांत ) जीं फुलें यावयाचीं तीं फुलें नेहमीं येत असून त्या फुलांच्या वासानें दाही दिशा व्याप्त झाल्या होत्या. (५२) सोन्यासारखे कमल, पद्म, नक्षत्राप्रमाणें दिसणारे कुमुद यांनीं तें तळें भरलें असल्यामुळें अभ्रासारख्या तरंगांनीं सुशोभित झालेल्या आकाशाप्रमाणें जणूं भूमींतलें आंकाशच कीं काय ? असा भास होत असे. (५३) तळ्यां-

लामयैः ॥ सोपानमार्गैरुचिरैः शोभमानाष्टदिङ्मुखम् ॥५३॥ तत्र तत्रावतीर्णैश्च तत्रोत्तीर्णैश्च भूयशः ॥ स्नातैः सितोपवीतैश्च शुक्लकौपीनवल्कलैः ॥५४॥ जटाशिखायुतैर्मुण्डैस्त्रिपुण्ड्रकृतमण्डनैः ॥ विरागविशदस्मेरमुखैर्मुनिकुमारकैः ॥५५॥ घटैः कमलिनीपत्रपुटैश्च कलशैः शिवैः ॥ कमण्डलुभिरन्यैश्च तादृशैः करकादिभिः ॥५६॥ आत्मार्थे च परार्थे च देवतार्थे विशेषतः ॥ आनीयमानसलिलमात्तपुष्पश्च नित्यशः ॥५७॥ अन्तर्ज्जलशिलारूढैर्नीचानां स्पर्शशंकया ॥ आचारवद्भिर्मुनिभिः कृतभस्मांगधूलनैः ॥५८॥ इतस्ततोऽप्सु मज्जद्भिरिष्टशिष्टैः शिलागतैः ॥ तिलैश्च साक्षतैः पुष्पैस्त्यक्तदर्भपवित्रकैः ॥५९॥ देवाद्यमृषिमध्यश्च निर्वर्त्य पितृतर्पणम् ॥ निवेदयदभिज्ञेभ्यो

---

त सुखानें उतरण्याकरितां मोठमोठ्या काळ्या दगडांच्या पायऱ्या केल्या होत्या, चोहोंबाजूनें अशा सुंदर पायऱ्या केल्यामुळें सरोवराच्या आठही दिशा शोभत होत्या. (९४) त्या त्या पायऱ्यांवर कांहीं मुनि उतरत होते, व चढून कांहीं लोक येत होते, ते ऋषि तेथें स्नान करून शुभ्र उपवीत घालून स्वच्छ कौपीन नेसून व कांहीं लोक वल्कलें नेसून येत होते. (९५) त्यांत जटाधारी, शिखाधारी, मुंडी असे लोक असून कपाळाला त्रिपुण्ड्र लावलेले होते, व कडक वैराग्यामुळें स्वच्छ मंदहासानें युक्त मुख असलेले मुनिकुमार जिकडे तिकडे बसलेले होते. (९६) व घट ( घागर कळशी ) कमलाच्या पानाचें केलेलें पात्र, चांगले कलश, कमंडलु, तसलेच दुसरे करक वगैरे पात्र घेऊन (९७) आपल्याकरितां व देवपूजेकरितां, दुसऱ्याकरितां पाणी भरून घेऊन फुलें घेऊन रोज मुनिकुमार येत होते. (९८) नीच लोकांचा विटाळ होईल या भीतीनें कांहीं मुनिकुमार मधल्या पाण्यांतल्या दगडावर स्नान करताहेत, कांहीं आचारशील मुनि भस्मलेपन भस्मोद्धूलन करून उभे आहेत, (९९) कांहीं लोक आपआपल्या आवडत्या दगडावर उभे राहून इकडे तिकडे बुड्या मारीत आहेत, कांहीं लोक तीळ, अक्षता, फुलें, दर्भ, पवित्र वगैरे घेऊन (६०) देवतर्पण, ऋषितर्पण, पितृतर्पण करून ज्ञानी लोकांना सांगताहेत, व निरंतर स्नान करणाऱ्या ब्राह्मणांना सां-

नित्यस्नानगतान्द्विजान् ॥६०॥ स्थाने स्थाने कृतानेकबलिपुष्पसमीरणैः॥ सौरार्घ्यपूर्वं कुर्वद्भिः स्थण्डिलेऽभ्यर्चनादिकम्॥६१॥ क्वचिन्निमज्जदुन्मज्जत्प्रशस्तगजयूथपम् ॥ क्वचिच्च तृषया यातमृगीमृगतुरंगमम् ॥६२॥ क्वचित्पीतजलोत्तीर्णमयूरवरवारणम् ॥ क्वचित्कृततटाघातवृषप्रतिवृषोज्ज्वलम् ॥६३॥ क्वचित्कारण्डवरवैः क्वचित्सारसकूजितैः ॥ क्वचिच्च कोकनिनदैः क्वचिद्भ्रमरगीतिभिः ॥६४॥ स्नानपानादिकरणैः स्वसम्पदुपजीविभिः ॥ प्रणयात्प्राणिभिस्तैस्तैर्भाषमाणमिवासकृत् ॥६५॥ कूलशाखिशिखालीनकोकिलाकुलकूजितैः॥ आतपोपहतान्सर्वानामन्त्रयदिवानिशम् ॥६६॥ उत्तरे तस्य सरसस्तीरे कल्पतरोरधः॥ वेद्यां वज्रशिलामय्यां मृदुले मृगचर्मणि ॥६७॥ सनत्कुमारमासीनं शश्वद्बालवपुर्धरम् ॥ तत्कालमात्रोपरतं समाधेर-

---

गत आहेत, (६१) प्रत्येक स्थानांत बलिदान पुष्पदान वगैरे करीत आहेत, सूर्याला अर्घ्य वगैरे देऊन स्थंडिलावर पूजा वगैरे करीत आहेत, (६२) त्या तळ्याच्या दुसऱ्या कांहीं जागेंत मोठमोठाले हत्तींचे कळप पाण्यांत बुड्या मारताहेत, व पाणी उधळीत आहेत. कांहीं ठिकाणीं मृग, हरिणी, घोडे वगैरे तान्हेलेले असून पाणी पिण्याकरितां येताहेत. (६३) कांहीं ठिकाणीं मोर व हत्ती पाणी पिऊन वर येतात, कांहीं त्या तळ्याच्या कांठावर माजलेले पोळ शिंगांनीं माती उधळून कांठाला आघात करतात. (६४) कांहीं ठिकाणीं हंस कलकल करतात, कांहीं ठिकाणीं सारस ( चक्रवाक ) शब्द करतात, कांहीं ठिकाणीं कोक पक्षी ओरडत आहेत, कांहीं ठिकाणीं भ्रमर गुंजारव करतात. (६५) जे स्नान पानादि साधनांनीं तयार झाले आहेत, व जे आपल्या संपत्तीनें उपजीविका करीत आहेत, अशा प्राण्यांशीं प्रेमानें वरचेवर भाषण करतो कीं काय, असा जो भासतो, (६६) व तळ्याच्या कांठावरच्या झाडांच्या फांदींत घरटें करून राहिलेल्या कोकिलांचे रव ऐकून उन्हानें ते कोकिल त्रासले असतील अशा समजुतीनें त्यांना अहोरात्र हाक मारतो, कीं काय, असा जो भासतो, (६७) व त्या सरोवराच्या उत्तर तीरावर कल्पतरूखालीं वज्रशिळेनें केलेल्या वेदीवर घातलेल्या मऊ हरिणाच्या चर्मावर (६८) नेहमीं बालरूपानें राहणारा असा तो सनत्कुमार

चलात्मनः ॥६८॥ उपास्यमानं मुनिभिर्योगीन्द्रैरपि पूजितम् ॥ ददृशुर्नैमिषीयास्ते प्रणताश्चोपतस्थिरे ॥६९॥ यावत्पृष्टवते तस्मै प्रोचुः स्वागतकारणम् ॥ तुमुलः शुश्रुवे तावद्दिवि दुन्दुभिनिःस्वनः॥७०॥ ददृशे तत्क्षणे तस्मिन्विमानं भानुसन्निभं ॥ गणेश्वरैरसंख्येयैः संवृतंच समन्ततः ॥७१॥ अप्सरोगणसंकीर्णं रुद्रकन्याभिरावृतं ॥ मृदंगमुरजोद्धुष्टवेणुवीणारवान्वितं ॥७२॥ चित्ररत्नवितानाढ्यं मुक्तादामविराजितं ॥ मुनिभिः सिद्धगन्धर्वैर्यक्षचारणकिन्नरैः ॥७३॥ नृत्यद्भिश्चैव गायद्भिर्वादयद्भिश्च संवृतं ॥ वीरगोवृषचिन्हेन दिव्यविद्रुमयष्टिना ॥७४॥ कृतगोपुरसत्कारं केतुना मान्यहेतुना ॥ तस्य मध्ये विमानस्य चामरद्वितयान्तरे ॥७५॥ छत्रस्य मणिदण्डस्य चन्द्रस्येव शुचेरधः ॥ दिव्यसिंहासनारूढं देव्या सुयशसा सह ॥७६॥ श्रिया

---

ऋषि तेव्हां नुकताच स्थिर मनांतली समाधि उतरून विश्रांति घेत बसला होता, (६९) सभोंवतीं योगिश्रेष्ठ मुनि बसून त्याची सेवा करतात, अशा सनत्कुमाराला नैमिषारण्यांतल्या ऋषींनीं पाहून नमस्कार केला व त्याची स्तुति केली. (७०) इतक्यांत तो सनत्कुमार कांहीं प्रश्न करणार, असें पाहून आपण होऊन त्यांनीं आपल्या येण्याचें कारण सांगून टाकिलें, इतक्यांत आकाशांत दुंदुभीचा दाट अवाज ऐकूं आला. (७१) त्याचक्षणीं सूर्यासारखें तेजस्वी विमान दिसलें. त्यांत असंख्यात गणेश्वर चोहोंकडे बसले होते, (७२) व अप्सरा स्त्रियांचा समुदाय बसला होता, व रुद्रकन्या त्या विमानांत होत्या, कांहीं लोक मृदंग, वीणा, मुरज, किनरी वगैरे वाद्यें वाजवीत होते. (७३) त्या विमानाला चित्रविचित्र रत्नांचें छत असून सभोंवतीं मोत्यांच्या माळा लोंबत सोडल्या होत्या. मुनि, सिद्ध, गंधर्व, यक्ष, चारण, किन्नर (७४) वगैरे लोक नाचत होते, गात होते, व वाजवीत होते. वीरगोवृषाच्या (नंदीच्या) चिन्हाची उत्तम पोंवळ्याची काठी ज्याला शोभत आहे, (७५) असा ध्वज लोकमान्य होऊन विमानाच्या गोपुरावर शोभत होता. त्या विमानाच्या मध्यभागीं दोनी चामरांच्यामध्यें (७६) शुद्ध चंद्राप्रमाणें शोभणाऱ्या रत्नदंडाच्या छत्राखालीं उत्तम सिंहासनावर पार्वतीसह व कीर्ति, (७७) लक्ष्मी यांसह, शरीरानें व तीन डोळ्यांनीं शोभणारा शिव

च वपुषा चैव त्रिभिश्चापि विलोचनैः ॥ प्रकारैरपि कृत्यानां प्रत्यभिज्ञापकं प्रभोः ॥७७॥ अविलङ्घ्ये जगत्कर्तुराज्ञापनमिवागतं ॥ सर्वानुग्रहणं शम्भोः साक्षादिव पुरः स्थितं ॥७८॥ शिलादतनयं साक्षाच्छ्रीमच्छूलवरायुधं ॥ विश्वेश्वरं गणाध्यक्षं विश्वेश्वरमिवापरम् ॥७९॥ विश्वस्यापि विधातॄणां निग्रहानुग्रहक्षमं ॥ चतुर्बाहुमुदारांगं चन्द्ररेखाविभूषितं ॥८०॥ कण्ठमध्ये च कालेन कलंकेनाप्यलंकृतं ॥ सविग्रहमिवैश्वर्यं सामर्थ्यमिव सक्रियं ॥८१॥ समाप्तमिव निर्वाणं सार्वज्ञमिव संगतं ॥ दृष्ट्वा प्रहृष्टवदनो ब्रह्मपुत्रः सहर्षिभिः ॥८२॥ तस्थौ प्राञ्जलिरुत्थाय तस्यात्मानमिवार्पयन् ॥ अथासन्नतरे तस्मिन्विमाने चावनिं गते ॥८३॥ प्रणम्य दण्डवद्देवं स्तुत्वा व्यज्ञापयन्मुनीन् ॥ षट्कुलीया इमे दीर्घे नैमिषे सत्रमास्थिताः ॥ आगता ब्र-

---

बसला असून आपल्या कर्तव्याच्या प्रकारांनीं मी शिवच आहें असें सुचवीत होता. (७८) त्या जगत्कर्त्याच्या आज्ञेला मान देणारा, किंवा आज्ञारूपच हा आहे, कीं काय असा भासणारा, शंभूच्या अनुग्रहाचें रूपच असणारा, व साक्षात् शिवापुढें बसलेला, (७९) उत्तम शूलायुध धारण केलेला, जगाचा प्रभु ह्मणविणारा, गणाचा स्वामी, दुसरा शिवच कीं काय, असा भासणारा, शिलादाचा मुलगा तेथें शोभत होता. (८०) तो शिव जगाच्या पोषकांना निग्रह करण्यांत व त्यांवर अनुग्रह करण्यांत समर्थ होता त्याला चार बाहु असून त्याचे अवयव उत्कृष्ट होते, त्याच्या डोक्यावर चंद्राची रेषा शोभत होती, (८१) त्याच्या गळ्यामध्यें कालकूटाच्या कलंकानें एखाद्या दागिन्याप्रमाणें शोभा आली होती, व शरीरसहित ऐश्वर्याप्रमाणें जो शोभत आहे, क्रियासहित मूर्तिमंत सामर्थ्याप्रमाणें जो शोभतो, (८२) समाप्तीप्रमाणें निर्वाणच जो आहे, असा दिसतो, व सर्वज्ञाप्रमाणें जो संगत आहे, अशा शिवाला ब्रह्मर्षींसह सनत्कुमार पाहून आनंदयुक्त झाला. (८३) नंतर त्याला ( शिवाला ) आत्मसमर्पण करतो, कीं काय ? याप्रमाणें भासणारा तो सनत्कुमार हात जोडून उभा राहिला. नंतर तें विमान जवळ जमिनीवर आल्यानंतर (८४) देवाला ( शिवाला ) दंडाकार नमस्कार घालून स्तोत्र करून मुनींची विज्ञापना त्यानें केली. किंवा आलेल्या ऋषींची हकि-

ह्मणादिष्टा देवसेवाभिकांक्षया ॥८४॥ श्रुत्वा वाक्यं ब्रह्मपुत्रस्य नन्दी च्छित्वा पाशान्दृष्टिपातेन सद्यः॥ शैवं धर्मं चैश्वरं ज्ञानयोगं दत्वा भूयो देवपार्श्वं जगाम ॥८५॥ सनत्कुमारेण च तत्समस्तं व्यासाय साक्षाद्गुरवे ममोक्तं ॥ व्यासेन चोक्तं महितेन मह्यं मया च तद्वः कथितं समासात् ॥८६॥ नावेदविद्भ्यः कथनीयमेतत्पुराणरत्नं पुरशासनस्य ॥ नाभक्तशिष्याय न नास्तिकेभ्यो दत्तं हि मोहान्निरयं ददाति ॥८७॥ मार्गेण वेदानुगतेन यैस्तद्दत्तं गृहीतं पठितं श्रुतं वा ॥ तेभ्यो मुखे धर्मसुखं त्रिवर्गं निर्वाणमन्ते नियतं ददाति ॥८८॥ परस्परस्योपकृतं भवद्भिर्मया च पौराणिकमार्गयोगात् ॥ अतो गमिष्ये ऽहमवाप्तकामः समस्तमेवास्तु शिवं सदा नः ॥८९॥ सूते कृताशिषि गते मुनयः सुवृत्ता यागे च पर्यवसिते महिते प्रयागे ॥ काले कलौ

---

कत शिवापुढें सांगितली, कीं हे षटकुलीय ऋषि नैमिषारण्यांत पुष्कळ वेळ सत्रयाग करून ब्रह्मदेवाची आज्ञा घेऊन देवाच्या ( शिवाच्या ) सेवेकरितां येथें आले आहेत. (८५) सनत्कुमाराचें तें वाक्य ऐकून नंदीनें आपल्या दृष्टिपातानें त्यांचे पाश तात्काळ तोडून टाकिले, व शैव धर्म, ईश्वराचा ज्ञानयोग वगैरे त्यांना देऊन पुनः शिवाच्या बाजूला गेला. (८६) नंतर सनत्कुमारानें ते सर्व माझा गुरु जो व्यास त्याला सांगितलें, नंतर पूज्य व्यासानें तेंच मला सांगितलें, नंतर तेंच मी तुह्माला संक्षेपानें सांगितलें. (८७) वेदार्थ जो जाणीत नाहीं, त्याला हें पुराणांतलें रत्न शिवपुराण सांगूं नये. अभक्ताला, अशिष्याला, नास्तिकाला सांगूं नये. जर मोहानें सांगितलें, तर तो नरकाला जातो. (८८) वेदोक्तमार्गानें याचें दान केलें किंवा गृहण, पठन, श्रवण केलें तर त्यांना धर्म, अर्थ, काम हे साधून शेवटीं मोक्ष मिळतो. (८९) पौराणिक या नात्यानें तुमच्यावर माझे उपकार झाले, व श्रोते या नात्यानें माझ्यावर तुमचे उपकार झाले. आतां सर्व काम संपल्याप्रमाणें आहे, याकरितां मी जातों. आह्मां सर्वांना सर्वदा मंगल असो. (९०) नंतर असा आशीर्वाद करून सूत गेल्यानंतर सदाचारी ते सर्व ऋषि सत्रयाग समाप्त करून उठले, नंतर कलीमुळें काल हा दूषित झाला ह्मणून तेथून

च विषयैः कलुषायमाणे वाराणसीपरिसरे वसतिं वितेनुः ॥९०॥ अथ च ते पशुपाशमुमुक्षया स्वकृतया कृतपाशुपतव्रताः ॥ अधिगताखिलबोधसमाधयः परमनिर्वृतिमापुरनिन्दिताः ॥९१॥

इति श्रीशैवे महापुराणे वायवीयसंहितायामुत्तरभागे श्रीकृष्णोपमन्युसंवादे त्रिंशोऽध्यायः ॥३०॥ समाप्तोऽयमुत्तरभागः ॥

---

कांहीं लोक प्रयागाला जाऊन राहिले, कांहीं लोक वाराणसी क्षेत्राला जाऊन राहिले. (९१) अनंतर पशुपाशमोचन करणाऱ्या आपल्या कृतीनें सर्वांनीं पाशुपत व्रत करून उत्तम ज्ञान संपादन करून ते सर्व आनंदित होऊन परमसुखाला पावले.

याप्रमाणें श्रीशिवपुराणांतील वायवीयसंहितेंतील उत्तरभागांतील श्रीकृष्णोपमन्युसंवाद नांवाचा तिसावा अध्याय संपला.





---

सोलापूरः— “ श्रीदत्तप्रसाद ” छापखान्यांत छापिला.

याचें पटल पांचवें किंमत ८१, सहावें किंमत ८१, सातवें ८१। व नववें किं. ८८९ हीं निराळीं छापविलीं आहेत.

२०. **संक्षिप्त लिंगपूजाविधिः**–कित्येकांना रोज समग्र लिंगपूजा करतां येत नाहीं, सबब थोड्या वेळांत ( १५–२० मिनिटांत ) लिंगपूजा करतां यावी ह्मणून हा लहानसा ग्रंथ तयार केला आहे. किंमत ८८९.

२१. **वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलिपटः**–किंमत ८१.

२२. **व्यापारसाम्राज्य पूर्वार्धः**–किंमत १ रुपया.

२३. **शिवपरअभंगः**--किंमत ७ आणे.

२४. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणीः**--भाग १ ला. किंमत ५ आणे.

२५. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणीः**--भाग २ रा. किंमत ५ आणे.

२६. **शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणीः**--भाग ३ रा. किंमत ४ आणे.

२७. **मराठी सिद्धरामेश्वर चरित्रः**--किंमत ७ आणे.

२८. **वीरशैवदीक्षाविधि वीरमाहेश्वरदीक्षाविधिः**--वीरशैव सदाचारसंग्रहांतील प्रकरण ११ वें. किंमत १ आणा.

२९. **शिष्यवर्गसंप्रदायनिरूपणः**--( शिष्य कोणाला करावा याचा विचार ) वीरशैवसदाचारसंग्रहांतील प्रकरण १४ वें. किंमत १ आणा.

३०. **शिवपुराण वायवीयसंहिता पूर्वभागः**--मराठी अर्थासह किंमत २ रुपये.

यांपैकीं कोणत्याही ग्रंथाच्या एकदम दहा प्रती घेणारास एक प्रत बक्षिस मिळेल.

---

## छापत असलेले ग्रंथ.

१. **बसवेश्वरपुराणः**--(व्यासकृत भाग २ रा.) २. **संक्षिप्तविवाहविधि.**
३. **अनादिवीरशैवसारसंग्रहः**--भाग २ रा. ४. **भारतसारसंग्रह.**

वरील ग्रंथ मराठी अर्थासह लौकरच तयार होतील.

---

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

सोलापूर येथें रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचे दुकानीं व याशिवाय मुंबई, विजापूर व कलबुर्गा येथें रावसाहेब वारद यांचे दुकानीं विकत मिळतील.

